॥ श्रीराम ॥

# उपकारांचें स्मरण

## प्रार्थना

संशोधन आणि प्रकाशन, श्रीसमर्थमंदिर—जांब, श्रीसमर्थवाग्देवता-मंदिर—धुळें, या सत्कार्योत्तेजक सभेनें आरंभिलेल्या आणि चाल-विलेल्या त्रिविध कार्याच्या निमित्तानें केल्यापासून रामेश्वरपर्यंत व कराचीपासून कलकत्यापर्यंत बृहन्महाराष्ट्रांतील हजारों महाराष्ट्रियांशीं, मठपतींशीं व इतरांशीं प्रत्यक्ष संबंध आला असता ज्यांनीं ज्यांनीं कायेनें, वाचेनें, मनानें, धनानें, कागदपत्रें व पोथ्यापुस्तकें देऊन या त्रिविध कार्यास साहाय्य केलें व जे अद्यापि हि करीत आहेत, त्या सर्वांचे मजवर अगणित उपकार झाले व होत आहेत! या जवळच्या आणि दूरच्या पर्यटनात मला कित्येक उदारात्मे भेटले. त्यांच्या प्रेमळ अंतरंगाचा परिचय होऊन त्याची मैत्रींत परिणति झाली आहे. अशाचें मला नित्य कृतज्ञतापूर्वक स्मरण होत असतें.

मी सर्वांचा ऋणी आहे. अशी नुसती कबुली दिली म्हणजे ऋण फिटतें, असें थोडें च आहे? श्रीसमर्थ सर्वांचें कल्याण करोत व मनोरथ पुरवोत, अशी अहर्निश प्रार्थना करण्यापलिकडे मी कांहीं करूं शकत नाहीं. क्षमा करा, लोभ ठेवा, श्रीसमर्थचरणाचा निदिध्यास घ्या, त्याचे ग्रन्थ नित्य नियमानें वाचा, त्यात त्याना पहा, त्याचें ऐका, त्याची पुनरपि कृपादृष्टि झाल्यावाचून राहणार नाहीं, हा निश्चय असूं द्या.

समर्थदेवा सद्गुरुरामा। परम पुरुषा पूर्णकामा।
श्रीगुरुभजन न घडे आम्हा। गुरुभक्तांचीं धन्य जिणीं॥

श्री. स. वा. दे. मंदिर
१८६० ज्येष्ठ शु. १

शंकर श्रीकृष्ण देव

श्री

# रामदास आणि रामदासी

## भाग अट्ठाविसावा

गेल्या अठ्ठावीस वर्षांत वस्तुतः पस्तीस वर्षांत झालेलें

# श्रीरामदासी संशोधन

## द्वितीय खंड

## अनुक्रमणिका

## चित्रें





॥ श्रीराम ॥

गेल्या अठ्ठावीस वस्तुतः पसतीस वर्षांत झालेलें

# श्री रामदासी संशोधन

## द्वितीय खंड

## प्रस्तावना

### श्रीसमर्थवाग्देवतामंदिरांतील संग्रहाचें स्वरुप

भांडारगृहें भरलीं । परी असतीं आडकिलीं ।
हातास न येतां पिटीं । सर्व हि असात ॥ ७-२-१३

श्री सद्गुरु समर्थ रामदासस्वामींचा चरित्र वाचावें, स्थळें पहावीं, मठ शोधावे, ग्रन्थ मिळवावे, याला आरंभ शके १८२३-२४ त केला. कांहीं मोबदला पैसे देऊन, कांहीं अन्य तऱ्हेनें मदत करुन, कांहीं प्रेम संपादन करुन, कांहीं फुकट तर कांहीं भिक्षा मागून, कांहीं प्रयत्नानें तर कांहीं अकल्पित अचानक, अशी विपुल आणि अमोल हस्तलिखित ग्रन्थांची संपत्ति मिळत गेली. कोठें एक च शोधन काम व्हावें, तर कोठें गाव गाव गोळा कराव्या लागल्या, तर कोठें याहून हि जास्त हेलपाटे घालून काम साधलें नाहीं तें नाहीं च हें संशोधन संपलें, असें कधीं च होणार नाहीं, तें पुढें येणारांना अखंड चालू ठेवलें पाहिजे. ह्यांत स्वहित आहे आणि जनहित आहे. ह्यांत इहपरकल्याणाचा मार्ग सापडण्याचा फार संभव आहे. म्हणून तें अव्याहत चालूं राहिलें पाहिजे.

१८५२ पर्यंत मिळालेल्या

### संग्रहाची वर्णनात्मक यादी

करुन ती श्री रामदास आणि रामदासी मासिकाच्या द्वारें प्रकाशित करण्यास सुरुवात केली, म्हणून या ग्रन्थाचें नाव '**गेल्या अठ्ठावीस वर्षांत झालेलें श्रीरामदासी संशोधन**' असें ठेवण्यात आलें, पण वस्तुत त्यात १८५९ च्या चैत्रापर्यंतच्या संशोधनाचा समावेश झाला आहे. या ग्रन्थाचा सुमारें ५०० पृष्ठांचा पहिला खंड १८५५ च्या कार्तिकांत पुरा केला व आज हा सुमारें ६०० पृष्ठांचा दुसरा खंड प्रसिद्ध होत आहे.

पहिल्या खंडाची प्रस्तावना लिहित असतां या मंडळानें निरंतर संरक्षण करीत जावें व शक्य तर संवर्धन आणि यथावकाश प्रकाशन करीत होत रहील, अशी चिंता उद्भवली, म्हणून उदार धुरंधरमहाराजानें श्रीसमर्थांविषयींच्या प्रेमादरानें चाळीस पन्नास हजार रुपये सहज लीलेनें उभारून आपेल श्रीसमर्थांच्या जन्मस्थानीं श्रीसमर्थमंदिर उभें करून त्यांत १८५४ च्या चैत्र शु. ९ स अपूर्व समारंभानें श्रीसमर्थांची प्राणप्रतिष्ठा केली, त्या महाराष्ट्रास दहा पांच हजार रुपये खर्चून धुळें येथें

## श्रीसमर्थवाग्देवतामंदिर

उभारणें व त्यांत श्रीसमर्थवाग्देवतेची स्थापना करणें जड नव्हे, अशी घोषणा त्या खंडाच्या प्रस्तावनेंत च केली. श्रीसमर्थांच्या नांवांत विलक्षण जादु आहे. त्यांचें नुसतें नाव, ही एक शक्ति आहे. कोणा हि भिकाऱ्यानें त्यांच्या नांवावर सवाल टाकावा आणि महाराष्ट्रानें तो झेलावा, इतकी त्यांच्या विषयींची कृतज्ञताबुद्धि आज हि महाराष्ट्रांत जागृत आहे. सवाल होता दहा पांच हजारांचा आणि महाराष्ट्राकडून तत्काळ जबाब मिळाला पंधरा सोळा हजारांचा. १८५६ च्या अधिक आषाढ शुद्ध १२ स, म्हणजे श्रीकल्याण-स्वामींच्या पुण्यतिथीस–कल्याणस्वामी समाधिस्थ झाले त्या वर्षीं हि आषाढ च अधिक आला होता, ही त्यांतल्या त्यांत अपूर्वता–श्रीसमर्थवाग्देवतामंदिरासाठीं भूमिपूजन झालें, इमारतीस आरंभ झाला भाद्रपद शुद्ध ४ स आणि श्रीसमर्थचरणांकडे ज्यांचें अखंड चित्त आहे त्या श्रीसद्गुरुभक्त श्रीमंत सौभाग्यवती मातुःश्री महाराणी इंदिराबाई साहेब होळकर यांच्या हस्तें १८५७ च्या ज्येष्ठ शुद्ध १२ च्या शुभ मुहूर्तावर चिरस्मरणीय समारंभ होऊन मंदिराचें उद्घाटन झालें आणि त्यांत सर्व संग्रह सुरक्षित आणि व्यवस्थित जाऊन बसला. त्या च दिवशीं पांच मूलभूत शर्ती घालून विश्वस्तपत्र होऊन मंदिर आणि मंदिरांतील संग्रह तेरा नामांकित विश्वस्तांच्या हवालीं करण्यात आला.

## त्या मूलभूत शर्ती

( श्री ) मंदिरांत एकदां दाखल झालेलें कोणतें हि हस्तलिखित, मंदिर किंवा मंदिराचें आवार सोडून कोणत्या हि कारणानें बाहेर जातां कामा नये.

( रा ) जाति, धर्म, पंथ, वर्ण वगैरे विचारांत न घेतां कोणा हि अभ्यासकास मंदिरांतील कोणतें हि हस्तलिखित, मंदिराच्या अधिकाऱ्याच्या नजरेखालीं, लिखिताची पूर्ण काळजी घेऊन, नुसतें पाहातां येईल, तासून पाहातां येईल, उतरून घेतां येईल, त्याचा फोटो काढून घेतां येईल.

( म ) मंदिरातील कोणता हि ल्हान मोठा ग्रंथ किंवा हस्तलिखित कोणास प्रकाशित करावयाचें असल्यास त्यानें विश्वस्तमंडळाची परवानगी घेतली पाहिजे मंदिरातील कोणता हि ग्रंथ किंवा लिखित प्रकाशित करण्याचा पहिला हक्क सत्कार्योत्तेजक सभेकडे राहील तो ग्रंथ किंवा लिखित प्रकाशित करण्याला विश्वस्तमंडळ सभेला जरूर ती मुदत देईल त्या मुदतींत सभेनें प्रसिद्ध न केल्यास, विश्वस्तमंडळास योग्य वाटल्यास, ज्यानें परवानगी मागितली असेल त्यास विश्वस्तमंडळ तशी परवानगी देऊ शकेल

( दा ) विश्वस्तमंडळातील कोणी हि सभासद कोणत्या हि कारणानें कमी झाल्यास त्याच्या जागीं बाकीच्या सभासदानीं योग्य अशा सद्गृहस्थाची नेमणूक करावी

( स ) सत्कार्योत्तेजक सभेचा चिटणीस हा अधिकारपरत्वें विश्वस्तमंडळातील एक सभासद असावा.

येणें प्रमाण होत तेव्हांपासून प्रतिवर्षी ज्येष्ठ शुद्ध १३ चा दिवस मंदिरातर्फे व्याख्यानप्रवचनद्वारा साजरा केला जातो

## या हस्तलिखित संग्रहांत

श्रीसमर्थांचे वाङ्मय संपूर्ण आहे, सांप्रदायिक वाङ्मय हि बहुतेक आहे आणि इतर सर्व ज्ञात आणि शेकडों अज्ञात अशा संतकवींचे अनेक ग्रन्थ आहेत हा संग्रह पाहून जाणत्यानें असें मत झाले आहे कीं, यापुढें कोणत्या हि प्राचीन महाराष्ट्रीय कवीच्या काव्याची कोणास शुद्ध आणि संपूर्ण आवृत्ति काढणें झाल्यास त्यास या संग्रहाकडे वळणें च पाहिजे तसें न करतां कोणी परभारें प्रकाशन करील तर आपणांस मंदिरात बसून म्हणता येईल कीं, तें त्याचें प्रकाशन अशुद्ध आणि अपूर्ण झालें आहे इतका हा संग्रह व्यापक आहे साहजिक आहे श्रीसमर्थांचे मठ म्हणजे इतरीं

## विद्यापीठें

होती मठस्थापनेपासून तों सुमार शंभर वर्षां पूर्वीपर्यंत त्या मठातून लेखनक्रिया अखंड चालत असे त्या मठातून श्रीसमर्थांच्या ग्रन्थाच्या आणि प्रकरणाच्या प्रती तर होत च, पण वेळोवेळीं जे मठपति विराजमान होत त्याचा पूर्वी जे जे संतकवि होऊन गेले असतील, त्या सर्वांच्या काव्याच्या प्रती करण्यात येत असत श्रीसमर्थांनीं आपल्या शिष्यांना परंपरेनें हा दंडक च घालून दिलेला होता श्रीमत् ग्रन्थराज दासबोधांत लेखनक्रियेवर स्वतंत्र समास आहे, त्याची आवश्यकता काय होती, तें हा संग्रह पाहून कळतें मग वाटत नाहीं, दुसऱ्या कोणाच्या हि ग्रन्थांत लिहिण्याचा कागद कसा असावा, लिहिण्याचे वेळीं काय काय कोणतें सामान जवळ

असावें, शाई कशी करावी, पान कसें रेखाटावें, पानाच्या चारी बाजूस स्थळ या सोडावें, अक्षर केवढें काढावें, लिहाव कसें, पोथीच्या वरखालीं फळ्या लावण्यास कोठून आणाव्या, त्यावर चित्रें कशीं काढावीं, पोथ्याना कसें आणि किती जपावें, इतकी बारिकसारिक सुद्धा माहिती इतक्या साक्षेपानें दिलेली असेल! मी जन्मलों त्याच्या आधी पन्नास वर्षें जन्माला यावयाला पाहिजे होतें. वाईट वाटत त्या पन्नास वर्षांच्या अवधात पोथ्यापुस्तकाची आणि कागदपत्राची फार नासधूस झाली रार वोलावयाचें तर आम्ही हा जो संग्रह मिळविला तो मठामठात उरलेला पोथ्यापुस्तकाचा केर होता तो केर आज इतक्या मोलाचा आहे! मग ज्या वेळीं हे सारे मठ आपल्या ऐन वैभवात असताल, त्या वेळा तो संग्रह किती प्रचंड, किती सुंदर, किती महत्त्वाचा असेल, याची कल्पना करा हा नुसता कर आज लक्षावधि रुपये मोलाचा आहे व त्यात हि

**पहिलें अक्षर जें काढिलें । ग्रंथ सपे तों पाहात गेलें ।**
**येका टाकें चि लिहिलें । ऐसें वाटे ॥ १९-१-४**

या नमुन्याचा हजारों बाडें व पोथ्या आहेत

श्रीसमर्थवाग्देवतामंदिर हा अपूर्व संस्था आहे अशी दुसरी संस्था नाहीं व होणें शक्य नव्हे कोठून तरी गोळा करून एकत्रित केलेला संग्रह, या मंदिरातील संग्रहाच्या दसपट मोठा होऊ शकेल, पण या संग्रहात जी सूत्रबद्धता आहे, ती त्यात आढळावयाची नाहा हा संग्रह म्हणजे

## श्रीसमर्थवाग्देवतेचा पूर्णावतार

होय तो दुसरीकडे कोठें पहावयास मिळावयाचा नाहा

श्रीसमर्थप्रताप या श्रीसमर्थांच्या अत्यन्त महत्त्वाच्या चरित्रग्रन्थात समास सोळावा आणि सतरावा या दोन समासात श्रीसमर्थसदनीं झालेल्या महापुरुषाचीं भोजनें प्रतापकारानीं वर्णिलीं आहेत श्रीमत् जगद्गुरु आद्य श्रीशंकराचार्यापासून तों प्रतापकार गिरिधर यांच्या वेळेपर्यंतची सर्व संतमंडळी भोजनास आलेली आहेत व त्याच्या पंगतीमागून पंगती उठत आहेत असें वर्णन त्या समासात केलेलें आहे गिरिधरानीं त्या समासात एक एका संतकवीचें नाव घेऊन त्याच्या मुख्य ग्रन्थातील जो वर्ण्य विषयरस तो त्याच्या पात्रात वाढला आहे श्रीसमर्थप्रताप ग्रन्थ मी प्रथम वाचला, तेव्हा मला ही सारी कविकल्पना वाटली पण आता श्रीसमर्थवाग्देवतामंदिरातील हा विविध संग्रह पाहून गिरिधराच्या वर्णनाची यथार्थता प्रत्ययास येत आहे आपआपल्या ग्रन्थाच्या रूपानं ते सारे प्राचीन आणि अर्वाचीन, भूत आणि वर्तमान संत श्रीसमर्थांच्या घरीं भोजनास उपस्थित होते, हे निर्विवाद सत्य होय. ती बहुतेक मंडळी आज श्रीसमर्थवाग्देवतामंदिरात येऊन बसली आहेत त्या पंगती आज या मंदिरात उठत आहेत तीं सारा

# विविध रसांचीं भांडीं

आज येथें मंदिरात आहेत. त्यात सर्व रस आहेत. ज्याला ज्या रसाची अपेक्षा असेल त्यास तो रस येथें मिळेल रामरसानें भरलेलें भांडें तर पुष्कळ च आहेत. पण कृष्णरस आणि विठ्ठलरस यांचा हि भांडीं थोडीं थोडकीं नाहीत. हवा तो रस येथें आहे. मन्नरस आहे, परमानंदरस आहे अद्वैतरस तर आहे च, पण कोणास द्वैतरसाची आवड असल्यास तो हि आहे नामामृतरस तर बहुधा प्रत्येक भांड्यातील रसात मिश्रित आहे. विवेकसिंधुरस आणि परमामृतरस यानीं भरलेलीं भांडीं पाच पन्नास भरतील. जयदेवाचा गीतगोविंदरस आहे. न्नानाळच्या आनंदमूर्तींनीं गुरुभक्तिप्रेमरसानें तुडुंब भरून ठेवलेलीं कित्येक भांडीं येथें आहेत. गीतार्णवरस आहे, ज्ञानरस आहे, निवृत्तिरस आहे, मुक्तिरस आहे. दामाजीपंतांचा भूतदयारस आहे. तुम्ही आठवाल तो रस येथे आहे च आहे. नाहीं कोणता? गीतारस, भागवतरस, भारतरस, रामायणरस, ब्रह्मानंदरस, कथामृतरस, हरिरस, हरिहरैक्यरस, गोपाळरस, नादब्रह्मरस, कीर्तनामृतरस, स्मरणामृतरस, स्वानंदरस, आत्मरस, उद्बोधरस, इत्यादि सर्व वाद्य रस येथें आहेत. कोणास वीररसाची गोडी असेल तर तो हि त्यास मिळण्याची येथें सोय आहे. श्रीसमर्थवाग्देवतामंदिर सर्वांचे कोड पुरवील. श्रीसमर्थांच्या घरीं कांहीं कमी नाहीं. रस आहेत, तशीं पक्वान्नें हि आहेत. मोदक, जिल्बी, पुलाव, कानवले, चुर्मालाडू, पुरणपोळी, साधें पक्वान्न हवें असल्यास रोटगे, शिखरण, खिचडी, तूपभात, दूधभात, दहिभात इत्यादि ज्यास जें रुचेल आणि पचेल, असें पक्वान्न हि येथें आहे. तथापि श्रीसमर्थवाग्देवतामंदिरात

## मुख्यतः आमच्या श्रीसमर्थांनीं

**निगमकल्पतरूचें विशाळ अमृतफळ।**
**अपार ब्रह्मरस काढिला परम निर्मळ।**
**संतसज्जनांसी वाढिला सकळ।**
**श्रीरामदासस्वामीसमर्थ॥ स. म. १७-४२**

हें रसभरित म्हणजे रसविषयींचें वर्णन वाचून वाचकांपैकीं कदाचित् कोणी मला च विचारतील कीं, तुम्ही श्रीसमर्थवाग्देवतामंदिरात रसाचीं इतकीं भांडीं आणून ठेवलीं, पण त्यांपैकीं एखाद्या तरी रसाची चव तुम्ही स्वत घेतली आहे काय? धावून उत्तर देतों, नाहीं! इतकें माझें भाग्य नाहीं! इतरासाठीं आंब्याचा रस काढणारा रस काढतो व काढणें झाल्यावर हात धुण्यास जातो, तेव्हां हाताला लागलेला थोडासा रस असतो तो, शक्य तर कोणाच्या नजरेस न पडता, हळू च चाटतो, तद्वत् मी फार तर थोडथोडा रस चाटला आहे, पण पचला वगैरे गुरफटला गान

नाहीं. ही सारी तयारी तुम्हांकरिता करून ठेवलेली आहे. तुम्हा सर्वांची भोजनें झाल्यावर मी फार तर, आपलें उच्छिष्ट प्रसाद म्हणून सेवन करीन.

आपलीं भोजनें झाल्यावर मागच्या पंक्तीसाठीं काही उरेल किंवा नाहीं, अशी कोणी शंका घेणें नको यातल्या कोणत्या हि रसाची कोणती हि चरवी उचला आणि तोंडाला लावून तृप्ती होई तों सेवन करून चरवी खालीं ठेवा, तों ती पुन्हा जशीच्या तशी च काठोकाठ भरलेली आढळेल! साधुसंताच्या चरित्रात असल्या चमत्काराच्या गोष्टी सांगतात, पण येथें तसा

## प्रत्यक्ष अनुभव

येत आहे. १५८१ पासून आजतागाईत, न जाणो कोट्यवधी जीवांना श्रीमत् ग्रन्थराज दासबोधातील ' अहं ब्रह्मास्मि ' महावाक्याचा ब्रह्मरस सेवन केला असेल व यावच्चंद्रदिवाकरौ असंख्य जीव करीत राहतील, पण म्हणून त्यातला एक बिंदु तरी कमी झाला आहे किंवा होईल काय ? तेव्हा आपल्या मागाहून भोजनारा येणाऱ्या पिढ्यांची काळजी न करता विद्यमान महाराष्ट्रीयानीं आपल्या अभिरुची-प्रमाणे श्रीसमर्थवाग्देवतामंदिरातील रसपान यथेच्छ करावें, अशी प्रार्थना आहे

विविध रसानीं एकंदर १८७५ चरव्या भरलेल्या आहेत किंत्येक मोठ्या चरव्याच्या पोटात अनेक लहान लहान चरव्या ठेवलेल्या आहेत त्या सर्वांना स्वतंत्र अनुक्रमांक दिले तर ३००० वर चरव्या भरतील म्हणजे इतक्या धारांची व त्यातील, न जाणो, १०।११००० लहान मोठ्या प्रकरणाची नोंद होऊन ती मंदिरात व्यवस्थित रीतीनें क्रमश लावून ठेवलेली आहेत

त्याची वर्णनात्मक यादी म्हणजे संशोधनाचे हे दोन खंड होत ही यादी नसती तर हा समग्र, कोणाच्या उपयोगा न पडता, नुसता कपाटात च अडकून पडता. हे दोन खंड म्हणजे त्या कपाटाची खरी किल्ली होय, किंवा श्रीसमर्थ-वाग्देवतेचें दर्शन घडविणारे डोळे होत त्याच्या साहाय्यानें ज्याला जें अपेक्षित असेल तें क्षणार्धात कपाटाबाहेर येऊन त्याच्या हातीं पडू शकेल खडाना जोडलेली

## सूची

व्यापक आणि संपूर्ण आहे. नुसत्या या सूचीवरून नजर फेकण्याची कोणी कृपा करील, तर हा सर्व संग्रह सर्वतोपरि किती महत्त्वाचा आणि चिरंतन उपयोगाचा आहे, याची त्यास कल्पना होईल या क्षणीं हे दोन्ही खंड हातात असताना त्याच्याकडे पाहताना माझ्या चित्तात क्षणैक समाधानाचा तरंग उठला, तर वाचक मला क्षमा करणार नाहींत काय ? या संग्रहांत केवळ

## श्रीसमर्थांना धुंडावें

या स्वार्थबुद्धीनें जरी मी हा व्याप केला असला तरी त्यानें इतराचा हि कार्यभाग साधत आहे, असें मला वाटतें या संग्रहात सर्व ज्ञात साधुसताचे ग्रन्थ तर आहेत च, पण मला अशी कल्पना होते कीं, आजपर्यंत ज्यांचीं नावें हि महाराष्ट्राच्या कानावर आलीं नव्हतीं, असे चार पाचशें नवीन कवि या संग्रहांत आढळतील या सर्वांचा परामर्श घेण्याची बुद्धि महाराष्ट्रास केव्हा तरी होईल ना ? मंदिराचें उद्घाटन होऊन पुढच्या महिन्यात तीन वर्षे पूर्ण होतील या अवधांत मंदिर पाहण्यास हजारों स्त्रीपुरुष आले आणि कौतुक करीत गेले परतु

## प्रत्यक्ष वाग्देवतेचें दर्शन

घेण्यास दहा पाच दिवस थांबले आणि तिच्या सानिध्यात कांहीं तास खर्च केले, असे अवघे तिघे च होते ! अनुकूल काळ येऊन अशाची सख्या उत्तरोत्तर वाढत जावो, अशी प्रार्थना आहे साहित्यिकांच्या हि जाती आहेत आपल्या थोर पूर्वजाच्या आणि समकालीन साधुसताच्या कृतींकडे प्रेमानें, आदरानें, कौतुकाने, आत्महिताच्या लालसेनें पाहणाऱ्या साहित्यिकांची जी जात आहे, तिच्या हवालीं मी हे दोन्ही खड विश्वासानें करतो या जातीचे भाग्यवान् लोक राजे लोकांत आहेत, धनिकात आहेत, गरिबात आहेत स्त्रियात आहेत, पुरुषात आहेत, ब्राह्मणांत आहेत, क्षत्रियात आहेत, सर्वांत आहेत त्या सर्व विद्यमान आणि भावी भाग्यवतांना हे दोन्ही खड प्रणामपूर्वक अर्पण करितों या

## संग्रहाचें भवितव्य

श्रीसमर्थांनीं च सागून ठेवलेलें आहे त्यावर माझा पूर्ण विश्वास आहे व आपला हि असावा, अशी सर्वांच्या चरणीं प्रार्थना करून मी आता माझ्या जीवाच्या उद्योगाला सर्वस्वीं लागतों

| | | |
|---|---|---|
| श्रीसमर्थवाग्देवतामंदिर<br>धुळें<br>१८६० वैशाख शु १३ | } | शंकर श्रीकृष्ण देव |



# श्रीसद्गुरुस्तवन



॥ सद्गुरुचरणाशीं शरण श्रीगुरुचरणाशीं ॥

जे घरण पाहिले जांबुवातिये नगरीं ।
तेथून प्रकटले पंचवटीमंदिरीं ।
यात्रामिषें प्रवेशले वनवनांतरीं ।
भरतखंडामाझारी ॥ १ ॥

त्या चरणांची माती वंदिली सज्जनगडीं ।
तैशी च ती छत्रपतींच्या रायगडीं ।
तिच्यांत लोळलों तीर्थीं कुबडी ।
संप्रदायदीक्षेंत ॥ २ ॥

त्या चरणांचा महिमा अगाध ।
ज्या ज्या लागला त्यांचा वेध ।
ते ते स्वरूपीं मिनले प्रसिद्ध ।
संत महंत स्वामींचे ॥ ३ ॥

जन्मोजन्मीं त्या चरणांची सेवा ।
कांहीं घडावी मजला देवा ।
ऐसा मनीं धरूनि भावा ।
चरणीं मिठी घातली ॥ ४ ॥

अनन्य शरण त्या चरणांशीं ।
पुरवा सकळ मनोरथाशीं ।
मिळवा आपुल्या परंपरेशीं ।
कृपाकटाक्षेंकरूनि ॥ ५ ॥



श्री

# रामदास आणि रामदासी

## भाग अट्ठाविसावा

---

## गेल्या अट्ठावीस वर्षांत झालेलें

# श्रीरामदासी संशोधन

## द्वितीय खंड

---

॥ श्रीराम ॥

× × × ॥ × × × ॥ × × × ॥ × × × ॥ × × × ॥

इदुरबोधन येथें पहिल्या खेपेस जाऊन बाडाचें नुसतें गाठोडें बांधून ठेवता आलें. तें ठेवून श्रीसमर्थपंचायतनातील

## केशवस्वामींच्या समाधीचें दर्शन

घेण्यासाठीं १८२७ च्या पौष शु. ३ सह ४ स हैद्राबादेस जाऊन पोंचलों. केशवस्वामी राहणारे भागानगरचे व तेथें त्यांची समाधी आहे, हें ऐकून ठाऊक होतें. पण हैद्राबादेस महाराष्ट्रीय मंडळींत तपास करतां समाधी कोठें आहे, याचा च शोध लागेना ! श्रीराम पंडित ऊर्फ भाऊसाहेब रजलकर म्हणून एक प्रख्यात गृहस्थ गौळीगुड्यांत रहात होते. त्या वेळीं त्यांचे वडील बाबासाहेब ८०।९० वर्षांचे होते. केशवस्वामींच्या समाधीचें ठिकाण फक्त त्यांना ठाऊक होतें. तें दाखविण्यास येण्याची आमच्यासाठीं त्यांनीं तसदी घेतली. रंग्रेजगुड्याऱ्या पलीकडे मुसा नदीच्या काठीं एका शेतांत ती समाधी आहे, तेथें आम्ही गेलों आणि समाधी पाहिली ! समाधी पाहिली म्हणजे काय पाहिलें ? चौफेर मुसलमानाच्या मालकीच्या झालेल्या शेतांत एक चार पांच फूट उंचीचा कोनाडा बांधलेला होता व आंत उखळलेली जागा होती ! ही केशवस्वामींची समाधी होय ! आंत दगडाच्या पादुका पूर्वीं होत्या म्हणतात, पण त्या आतां गेल्या होत्या. भोंवतालची जमीन पूर्वीं समाधीकडे च होती म्हणतात, पण कोणी पर्वा न

केल्यामुळें ती वार्ता दुसऱ्यांची झाली होती. याचें केशवस्वामींना कांहीं सुखदुःख नाहीं. पण आपल्या मनाला वाईट वाटतें तें त्यांच्याकरितां नसून आपल्या च करितां होय. साधूचा देह जेथें शेवटीं पडला ती पुण्य भूमि होय. तिचें दर्शन आपणांस घडावें व तेणें करून आपलें मन पालटावें, म्हणून अशा भूमीचें रक्षण करावयाचें व पावित्र्य राखावयाचें. हैद्राबादेच्या महाराष्ट्रियांनीं व इतरांनीं मनावर घेतलें पाहिजे.

पुढें १८२८ च्या चैत्रवैशाखांत चरेगांव, कऱ्हाड, चाफळ, माजगांव, शेंद्रे, शिरगांव, मसूर, बहादुर, वडगांव, निगडी, कोरेगांव, सज्जनगड, वांई, कण्हेरी, पसरणी, बोरगांव, वाहे आणि पाली अशीं

## सातारा जिल्ह्यांतील अठरा ठिकाणें

क्रमशः घेतलीं. कोठें संग्रह होता, कोठें नव्हता. कोठचा तेव्हां किंवा पुढें मागें मिळाला, कोठचा तेव्हां हि नाहीं आणि अद्यापि हि मिळाला नाहीं. या अठरा ठिकाणांची किंचित् माहिती देऊन मिळालेल्या संग्रहाचें टांचण करावयाचें आहे.

( १ ) चरेगांव हें भक्तमंजरीमालाकार राजाराम प्रासादी यांचें गांव होय. त्यांनीं १७६९ त समाधी घेतली. त्यांची पुत्रपरंपरा चरेगांवीं होती. भक्तमंजरीमालेची मूळ प्रत हि तेथें मादत्या पाहण्यांत आली होती. सांप्रतीच मिळालेल्या प्रतीवरून तो ग्रंथ सभेनें प्रकाशित केला आहे. चरेगांवीं एक शेत श्रीसमर्थांच्या नांवावर चालतें, असें कळतें.

( २ ) कऱ्हाड येथील देशपांड्यांच्या घराण्यांतील आकामहाराज होत. बेणाबाई मिरजेच्या राहत्या, पण त्यांची मंडळी शेडवाळ स्टेशनपासून पांच कोसांवर चंदूर म्हणून चिकोडी तालुक्यांतील एक गांव आहे, तेथें राहतात, अशी माहिती कऱ्हाडास मिळाली. चंदुरास तपास करणें आहे.

( ३ ) चाफळचें वर्णन पहिल्या खंडांत येऊन गेलें च आहे. तें सर्वच खरें श्रीसमर्थांनीं पायाखालीं तुडविलेलें होतें. त्या रानांत जिकडे पहावें तिकडे श्रीसमर्थ दिसतील. तेथील डोंगर, घळी, वृक्ष, झरे, दगड, माती सर्व वस्तु पवित्र असून श्रीसमर्थांची आठवण करून देतील. त्यांतील संस्मरणीय वस्तूंचें टांचण श्री सांप्रदायिक विविध विषयांक ६६ वांत आलेलें असून अवलोकनांत असावें. समर्थांच्या वेळेला चाफळास जे देव्हारे होते ते पुढें पालीस हलवाव गेले.

( ४ ) माजगांव हें अकरा मारुतींपैकीं एका मारुतीचें स्थान होय. बाळाजी आवजी चिटणीसाच्या घराण्यापैकीं हणमतराव चिटणीस येथें राहतात. भास्येवाईक गृहस्थ आहेत, पण त्याचेजवळ कागदपत्राचा समह नाहीं.

( ५ ) चंद्रज येथें हि अकरापैकीं एक मारुती आहे. कल्याणांचे शिष्य केशव याचा येथें मठ आहे. त्याची समाधी कृष्णेच्या काठीं आहे. भाद्रपद वद्य ३० ही त्याची पुण्यतिथी होय. मठात ' आषाढ वद्य नौमी चित्रभान नाम संवछर गतकली ४८०३ ' म्हणजे शक १६२४ तील केशवाच्या हातची ग्रन्थराजाची प्रत आहे.

( ६ ) शिरगांव येथें आम्ही चैत्र व. १३ स पोंचलों. कल्याणांचे धाकटे बधु दत्तात्रय याचा येथें मठ आहे. दत्तात्रय गृहस्थाश्रमी होते. त्याची समाधी येथें च आहे त्याची पुण्यतिथी फाल्गुन वद्य १०. स्थान निवात, रमणीय आहे. श्रीसमर्थांनीं स्थापिलेल्या मारुतीची लहान मूर्ति येथें आहे. एक लहान व एक मोठी अशा श्रीसमर्थांच्या दोन तसबिरी आहेत. दत्तात्रय-राघव-यशवत अशी परपरा. यशवताचे पुत्र तीन : भीम, लक्ष्मण व मनोहर. हे भीम म्हणजे श्रीसमर्थांच्या दोन जुन्या चरित्रापैकीं एकाचे कर्ते. लक्ष्मण हे वडोद्याचे लक्ष्मणमहाराज व ग्वाल्हेरकडील परशुराम महाराज या दोन विख्यात रामदासियांचे गुरु होत.

( ७ ) मसूर येथील पाटीलकी मूळची जगदळ्याची, ती शहाजी राजे यांनीं स्वतःकडे घेतली व नतर श्रीसमर्थ येथें रहावयास आले. अकरापैकीं एक मारुती येथें आहे. येथें च श्रीसमर्थांनीं श्रीरामजन्मोत्सवाला सुरवात केली. श्रीसमर्थकालीन घरीं च घराणीं या गावीं आहेत.

( ८ ) शहापुर-मसूरपासून एक कोस, सतीबाईचें गाव, अकरापैकीं एका मारुतीचें स्थान. तजावरमठपति भीमस्वामी येथील होत. मठात कागदपत्र नाहींत, फक्त शक १७०५ तील ग्रन्थराजाची एक प्रत आहे. मठाच्या डाव्या बाजूला एकातात स्नानसंध्येला बसण्याची श्रीसमर्थांची गुफा आहे. सार्वजनिक रीतीनें जीर्णोद्धाराचें कार्य सुरू होण्यापूर्वी च या गुफेचा खाजगी नात्यानें जीर्णोद्धार करण्यात आला होता. गुफा उघड्यावर होती, तो तिचा पाऊसपाण्यापासून बचाव व्हावा म्हणून तिच्यावर छाया करण्यात आली. गावापासून पाव कोस राजणखिंड म्हणून एक खिंड आहे. तींत दगडाचीं

दोन मोठालीं रांजणें आहेत खरी. कोणाच्या वेळचीं आहेत, कोण जाणे. जवळ च एक महादेवाचा व दुसरा श्रीसमर्थांचा डोंगर आहे. समर्थांच्या डोंगरावर दगडाचा एक मोठा स्वाभाविक चवुतरा आहे. त्यावर श्रीसमर्थ बसत. त्यावरून वन्हाड, वसंतगड, सदाशिवगड, चंद्रगिरी, उंब्रज, शिरगांवचा टापू वगैरे मोंवतालचा सारा प्रदेश दिसतो. दक्षिणेस कृष्णा नागमोडीप्रमाणें वहात जात आहे.

( ९ ) चाफळगांव येथें श्रीसमर्थपंचायतनांतील जयरामस्वामी यांचा मठ आहे. तेथें च त्यांची समाधी आहे. शिष्यपरंपरा ब्रह्मचाऱ्यांची आहे :

कृष्णस्वामी ( १५४५ माघ शु. १५ )
|
जयरामस्वामी ( १५९४ भाद्रपद व. ११ )
|
गोपाळस्वामी ( १६१२ आश्विन व. १ )
|
विठ्ठलस्वामी ( १६४१ कार्तिक व. १० )
|
मुनेश्वरस्वामी ऊर्फ यतमुनी ( १६६६ फाल्गुन व. ९ )
|
महादेवस्वामी ( १७२१ कार्तिक व. ५ )

इत्यादि. हे महादेवस्वामी मोठे कर्ते पुरुष होऊन गेले. जयरामस्वामींचे व इतरांचे येथें च ग्रन्थ मठांत आहेत.

[ एक ] सीतास्वयंवर–" श्री शके १५७० ॥ सर्वधारी नाम संवत्सरे भाद्रपद मासे कृष्णपक्ष अष्टमि गुरुवार शिवनक्षत्र शिवयोग तद्दिनी ग्रंथ संपला ... ग्रंथसंख्या ओवी ॥ २०४०, ॥ "

[ दोन ] अपरोक्षानुभव–" स्वस्ति श्री शालिवाहन शक पंचदशे येकयातील १५९१ ॥ सौम्यनाम संवत्सरे आश्विन मासे । कृष्णपक्षे । अष्टमि गुरुवासरे तद्दिनि आत्मउद्देशें । वैधाप्रति सौरसें । केलें लेखन दासें । जयरामाचेनि ॥ कृष्णदास जयराम म्हणे । सद्गुरुचेनि प्रसन्नपणें । अपरोक्षानुभव पावणें । साधनेंवि ( च ) योगपणें स्वानंदु ॥ ग्रन्थ संपूर्ण ॐ तत्सद्ब्रह्म श्रीजयरामार्पणमस्तु । श्रीराम । श्रीकृष्ण । श्रीजयराम ॥"

[ तीन ] १६५४ तील जयरामकृत रुक्मिणीस्वयंवर ग्रन्थाच्या दोन प्रती

[ चार ] १७०८ तील गद्यात्मक विवेकसार, १६ प्रकरणें

[ पाच ] १७१० तील परमामृत

[ सहा ] माधवविरचित स्वात्मबोध, ४१ अध्याय

[ सात ] ज्ञानेश्वरी

[ आठ ] जयरामकृत ज्ञानीभक्तसंवाद — ग्रं. सं. २३८

[ नऊ ] जयरामकृत भागवत, पूर्वार्ध ४९ अध्याय

[ दहा ] जयरामकृत शांतीपंचीकरण

[अकरा] जयरामाचे अभंग, पदें अठलेलीं चार बाडें

[ बारा ] पंचदशी, प्राकृत टीका

[ तेरा ] सोपानदेवाची समश्लोकी भगवद्गीता

इत्यादि संग्रह त्या वेळीं माझ्या पाहण्यात आला होता. कागदपत्रांनीं अर्धी खोली भरली होती. बहुतेक कागद शंभर सवाशें वर्षांतले अलिकडचे होते. १६१९ तील एक अस्सल सनद पाहण्यात आली ती उतरून घेतली:

श्री

जयेराम

राजश्री समस्त सरदार पागा

व सिलेदार गोसावियांसी

ऽ) अखंडित लक्ष्मी अलंकृत राजमान्य स्ने॥ रामचंद्र नीळकंठ अमात्य आसिर्वाद सु॥ समान तिसैन अलफ मौजे रायेगाव ता॥ आऊंध हा गाव राजश्री स्वामी यास इनाम दिल्हा आहे तरी तुम्ही आमदफ्तीमुळें कोणी उपसर्ग याल तरी यावयाचे प्रयोजन नाही छ ९ रबिलावल निदेश समक्ष

लेखन सीमासमु लसति

लवकर संशोधन आणि प्रकाशन न होईल तर संग्रह हळुहळु अ.पभावस्था आराध्यदैवतीं लीन होण्याचा फार संभव आहे.

( १० ) निगडी हा श्रीसमर्थपंचायतनांतील रामयोगी रंगनाथस्वामी यांचा गांव होय. वैशाख शु. ४ स गेलों. त्या वेळीं कळलें कीं, वीस एकवीस वर्षांमागें एकदा व पुन्हां चार वर्षांपूर्वी दुसऱ्यांदा आग लागली होती, तेव्हां बराच संग्रह गेला. विश्रांतिवही व समुद्रवही अशा दोन वह्या स्वामींच्या होत्या, पण आतां नाहींत. तरी हि या गांवीं अजून पुष्कळ संग्रह असावा, असा माझा तर्क आहे. परंपरा :




चार सनदा पाहण्यांत आल्या : ( १ ) १६१२ चैत्र शु. ९ रविवार रोजीं दत्ताजी कराजी नाईक व सूर्याजी फिरंगोजी नाईक पिंपळे देशमुख व देशपांडे प्रांत वाई सरकुमा विजापुर यांनीं पूर्वील इनामाचा उल्लेख करून योगेश्वर यांस एक चावर जमीन दिली, ( २ ) समान तिसैन अलफ म्हणजे १६१९ त रामचंद्र नीळकंठ हे संभाजी राजे यांच्या कारकीर्दींत पंचेचाळीस बिघे इनाम होते, त्यांचा उल्लेख करून वाईच्या देशाधिकारियास आज्ञा करितात कीं, स्वयं निगडी गांव पुण्यक्षेत्री, असतां मठेरेसाठीं इनाम दिला आहे, तरी चालविणें, ( ३ ) रामशक २५ तील एक सनद व ( ४ ) रामशक २४ तील आणखी एक.

पोथ्यापुस्तकांचा संग्रह फारसा नजरेस पडला नाहीं. ( १ ) शिवरामांचा अष्टपद ग्रन्थ ( हा ग्रंथ ठांसातरि जाण होती । श्लोकामधीं श्लोक चि देशभाषी । श्रीनाथदेवों यदत्या गुराचा । दयाळु राजा शिवरामजीचा ॥ ) ( २ ) रविवार कार्तिक व. १० शके १६१६ रोजीं पटवाळलिखितनागनाथांत गुरुशिष्यसंवाद-रूप आठ अध्यायांचा परदनावेश ग्रन्थ, ( ३ ) श्रीपरमप्रकाश ग्रन्थ, हाये

अवघे तीन ग्रन्थ व (४) फाल्गुन व. ५ शके १७०६ तील माधवराय कवीचें एक बाड, अशीं पाहण्यांत आलीं. त्या बाडांत माधवरायविरचित लोपामुद्राजानकीसंवादाचे २६ श्लोक, ' विर्भाचार आख्याना 'चे २५ श्लोक व कांहीं पदें होतीं. तीन पदें आवडलीं तीं उतरून घेतलीं होतीं :

[ १ ] तो ठकला

जाणा तो ठकला । तो ठकला । धनकामिनिवर झुकला ॥ ध्रु०
ममतेचा जो विकला । जो करि संतजनाच्या नकला ॥ जाणा० ॥ १
परिसा सांगे थकला । आपुल्या स्वहिता आपण मुकला ॥ जाणा० ॥ २
माधवराया चुकला । कैसा होइल त्या उकला ॥ जाणा० ॥ ३

[ २ ] तो तरला

जाणा तो तरला । तो तरला । भजनभरीं जो भरला ॥ ध्रु०
संसारा विसरला । संताचे चरणीं अनुसरला ॥ जाणा० ॥ १
भक्तीचा पथ धरला । आपला आपण जो उद्धरला ॥ जाणा० ॥ २
दुष्ट जनासी हरला । माधवरायातें मोहरला ॥ जाणा० ॥ ३

[ ३ ] सद्गुरुचे गुण घेत

चरणीं जडला हेत । हरीच्या ॥ ध्रु०
धनसुत जाणुनि त्याग चि केला । जैसें निर्जिव प्रेत ॥ १
संतपदावरि सर्व हि अर्पिलें । मागितलें तें देत ॥ २
माधवराया संगें रमलें । सद्गुरुचे गुण घेत ॥ ३

समाधीचें देवालय शिरवळकर रंगो गोविंद सुभेदार दिवाण प्रांत मावळ यांनीं इहिदे सबैन मया अलफ म्हणजे १६९२ या शकांत बांधलें, असें कळलें. घोड्याचा खूर उमटलेला दगड दाखविण्यांत येतो.

(११) कोरेगांव हा बोकिलांचा गांव. श्रीसमर्थचरित्रांत बोकिलांचें घराणें प्रसिद्ध आहे. पट्टाभिषिक्त श्रीरामाच्या मूर्ति श्रीसमर्थांनीं यांना दिल्या होत्या. अंताजीपंत बोकिलांच्या कडे त्या मूर्तींचें दर्शन घडलें. कागद नाहींत, म्हणतात. आपल्या सिद्धान्ताप्रमाणें प्रयत्न सोडू नये.

(१२) सज्जनगड-जेथें जागत रामदास विलसे जो या जना उद्धरी ॥ या लेपेस च समर्थांच्या कडील कागद मिळाले,

(१३) वांई येथें पुढील अभंग मिळाला. आधुनिक भासलो.
शकांत पंधराशें छपन्न साल्रांत । वैराजक्षेत्रांत स्वामी आले ॥ १ ॥
आले रामदास कृष्णातटाकासी । दक्षिणतिरासी वस्ती केली ॥ २ ॥
केली वस्ती तेथें मारुति स्थापिला । रोकडोबा त्याला नांव दिल्हें ॥ ३ ॥
दिले शुभग्रह धिटे चिन्नावासी । पूजा पिटक्यासी सांगितली ॥ ४ ॥

रविवार वैशाख शु. १३ स वाईहून पायरस्त्यानें धावडीवरून आंबड खिंडीवर चढलों. तीन तास लागले. ठिकाण अति रमणीय भासलें. पलिकडचा मोर, भाटघरचा तलाव वगैरे सूभाग दृग्गोचर होतो. पाणी विपुल आहे. जवळ च केंजळेश्वराच्या दर्शनास गेलों. देवालयांत पिंडीपाशीं च गार पाण्याचें कुंड आहे. सचिवांचें हें मोठें भाग्य कीं, त्यांच्या राज्यांत अशीं रमणीय ठिकाणें अनेक आहेत. खिंडींत सचिवांचें अन्नछत्र आहे. आल्हाद-दायक असें हें ठिकाण आहे. शिव हर सांब शिव हर सांब शिव शिव शंकर शिव हर सांब असा ध्वनि खिंडींत सारखा घुमत असतो. रात्रौ मुक्काम करून दुसरे दिवशीं कण्हेरीस गेलों.

(१४) कण्हेरी मठाची हकिकत श्री रामदासी ग्रन्थमालेंतील तिसऱ्या भागाच्या प्रस्तावनेंत आली आहे. तींत फक्त दोन ठिकाणीं दुरुस्ती करावयाची आहे. परंपरेंत वासुदेव आणि पुरुषोत्तम यांच्यांत माधव होऊन गेले कीं काय, अशी शंका प्रगट केली होती, ती बरोबर असून वासुदेवांचे शिष्य माधव व माधवांचे पुरुषोत्तम होत. दुसऱ्या दुरुस्तीबद्दल मात्र अजून खात्री नाहीं. चिरा बसविल्याची मिती " १६१७ युवा नाम संवत्सरे ज्येष्ठ शु. १० गुरुवार " दिली आहे. पण त्या दशमीस गुरुवार नसून सोमवार होता. तेव्हां मुळांत 'सोळा शतें सत्तरा' आहे तें १६७० वाचावें कीं काय, असें मनांत येतें. १६७० च्या ज्येष्ठ शु. १० स गुरुवार होता. पण त्या संवत्सराचें नांव युवा नसून विभव होतें. " यु " अक्षराबद्दल तेव्हां हि शंका आली होती. तेव्हां कण्हेरीस पुन्हां केव्हां तरी आणि कोणी तरी जाऊन खात्री करून घेतली पाहिजे. तेथील संशोधन हि पुरें झालेलें नाहीं. आमच्या वाचकांच्या संमतीं मालेंतील तिसरा भाग अवश्य असावा, हें आणखी एकवार येथें स्पष्ट नमूद करून ठेवलेलें बरें.

(१५) पसरणी हा मठ कण्हेरी मठापैकीच. वाईजवळ च पसरणी आहे. परंपरा अशी : श्रीसमर्थ–वासुदेव–माधव–पुरुषोत्तम–भीम–रघुनाथ–

वगैरे. भीम पर्यंत परंपरा कन्हेरीमठाची च आहे. त्या भीमांचे रघुनाथ; त्या रघुनाथांनीं पसरणीस मठ स्थापिला. त्यांची समाधी हि येथें च आहे. रघुनाथ मोठे साक्षात्कारी होते. त्यांचा एक पणतु रंगनाथ हे हनुमंतस्वामींचे सम-कालीन असून त्यांनीं रघुनाथांचें श्रीगुरुरघुनाथकथामृत नांवाचें सोळा अध्यायांचें ओवीबद्ध चरित्र लिहिलेलें आहे. पण आह्मांस त्यांतील फक्त एक च दहावा अध्याय मिळाला. त्याच्या १२७ ओव्या आहेत. या एका अध्यायावरून सुद्धां रघुनाथांचा अधिकार फार मोठा होता, असें दिसतें.

राजशक ५२ म्हणजे १६४७ च्या पौष शु. ४ स राघोबा गोसावी यांच्या नांवच्या, भोगांव व एकसर या प्रत्येक गांवीं अकरा अकरा विघे इनाम मिळाल्याच्या तीन सनदा पाहण्यांत आल्या.

खालीं समाधी व वर रामाच्या मूर्ति, अशा लहानशा प्रमाणावर येथें सज्जनगडावरील नमुना आहे.

( १६ ) बोरगांव हें प्रख्यात चिटणीस घराण्याचें गांव. जरूरीपुरता वंशवृक्ष असा :



बाबासाहेबांची भेट झाली. या गांवीं असल व नकला केलेलीं कागदपत्रे अजून हि पुष्कळ असावीत, असा माझा समज आहे. नंतर आणखी कांहीं कागद मिळाले पण या खेपेस कांहीं नकला तेथल्या तेथें उतरून घेण्यास मिळाल्या, त्यांपैकीं एक सांप्रदायिक महत्त्वाचें पत्र येथें च देतों :

श्रीरामसमर्थ

असल बाहुकुम

तालिक

श्रीरामदासस्वामी

हनुमंतनामा

श्रिया सह चिरंजीव विजई मन राजमान्य राजश्री मल्हारीराव दादा चिटनविस यांस

अनेक असिर्वाद उपरी संस्थानचे जमीन भूमी वगैरे बंदोबस्ताची राजपत्रें रुमाल तुम्हापासी कैलासवासी श्री बाबास्वामींनी पुर्वी महादाजी लिंगो याचे विद्यमाने दिल्हे ते पावले व चार मुख्य राजपत्रें दोन थोरले कैलासवासी सिवाजी महाराज यांचीं व दोन शाहु महाराज यांचीं तीं आम्ही प्रौढ जाल्यावरी द्यावी म्हणोन ठेविली तीं हालीं आणविल्यावरून तुम्ही आणून दिल्हीं ती पावली त्यात येक पत्र सिवाजी महाराज याणी श्री चे संस्थानचा व्यापार राजद्वारी व संस्थानचे उस्तवारी बाळाजी आवजी चिटनिवीस याजकडे नेमिली ते सेवा करितील म्हणोन उत्तर पाठविले ते पत्र तुमचे तुम्हापासी दिल्हे बाळाजी आवजी व खंडो बल्लाळ व जिवाजी खंडेराव व गोविंद खंडेराव व रामराव जिवाजी सेवा करीत आले त्या अन्वये तुम्ही सेवा करीत आहां पुढे ही वंशपरंपरेने राजद्वारीं व संस्थानी सेवा करीत जावी सर्व पारपत्यगार व अधिकारी याणी तुम्हास कळऊन तुमचे संमते चालावे ऐसे राजआज्ञा व थोरले श्री चीं अज्ञा त्यामीं चालत जावे तुम्ही सेवा करीत आला तैसी करीत जावी बहुत काय लिहिणे मिति शके १७२७ भाव नाम संवछरे भाद्रपद शुध्य १३ हे असिर्वाद

(१७) वाहे चोरगावपासून दोन अडीच कोसांवर आहे. संप्रदायांत

हें एक महत्त्वाचें ठिकाण आहे. अकरापैकीं एक मारुती येथें आहेत. ५३ वें करुणाष्टक पहा. तें प्रत्येकास पाठ असावें. या ठिकाणीं श्रीसमर्थांना जो प्रत्यय आला व त्यांच्या मनाची जी अवस्था झाली, ती जगाला सांगावी तरी कशी, असें कोडें त्यांना पडलें ! येथील पूजा गोवर्धन ब्राह्मणाकडे आहे. ती म्हशीची गोष्ट या च ब्राह्मणाच्या पूर्वजाची. जयरामस्वामींचे गुरु कृष्णाप्पा या गांवचे होत.

(१८) पाली हें खंडोबाचें ठिकाण वैशाख व. ४ स गांठलें. येथील काळभोरांचें ऐतिहासिक घराणें प्रसिध्द आहे. ते आणि खराडे यांच्यांत लागलेल्या वादाचा जो निकाल स्वतः श्री शिवाजी महाराजांनीं पालीस येऊन खंडोबाचे देवालयांत बसून केला, तो महत्त्वाचा निवाडा सांप्रदायिक विविध विषयांक ९९ यांत छापून आला आहे. तो अवश्य पहावा. त्यावर श्री शिवाजी महाराजांनीं स्वहस्ताक्षरें ' मोर्तब सुद ' हीं अक्षरें लिहिलेलीं आहेत. श्रीसमर्थांचा शिष्य रंगोबा यांची येथें समाधी आहे. तिची मात्र अति दुर्दशा आहे, पण तिकडे कोणाचें लक्ष जात नाहीं, हें दुर्दैव होय. रंगोबाची पुण्यतिथी पौष व. ८. समाधीला इनाम होतें, पण त्याचें जात इनाम होऊन त्याची विक्री होऊन तें रहिमतपुरच्या कोणा वकिलाकडे आहे. या गांवीं जुनीं कागदपत्रें विपुल आहेत.

पालीहून परततांना मार्गांत पुन्हां शिरगावीं जाऊन दत्तात्रयस्वामींचें दर्शन घेऊन व कांहीं संग्रह मिळाला तो घेऊन हा १८२८ च्या चैत्र वैशाखाचा दौरा समाप्त केला.

आतां मिळालेल्या संग्रहाची नोंद करूं.

उंब्रज कुळकर्णी

५३७ ] पोथी-पत्रें ६१ [ २७७

महानंद कृत ओवीबद्ध सटीक गुरुगीता-टीका वाचून पाहिली, अति सरस आहे. मला वाटतें, ग्रन्थ अप्रकाशित आहे, तो प्रकाशित झाला पाहिजे. मूळ संस्कृत श्लोक १४६ आहेत व ओवीसंख्या १०२१ आहे.

महानंदाचे गुरु शिव व शिवाना अनुग्रह प्रत्यक्ष श्रीगोपालकृष्णाचा. महानंद म्हणतात :

तया उद्धवार्जुनांयाचें । भाग्य येकवटलें सारें ।
तें फळयुगीं शिवाजीउदारें । हृदयीं धरलें ॥ १०२५
एवं उद्धव अर्जुन शिव । गोपाळें अनुग्रहिले स्वमेव ।
स्वहस्तें कवळ घाली देव । जयाचा मुखीं ॥ १०२६
अहो अर्जुना सर्व जो सेवी । किं गोपाळाचीं उच्छिष्टें सेवी ।
हें चि आश्चर्य जीवीं । मानित होतो ॥ १०२७
तव कलयुगीं श्रीगोपाळें । शिवाचे मुखीं दहीभात कवळिले ।
पूर्ण केले जनाचे डोळे । देखते झाले ॥ १०२८
गोपाळें शिवाचे माथां । ठेविला हस्तु ॥ १०३२
तया शिवपदीं शरण । महानंद रजरेण ।
जैसा सैंधवाचा कण । सागरामाजि ॥ १०३५
ग्रन्थाचा रचनाकाल व फलश्रुति :
शके पंधरा ते अष्टाहात्तरि । हेमलंबी संवत्सरीं ।
श्रावण मास अष्टमी धरी । शुक्लपक्षीं ॥ १०८१
गुरुवारीं गुरुगीता । गुरुकृपेनें समाप्तता ।
श्रवणें पठणें गुरुभक्तां । गुरुकृपा चि लाधुडे ॥ १०८२
जो जो जे मनोरथ धरी । ते ते गुरुगीता पूर्ण करी ।
याकारणें गुरुगीता चतुरीं । पठण किजे ॥ १०८३

५३८ ] हनुमंतस्वामीकृत बखरीच्या दोन प्रतींचीं कांहीं पृष्ठें [ १००-१३५

५३९ ] पोथी–पत्रें ६ [ १००

दासबोधाचा सोळीव अर्थ–ओवीसंख्या ५०. मागील बाहेक २३५ पद्य. या प्रतींत हि आरंभीं च ' श्री रामदासकृत छोटाव ग्रंथ ' असें म्हटलें आहे. पण ४४ व्या ओवींत कल्याण म्हणे जी रामदासा । अशा चरण आला आहे. हें प्रकरण कल्याणकृत असावें, असें मला वाटतें.

५४० ] पोथी–पत्रें २८ [ १५०

देवदास चैतन्यांकित कृत करुणामृत ग्रन्थ

ओवीसंख्या १४३ च आहे. मधलीं कांहीं पर्णे रखलीं आहेत. रचनाकालाची ओवी :

क्षय संवत्सर आषाढ मासीं । सोमवार तृतियेचे दिवसीं ।
पूर्णता झाली ग्रंथासी । श्रोतीं सावकाशीं परिसिजे ॥ १४३॥

मागील यादांक ६८ व ४०३ पहा.

## शिरगांवचा संग्रह

## ५४१ ]

बाड–पृ. सं. २१७ × २ = ४३४ [ १२६

शिरगांवमठपति भीमस्वामी कृत भक्तलीलामृत ग्रंथ. मालेंतील दुसरा भाग श्रीसमर्थांचीं दोन जुनीं चरित्रें यांत हा सबंध ग्रंथ सभेनें छापला आहे.

## ५४२ ]

बाड–पृष्ठें १० ते ५१ [ ७६

मनाच्या श्लोकांची वही–श्लो. ३७ ते २०५

## ५४३–४६ ]

पोथ्या–पर्णें १२, ५, ९, १३ [ १५०

( ५४३ ) श्रीसमर्थ कृत बहुधागोसावी
( ५४४ ) ,, ,, जुनाट पुरुष
( ५४५ ) ,, ,, अंतर्भाव
( ५४६ ) ,, ,, आत्माराम

## ५४७ ]

बाड–पृ. सं. १८८ × २ = ३७६
पैकीं आरंभींचीं ५ × २ = १० नष्ट [ १५४

( १ ) श्रीसमर्थ, ज्ञानदेव, तुकाराम, अमृतराय, रंगनाथ, मुक्ताबाई, एकनाथ, तुळशीदास, कबीर, नामदेव, केशव, केशवचैतन्य, उद्धवचिद्घन, गोसावीनंदन, सुरदास, केसरीनाथ, शिवदिनकेसरी, माळो, श्रीधर, आत्मारामस्वामी, आदिनारायण इत्यादिकांचीं पदपदावरें

( २ ) हें पद आदिनारायणाचें च ना ?

गे माइ मी वेडिपिसी कसी ॥ ध्रु०
वेडिपिसि जाले पूर्ण निवाले । नामसुधारस प्याले ॥ गे वाई०
सद्गुरुवचनीं भेदुनि बेछे । मासें मीपण गेलें ॥ गे वाई०
मस्तकिं हस्तक ठेउनि अपुला । आपणा ऐसे केले ॥ गे वाई०
आदिनारायण स्मरणमात्रें । समुळ हि पातक गेलें ॥ गे वाई०

(३) ज्ञानेश्वरांची हरिपाठ व नमनस्तोत्र हीं प्रकरणें, श्रीधरब्रह्मानंदांच्या शिवलीलामृतांतील महानंदाख्यानाचा अकरावा अध्याय, अमृतरायकृत दामाजीचरित्र, वामनकृत गोपीगीत, अशीं प्रकरणें या बाडांत आहेत.

(४) वाल्मीकिकृत गंगाष्टकस्तोत्र, जयदेवकृत अष्टपदी हीं संस्कृत प्रकरणें आहेत.

(५) दासबोधांतील १५ × ५ हा समास उतरलेला आहे.

(६) शिवदिनकेसरीकृत तो हा वंद्य ज्ञानेश्वरगुरु दिनबंधु ॥ हे दश श्लोक (पृ. ६१)

(७) आनंदाख्यतनयकृत रंगनाथचरणयुगुळिं रंग मानवा ॥ हे पद (पृ. १८५)

५४८ ] बाड–पृष्ठें ९८, नंबरचीं ५ अर्धवट व आरंभीचीं पांच अर्धवट [१५०

जमाखर्चाच्या वहीसारखें उभें लिहिलेलें हें एक लांबलचक बाड आहे. तें तेवीस इंच लांब व साडेचार इंच रुंद आहे.

यांत बाबाजी भोसले यांच्या पासून तों शाहुमहाराज दक्षिणेंत येऊन राज्य करूं लागेपर्यंतचा भोसले घराण्याचा वृत्तान्त आहे. कांहीं कांहीं माहिती नवीन आहे.

शिवाजी महाराजांचा जन्मकाळ दिला आहे तो असा : "शके १५४९ प्रभव नाम संवत्सरे फसली सन १०३७ वैशाख शु॥ २ रोज शनवार रोहिणी नक्षत्र कर्क लग्न"

श्रीसमर्थांविषयीं उल्लेख आहेत, त्यांतील दोन तीन उतरून घेतों : पृ.७० वर "शिवाजी महाराज यांचे वेळेस श्री रामदासस्वामी हे मारुतीचा औतार व शिवाजी महाराज हे शिवाचा अवतार परंतु मानवदेही यास्तव श्री रामदासस्वामीस गुरु केले

होते ... " पृ. ७२ वर " संभाजी महाराज हे रायगडाहून निघून सातारियास आले नंतर परळीस रामदासस्वामी होते त्यास मी भेटीस येतो असे सांगोन पाठविले त्यास माझी प्रकृति बिघडली आपण भेटीस येऊ नये आणि शिवाजी याणी राज्य केले त्याप्रो तुम्ही करावे असें सांगोन पाठविले ... " पृ. ७३ वर " शके १६०३ दुर्मती नाम संवछरे माघ व॥ ९ रोजी श्रीरामदासस्वामी याणी मनात आणिले की शिवाजी राजे याणी व आम्ही उभयेता दक्षिण देशी औतार घेतला होता आणी शिवाजी शांत जाले हे मनात आणून श्रीरामचंद्राचे स्मरण करून परळी किल्यावर शांत जाले ... "

# ५४९ ]

बाड–पृ. सं. ८१ × २ × २ = ३२४ [ १५०

( १ ) श्रीसमर्थ, तुका, रंगनाथ, मुक्ताबाई, अमृत, नामा, ज्ञानदेव, केशव, शिवरामपूर्णानंद यांचीं पदपदांतरें

( २ ) आरंभीं व मधून मधून बरे च संस्कृत सुभाषित श्लोक आहेत, कांहीं मराठी हि आहेत.

( ३ ) निरनिराळ्या रागांचीं उदाहरणें आहत.

( ४ ) मुक्तेश्वर कृत विराटपर्व–अध्याय १ ते ४, नलोपाख्यान व इतर कांहीं प्रकरणें आहेत.

( ५ ) वामन कृत बालक्रीडा, हरिविलास, कंसवध, अश्वस्नान हीं प्रकरणें.

( ६ ) हिंदुस्थानी भार्षेत रुक्मिणीस्वयंवर, कोण कृत न कळे, कदाचित् कल्याणांचें असेल.

( ७ ) आनंदतनय कृत साटिकावध

( ८ ) अमृतरायांचें एक गोड पद :

हरि तूं येईं रे । दासासि दर्शन देईं रे ॥ ध्रु० ॥
हें वय व्यर्थ चि गेलें पाहीं रे ।
या संसारीं सार्थक नाहीं रे ।
संचित मजला न दिसे कांही रे ।
आस धरुनि तुझि कास निरंतर निशिदिनिं संनिध राहीं रे ॥ १

{ नंतर शबरी, किरात, दामोदर, नामा, सेना, यांच्यावर कृपा केल्याचीं उदाहरणें देऊन म्हणतात }

हरि तुझि काय वदूं चतुराई रे ।
तुजला उत्तम मध्यम नाहीं रे ।
आपले चित्ति विचारुनि पाहीं रे ।
अमृतरायावरि कृपाळु जाहलास तरि तुझि गाठोडि गेली नाहीं रे ॥ ५

५५० ] बाड १९६ × २ = ३९२ [१५०

( १ ) हें अवघं बाड निरनिराळ्या संतकवींच्या पदपदांतरांचें आहे. अगदीं आरंभीं त्यांत तुकारामांचे एकसारखे १५२ अभंग, नंतर मध्यें च एकदा श्रीसमर्थांचे एकसारखे १४३ अभंग आहेत. शिवाय मधून मधून या समयतांचीं अनेक पदपदांतरें आहेत च.

( २ ) याशिवाय मुक्ताई, ज्ञानदेव, एकनाथ, नामदेव, केशव, परेश्वर चांगा, कबीर, शिवदिन, मच्छनाथ, नरहरी, मालो, केसरीनाथ, सोयरा, अमृतराय, रंगनाथ, तुलसीदास, नित्यानंदसुत, भद्राचल रामदास ( यांचें तत्मांधीय मार्पेत ), मुद्गल, शिवरामपूर्णानंद, आगरदास ( अमदास ), वहिणी, मुक्तेश्वर, वामन, शेख महंमद, उद्धवचिद्घन, आनंदतनय, श्रीधर, विठ्ठलनाथ, निवृत्ति, दामोदर इत्यादिकांचीं अनेक पदपदांतरें आहेत.

( ३ ) शेवटीं शेवटीं श्रीसमर्थकृत चौदा शतकांपैकीं सात शतकें आहेत.

( ४ ) तात्पर्य, हें बाड अनेक संतकवींच्या उद्गारांचा एक मोठा ठेवा आहे. यांत कित्येक उद्गार अप्रकाशित असतील, नव्हे आहेत.

५५१ ] ८" × ४" असें उभें सुंदर बाड
पृ. सं. ९९ × २ = १९८ [२००

[illegible]व आरंभींचीं व शेवटचीं किती पृष्ठें गेलीं तीं समजण्यास मार्ग [illegible] श्रीमुती एक एक दुमलेला तक्ता घेऊन सर्व तक्ते पुढून ते "शिवणीच बाजूनें शिवण्यांत येतात ( Section Binding ) त्याप्रमाणें [illegible] बाडाच्या अकरा गड्या शिवलेल्या आहेत. बाडाचें अक्षर सुंदर आहे.

( १ ) आरंभींच्या दहा वीस पानांत श्रीसमर्थ, नामा, तुका, रामानंद, हरि नारायण, निवृत्ति, ज्ञानदेव, विष्णुदास नामा, मुकुंदमुनि, माधो, गोरा कुंभार यांचीं पदपदांतरें

( २ ) नंतर एकनाथ कृत चिरंजीवपद—श्रो. सं. ४१

( ३ ) नंतर ते प्रश्नोत्तराचे पांच पांच श्लोक :

प्रश्न — गर्भांधाप्रति डोळसें झाकविलें तें अंध कूपीं पडे ।
सदैवें जरि वंचिलें तरि जिणें रोग्यासि कैसें घडे ।
जैसी निष्टुर बाळकासि जननी ने घे जसी पैं कडे ।
तैसी हे गति आमुची तरि विठो अन्याय कोणाकडे ॥ ५

उत्तर — बोले विठ्ठल भक्तराज सखया मी सर्व सर्वांतरीं ।
नांदे सर्व समान व्यापकपणें तंतू जसा अंबरीं ।
ऐसें सद्गुरुच्या मुखें नुमगती गुंतोनि देहाकडे ।
आत्मा आपण नेणती नर कुडे अन्याय हा त्यांकडे ॥ १

× × × × ×

हे प्रश्नोत्तर रत्नमाळ बरवी जो आपुले कंधरीं ।
घाली त्यासि कदापि ही भय नसे प्रल्हाद हातीं धरी ।
कांहीं संशयलेश ही नुरउनी आत्मा चि देहीं करी ।
श्रीमत् सद्गुरु सर्वरूप असतां क्लेशासि कैंची उरी ॥ ५

( ४ ) नंतर वामन कृत मूळ श्लोकांसह संपूर्ण नामसुधा व प्रियसुधा हीं प्रकरणें व राजयोगा पैकीं पहिले सोळा श्लोक.

( ५ ) शेवटीं ' श्लोक केशवस्वामी ' या मथळ्याखालीं ९७ श्लोक पूर्ण व ९८ वा श्लोक अपूर्ण असतां बाडाची उपलब्ध पृष्ठसंख्या संपली, त्यामुळें व या श्लोकांचा मला पूर्व परिचय नसल्यामुळें हें कोणतें प्रकरण आहे तें मला सांगतां येत नाहीं. खुणेसाठीं श्लोक :

देऊनियां बोध महेश दावी । महेश दाऊनि समाधि लावी ।
समाधिचें सार करूनि ठेवी । सभाग्य त्याचे पदरेणु सेवी ॥ १

जगीं राम संपूर्ण विस्तारला हो । श्रुतीसार संपूर्ण शोधूनि पाहों ।
नका सर्वदां अल्प संदेह मानूं । धरा वोळखा मानुवा बीजभानु ॥ ३२

गर्जे सदा राघव नाम वाचे । संकीर्तनीं भेद स्वजूनि नाचे ।

त्याच्या घरीं सेवक मोक्ष जाला । तो भेटतां राम परासि धाला ॥ ४१
नसे आदि ना अंत हा ज्यासि कांहीं । जया पाणतां अंत त्यासि पाही।
असें पावलों तत्त्व मी संतपायीं । तरी तें मला बोलतां येत नाहीं ॥ ५६

५५२ ]

पोथी–पत्रें १२ [१००

श्रीसमर्थ कृत पंचसमासी

५५३ ]

पोथी–पत्रें ६१ [१०४

श्रीसमर्थ कृत येकवीससमासी

या प्रकरणास या प्रतींत कोठें " जुना दासबोध " म्हटलें नाहीं, पण श्रीमत् ग्रन्थराज दासबोधाच्या पूर्वींचें हें प्रकरण आहे, हें निर्विवाद आहे.

प्रतीचा लेखनकाल वगैरे : " संवत १८८५ ॥ शके १७५० ॥ सर्वधारी नाम संवत्सरे दक्षिणायने हेमंतरुतौ मार्गशीर्ष मासे कृष्णपक्षे दशम्यां सौम्यवासरे स्वातिनक्षत्रे तद्दिनी जनस्थानक्षेत्रे गंगारघुवीरसंनिधौ श्रीसद्गुरु-सीतारामचरणकमलार्विंदौ समर्पयामि ॥ ग्रंथसंख्या १२२६ ॥ "

५५४ ]

१६½" × ६" असें उभें प्रचंड बाड
पृ. सं. २१५ × २ = ४३० [१५०

हें एक प्रचंड, प्रेक्षणीय आणि अभ्यसनीय बाड आहे. त्यांत श्रीसमर्थ, कल्याण, दत्तात्रय, राघव, यशवंत, भीम, लक्ष्मण, केशवस्वामी, रंगनाथ-स्वामी, जयरामस्वामी, तुकाराम, एकनाथ, नामदेव, विठा, गोंदा, महादा, नारा, गोणाई, जनी, विष्णुदास नामा, अनंततनय, आनंदतनय, जगमित्रनागा, उद्धवचिद्धन, मध्वमुनेश्वर, दास विठ्ठल गुरु गोविंद, विठ्ठल दीक्षित, शिवराम पूर्णानंद, गिरिधर प्रभु, वामन, साम्राज्यकल्याण, ज्ञानदेव, कोन्हेर गंगाधर, नेघा कवि सरदार, गोरक्ष, कोल्हा विश्वंभर, मच्छिंद्रनाथ, जयरामसुत, अमृतराय, शांतेश्वर, श्रीरंग, कान्हा, चोखला, रमावल्लभदास, माणको, भानुदास, गणेशनाथ, शेखमहंमद, श्रीधर, कबीर, सखारामसुत, जमालशा, सुरदास, येकाशिवराम, शिवदिन, सहजानंद, मीराबाई, वेणाबाई, मोरोपंत, इत्यादि साठ, येकूण साठ कविकवयित्रींचीं पदपदांतरें आहेत.

( २ ) विशेषतः त्यांत तुकाराममहाराजांचे सहज पांचशांवर अभंग आहेत, समर्थांचे अभंग, पदें दीडशावर व नामदेवांचे नुसते अभंग शंभरावर आहेत, केशवस्वामी व अमृतराय या प्रत्येकाचीं पन्नासावर पदें आहेत, रंगनाथस्वामींचीं पंचवीसाहून जास्त आहेत.

( ३ ) हें बाड वाचीत असतां व ताडून पहात असतां एक गोष्ट पुन्हां ठळकपणें लक्षांत आली, ती ही कीं, श्रीसमर्थसंप्रदायाबाहेरील कोणाची हि कविता शुद्ध व संपूर्ण छापून काढण्याचा प्रयत्न महाराष्ट्राकडून अजून झाला नाहीं. मला तर वाटतें, प्रत्येक कवीच्या नांवाचें महाराष्ट्रांत एक एक मंडळ असावें, निदान ज्ञानेश्वर, नामदेव, तुकाराम, एकनाथ यांच्या नांवांचीं मंडळें तत्काळ स्थापण्यात यावीं व त्या मंडळांनीं त्या त्या कवींच्या काव्यांचा शोध करून त्यांच्या अधिकृत आवृत्त्या काढल्या पाहिजेत. भागानगरचे केशवस्वामी, वडगांवचे जयरामस्वामी, निगडीचे रंगनाथस्वामी, अमृतराय, आनंदतनय इत्यादिकांच्या हि काव्याचा शोध करण्यास अजून पुष्कळ वाव आहे, यांत शंका नाहीं. महाराष्ट्रानें मनावर घेतलें पाहिजे.

( ४ ) या बाडांतील तुकाराममहाराजांच्या अभंगापैकीं पांच पंचवीस अभंग, पूर्व प्रकाशकांनीं प्रकाशित केलेल्या प्रतींशीं कांहीं कारणानें ताडून पाहिले, तर मला असा एक हि छापलेला अभंग आढळला नाहीं कीं, त्यांत अशुद्ध पाठ नाहींत, किंवा चरणेंच्या चरणें गाळलेलीं नाहींत. उदाहरणार्थ, श्रीसमर्थवाङ्मयांत ' तो गे तो चि तो ' राम सर्वत्र पाहे । ' हे गे हे चि ' माझी घणंमा । हे वाक्प्रचार आढळतात, तसला च एक प्रयोग ' तो गे तो चि जाणा देव ' तुकारामांच्या करावें चिंतन । तें चि बरें न भेटोन ॥ या अभंगांत आढळला, म्हणून मनांत आलें, छापलेला हा अभंग काढून ' तो गे तो चि ' यावर खूण करून ठेवावी. पण छापलेला अभंग काढला त्यांत ' तो गे तो चि ' ऐवजीं ' तग तोचि ' असा पाठ आढळला ! चार पांच प्रकाशकांच्या प्रती पाहिल्या, तर ' तो गे ' ऐवजी कोणी ' तग, ' तर कोणी ' तंव, ' तर कोणी ' तंग ' असे च अशुद्ध पाठ छापलेले आढळले ! फक्त कै. विनायक लक्ष्मण भावे यांनीं संताजी तेली जगनाडे यांच्या वहीवरहुकुम दोन भागांत जे ८६५ + ४५८ = १३२३ अभंग छापले आहेत, त्यांतील ३९ व्या अभंगांत मात्र ' तो गे तो चि ' असा बरोबर पाठ आढळला.

( ५ ) अगदीं आरंभीं या बाडांत निरनिराळ्या कविवचनांचा आधार घेऊन कृष्णलीला वर्णिली आहे.

( ६ ) पृ. ११ वर अमृतरायकृत गुरुशिष्यसंवाद व पृ. १०६ वर दामाजीपंताची रसद आहे.

( ७ ) तुकाराम कृत भानुदासचरित्राचा १४ कडव्यांचा अभंग पृ. १०४ वर आहे.

( ८ ) श्रीधर कृत भिक्षुगीत, राघव कृत कबीर आख्यान, गोरक्षनाथचरित्र अशीं प्रकरणें आहेत.

( ९ ) शेवटीं शेवटीं मोरोपंत कृत संतांच्या आर्या आहेत. त्यांत पुढील तीन आर्या शेवटीं जोडलेल्या आहेत :

श्रीगुरुसेवातत्पर वंदीं दत्तात्रया तया धीरा ।
ज्याच्या नत भक्ता धरिलें रामें च काय अवतारा ॥ १३४

वंदीं राघव साधू ज्याची श्रद्धा सदैव श्रीरामीं ।
कीर्तनिं ज्याच्या एक ही पावति मुक्तिस वसूनि आरामीं ॥ १३५

श्रीयेशवंत साधू वंदन करितों गुणार्णवा पाईं ।
निस्पृह उदार रत जो परोपकारी सदा जसी आई ॥ १३६

दत्तात्रय–राघव–यशवंत ही शिरगांवची परंपरा होय. यशवंतांच्या पुत्रांपैकीं भीम आणि लक्ष्मण यांची हि कविता या बाडांत आढळते, यावरून हें बाड या दोघांपैकीं एकाचें असावें, असें वाटतें. म्हणजे या बाडाचा लेखनकाळ १७०० च्या सुमाराचा येतो. वरील तीन हि आर्या मोरोपंतांनीं च केलेल्या असणें शक्य आहे. मोरोपंतांच्या घराण्याचा चाफळशिरगांवशीं संबंध होता, हें मला ठाऊक आहे.

( १० ) श्रीसमर्थांच्या निर्वाणाच्या वेळच्या त्या चार ओव्या या बाडांत पृ. १६६ वर दिल्या आहेत, त्या जशाच्या तशा येथें उतरून घेतों :

माझी काया गेली खरें । परी मी आहे जगदांतरें ।
ऐका स्वहित उत्तरें । सांगितलीं ॥ १ ॥

नका करूं खटपट । पाहा माझा ग्रंथ नीट ।
तेणें सायोज्याची वाट । गोसाविली ॥ २ ॥

राहा देहाच्या विसरें । वदूं नका वाईट बरें ।
तेणें मुक्तीचीं द्वारें । चोजगती ॥ ३ ॥

दास म्हणे सावधान । नित्य स्वरूपीं अनुसंधान ।
करा श्रीरामाचें ध्यान । निरंतर ॥ ७ ॥

मागील बाडाक ७९ पहा.

५५९ ] पोथी–पत्रें १६४ [११५

### लक्ष्मण कृत श्रीसद्गुरुस्तवराज

हें श्रीसमर्थांचें ओवीबद्ध चरित्र आहे. दुर्दैवानें तें अपूर्ण आहे, पूर्ण मिळालें नाहीं. पहिले १५ अध्याय आहेत व नंतर १९ वा अध्याय आहे. १६, १७, १८ असे अध्याय नाहींत व १९ व्या नंतर किती असतील ते नाहींत. प्रत्येक अध्यायाच्या नेमक्या १२१ ओव्या आहेत. हें संपूर्ण चरित्र मिळविलें पाहिजे.

त्याचें महत्त्व असें कीं, दोन जुन्या चरित्रांपैकीं एका चरित्राचे कर्ते जे शिरगाव मठपति भीमस्वामी त्यांचे हे लक्ष्मण बंधु होत. भीमस्वामींनीं श्रीसमर्थचरित्र अभंगांत वर्णिलें आणि लक्ष्मणानीं ओवींत वर्णिलें आहे. दोन्ही चरित्रें ताडून पाहिलीं पाहिजेत.

या चरित्रांत ( १ ) उद्धवाच्या जन्माची कथा भिलवडीच्या देशपांड्याची म्हणून दिली आहे, ( २ ) कागद, लेखणी आणि दऊत त्यात आहे असा एक दंड श्रीसमर्थ वागवीत म्हणून रघुनाथपंडिताच्या अष्टकांत आहे, त्याला या चरित्रांत हि पुष्टि मिळते, ( ३ ) कल्याणस्वामी झाडावरून पडले ते पाण्यात पडले असें यात म्हटलें आहे, ( ४ ) जटिलाची गोष्ट तळवीडच्या मराठ्याची म्हणून यात सांगितली आहे, ( ५ ) एकनाथ-हरि-निंबक-बाबाजी अशी परंपरा देऊन एकवट होनाची गोष्ट एकनाथाच्या या पणतवाची होय, असें म्हटलें आहे, ( ६ ) जयरामाना पठाणानें अडविलें तें कऱ्हाडास नसून खटावास होय, असा यात दाखला आहे, ( ७ ) वादीच्या सर्पांची गोष्ट कल्याणांची म्हणून दिली आहे, ( ८ ) श्रीरामाच्या मूर्ति अंगापूरच्या डोहांतून काढल्या, त्या डोहाचें नाव शिवनामी म्हणून दिलें आहे.

आश्चर्य मात्र असें कीं, या सबंध उपलब्ध अध्यायांत शक, मिती, वार एकदां सुद्धां कोठें आला नाहीं.

**५५६** ] बाड—पृ. सं. २२० × २ = ४४०
मधलीं २१६ ते २२१ पृष्ठें गहाळ [ १६५

( १ ) श्रीसमर्थ, कल्याण, वेणी, यशवंत, केशव ( पृ. ८ ते १७. दाटकरि दावा घो मजलागी। प्राणविसावा योगी ॥ ), जनी, सहजानंद, मानपुरी, गोसावीनंदन, उदयचिद्घन, तुळशीदास, मत्स्यनाथ, हरि कवि, साळो, आनंदात्मज, तुका ( पृ. २७ ते ४६ ), तुकया बंधु, रमावल्लभदास, श्रीरामानुजात्मज, नामा, वामन, एकनाथ, शिवराम, श्रीधर इत्यादिकांचीं पदपदांतरें

( २ ) पृ. ९९ वर केशव कृत ३२ श्लोकाचें एक अपूर्ण प्रकरण आहे. प्रत्येक श्लोकांत केशवानीं आपलें नाव गोविलें आहे.

सिद्धांत हा सार विचार घेसी। पितामहाचें तरि रूप होसी।
गुह्यार्थ हा केशवराव बोले। कळे मनीं तो चि गळोनि डोले ॥ १ ॥

सांडूनियां संगति या भवाची। करी सदा भक्ति दयाघनाची।
देईल तो भक्ति सदाशिवाची। हे माळ घे रे कवि केशवाची ॥ १६ ॥

( ३ ) गेल्या च वैशाखांत, पुण्याच्या भारत-इतिहास-संशोधक मंडळाच्या पुरस्कृत ग्रन्थमालेमार्फत रा. प्रल्हाद व्यंकटेश गुर्जी यांनीं अति मेहनत घेऊन मोठ्या प्रेमानें मध्वमुनीश्वरांच्या कवितेचा ग्रन्थ प्रकाशित केला आहे. श्रीरामदासी संप्रदाय मध्वनाथाची पुष्कळ कविता आढळते. परंतु आजपर्यंत वाहून पाहण्यास संघटित साधन नसल्यामुळें त्यांच्या कवितेकडे माझें विशेष लक्ष गेलें नाहीं. यापुढें जाईल. गुर्जींच्या ग्रन्थांत आलें नाहीं असें एक पद या बाडांत आढळलें, तें आवडलें म्हणून येथें देतों :

दुर्जनसंग सोडा रे संग सोडा रे ॥ ध्रु०

संतसमागम धरनी त्याच्या ऐका गोष्टी गोडा रे।
हरिभजनाचे आयुध घेउनि काळाचें शिर फोडा रे ॥ १

सावध होऊनियां विषयांचा अवघा खेळ मोडा रे।
ज्ञानप्रकाशवाणी आर्यी बंध जिवाचा तोडा रे ॥ २

देहाचण म्हणतो आतां उरला अवसर थोडा रे।
मुक्त होतो नाना वयाचा नाहीं थाडा जोडा रे ॥ ३

(४) दशावतारावर अकरा श्लोक व शामजीसुत मूढ राघव कृत सवाया

(५) राघव कृत गरुडाख्यान, श्लोक ५४ (पृ. ७०), रामजन्म, श्लो. २३ (पृ. ७६) पांडुरंगाची आरती व सुदामचरित्र

(६) अमृतेश्वर कृत ध्रुवाख्यान व सुदामचरित्र (पृ. ११९)

(७) आनंदतनय कृत सीतास्वयंवर (पृ. १६८)

(८) लक्ष्मण कृत निरनिराळीं भजनें व कल्याण, दत्तात्रय, राघव आणि यशवंत यांच्या आरत्या

(९) पृ. ४६, ४७ वर पुण्यतिथींचे श्लोक दिले आहेत, त्यांच्या आधारें पुढील पुण्यतिथींचा बोध होतो :

[ एक ] श्रीसमर्थांची पुण्यतिथी–१६०३ दुर्मती नाम माघ वद्य ९ मंदवार

[ दोन ] कल्याणांची–१६३५ विजय नाम आषाढ शुद्ध १३

[ तीन ] दत्तात्रयांची – १६३८ दुर्मुख नाम फाल्गुन व. १०

[ चार ] राघवांची – १६८३ वृष नाम माघ शु. २

[ पांच ] यशवंतांची – १७०३ ध्रुव नाम माघ शु. ९ भौमवासर यांत कल्याणस्वामींच्या शकाचा प्रश्न पडतो. मागील बाडांक ५३ पहा.

५५७ ] पोथी – पत्रें १४१ [ १५०

## मुकुंदराज कृत विवेकसिंधु

सुंदर, संपूर्ण प्रत आहे. सभेच्या संग्रहांतील मागील बाडांक ३११, ४०१, ४१६ व ४९३ पाहण्यांत येतील च. सर्वांत जुनी प्रत ४९३ ची आहे. त्या प्रतींत पूर्वार्धाच्या ७७० व उत्तरार्धाच्या ९१४, एकूण १६८४ ओव्या आहेत. या प्रतीच्या शेवटीं एकंदर ग्रन्थाची संख्या पुन्हां तपशीलवार दिलेली आहे, त्यावरून पूर्वार्धाची संख्या ७८० व उत्तरार्धाची ८८६, एकूण १६६६ संख्या येते.

या अपूर्व ग्रन्थाकडे महाराष्ट्राचें हल्लीं आहे त्याहून जास्त लक्ष गेलें पाहिजे, असें वाटतें. सर्व प्रती ताडून पाहून एक शुद्ध व अधिकृत अशी आवृत्ति सभेनें च काढली पाहिजे.

५५८ ] पोथी-पत्रें ८२ [ १५०

ज्ञानेश्वरीपरिभाषा

ही प्रत सुंदर आणि संपूर्ण आहे. मागील १३४ आणि २१० या प्रती अपूर्ण होत्या. परिभाषा म्हणजे ज्याला हल्लीं आपण शब्दार्थ, शब्दकोश म्हणतो. ज्ञानेश्वरी ग्रन्थ भाषेच्या दृष्टीनें पूर्वीपासून च कठीण वाटत आला आहे. म्हणून ही परिभाषा पूर्वीं च तयार झाली. ही कोठें छापली गेली आहे कां नाहीं, गत्य ठाऊक नाहीं. ज्ञानेश्वरी वाचतांना ही परिभाषा जवळ असल्यास फार उपयोग होईल, ती अवश्य प्रकाशित व्हावी.

५५९ ] पोथी-पत्रें २४ ते ४५ [ १५०

मुकुंदराज विरचित परमामृत ग्रन्थाची ही अपूर्ण प्रत आहे, पहिलीं २३ पत्रें गहाळ आहेत.

५६० ] बाड-पृ. सं. १९२×२ = ३८४ [ १००

( १ ) या बाडांत अपूर्ण प्रकरणें फार आहेत. ओवीबद्ध रामायण, प्रल्हादचरित्र, सुदामचरित्र, श्लोकबद्ध हनुमतजन्म, अध्यात्मरामायणांतील कांहीं भाग, रामविजयांतील काहीं भाग वगैरे अपुरीं प्रकरणें आहेत.

( २ ) मयूरपंडित कृत भारतांतील बरे च भाग विराटपर्व, कर्णपर्व, वगैरे

( ३ ) विठ्ठल कृत हिंदुस्थानी कविराख्यान

( ४ ) राघव कृत दत्तात्रयजन्मकथा, श्लोक १८. शेवटचा श्लोक :

श्रीरामदासगुरुपादरजःपांसुधारी ।
योळे दिनावरि अमोघ चि मोक्षकारी ।
दत्तात्रया पदिं रमे सुख राघवासी ।
नेणे मनीं किमपि भाव दुजा जिवासी ॥ १८

( ५ ) हे राघव मोरोपंतकालीन असून परस्परांचा विशेष स्नेहसंबंध असावा, असें वाटतें. दत्तात्रयजन्मकथेच्या पुढें आर्यावृत्तांत कविराख्यान असून तें अपुरें च सोडलें आहे. तें बहुधा राघव कृत असावें.

( ८ ) चाणक्य विरचित राजनीतिसमुच्चय म्हणून म्हणून महत्त्वाचें ११३ श्लोकांचें एक संकृत प्रकरण आहे. तें च पुन्हां पुढें दुसऱ्यांदा आलें आहे, पण त्यांत पाठांतर फार आहेत, श्लोकांची संख्या हि वाढली आहे, १५५ श्लोक असून त्यांचे आठ अध्याय पाडले आहेत.

( ९ ) भगवद्गीतेचा म्हणून गीतागर्भयोगो नाम एकोनविंशति अध्याय-संस्कृत श्लोक २४

( १० ) संस्कृत धर्मराज रचिता ललितप्रबंधा नामावली, पैकीं यमलोकवर्णनं नाम अष्टमोध्यायः, श्लोक ११२

( ११ ) संस्कृत श्रीमत् भागवताच्या प्रत्येक स्कंधांतील निवडक उतारे

( १२ ) कांहीं औषधें

## ५६२ ]

बाड-पृ. सं. ५६ × २ = ११२ [ ८५

( १ ) या सबंध बाडांत तुकाराममहाराजांचे बाळक्रीडेचे शंभर अभंग आहेत, त्यांच्या ८९३ ओव्या आहेत.

( २ ) लेखनकाल शके १७७० ज्येष्ठ व. ४ मगळवार

( ३ ) " हि वहि गणेश सखाराम देशपांडे याचि आसे "

( ४ ) दुसऱ्या पृष्ठावर कांहीं औषधें आहेत.

## ५६३ ]

पोथी-पत्रें १४, पहिलें गहाळ
शेवटचीं किती गहाळ न कळे [ १००

( १ ) वामन कृत राजयोग ३५ श्लोक, चित्सुधा ४१ श्लोक, प्रियसुधा १८ श्लोक, स्फुट सवाई १४, तत्त्वमालिका १८ श्लोक.

( २ ) अपरोक्षानुभूति-अपूर्ण, टीका श्लोक १०५

## ५६४ ]

बाड पृ. सं. २७ × ४ = १०८ [ १५०

( १ ) कृष्णदासयाज्ञवल्की कृत कथाकल्पतरु, तृतीय स्तवक, ओवी ५५

( २ ) चंद्रहास्याख्यान, तीन प्रसंग, अनुक्रमें [illegible] संख्या ६५, ७५ आणि ५२. पहिल्या प्रसंगाचे शेवटीं तें सांगे[illegible]न. । अर्थ

( २ ) ही परंपरा येथें अशाकरितां दिली की, या बाडाच्या पहिल्या पृष्ठावर "हे पोथी केशव गोसावी शिरगांवकर रामदासी" यांची असल्याचा उल्लेख आहे, त्यांतील केशव कोण, हें कळावें. दुसरें कारण, या बाडांत यशवंतसुतांची बरी च कविता आहे, तेव्हां हे यशवंतसुत कोण, याचा अंदाज व्हावा. केशव हे भीमाजीबावांचे पुत्र होत, हें उघड आहे. पण यशवंतांचे जे तिघे पुत्र, त्यांतील यशवंतसुत कोण, हा प्रश्न आहे. भिमाजी-बावांची जी कविता आहे तींत त्यांनीं आपलें नांव भीम म्हणून सर्वत्र स्पष्ट उल्लेखिलें आहे. प्रत्यक्ष याच बाडांत त्यांचीं कांहीं पदें भीम नामांकित अशीं आहेत. लक्ष्मण यांची जी कविता आहे तींत किंवा बाडांक ५५५ यांत त्यांनीं केलेल्या श्रीमद्गुरुस्तवराजाचे जे अध्याय उपलब्ध आहेत, त्या प्रत्येक अध्यायाचे शेवटीं लक्षितो, लक्ष, लक्षितां यांपैकीं कोणता तरी एकादा शब्द हटकून खुबीनें योजून त्यांनीं आपलें कर्तृत्व वाचकांच्या नजरेस आणलें आहे. तेव्हां तिसरे पुत्र जे मनोहर ते च या बाडांतील यशवंतसुत होत, अशी आमची कल्पना होते.

( ३ ) या बाडांत यशवंतसुत कृत कांहीं पदें आहेत व देवचरित्र–ओवीसंख्या १००, विक्रमाचा अभंग, हरिश्चंद्र आख्यान— ओ. सं. १२६ व डांगविराजाचें आख्यान—ओ. सं. १०७ अशीं स्वतंत्र प्रकरणें आहेत. संतकवि म्हणून यशवंतसुत हे महाराष्ट्रास आज प्रथम च विदित होत आहेत. त्यांची कविता प्रकाशनाला योग्य आहे.

( ४ ) एक 'संतनामावळी' आहे. ती कोणत्या हि वृत्तांत गोविली नसून नुसतीं नांवें क्रमांक घालून दिलेलीं आहेत. पौराणिक व आधुनिक मिळून प्रथम १०८ पुरुषांचीं नांवें, नंतर ८९ स्त्रियांचीं नांवें आणि नंतर पुन्हां २५ पुरुषनांवें दिलेलीं आहेत. कांहीं थोडीं नांवें मला अपरिचित वाटतात. ही नामावळी प्रकाशित व्हावी.

( ५ ) हरिभक्ति करी धन्य तो संसारीं। या भीमसमर्थकृत सवंग पदावर सवंग कीर्तन उतरलेलें आहे.

( ६ ) गजगौरीव्रत, १८ कडवीं.

( ७ ) संस्कृत सुभाषित श्लोक विपुल आहेत. उ०

वयोवृद्धास्तपोवृद्धा ये च वृद्धा बहुश्रुताः।
सर्वे धनवृद्धस्य द्वारि तिष्ठन्ति किंकराः॥

( ८ ) चाणक्य विरचित राजनीतिसमुच्चय म्हणून महत्त्वाचें २३१ श्लोकांचें एक संस्कृत प्रकरण आहे. तें च पुन्हां पुढें दुसऱ्यांदा आलें आहे, पण त्यांत पाठांतर फार आहेत, श्लोकांची संख्या हि वाढली आहे, १५५ श्लोक असुन त्यांचे आठ अध्याय पाडले आहेत.

( ९ ) भगवद्गीतेचा म्हणून गीतागर्भयोगो नाम एकोनविंशति अध्याय-संस्कृत श्लोक २४

( १० ) संस्कृत धर्मराज रचिता ललितप्रबंधा नामावली, पैकीं यमलोकवर्णनं नाम अष्टमोध्यायः, श्लोक ११२

( ११ ) संस्कृत श्रीमत् भागवताच्या प्रत्येक स्कंधांतील निवडक उतारे

( १२ ) कांहीं औषधें

**५६२ ]** बाड-पृ. सं. ५६ × २ = ११२ [ ८५

( १ ) या सबंध बाडांत तुकाराममहाराजांचे बाळक्रीडेचे शंभर अभंग आहेत, त्यांच्या ८९३ ओव्या आहेत.

( २ ) लेखनकाल शके १७७० ज्येष्ठ व. ४ मंगळवार

( ३ ) " हि वहि गणेश सखाराम देशपांडे याचि आसे "

( ४ ) दुसऱ्या पृष्ठावर कांहीं औषधें आहेत.

**५६३ ]** पोथी-पत्रें १४, पहिलें गहाळ
शेवटचीं किती गहाळ न कळे [ १००

( १ ) वामन कृत राजयोग १५ श्लोक, चित्सुधा ४१ श्लोक, प्रियसुधा १८ श्लोक, स्फुट सवाई १४, तत्त्वमालिका १८ श्लोक.

( २ ) अपरोक्षानुभूति-अपूर्ण, टीका श्लोक १०५

**५६४ ]** बाड पृ. सं. २७ × ४ = १०८ [ १५०

( १ ) कृष्णदासयाज्ञवल्की कृत कथाकल्पतरु, तृतीय स्तवक, ओवी ५५

( २ ) चंद्रहास्याख्यान, तीन प्रसंग, अनुक्रमें ओवीसंख्या ६५, ७५ आणि ५२. पहिल्या प्रसंगाचे शेवटीं ते सांगे नामा विष्णुदास । असें

म्हटलें आहे, दुसऱ्याच्या शेवटीं म्हणे नामा पाठक । असें आहे, आणि पुन्हां तिसऱ्याच्या शेवटीं म्हणे नामा विष्णुदास । आहे. तेव्हां, नामा पाठक आणि नामा विष्णुदास एक च कीं काय !

(३) श्रीसमर्थांचा एक अप्रकाशित अभंग :
जें जें म्हणसी माझें । तें तें नव्हे तुझें । वायांवीण वोझें । वाहातोसी ॥ १

(४) विप्रगिरी कृत श्री नाव प्रकरण (श्रीरामगूरुकसंवाद), ओ. सं. ३६

(५) समुद्रसंभाषणकथानक—श्लोक ४८, कोण कृत न कळे, अपूर्ण दिसते. ओळखण्यासाठीं तीन श्लोक :

ज्याचे चित्स्वरूपीं अनंत भुवनें कोट्यानकोटी रवी ।
त्याची कीर्ति वदावया क्षितिवरी वाल्मीक साजे कवी ।
जों नाहीं अवतारचिन्ह अनु ही विस्तारिली सत्कथा ।
त्याचा हा उलथा अलक्ष करितां आयुष्य जातें वृथा ॥ १
भरवसा तनुचा मज नाहीं । समय येइल कसा नरदेहीं ।
म्हणउनी भवसिंधु तराया । स्मरण हें चि तुझें रघुराया ॥ ४७
विकळ देह पडे धरणीसी । विमळ नाम न ये रसनेसी ।
म्हणउनी यमपाश तुटाया । स्मरण हें चि तुझें रघुराया ॥ ४८

(६) नरदेह आणि पशुदेह, मनाची अनिवारता आणि भवबंध या तीन विषयांच्या बाबतींत बहुधा एकनाथी भागवतांतील उतारे

(७) तुकाराममहाराज कृत सद्गुरूची आरती :
वोवाळूं वोवाळूं आधीं सद्गुरुराणा । पांचा ही तत्त्वांचा दीप लाविला जाणा ॥ध्रु०

(८) पुढील अठरा कडव्यांचें कवित्व कोणाचें आहे ?

प्रथम मूर्ति जगदेश्वराची । बहु कृपा पार्वतीची ।
नांदणूक अमरावतीची । सभा राया इंद्राची ॥ १
सौभाग्य गौरीचें । लावण्य रंभेचें ।
स्वर कोकिळेचा । गायनकळा शुकीची ॥ २
जाणीव श्रोतियाचें । उचीत रावाभोजाचें ।
दान राया कर्णाचें । इच्छाभोजन श्रियाळाचें ॥ ३
×× ×× ××
भक्ति श्रीलक्ष्मीनारायणाची । आदरता भक्तीची ।
बहु कृपा सद्गुरूची । कवित्व नामदेवाचें ॥ १८

( ९ ) एकनाथ कृत अर्जदास्त

( १० ) जनार्दन कृत – नमस्कार साष्टांग ज्ञानेश्वरासी । १० श्लोक

( ११ ) एकादशीव्रत – अपूर्ण, ओवी २५

**५६५ ]** बाड–पृ. सं. ३८ आ. व शे. वरीं च नष्ट [१००

किरकोळ बाड, त्यांत श्रीसमर्थ, अमृत, गिरिधर, केशव, आनंदतनय, जनी, जयरामात्मज यांचीं पदपदांतरें आहेत.

**५६६ ]** पोथी–पत्रें ६९ [१५०

ज्ञानदेव विरचित अनुभवामृत – सुंदर प्रत

**५६७ ]** पोथी–पत्रें ३१ [१५०

मुकुंदराज कृत विवेकसिंधु – फक्त पहिलीं चार प्रकरणें

**५६८ ]** बाड–१०९×२=२१८ [१२५

( १ ) श्रीसमर्थ, आनंदतनय, अमृतराय, तुळशीदास, होनाजी बाळ, राघवस्वामी, दास गुंडि, यांचीं पदपदांतरें

( २ ) कृष्णदासमुद्गल, वामनपंडित व मोरोपंत या त्रिवर्गांच्या रामायणांतील बरे च प्रसंग या बाडांत आहेत.

( ३ ) एकनाथी भागवतांतील उतारे असून, मोरोपंतांनीं एकनाथांना केलेल्या नमनाचे श्लोक आहेत.

( ४ ) मारुतीच्या जन्मकाळाचे २७ श्लोक, पृष्ठ १२ वर श्रीसमर्थकृत म्हणून दिलेले आहेत, पण मला शंका आहे.

( ५ ) नृहरिदर्पण म्हणून ४४ श्लोक आहेत, कोण कृत न कळे.

( ६ ) विनाशकाळे विपरीत बुद्धीचीं पांच उदाहरणें पृ. ६० वर आहेत:

लंकापुरीं रावण राज्यधारी । मंदोदरी सारिखि ज्यासि नारी ।
तो राघवासी करि वैर साची । विनाशकाळे विपरीत बुद्धी ॥ १ ॥

तो कंसराजा मथुरापुरीचा । कां द्वेष केला त्या देवजीचा ।
वधूनि बाळें केली उपाधी । विनाशकाळें विपरीत बुद्धी ॥ २ ॥
तो धर्मराजा बहु पुण्यरासी । कां द्यूत खेळे दुर्योधनासी ।
हरोनि दारा केली उपाधी । विनाशकाळें विपरीत बुद्धी ॥ ३ ॥
कामानळें कीचक द्रौपदीसी । भोगावया इच्छित पापरासी ।
प्राणांत त्याचा करि भीम क्रोधी । विनाशकाळें विपरीत बुद्धी ॥ ४ ॥
त्या चैद्यरामें हरिद्वेष केला । सभामधें निंदितसे हरीला ।
ते त्याजला पातलि मृत्युसंधी । विनाशकाळें विपरीत बुद्धी ॥ ५ ॥

## ५६९ ]

बाड–पृ. सं. ३२ × २ = ६४
शिवाय दोन्ही बाजूचीं ४।४ नष्ट [११५

( १ ) आनंदतनय, रंगनाथ, उद्धवचिद्घन, वामन, शिवराम पूर्णानंद, अमृतराय, मानपुरी, शिवक, श्रीरंगानुजतनुज, राघव, रुद्रसुत शंकर अनंत, लक्ष्मणापंत, जयरामस्वामी यांचीं पदपदांतरें

( २ ) श्रीसमर्थ कृत हनुमंतस्तोत्र–हनुमंता रामदूता

( ३ ) श्रीधर ब्रह्मानंद कृत श्रीकृष्णलीलावर्णनपर पांच पदें

( ४ ) गजगौरी आख्यान – १८ कडवीं, बाडांक ५६१ त आहेत तीं च, शेवटीं बाळक राघवीं अनन्य । असें आहे.

( ५ ) शिवराम कृत द्वादशमास–कौतुकवृंद, श्लोक ६२. हे शिवराम, पूर्णानंदांचे किंवा कल्याणाचे नसून निराळे च दिसतात.

( ६ ) अद्वैतबोध पदनिश्चय पूर्ण जाला । या चवथ्या चरणाचे आठ श्लोक

( ७ ) गोपीगीत, ध्रुवाख्यानचूर्णिका, संस्कृत सुभाषितें, वगैरे

## ५७० ]

पोथी–पत्रें तीन [२५०

मन्थराज दासबोधाच्या चवथ्या दशकांतील तीन पानें त्या प्रतींतील हीं तीन पानें होतीं ती प्रत तत्कालीन असली पाहिजे. अक्षर सुंदर, कल्याणपरंपरेला शोभणारें, असें आहे. पोथीची दुर्दशा होऊन हीं अवघीं तीन च पानें रहावीं, हा आपल्या अनास्थेचा पुरावा होय !

**५७१ ]** पोथी-पर्ने १२७ ते १४० म्हणजे १४ [ २७५

रमावल्लभदास कृत श्रीमद्भगवद्गीताराजगुह्यचमत्कारी टीका
दुर्दैव की, या तत्कालीन प्रतीचीं पहिलीं १२६ पानें मिळूं नयेत! १४० व्या पानावर टीकेचा शेवट च झालेला आहे. शेवटच्या ८२ व्या ओवींत रचनाकाल दिलेला आहे तो शक १५५० होय. श्रीसमर्थांच्या अवलोकनांत ही टीका असली पाहिजे. शिवतरच्या घळींत शक १५७६ पासून पुढें लेखन व्यवसाय सुरू होण्यापूर्वी शिरगांवीं च कल्याण आणि दत्तात्रय यांचें लेखन चाले.

**५७२ ]** पोथी-पर्ने ३ ते ७३ म्हणजे ७१ [ २७५

ज्ञानेश्वरींचा तेरावा अध्याय
प्रत श्रीसमर्थकालीन आहे. कागद जीर्ण झाला आहे. प्रेक्षणीय.

**५७३ ]** पोथी-पर्ने ९ [ २७५

येकनाथ कृत भावार्थरामायणांतील अयोध्याकांडांतील तिसरा प्रसंग. प्रत तत्कालीन, जीर्ण.

**५७४ ]** पोथी-पर्ने ६ [ २७५

विप्र नारायण कृत अश्वमेधांतील प्रसंग आठवा
कागद जीर्ण, प्रत तत्कालीन. प्रसंगाचा शेवट :

हे गरुडपुराणींची कथा। प्रस्तावा आली सांगता।
ते आईकांव श्रोता। म्हणे विप्र नारायेण ॥ ९०
इति श्री अश्वमेधकथारसु। आईकता पातकां होये नासु।
तो सांगता होये दासु। सर्व जनाचा ॥ ९१ ॥ प्रसंगु ॥ ८ ॥

**५७५ ]** पोथीचें एक पान [ २७५

विप्र नारायण कृत च एकाद्या ग्रन्थाच्या बाराव्या प्रसंगाचें हें शेवटचें पान आहे. तो ग्रन्थ अश्वमेध च असावा, असें वाटत नाहीं. पृष्ठाच्या उजव्या बाजूचा भाग थोडथोडा फाटला आहे. त्यांत ग्रन्थाचें नाव गेलें.
" इतिश्री विचित्र आ + + + + + कवि परमार्थो। विप्र नारायेणु विनवी

संतां । कथा आईक + + + प्रसंग ॥१२॥ संपूर्ण ॥ श्रीरामार्पणमस्तु ॥..."
असा शेवट आहे.

**५७६ ]** पोथी - दोन पत्रें १५ वें व १६ वें [२५०

कृष्णदास जयराम कृत अपरोक्षानुभवाच्या बाराव्या प्रकरणाचीं हीं शेवटचीं दोन पानें आहेत.

वरील ५७० ते ५७६ या महत्त्वाच्या ग्रन्थांचे अपूर्ण भाग जीर्ण स्थितींत आज आपणांस उपलब्ध होत आहेत, पण एके काळीं हे ग्रन्थ पूर्ण आणि सुसंपन्न स्थितींत असले पाहिजेत. त्यांची ही अशी दशा झालेली पाहून वाईट वाटतें.

**५७७ ]** पोथी - पत्रे ६ [१०५

नारायणकृतम् अनुभवरामायणम् - १८ श्लोकांचें संस्कृत प्रकरण. लेखनकालस्थल वगैरे : " श्रीसद्गुरुसीतारामचरणारविंदार्पणमस्तु ॥ शके १७५० मार्गशीर्ष कृष्ण १४ मंगलवारे जनस्थानक्षेत्रे श्रीमारुतिसंनिधौ समाप्तं ॥

**५७८ ]** शिरगांव-गळांठा [१००-१५०

( १ ) जयराम कृत परशुराम महाराजांवर कटिबंध
( २ ) त्र्यंबक कृत निर्वाणसारसंग्रह-आर्या आणि ओवी मिळून ९८
( ३ ) गंगाधर कृत श्रीसमर्थांवरील अष्टक--गुणातीतमेकम् ०
( ४ ) वामन कृत राजयोगाचें पहिलें एक पान
( ५ ) शिरकोळ पांच कागद

येणें प्रमाणें शिरगांवचा संग्रह आहे. शिरगांवचें संशोधन पूर्ण झालें असें मी समजत नाहीं. कल्याण आणि दत्तात्रय यांचें हें राहण्याचें ठिकाण होतें. या दोघांचा लेखनव्यवसाय येथें चाले. येथें विपुल व अपूर्व संग्रह उपलब्ध झाला पाहिजे.

याशिवाय येथें व वरील अठरा ठिकाणांपैकीं पुष्कळ ठिकाणीं कागदपत्रें वगैरे ह मिळालीं. परंतु तीं सध्यां बाजूस ठेवलीं आहेत. सर्व च ठिकाणच्या कागदपत्रांचें स्वरूप आणि महत्त्व काय आहे, त्याचें टांचण या खंडाच्या अगदीं शेवटीं करण्याचें ठरविलें आहे. १८५५ महाशिवरात्र

## मसूरचा संग्रह

वाईपेक्षां कागदपत्रांचा संग्रह मसूरला फार मिळाला, पण मिळाला त्यापेक्षां आणखी दुप्पट, तिप्पट मिळावयाचा राहिला आहे, असा आमचा कयास आहे. आफळे, बुधकर, अरणके व मोरे या श्रीसमर्थकालीन चार घराण्यांचीं आज हि मसुरास साठ सत्तर घरें आहेत व ही मंडळी त्या भागात इतरत्र हि पसरलेली आहेत. आम्हास अवघ्या चार पांच घरातील कागद पहावयास मिळाले, त्यांत काहीं कागद तर शहाजीमहाराजांच्या वेळचे आहेत. सर्व उपलब्ध कागदपत्रांचें टाचण या खंडाच्या शेवटीं करावयाचें ठरलें आहे, त्यांत च मसूरच्या कागदपत्राचा समावेश होईल. तूर्त नुसतीं बाडें पहावयाचीं आहेत. मसूरचें मूलचें पाटीलघराणें जगदळ्याचें. त्यांच्या कडील कांहीं महत्त्वाचे कागद, मराठ्यांच्या इतिहासाचीं साधनें, खंड पधरावा, यांत प्रसिद्ध झाले आहेत.

**५७९ ]** बाड– पृ. सं. ८० × २ = १६० [१५०
आ. व शे. ४।४ नष्ट

( १ ) श्रीसमर्थ, शिवदिनकेसरी, निरंजन, अमृतेश्वर, अनंतदास ( हरि गा रे सारे हित गुरुलागि पुसा रे ॥ ध्रु० ॥ ... अनतदासप्रभु त्रिभुवननायक । पाहतां नाहिं असा रे ॥ ) यांचीं पदपदांतरें

( २ ) वामन कृत रामजन्म श्लोक २५–४८, भामिनीविलास श्लोक ४८, कृष्णजन्म श्लो. २७

( ३ ) जयदेवकवि कृत गीतगोविंद

( ४ ) श्रीहनुमंतसंवाद श्लो. ३२. हस्ताक्षर " जोती तुकदेव वेवे कुळकर्णी कर्जीयेकर "

( ५ ) दामोदर कृत लिंगमाळ–द्वादश ज्योतिर्लिंगावर त्रयोदश श्लोक

( ६ ) एकादशी मृदमान्य—ओवी १०९ नतरचें एक पृष्ठ फाटलें आहे. ओळसीधाटीं दोन ओव्या :

मार्गी हस्तनापुरीं । कृष्णपांडवाचे घरीं ।
गोत्रजाची हत्या थोरी । राया धर्मासी घडली ॥ २
तेहीं स्मरिलें कृष्णासी । पावे पावे हृषीकेशी ।
तुझा हाकारी आम्हासी । म्हणउनि तुम्हासी स्मरतों ॥ ३

(७) शुकरंभासंवाद-ओवीसंख्या १४५. पुढचीं पृष्ठें नष्ट. ओळखीसाठीं

शुक म्हणे ऐक जननी । माझ्या पूर्वकर्मांची काहाणी ।
द्वादश वर्षे नरकयातनीं । मातृगर्भी वसिनलों ॥ ३३३
तुजसारिखी पावतो माता । तरी कां पावतो व्येथा ।
रोडी रोटी व्यर्थ आर्ता । आठउनि फळ काय ॥ २३८

**५८० ]** बाड-पृ. सं. ५१ × २ = १०२
सिवाय आ. व शे. कांहीं नष्ट [ १५०

(१) बाड जीर्ण झालें आहे. त्यांत आरंभीं देवदास कृत संतमालिका आहे, नंतर एकनाथ कृत आनंदलहरी आहे आणि शेवटीं प्रत्येक वाराच्या, दिवसाच्या आणि रात्रीच्या काळवेळा, लाभवेळा, रोगवेळा, उद्वेगवेळा, चंचलवेळा, शुभवेळा, अमृतवेळा पार्वतीनें पुसल्यावरून शंकरांनीं सांगितल्या आहेत.

(२) या बाडांत एका पृष्ठावर " ही पोथी पॉडिबा मोतदार मौजे बेलगाव पो इंदापुर याची असे..." अशी नोंद मोडींत आहे.

**५८१ ]** बाड-पृ. सं. २० + १८ = ३८ × २ = ७६
कांहीं नष्ट [ १५०

(१) या बाडांत कोणी माव, बापु शामराज व मोरो शाम यांचे दहा पांच अभंग आहेत, बाकी सबंध बाडात सखा यांचे अभंग व कांहीं प्रकरणें आहेत. हीं सर्व नांवें नव्यानें च पुढें येत आहेत. चांदोरकरांच्या संतकविकाव्यसूचींत फक्त सखा आणि सखोबा नाईक अशीं दोन नांवें आहेत व हे दोघे एक च कीं काय, अशी त्यांनीं पृच्छा केलेली आहे. या बाडांतील सखा आणि सूचींतील सखा कदाचित् एक असतील, पण सखोबा नाईक हे भिन्न होत. सखोबांचे गुरु नारायण किंवा काशी होते व या बाडांतील सखा यांचे गुरु जनार्दन दिसतात.

(२) अगदीं आरंभीं या बाडांत सखा यांचें ज्ञानदीपिका किंवा आत्मादर्शप्रकाश असें प्रकरण असून त्याच्या फक्त ७९ ते १०४ ओव्या आहेत. त्याशिवाय दुसऱ्या एका अपूर्ण प्रकरणाच्या १ ते ७८ ओव्या आहेत, त्यांत भृगु आणि पाराशर यांचा संवाद आहे.

( ३ ) त्याशिवाय सखा यांची लिंगपुराणांतर्गत शिवरात्रव्रतकथा—ओवीसंख्या ३६९ व स्कंदपुराणोक्त शनिवारत्रयोदशीकथा ऊर्फ शनिप्रदोष-ओ. सं. ८५ अशीं दोन पूर्ण प्रकरणें आहेत.

( ४ ) त्यांची एकनाथावर आरती आहे. एकनाथांचे सखा हे गुरुबंधु होते कीं काय, न कळे.

५८२ ] बाड-पृ. सं. १७ × २ = ३४ [ १५०
काहीं पत्रें हरवलीं

( १ ) श्रीसमर्थ, केशवस्वामी, तुकाराम आणि अनंतबोध यांचीं पदपदांतरें

( २ ) हे अनंतबोध नवीन ऐकण्यांत येत आहेत. त्यांचीं बरीं च पदें आहेत. त्यांचे गुरु शिवाद्वय.

५८३ ] चोवीस इंच लांब व साडेपांच इंच रुंद असे सोळा कागद एकापुढें एक डकवून तयार केलेलें लांबट [ ८४

हें मेस्तक आहे. तें मोडी लिपींत आहे. त्याचा आरंभ— " मेस्तक स्वाधगत राजश्री रामचंद्र बाबुराव नेने कों मयूर प्रांत कराड पेटा तारगाव सुा इहिदे खमसैन मया तैन व अलफ सन १२६० फसली सन १८५० इसवी माहे जून ऊर्फ जेष्ठ मास शके १७७२ साधारण नाम संवत्सर या मेस्तकांत दामाजाई हरजिनसी वाटणी येणे प्रमाणे करावे याच्या रीती सांगावयाच्या त्या मुलास समजावया जोग्या लिहिणेकारितां लिहिले मिा तारीख १९ जून या दिवशीं आरंभ केला ते कलमवार,... "

हें मेस्तक एकवार छापलें जाणें योग्य होईल.

५८४ ] पोथी—पत्रें १८ + १७ = ३५ [ २००

एकनाथ कृत भागवताचा पहिला आणि सत्ताविसावा अध्याय संपूर्ण. पहिल्या अध्यायाचे मूळ श्लोक २७ व टीकेच्या ओंव्या ३९६ व सत्ताविसाव्या अध्यायाचे श्लोक ५५ व ओंव्या ४१४ आहेत. पहिल्या अध्यायाच्या पहिल्या पत्रावर पुढील श्लोक आहे :

नदी दिव्य गोदातटीचा निवासी । सदा प्रेम जो सज्जना वैष्णवासी ।

तया पाहतां थोर आल्हाद चित्ता । नमस्कार माझा तया येकनाथा ॥१॥

## सज्जनगड–सवनीस

५८५ ] बाड–पृ. सं. ७१×२=१४२ [ १५०

( १ ) यात गुरुदास कृत १४० पदें आहेत. प्रत्येक पदांत त्याचें नाव आलें च आहे. कोठें श्रीगुरुदास आहे, तर कोठें नुसतें दास हि आहे व कोठें कोठें गुरुदास्य किंवा दास्य या शब्दाची योजना केली आहे. प्रत्येक पदांच्या वरती निरनिराळ्या नावानें किंवा प्रकारानें देवाला नमन केलें आहे.

( २ ) हें बाड " प्रभाकर शंकर सोहनी यांचें असे "

५८६ ] कागदाचा तुकडा [ २००

यावर दासबोधांतील प्रत्येक दशकाची ओवीसंख्या दिली आहे, ती अशी : ( १ ) ३२६, ( २ ) ४७०, ( ३ ) ५८०, ( ४ ) २३६, ( ५ ) ५७२, ( ६ ) ४०१, ( ७ ) ५६४, ( ८ ) ६४४, ( ९ ) ४२७, ( १० ) ३५३, ( ११ ) २८६, ( १२ ) २९४, ( १३ ) ३१६, ( १४ ) ४०६, ( १५ ) ३३६, ( १६ ) ३०२, ( १७ ) २९७, ( १८ ) २८८, ( १९ ) २८५, ( २० ) ३०८, एकूण ७७३१

५८७ ] पोथी–पत्रें २ [ २५०

( १ ) ग्रन्थराज दासबोधाच्या एका अपूर्व प्रतींतील हीं दोन पानें आहेत. त्यांत द. ७ स. १ पैकीं ४१ ते ५९ ओंव्या आल्या आहेत. पानाचा आकार ४ इंच × २½ इंच इतका लहान आहे. कागद सुंदर, अक्षर सुंदर.

( २ ) या च आकाराची एक संपूर्ण प्रत सभेच्या संग्रहीं आहे. तिची नोंद पुढें होईल. संपूर्ण ग्रन्थ मुठींत मावतो. प्रस्तुतचीं दोन पानें ज्या प्रतींतील असतील, ती प्रत कोठें गेली ? त्याला जबाबदार कोण ?

५८८ ] श्रीरामाचें रंगीत सुंदर चित्र [ २५०

५८९ ] पोथी–४ पानें [ २६०

श्रीसमर्थ कृत राजधर्म आणि क्षात्रधर्म. महत्त्वाचीं पाठांतरें आहेत.

५९० ] पोथी–पत्रें २ + २ + ४ = ८ [ २६०

श्रीसमर्थ कृत आलेख, तीन प्रती व सरवदा

फण्हेरी मठांतील संग्रह

५९१ ] एका बाडाचीं अवशिष्ट १४ पानें तीं पाहून जीव कासावीस व्हावा [ २५०

( १ ) त्यांत श्रीसमर्थशिष्य रंगनाथ यांचीं अकरा पदें आहेत. प्रकाशित झालीं पाहिजेत. एका पदाचा शेवट :

श्रीरामदासें आम्हां पूर्ण दया केली दिल्ही अद्वैतमूर्ति ध्याना ।
रंगनाथ म्हणे पावन जालों त्या सुखें नाचतों गातों रघुनंदन गे मावे ॥ ४

( २ ) एक लहानसें पद सबंध देतों :

अरे आर्धी निजसुख सार्धी स्वरूपसमाधी
निरसुनि आधिव्याधी धरि भजनीं कृतबुद्धी
सावध साधन नवविधाभजनें सार्धी शुद्ध समाधी ॥ ध्रु०
हे काया विपरित माया भ्रमरूप छाया ।
मुळिहुनि अवघी जाया । आड्ड सेवट वाया ।
आणोनि सत्वर सोडुनि समभर गुरुवर घे लवलाहां ॥ १
भावें शरण रिघावें स्वहित करावें
उध्धरोनि तारावें । जन्ममरण वारावें ।
रंगनाथप्रभुरामदासपदिं अनन्यरूप सुरावें ॥ २

५९२ ] दुसऱ्या एका प्रचंड बाडाचीं अवशिष्ट चार पानें [ २५०

यांत आरभीं पांच अभंग नामदेवांचे, तीन गोरा कुंभारांचे, एक मुकुंदमुनींचा व एक पद कबिरांचें आहे. नंतर कल्याणांचे कांहीं श्लोक आहेत.

५९३ ] किरकोळ [ २००

( १ ) शरीरांतील चक्रांचा कागद, ( २ ) दोन कागदांच्या तुकड्यांवर दोन पदें : १ दिठ्ठ्याविण नाहीं देणें०, २ सार मना येक सांगेन०, कोण कृत न कळे

५९४ ] शके १७०३ चें पंचांग [ १५१

५९५ ] पोथी–पत्रें २४ [ १००

( १ ) कृष्णदासमुद्गल कृत रामायणापैकीं कांहीं भाग. प्रसंग २० वा आणि ६४ वा पूर्ण आहेत; प्रसंग १७ व्याच्या पहिल्या ३० ओव्या व प्रसंग ७० व्याच्या शेवटच्या ७८ ते ८७ ओव्या आहेत. लिपी तत्कालीन आहे. ६४ व्या प्रसंगाचे शेवटीं लेखकाचें नांव आहे : " हें पुस्तक लिखिते चांगो दामोधर "

( २ ) कृष्णदासमुद्गल हे श्रीसमर्थांच्या पूर्वी नुकते च होऊन गेले होते. त्यांनीं फक्त युद्धकांड तेवढें वर्णिलें आहे. त्याच्या प्रती बहुतेक मठांत असत. तें श्रीसमर्थांच्या हि अवलोकनांत असावें.

## पसरणी मठांतील संग्रह

५९६ ] पोथी–पत्रें ७ [ १२५

पसरणीमठसंस्थापक रघुनाथ यांच्या ओवीबद्ध चरित्रांपैकीं फक्त दहावा अध्याय.

## बोरगांवच्या चिटणीसांकडील संग्रह

५९७ ] बाड पृ. सं. ८० × २ = १६० पहिलें व शेवटलें एक एक पान नष्ट [ १००

( १ ) शंकरसुत व चंद्रा फकीर यांचें एक एक हिंदुस्थानी पद

( २ ) जयरामसुत कृत आरती गीतेची–११ कडवीं, बहुधा अप्रकाशित, प्रकाशनास योग्य

( ३ ) आरती गीतेची दुसरी, कडवीं तीन, रखुमादेवीवरद (?) कृत

( ४ ) श्रीसमर्थ कृत स्तोत्र मारुतीचें—हनुमंता रामदूता

( ५ ) श्रीसमर्थ कृत भीमरूपी—भीमरूपी महारुद्रा

( ६ ) श्रीसमर्थ कृत सीताशुद्धी उर्फ सुंदरकांड

( ७ ) मुक्तेश्वर कृत नळदमयंतीस्वैवर उर्फ नळोपाख्यान-प्रसंग १ ओवी संख्या १४६, प्रसंग २ रा ओ. सं. २१८ व प्रसंग ३ रा ओ. सं. २२६

( ८ ) तुका कृत भानुदासचरित्र-ओ. सं. ९५

( ९ ) दामाजीपंताची रसद्-वारी संकट हरी दामाजीचें कौतुक देवाचें ॥ ध्रु० ॥ ७३ व्या कडव्यापर्यंत-अपूर्ण

**५९८ ]** बाड-पृ. सं. ६१ × २ = १२२ [१२५
पैकीं मधलीं ७ ते १८ नष्ट

( १ ) श्रीसमर्थ, अनंतदास, आनंदसुत, मानपुरी, एकनाथ, श्रीधर, सुरदास, रुक्मांगदसुत, चिन्मयनंदन, यांचीं पदपदांतरें

( २ ) तुका कृत कृष्णाची आरती

( ३ ) वामन कृत नृहरिदर्पण-श्लोकसंख्या १४८

**५९९ ]** बाड-पृ. सं. १६ × २ = ३२ [२००

देवदास कृत प्रार्थनाशतक-ओ. १०७ पर्यंत

## संकीर्ण संग्रह

**६०० ]** बाड-पृ. सं. ९५ × २ = १९० [१५०

( १ ) मधून मधून तुकारामांचे थोडे अभंग आहेत. शिवरामांचें एक पद व नामदेवांचा एक अभंग आहे.

( २ ) या बाडांत मुख्यतः मुक्तेश्वर कृत आदिपर्व, सभापर्व आणि वनपर्व यांतील मोरे च प्रसंग आले आहेत. आदिपर्वांतील अध्याय १७, १९,

१७, ३८, सभापर्वातील ३, ९, १५, वनपर्वातील २ ते ५, ११, १४, १६, १७ असे अध्याय आहेत.

( ३ ) आचार्यांचें चर्पटपंजरस्तोत्र

( ४ ) गीतेंत " धृतराष्ट्राचा १ श्लोक, दुर्योधनाचे ९, संजयाचे ३२, अर्जुनाचे ८४ व श्रीकृष्णाचे ५७४ श्लोक " आहेत, अशी एक नोंद आहे.

( ५ ) चौदा ब्रह्मांचे दोन संस्कृत श्लोक व त्यावर द. ७ × ३ × ६ ते १० या टीकेच्या पांच ओंव्या. परंतु ७ × ३ × १० या ऐवजीं ओंवी आहे ती अशी : ऐसीं हे चवदा ब्रह्में । निरोपिलीं अनुक्रमें । साधकीं पाहतां समें । यावितेना ॥

( ६ ) मुक्तेश्वर कृत वसिष्ट आख्यान–ओ. ४४

( ७ ) मध्वनाथ कृत सखुबाईचें चरित्र–ओ. ५७. हें प्रकरण रा. गुप्ते यांनीं प्रकाशित केलेल्या मध्वमुनीश्वरांच्या कवितेंत आलें नाहीं, असें वाटतें.

( ८ ) यशवंतसुत कृत एक सुंदर पारमार्थिक लावणी. तिचा शेवट :

हा यशवंतसुत धीट जदरतो गोष्टी ।
भजनासी लावी मन नको करूं मज कष्टी ॥

**६०१ ]** बाड–पृ. सं. ८७ × २ = १७४ आरंभींचीं २ पृ. नष्ट **[ १२५**

( १ ) श्रीसमर्थ, मीराबाई, गिरिधर प्रभु, कबीर, श्रीधर, माधव, तुलसीदास, सुरदास, प्रेमाई, मध्वमुनेश्वर, रंगनाथ, आनंदतनय, राघव, दास ( कोणी मिराळे, समर्थ नव्हत ), एकनाथ, कृष्णदयार्णव, आदिनारायण, गोसावीसुत, नामदेव, विष्णुदास नामा, ठाकुरदास, पिंपक, नाथ भुजंग, यांचीं पदपदांतरें

( २ ) पृ. ३१ वर अनुदिनि अनुतापें, असंख्यात ते, नसे भक्ति ना, उदासीन हे वृत्ति, मुक्ति नाहीं बुद्धि, समाधान साधु, या सहा अष्टकांना क्रमांक देऊन त्यांतील प्रत्येक श्लोकाचीं आद्याक्षरें उतरलेलीं आहेत. तसें च पृ. ३२ ते २७ वर सात दि यारांच्या पदांचीं वगैरे आद्याक्षरें दिलीं आहेत.

( ३ ) मोरोपंत कृत विराटपर्व, उद्योगपर्व, केकावली, यांतील कांहीं भाग

## ६०२ ] बाड–पृ. सं. ६६ × २ = १३२ [१००

( १ ) गोसावीनंदन, केशव, कबीर, जनीजनार्दन, आनंदतनय, तुका, माणे, भट गोपाळ, उद्धवचिद्धन, कृष्णदास, पूर्णनिजरंग, नामा, विष्णुदास नामा, एकनाथ, त्र्यंबक, माधवदास, मोरोपंत, यांचीं पदपदांतरें

( २ ) हे भट गोपाळ मला नवीन वाटले. त्यांच्या पदांत कळवळा आहे. एक आठ कडव्याचें त्याचें पद आहे. त्याचा आरंभ :

असा कोण्ही मंत्र सांगा । ... भव मी हा जाईं तरून ॥ ध्रु०
लागतसे तुमच्या पाया येतो मी हो लोटांगणी ।
आणिक पंडित शास्त्री पुराणिक महागुणी ।
क्षुधितासी अन्न घाला कृपा करा मोक्षदानी ।
नको फिरवूं माघारे कीर्ति भरे त्रिभुवनीं ।
ऐसा देहे पुन्हा न ये नरतनु जाईं झरून ।
असा कोण्ही मंत्र सांगा ।... भव मी हा जाईं तरून ॥ १

( ३ ) वामन कृत गोपीगीत व कृष्णजन्म

## ६०३ ] बाड–पृष्ठें १२९ एका बाजूस च लिहिलेलीं [१००

यात मोरोपंत कृत आर्याभारतांतील सभापर्व अ. १ ते ७, वनपर्व अ. १ ते ३, नलोपाख्यान अ. १ ते ४ असून द्रोणपर्वाला सुरवात करून सोडलें आहे.

## ६०४ ] बाड– पृ. सं. ९८ × ४ = ३९२ २२।२२ पृष्ठें आ. व शे. नष्ट [१८९

( १ ) श्रीसमर्थ कृत रामायण. आरंभींचीं पृष्ठें गेलीं आहेत, त्यांत सुंदरकांड व युद्धकांडाच्या पहिल्या शताचे ८३ श्लोक गेले. या पहिल्या शताला या बाडांत द्वितीय प्रसंग म्हटलें आहे. त्यावरून सुंदरकांड म्हणजे च या बाडातील पहिला प्रसंग असावा. नववें शत म्हणजे या प्रतींतील दहावा प्रसंग होय. तेथवर च या बाडात रामायण आहे. पुढचे प्रसंग नाहींत. तेथें लेखकाचें नाव व लेखनकाल हीं दिलीं आहेत. हें श्रीसमर्थकृत रामायण असतां या प्रतींत त्यास मारार्थरामायण म्हटलें आहे व एका प्रसंगाचे शेवटीं तर

' भावार्थरामायणे येकाकार टीका ' म्हटलें आहे. दहाव्या प्रसंगाच्या म्हणजे नवव्या बाताच्या शेवटचा मजकूर :

"इति श्री भावार्थरामायणे युध्दकांडे रावणवधोद्यम श्लोकद्वय प्रसंग ॥ १० ॥ श्रीरामार्पणमस्तु ॥ संवत् १८०१ वर्षे भाद्रपद सुदि ११ बुधे जती राम सभाग्य लिखितमिदं पुस्तकं ..."

हा मजकूर अस्पष्ट झाला आहे. संवत् १८०१ यांतील शेवटचा अंक १ आहे, का २ आहे, का ९ आहे, याची वाटत नाहीं. यांतील पुढचीं सर्व पानें निराळ्या माणसाच्या हातचीं आहेत.

( २ ) श्रीसमर्थ, तुकाराम, गंगाधर, कवि माणकेश्वर, ज्ञानदेव, एकनाथ, गोसावीनंदन, गिरिधर, केशव वगैरेंचीं पदपदांतरें

( ३ ) आनंदतनय कृत सीतास्वयंवर–श्लो. ७९

( ४ ) श्रीरंगअनुजात्मज कृत संतमाळा–ओ. ५७ अप्रकाशित आहेसें वाटतें

६०५ ] बाड–पृ. सं. १००×२ = २०० आ. १० पृष्ठें नष्ट, शे. ७ अपूर्ण [ १५०

( १ ) श्रीसमर्थ, तुकाराम, कबीर, मीराबाई, तुलसीदास, उद्धवचिद्धन, जयरामकाशी, निपटनिरंजन, श्रीधर, नामदेव, यशवंतसुत, आनंदतनय, जयराम, केशव, वामन, शिवदिनकेसरी यांचीं पदपदांतरें

( २ ) मुक्तेश्वर कृत घोषयात्रा

( ३ ) अमृतेश्वर कृत सुदामचरित्र–कडवीं १४

( ४ ) मोरोपंत कृत सन्मणिमाला व दशावतार

( ५ ) कृष्णदासमुद्गल कृत रामायणांतील ३८ ते ५९ अध्याय

६०६ ] बाड–पृष्ठें २६ ते १४१ आरंभींचीं २५ व तिसकींच शे. नष्ट [ १५०

( १ ) या सबंध बाडांत मोरोपंत कृत मंत्ररामायण संपूर्ण असावें.

( २ ) उपलब्ध २६ ते १४१ पृष्ठांत द्वितीय मंत्राक्षरत तों पुढें किष्किंधाकांड, सुंदरकांड पूर्ण, युद्धकांड पूर्ण व उत्तरकांडाचे पहिले बारा श्लोक आहेत.

( १ ) दर तेरा आर्यांनंतर मंत्रसंख्या दिलेली आहे. त्याप्रमाणें युद्धकांडाचे मंत्र ६६ असून एकंदर आर्यासंख्या ८५८ पृ. १२४ वर नमूद आहे.

६०७ ] उसवलेलें जीर्ण बाड-पृ. सं. १५२ × २ = ३०४ बरीं च पृष्ठें नष्ट [ १५०

( १ ) श्रीसमर्थ, कबीर, तुकाराम, एकनाथ, ज्ञानदेव, दीन राघव, लक्ष्मण यांचीं पदपदांतरें. हे दीन राघव व लक्ष्मण शिरगांव मठांतील दिसतात. लक्ष्मणांचीं पदें कृष्णलीलापर आहेत. घुसळण, दळण, कांडण, मस्करी, दंड, शोंधी, चेंडुफळी, सारवण, लपंडाई, हुंबरी, हुतुतु, फुगडी, प्रसाद इत्यादि मथळे त्या पदांना दिलेले आहेत.

( २ ) वामन कृत भीष्मप्रतिज्ञा-श्लोक २१

( ३ ) मोरोपंतांची केकावली संपूर्ण

( ४ ) माझा मायबाप नांदे पैठणांत ।
स्वामी एकनाथ नाम त्याचें ॥ १
माझा मायबाप नांदतो चाफळीं ।
रामदास माउली नाम त्याचें ॥ २

( ५ ) तुकाराम, शनेश्वर, एकनाथ, समर्थ यांच्या ग्रन्थांतील समानार्थी उतारे या बाडांत पुष्कळ दिले आहेत.

६०८ ] बाड-पृ. सं. ५८ × २ = ११६ शिवाय शेवटचीं ५।२५ नष्ट [ १६५

( १ ) श्रीसमर्थ, उद्धवलिंग, नामदेव, राघव, वामन, आनंदतनय, दयार्णव, गोसावीनंदन, तुकाराम, भीम, गिरिधरप्रभु, आपारंगात्मज, आनंद, विष्णुदास नामा, गंगाधरसुत, शंकरसुत, शिवराम पूर्णानंद, केशव, रंगनाथ, इत्यादिकांचीं पदपदांतरें

( २ ) वामन कृत दशावतार-श्लोक १०

( ३ ) एकएका विषयाच्या पायीं नाश करुन घेणारांचीं उदाहरणें सांगून
पांचा हीं विषयांसि जो नर भुले त्याची गती कोणती ॥
असा प्रश्न चवथ्या चरणांत केलेले ते प्रसिद्ध पांच श्लोक

(४) याकी कांहीं साधनें कर या करूं नकोस, पण ज्याचेनि स्मरणें पतीत तरती तो राम सोडूं नको ॥

(५) नरहरि मालो कृत भूपाळी बारा ज्योतिर्लिंगांची

(६) श्रीशंकराचार्य कृत अपराधस्तोत्र व श्रीकाशीविश्वनाथाष्टकस्तोत्र

(७) आनंदतनय कृत सीतास्वयंवर–श्लोक ७९. याच्या शेवटीं लेखकानें आपलें नांव, गाव व लेखनकाळ हीं दिलीं आहेत तीं अशीं : " हस्ताक्षर नरहरि चिमणाजी पतके कसबा करवीर ॥ ... विरोधी नाम संवत्सरेसी । आषाढ पंचमी रविवारेसी । पूर्णता जाली ग्रंथासी । श्रोतीं सावकाश परिसिजे ॥ शके १६११ ... "

(८) दास (?) कृत आरती महाकाळीची, एकनाथ कृत आरती संकष्ट चतुर्थीची, मोरेश्वरसुत काशी कृत आरती चंद्राची, निर्मळदास कृत कोल्हापुरच्या महालक्ष्मीची आरती व हरिदास कृत अंबाबाईची आरती

(९) कांहीं संस्कृत प्राकृत सुभाषितें, दोन कानडी पदें, त्यांत एक पुरंदर विठ्ठलांचें, कांहीं औषधें

**६०९]** १२"×६ ३/४" असें प्रचंड बाड–पृ. सं. २०५×२=४१०[१६५ शिवाय आ. व दे. कित्येक पृष्ठें नष्ट

(१) श्रीसमर्थ, एकनाथ, गोविंदसुत, विष्णुदास नामा, रमावल्लभदास, तुकाराम, गंगाधरसुत, मच्छनाथ, ज्ञानदेव, केशव, नामा, रंगा, रंगनाथ, शिवरामपूर्णानंद, आदिनारायण, अनंतात्मज म्हणजे च अनंतकविसुत म्हणजे च आनंदतनय, अमृतराय इत्यादिकांचीं पदपदांतरें

(२) संस्कृत प्राकृत शेकडों सुभाषितें

(३) वामन कृत भीष्मस्तव, जयद्रथवध, चतुःश्लोकी भागवत, शुकोक्ति, चित्सुधा

(४) गंगाष्टक ( तारावया प्रगटलें जल जान्हवीचें ), नामसुधा

(५) हरिहरनामावली, स्वप्नाध्याय, मुहूर्तविचार, सप्तश्लोकी गीता, अशीं संस्कृत प्रकरणें

( ६ ) भर्तृहरि कृत नीतिशतक, हरिकवि कृत मराठी समश्लोकांसह

( ७ ) एकनाथ कृत हस्तामलक-श्रीमत् आचार्यांच्या मूळ १४ श्लोकांवर नाथांच्या टीकेच्या ६७४ ओव्या.

( ८ ) रंगास्वामी कृत निरंजनाष्टक-प्रत्येक श्लोकाचें चवथें चरण " अद्वैतबोध पदनिश्चय पूर्ण जाला ॥ "

( ९ ) रंगा कृत प्रकृतिपुरुषविचार-ओ. सं. ३५

( १० ) गोसावीनंदन कृत ज्ञानमोदक-प्रथम प्रकरण मंगलाचरण ओवीसंख्या ४७, द्वि. प्र. अनुतापनिरूपण ओ. ३८, तृ. प्र. अधिकारनिरूपण ओ. १२५, च. प्र. गुरुलक्षण ओ. ८४, प. प्र. शिष्यलक्षण ओ. ८८, ष. प्र. गुरुभक्ति ओ. ८०, स. प्र. अनुबंधचतुष्टय ओ. ४६, अ. प्र. अध्यारोपापवाद ओ. २७, न. प्र. पंचीकरण ओ. ७९, द. प्र. जीवेश्वर ओ. ८०, ए. प्र. माया ओ. ५८, द्वा. प्र. ब्रह्म ओ. ५५, त्र. प्र. महावाक्य ओ. ४९, च. प्र. भेदनिरसन ओ. ४७, पं. प्र. श्रवण ओ. ३८

नंतर टीप कीं " याची सा प्रकरणें पुढें लिहिली आहेत मध्यें पत्रें कोरी नव्हती वास्तव ॥ " पण पुढें विवेकसिंधु सुरू होऊन तो हि अपुरा च आहे. पुढचीं पानें नष्ट झालीं आहेत.

( ११ ) मुकुंदराज कृत विवेकसिंधु-सोळाव्या प्रकरणाच्या आरंभापर्यंत

( १२ ) औषधें, गणिताचीं उदाहरणें सोडवण्याच्या रीती वगैरे किरकोळ भाग

( १३ ) या बाडांत दोन ठिकाणीं लेखनकाल दिला आहे : ( १ ) तिसऱ्या च पृष्ठावर म्हटलें आहे " हे वही श्लोक प्रस्तावीक वगैरे लिहिले असे शके १६९१ विरोधी नाम संवत्सरे कार्तिक मास... " ( २ ) दुसरा उल्लेख हस्तामलकाच्या शेवटीं आला आहे तो "शके १६९२ ॥ खर नाम संवत्छरे कार्तिक षद्धे १ मंदवासरे ॥ ते दिने मौजे पातोंडे परगणे जळवद येथें लिख्यते ॥ "

## ६१० ] १५३/४ " × १६१/२ " असा एक कागद [ १५०

यावर श्रीसमर्थ, शनेश्वर, नामा, विष्णुदासनामा व तुकाराम यांचे कांहीं अभंग उतरले आहेत. त्यांत श्रीसमर्थांचे आठ अभंग आहेत व ते

आठचे आठ अप्रकाशित आहेत. त्यापैकीं कांहींचा शेवट दास म्हणे ऐसें जयरामें केलें । जीवन्मुक्त जाले या चि देहीं ॥ किंवा दास म्हणे ऐसें जयरामें केलें । अविनाश दिल्हें पद मज ॥ या चरणानीं केलेला आहे.

६११ ] गळांठा [ १२५

( १ ) बाडें, पोथ्या यांचे अवशेष व कांहीं पत्रें

( २ ) श्रीसमर्थ, तुकाराम, रंगनाथ, अमृतराय, नामा, गोसावीनंदन, अनंतसुत, जयरामात्मजतनय, मयूरपंडित, हरिहर, भीम, मुक्तेश्वर इत्यादिकांच्या पदपदांतराचे कागदाचे तुकडे, त्यांत अनेक सुवर्णकण आहेत.

( ३ ) निःसंदेहदिवाकर, संक्षेप रामायण, सगुणध्यान, निर्गुणध्यान, अंतर्भाव या ग्रन्थाचे कांहीं भाग आहेत.

( ४ ) मोरोपंतांच्या मंत्ररामायणाच्या पद्धतीवर मंत्रभक्तिमाला म्हणून कोणी आर्यावृत्तांत श्रीसमर्थांचें चरित्र लिहिलें होतें, त्याचीं कांहीं पृष्ठें आहेत.

( ५ ) पत्रें सामान्य आहेत. त्यांत एका पत्रांत " १०० बाजीराव पेशवे, २०० होळकर रुपये शालजोडी, ७५ तीटोले, १०० बळवंतराव दिवाणजी, ५० पोतनीस, १२० नागो जीवाजी, १२५ मावे, १०० पाटण-कराकडील रामनौमी सणगे व बीदागी, २०० वावड्याकडील " अशी यादी आहे.

या च सुमारास सातारा जिल्ह्यांतील

## मढें मठांतील

विश्वनाथबुवा आणि अनंतबुवा यांची गांठ पडली होती. पुष्कळ मठ पाहण्यांत आले, पण या दोघांसारखी जाणती तरुण मंडळी क्वचित् च पाहण्यांत आली. दोघे हि अल्पायुषी झाले हें दुर्दैव होय. खुद्द मढेंमठांत आमचें जाणें झालें नव्हतें, पण मठांतील महत्त्वाचा संग्रह आणि कागदपत्रें अनंतबुवांनीं आम्हांकडे पाठविलीं होतीं किंवा गडावर भेटींत आणून दिलीं होतीं. पैकीं कागदपत्रें श्रीसंप्रदायाचीं कागदपत्रें-द्वितीय खंड-यांत प्रसिद्ध झालीं आहेत. येथें आज इतर संग्रहाचें स्वरूप पहावयाचें आहे.

६१२ ] पोथी-पत्रें २११ [१५०

श्रेष्ठांच्या भक्तिरहस्य ग्रन्थाचीं १ ते २५ प्रकरणें पूर्ण व २७ ह्याचें एक च पत्र. अपूर्ण प्रत. हा ग्रन्थ सभेनें वाङ्क ३१९ वरून श्रीरामदासी ग्रन्थमालेंत चवथा भाग म्हणून छापला च आहे.

६१३ ] एक लांबलचक वेटाळें [११४

मराठी साम्राज्याची छोटी बखर म्हणून जी बखर प्रसिद्ध आहे, तिच्यांतील श्रीसंभाजी महाराजांच्या कारकीर्दीच्या जवळ जवळ अखेर पर्यंतचा भाग या वेटाळ्यांत आहे.

नावें ठेवण्याचा हेतु स्वप्नांत हि नाहीं. पूर्वजांना कोण नावें ठेवील ? मागच्या पिढींतील विद्वानांनीं श्रम घेऊन हस्तलिखित ग्रन्थ आणि बखरी वगैरे मिळवून तीं छापून काढलीं म्हणून या पिढींतल्या लोकांना तीं वाचावयास तरी मिळालीं. पण जी गोष्ट काव्यग्रंथांची, ती च बखरींची. काव्यग्रंथांप्रमाणें च बखरी हि अति अशुद्ध छापल्या गेल्या आहेत. छापखान्याकडे पाठविण्यासाठीं मोडीवरून बाळबोध प्रत करताना जी दक्षता ठेवावयास पाहिजे होती ती मुळीं च ठेवण्यात आली नाहीं कीं काय, असें म्हणण्याचा, ही बखर पाहून मोह होतो. छापलेल्या प्रतीशीं हें वेटाळें ताडून पाहिलें तर शेकडो चुका आढळल्या आणि वाईट वाटलें. आधीं च कागदपत्रां इतक्या बखरी विश्वसनीय नसतात, त्यांत आणखी भरतीला शेकडों चुका प्रकाशकांनीं करून ठेवल्यावर छापलेल्या बखरींवर यत्किंचित् हि विसंबून राहणें अत्यन्त धोक्याचें होय, असें च म्हणावें लागेल. या चुक्यांमुळें वाचकाची कशी दिशाभूल होईल, याचें एक मजेदार उदाहरण देतों. ही बखर प्रथम शके १८११ त काव्येतिहाससंग्रहांत छापली गेली. ती च प्रत माझ्या संग्रहीं आहे. तिच्या ३३ व्या पृष्ठावर श्रीशिवरायाला राज्याभिषेक झाल्याचा उल्लेख असून पुढें म्हटलें आहे : "दानधर्म बहुत केला. निंबळपुरी गोसावी बावा वाराणशीहून आले. त्यांचा उपदेश घेऊन संगमेश्वरीं ठेविले. परमानंद गोसावी पोलादपुरीं ठेविले. ते बावा बहुत सिद्ध पुरुष होते व या च गांवीं मोहनीबावा, निंबक नारायणाश्रम, असे थोर सत्पुरुष होते..."

यांत याच गांवीं म्हणजे अर्थात् पोलादपुरीं होय हें उघड आहे व त्या पोलादपुरीं श्रीशिवछत्रपतींच्या वेळीं परमानंद, मोहनीबावा व निंबक नारायणाश्रम असे तीन सत्पुरुष होऊन गेले, अशी माहिती दिली आहे. तीवर विश्वास ठेवून कोणी हि संशोधक पोलादपुरास या विषयाचा शोध चालवील तर तो फसेल आणि आयुष्य फुकट दवडील. यांत याच गांवीं छापलें आहे, त्यापैकीं मुळांत याच ऐवजीं पाठ आहे. मोडी पाठ 'घें' वाचणारानें याच वाचलें. आणि पाठगावीं 'चें' याच गावीं केलें. तसें च मौनीबावा चें मोहनीबावा वाचलें आणि निंबकीं नारायणाश्रम च्या ऐवजीं निंबक नारायणाश्रम वाचलें आणि इतिहासाच्या संशोधकास पुरें घोटाळ्यांत पाडलें. हा एक नमुना, अशा शेंकडों चुका करून ठेवल्या आहेत. हा विस्तार येथें अशासाठीं केला कीं, आपल्या काव्यग्रन्थाप्रमाणें च आपल्या बखरी हि पुनरपि शुद्ध छापण्याची किती आवश्यकता आहे, ही गोष्ट वाङ्मयभक्तांच्या नजरेस यावी.

६१४ ] पोथी–पत्रें १२ [ १०५
पैकीं १ लें च हरपलेलें

( १ ) मठेंमठाचे सह्यापक अमृतेश्वर यांचें संस्कृतांत लिहिलेलें श्लोकबद्ध चरित्र–श्लोकसंख्या १२३

( २ ) चरित्रकाराचें नाव, नाव, काल हीं शेवटीं दिलेलीं आहेत तीं : " इति श्रीमद्‌द्रत्नप्रवर अमृतेशस्य कथा समाप्ता ॥ शके १७५१ श्रावण शुद्ध ५ बुधवासरे माध्या-ह्नसमये संपूर्णा ॥ मालवदेशे आष्टाग्रामनिवासिना ओंकाराख्येन ज्योतिर्विदा शोरोराख्ये ग्रामे कृतमेतत्कथानक लिखितमपि ॥ " यावरून ही प्रत चरित्रकाराच्या हातची च दिसते.

( ३ ) चरित्रावरून माहिती मिळते ती थोडक्यांत अशी : करवीराजवळ मदवर्के गावी विद्वाभृगुकुलातील रुद्र आणि भवानी या दंपत्याच्या पोटीं अमृतेश्वरांनीं जन्म घतला. पांडित्यमातु श्री लहानपणीं च गेले. वधूवर पत्नु दे परांड्रा निघाले. मठांत येऊन गणपतीची आराधना केली. तीव तप केले. दूध, गोमूत्र आणि भातपाला यावर छत्तीस वर्षें काढलीं. गुरुकृपा होण्याचा काळ समीप आला. श्रीसमर्थांचे शिष्य वासुदेव, वासुदेवाचे चिदेश, त्या चिद्देशस्वामींची कृपा अमृतेश्वरावर झाली. त्यांचे शिष्य पावन होत. अमृतेश्वरांचा समाधिकाल १६९२ ज्येष्ठ वद्य १३ गुरुवार व पावनांचा काल शालीवाहन १७४९ च्या आषाढ शु ११ स झाला.

# ६१५ ]

२०" × १०½ " असा एक कागद [ ११२

पुणें मुक्कामीं शके १७३४ त पावनबावा यांनीं स्वमुखें मर्ढे मठाची सांगितलेली हकिकत.

हा कागद मोठा असून त्यांत ओघानें कण्हेरी, मर्ढे व शिरवळचे नारायण गोसावी यांचा मठ, अशा तिन्ही मठांची हकिकत आली आहे.

" स्वामीचे शिष्य कल्याणबावा गोसावी वासुदेव बावा गोसावी व आणखी शिष्य सहा होते त्यांत वडील वासुदेवस्वामी हे वीतरागी जाहाले... वासुदेव स्वामी हे समर्थांचा निरोप घेऊन मौजे कण्हेरीस शिरवळप्रांतीं राहिले त्यांचा सांभाळ महाराज शिवाजी यांनीं करून मठ मौजे मजकुरीं बांधोन देविला..."

कोणते सहा च शिष्य पावनबावांच्या कल्पनेंत होते, कोण जाणे. श्रीशिवाजीमहाराजांनीं वासुदेवस्वामीस शक १५९३ त च सनद करून दिली होती, ही गोष्ट प्रसिद्ध आहे. ( सांप्रदायिक विविध विषयांक ९० व कागदपत्रांतील लेखांक ५५९ ही पहावीं. )

सांप्रदायिक विविध विषयांक ५ यांत शिरवळ येथील श्रीरामदासी मठांची हकिकत देतांना " शिरवळास नीरानदीचे कांठीं दोन मठ आहेत एक नारायणबावांचा व दुसरा वाजी गोसावी याचा, दोघे हि खुद्द श्रीसमर्थांचे शिष्य होते " असें म्हटलेलें आहे, त्यात प्रस्तुतच्या हकिकतीवरून दुरुस्ती करावी लागत आहे. नारायणबावा हे प्रत्यक्ष श्रीसमर्थांचे शिष्य नसून कण्हेरीमठाच्या परंपरेंतील पुरुषोत्तम गोसावी याचे शिष्य होते, म्हणजे भिवाजीबावाचे गुरुबंधु होते, असें या हकिकतीवरून दिसतें.

# ६१६ ]

बाड–पृ. सं. २७ × ४ = १०८
शेवटचीं २ पृष्ठें हरवलेलीं [ १७५

( १ ) या बाडात दोघांचीं हस्ताक्षरें आहेत. आरंभीं एका हातीं श्रीसमर्थांचीं १४३ अभंगपंचकें, पदपदातरें आहेत. त्यांत कांहीं नवीन आहेत. तीं सर्व सवडीनें वाचून पहावयाचीं आहेत.

( २ ) नंतर निराळ्या हातानें लिहिलेलीं श्रीसमर्थ, विदेह, अमृतेश्वर, पावन, शिवराम पूर्ण, एका शिवराम, बसवलिंग, तुकाराम, मत्स्यनाथ, मानपुरी,

रंगनाथ, शंकर, विष्णुदास नामा, माळो, केशव, एकनाथ, जयराम, गोविंद कवी, उद्धवचिद्घन, श्रीधर, विठ्ठल, आनंदनंदन, ज्ञानेश्वर, कवि अनंत, श्रीपति, इत्यादिकांचीं पदपदांतरें आहेत, त्यांत अमृतेश्वरांच्या पदांची संख्या विशेष आहे.

( ३ ) कांहीं सुभाषित श्लोक आहेत ते गोड आहेत.

**६१७ ]** उघवलेलें बाड–पृ. सं. १२० × २ = २४० [१५० पैकीं १ ते ६०, ६२, ६३, ७०, ७१, ७४-७७, ९०, ९१ नष्ट व १२० च्या पुढचीं किती पत्रें हरवलीं असावीं, कोण जाणे.

( १ ) हें बाड थोडें चमत्कारिक च म्हणावयाचें, कारण तें सर्व मोडी लिपींत आहे. त्यांत श्रीसमर्थ, राघव, शिवदिन, तुळसीदास, तुकाराम, शिवरामपूर्णानंद, मच्छमुनेश्वर, गोविंदात्मज, सज्जनरंजन, अनंततनय, गिरिधरप्रभु, उद्धवचिद्घन, अमृत, रंगनाथ, माणकोजी बोधला, केशव, ज्ञानदेव, नामा, जनाबाई, मुकुंद रामानंद, मुक्ताबाई, राजाई यांचीं पदपदांतरें आहेत. त्यांत श्रीसमर्थ व श्रीतुकाराम यांच्या अभंगांचा भरणा जास्त आहे.

( २ ) श्रीसमर्थांच्या अभंगांत कांहीं अभंग अपूर्व आहेत. ते महत्त्वाचे आहेत, पण ते सर्व श्रीसमर्थांचे च आहेत, कां अन्य कोणी त्यांचे म्हणून रचले आहेत, कोणी सांगावें ? ते सर्व उतरले पाहिजेत. त्यांची अपूर्वता वाचकांच्या नजरेस आज च यावी, म्हणून त्यांपैकीं एक दोन अभंग येथें देतों :

[ १ ]

भगवा तो झेंडा रामदास लावी । शिष्यरत्न तें पाही केलें कोणी ॥ १
स्वामी कल्याण.चें न कळे महिमान । खलबत्ता उतरोन पुढें केला ॥ २
मान कापुनीया गुरूसी अर्पिली । अंतर्यांत गेली सांगा कोठें ॥ ३
ज्योतीची निजज्योत मुठींत धाकळिली । प्रचीत दाविली राजियासी ॥ ४
स्वामी रामदास वास निरंजनीं । गुरुशिष्य दोन्ही येक जाले ॥ ५

[ २ ]

करा करा भजन स्वामी सद्गुरूचें । बापुड्या मनाचें काय चाले ॥ १
दोन.शत पांच मनबोध मी केला । तो कां व्यर्थ गेला सबपा चि ॥ २

अवघा उगवा झाडा या मनाचा । छंद राघवाचा चित्तीं धरा ॥ ३
राघव राघव वचनीं बोलता । व्यर्थ सीण करिता नेणोनीया ॥ ४
दास म्हणे आतां गुरुसी शरण जावें । चमत्कार पहावे निजघरचे ॥ ५

६१८ ] महत्त्वाचें पूर्ण बाड–पृ. सं. १०५×४=४२० [२५०

( १ ) समेच्या संग्रहीं पूर्वीच्या मोलाचीं जीं कांहीं बाडें आहेत, त्यांपैकीं हें एक बाड होय. त्यांत सर्वच श्रीसमर्थांचीं पदें आहेत. श्रीरामदासी ग्रन्थमालेंतील पंचविसावा भाग जो श्रीसमर्थांच्या पदपदांतरांचा आहे त्याच्या १९४ पृष्ठापर्यंत पूर्वार्ध पदें २३९, स्फुट पदें १७, आरत्या १३, उत्तरार्ध पदें ३३७, परिशिष्ट पदें ६, गोंदळ २, अशी संख्या आहे, तींतील आरत्या वगळून बाकी सर्व पदपदांतरें क्रमशः व नांवनिशीवार या बाडांत आहेत. शिवाय या बाडांत पूर्वार्धानंतर कांहीं "डफगाणीं" व "पांहांटगाणीं" आहेत आणि उत्तरार्धानंतर अनेक स्फुट पदें आहेत, त्यांपैकीं बरीं च गाणीं आणि पदें आजपर्यंत न छापलीं गेलेलीं अशीं आहेत. कांहीं अत्यन्त मौल्यवान आहेत, हृदयांत प्रवेश करणारीं आहेत, कांहीं घरगुती भाषेंत असल्यामुळें गालांतल्या गालांत हांसवितात, आनंदवितात आणि इटकून वारंवार वाचावींशीं वाटतात. श्रीसमर्थहृदय इतकें अन्यत्र पहावयास मिळत नाहीं. काय आणि कसें सांगूं ! त्यांचा कळवळा पाहिला म्हणजे आपला हि जीव हळुवार होतो. विनोद करण्याची त्याची लहर लागली म्हणजे आपण हि त्यांत च रमतो. एकदा काय त्यांच्या मनांत आलें कोणास ठाऊक,

काशी कांती कोल्हापुर । काश्मिर कुशावर्त काउर ।
कानड कर्नाटक कंदार । कनकी लंका ॥ १

अशीं वर्णानुक्रमानें क पासून ह पर्यंत ६० कडव्यांत गावांचीं नांवें सांगितलीं आहेत. पुन्हां दुसऱ्या एका प्रकरणांत वर्णानुक्रम सोडून

सुरत संपाईत लाहुर । भडोंच रुमशाम कंदार ।
गोवें चंदी चंद्राउर । विसाउर ॥

अशा ७५ कडव्यांत गावांचीं, देशांचीं, लोकांचीं नांवें आलीं आहेत. कोणत्या निमित्तानें हीं दोन प्रकरणें लिहिलीं गेलीं, का इतकीं ठिकाणें त्यांच्या

पाहण्यांत आलीं होतीं, हें आज कोणी सांगावें ? या सर्व गांवांना त्या काळीं कोणत्या ना कोणत्या कारणानें महत्त्व होतें.

शिवराव देवराव धानतराव दळपतराव
दिनकरराव दळपटराव धारेराव ॥ १

असें ११ कडव्यांचें एक डफगाणें माणसांच्या नांवांचें च आहे. निरनिराळे धंदे, जाती आणि कारखाने यांचेवर १२ कडव्यांचें, निरनिराळ्या धार्मिक पंथांवर २० कडव्यांचें, अरण्यें, अरण्यांची शोभा आणि अरण्यांतील जनावरें यांच्यावर २७ कडव्यांचें, अशीं अनेक विषयांवर अनेक दंडिगाणीं आहेत. तीर्थावळीचें दंडिगाणें हि या बाडांत आहे. श्रीसमर्थांची अप्रकाशित अशी बरी च कविता या बाडांत आहे. ती सर्व उतरून काढावयाची आहे.

(२) अशा या बाडांतील तूर्त दोन पदें देऊन पुढें जाऊं.

[ १ ]

नरा नरदेहा येऊन । येव्हढें करीं रे तूं साधन ।
जाईं सद्गुरुसी शरण रे । पावशी मोक्ष ॥ १
अन्य साधनें बहुतें । वृथा जाण रे निरुतें ।
येक्या सद्गुरुभजना परतें । नाहीं सार ॥ २
सार नाहीं रे दुसरें । वेद बोलिले निर्धारें ।
आणिक शास्त्रें हि अपारें । पुराणादिक ॥ ३
ऐसें जाणुनियां गुरुपाईं । अनन्य भावें शरण जाईं ।
जीवन्मुक्त होसी देहीं । दास म्हणे ॥ ४

[ २ ]

देव देवावरी देऊळ । देवळा वर्तीं ब्रह्मगोळ ।
त्यापरतें शून्य मंडळ । परता देव ॥ १
देव परता ना आरता । देव वर्ता ना खालता ।
देव निश्चळ पुरता । सर्वां ठाईं ॥ २
देव अनंत अपार । देव निर्गुण निराकार ।
त्याचा शोधावा विचार । साधुपासीं ॥ ३

दास मौजेनें घोलिला । शोध शोधावा आपुला ।
व्यर्थ कासया गळला । जन्मवरी ॥ ४

( ३ ) हें बाड कोणाच्या हातचें असावें हें सांगता येणें कठीण आहे. त्यांत दोन निरनिराळ्या व्यक्तींचीं हस्ताक्षरें आहेत. न जाणों, त्या दोन व्यक्ती वासुदेवस्वामी व विदेहस्वामी असतील !

**६१९]** गठ्ठा–अगदीं किरकोळ
समर्थ, अमृतेश्वर, सज्जनरंजन, मध्वनाथ, तुका, शिवदिन [१००

**६२०]** पोथी–पत्रें सुमारें १००० [ १४५

मर्देमठसंस्थापक अमृतेश्वर कृत पीयूषरामायण

( १ ) या रामायणांत बाळकांडाच्या पूर्वी एक आदिकांड आहे. त्याचे १९ अध्याय आहेत. बाळकांडाचे ३९, अयोध्याकांडाचे ३२, अरण्यकांडाचे ३०, किष्किंधाकांडाचे २२ व सुंदरकांडाचे ५५ अध्याय आहेत.

( २ ) युद्धकांड नाहीं. कै. अनंतबुवा पाठविणार होते, पण तें तसें च राहिलें. अर्थात् तें मर्देमठात असलें पाहिजे. तें मिळविलें पाहिजे, म्हणजे ग्रन्थ संपूर्ण होईल.

( ३ ) अयोध्याकांडाच्या शेवटीं " शके १७०७ विश्वावसु नाम संवत्सरे चैत्र वद्य द्वादशी " असा लेखनकाल दिलेला आहे. किष्किंधाकांडाच्या शेवटीं एकंदर ओवीसंख्या ३०७२ दिलेली असून १७०७ आषाढ शु. १५ गुरुवासर, असा लेखनकाल नमूद आहे. सुंदरकांडाच्या शेवटीं लेखनकाल, लेखकाचें नाव, गाव व तोंवर्यंतची एकंदर ओवीसंख्या हीं दिलेलीं आहेत, तीं अशीं : १७०७ आश्विन शु. १४ हस्ताक्षर गंगाधर सखाजी मुढे कुळकर्णी मौजे खरसी ओव्या संख्या ७०९०.

## सातान्याकडील आठ गांवें

१८२८ च्या पौषात चाफळ, इस्लामपुर, शिराळें, वाटेगाव, ओझर्डें, बोरगाव, मिरज व ब्रह्मनाळ हीं आठ गावें, काहीं पहिल्यादा व काहीं दुसऱ्यादा, घेतलीं. शिवथर कोठें आहे, त्याचा शोध लागेना म्हणून कुडाळलोन्यात वृथा तपास केला. इसलामपुरास सवनिसाकडे काहीं कागदपत्रें असतील म्हणून कोणी सांगितलें होतें, त्यासाठीं तेथें शोध घेतला, पण काहीं नव्हतें. शिराळ्यास्

मारुतीदर्शनास जावयाचें च होतें श्रीसमर्थांनीं स्थापिलेल्या मारुतींपैकीं दुसरी कडे कोठें एवढें मोठें मारुतीचें देवालय नाहीं. शिराळ्यास श्रीसमर्थांचे जयराम म्हणून शिष्य होते. जयरामाची समाधी येथें च मारुतीच्या देवालयाच्या समोर एका शेतात आहे. समाधीचें मंदिर अर्धवट उभें आहे. मंदिरावर पिंपळ वाढू दिल्यामुळें तें अर्धें पडलें आहे व वेळीं च दुरुस्ती न झाल्यास सर्व च पडेल. शिष्यपरंपरा चालू आहे, पण कोणास काळजी आहे, असें दिसलें नाहीं. आता सबंध गावानें च मनावर घेतलें पाहिजे. समाधीचा चिरा २′ × १′ × १′ असून त्यावर कोरलेला त्रयोदशाक्षरी मंत्र अद्यापि याचावयास मिळतो मठाला अद्यापि काहीं उत्पन्न चालू आहे का नाहीं, ठाऊक नाहीं, पण जयरामाच्या वेळीं होतें. १६५५ वैशाख व. २ गुरुवार या दिवशीं श्री शाहु छत्रपती यानीं खुद्द जयरामाना उत्पन्न करून दिलें होतें. जीर्ण कागदाचा केरकचरा मिळाला, त्याचा विचार पुढे करूं. श्रीसमर्थशिष्य नीलोमठपती आण्णाप्पा हे मूळचे शिराळ्याचे च राहणारे होत. या गावीं आग्रहास एका अपूर्व वस्तूचा लाभ झाला आहे ग्रंथराज दासबोधाची एक सुंदर प्रत मिळाली आहे. ती जयराम किंवा आण्णाप्पा यापैकीं कोणाच्या तरी हातची असावी. तिची हकिकत पुढें सांगू. येथील देशपांडे यांच्या सांठीं येथें मारुतीची स्थापना झाली, असें कळल्यावरून देशपांड्याचा तपास केला. काहीं मिळालें नाहीं. त्यांचीं दोन घरें वाटेगाव व ओझर्डे येथें आहेत, त्यांच्याकडे कागदपत्राचा समग्र खास आहे, असें कळल्यावर त्या दोन्हीं गावीं गेलों, पण तेथें हि काहीं प्राप्ती झाली नाहीं. ओझर्ड्यांस देशपांडे यांच्याकडे शक १६२६ व १६४६ तील दोन सनदा पाहण्यात आल्या, त्यात पूर्वीचे कागद दग्ध झाल्याचा उल्लेख होता, तेव्हा ते खरोखर च दग्ध झाले असावेत असें मानून वाटल्यास आशा सोडावी. या वेळीं गावोगावीं आग्रहास सांगण्यात येई कीं, कोणी हरणसाहेब म्हणून होऊन गेले त्यानीं आमचे कागद नेले! हे हरणसाहेब कोण होते व त्यानीं लोकांचे कागद हरण करून कसे नेले, याचा अर्थ मला समजेना. पण एका गावीं एका ऐतिहासिक घराण्यांत माझ्या पाहण्यात होंनें नावाच्या साहेबाचा एक खलिता च आला, त्यात म्हटलें होतें कीं, " तुमचे १२६ रुमाल आणले होते ते परत केले आहेत. " तेव्हा, हरणसाहेब यानीं कागद नेले होते ही दंतकथा नसून इतिहास आहे, असें ध्यानीं आलें.

## मिरज येथें दोन मठ

आहेत, एक मोठा आहे व दुसरा लहान आहे. मोठा मठ तो श्रीवेणाबाईचा व धाकटा तो सद्गु: बा अक्काबाईचा. अक्काबाई या च समर्थप्रतापांतील चाइयाबाई असाव्यात. अक्काबाईचे शिष्य वोडकर गोविंदबुवा व गोविंदबुवापासून पुढें गुरुपरंपरा चालत आली आहे ती अशी: गोविंदबुवा–रामचंद्र–आपाजी–सखाराम–राजाराम–विठ्ठल–रामचंद्र–कल्याण. मोठ्या मठात श्रीसमर्थांच्या हातचा मारुती आहे व श्रीसमर्थांनीं दिलेलें रामपंचायतन आहे. वेणाबाईची समाधी गडावर आहे, हें सर्वश्रुत च आहे. धाकट्या मठांत अक्काबाईची समाधी आहे व तिच्यावर त्रयोदशाक्षरी मंत्र आहे. धाकट्या मठाची संबंधी मंडळी कुरोर येथें राहतात. तिकडे मी तपास केला नाहीं. संशोधन पुरें झालें, असें कधीं च म्हणतां येणार नाहीं. संग्रह थोडा मिळाला.

## ६२१ ]

एक सुंदर मोहरेदार सोनेरी वर्खाचा भीमती थाटाचा कागद [ २२५

### गिरिधर कृत एक हकिकतवाका

श्री रामदासी ग्रन्थमालेंतील चोविसाव्या भागांत जे दहा वाके छापले आहेत, त्याहून हा वाका निराळा आहे. मथळ्याच्या उजव्या अंगाला वाक्याचें नांव असावयाचें, पण तेथील कागद फाटला आहे. आंतील संदर्भावरून मी त्याचें नाव भीमकपिवाका असें ठेवतों. कागदाचें रक्षण व्हावें या बुद्धीनें च कोणी तो कापडावर डकवून पुन्हा त्याचें वेटाळें करून ठेवलें होतें. त्यामुळें कागदाला ठणकपणा येऊन घडीच्या जागीं त्याचा काहीं काहीं भाग गळून पडला आहे. वाका एकवार छापला पाहिजे. तो मेधणीय आहे. तो बहुधा गिरिधरांच्या हातचा च अस्सल आहे. काचेच्या चौकटींत बसवून श्रीसमर्थवाग्देवतामंदिरांत तो दर्शनार्थ टांगून ठेवला पाहिजे.

## ६२२ ]

उसवलेलें बाड–पत्रें २ ते २२ पुढचीं कितीं गेलीं कोणी सांगावें [ १५०

श्रीसमर्थांचे अभंग–३ ते १०१

## ६२३ ]

उसवलेलें जीर्ण बाड–पत्रें २५ [ २२५

( १ ) यांत श्रीसमर्थ, तुकाराम, केशव, जगज्जीवन, उद्धवचिद्धन, साम्राज्य कल्याण, गोसावीनंदन, जयवंत, माधवदास गोसाई, मच्छनाथ, इत्यादिकांची पदपदांतरें

( २ ) या बाडाचें अक्षर मोठें आहे. तें पाहून मला डोमगांव मठांतील बाडांक ५२ ची आठवण झाली. न जाणों दोन्ही बाडें कल्याणशिष्य केशव यांच्या हातचीं असतील.

६२४ ] एक अर्धवट बाड–पृ. सं. ९ × २ = १८ आणि गळाठा [१५०

( १ ) बाडांत शिवरामाचें एक अर्धवट पद, अनंत कवींचा एक श्लोक, श्रीसमर्थकृत काहीं करुणाष्टकें व हनुमंताच्या जन्मकाळावर अपूर्ण सवाया अशीं आहेत.

पिता माता बंधू तुजविण असे कोण मजला ।
यहू मी अन्यायी परि सकळ ही लाज तुजला ।
न जाणे मी काहीं जप तप पुजा साधन रिती ।
कृपादृष्टीं पाहे शरण तुज आलों रघुपती ॥ १

( २ ) गळाठ्यात भीमरूपी वगैरे.

६२५ ] जमाखर्चाच्या वहीसारखे २१" × ६½" उभें बाड पानें ६७ पूर्ण, ६८-७० अर्धी, ये. चीं काहीं गेलीं [ ५८

बाड आधुनिक तर खरें च, पण महत्त्वाचें आहे. इ. स. १८९१ त बाबाजी अनंत तेंडुलकर यानीं जें काहीं श्रीरामदासी वाङ्मय प्रकाशित केलें होतें, त्यात 'आत्मारामबोवाकृत श्रीसमर्थरामदास स्वामींचें चरित्र' आहे. प्रस्तुतच्या बाडात त्या आत्मारामबोवांची इतर कविता आहे. त्या चरित्रात आणि या कवितेंत बोवांची परंपरा अनेकदा आली आहे ती अशी : श्रीसमर्थ–कल्याण डोमगावकर–जगन्नाथ तडवळेकर–यादव नगर प्रांतीचे–दत्तात्रय कोयाळचे–रामचंद्र कोयाळचे च–आत्माराम. आत्माराम चोरेगावीं मठ करून असत. चोरेगाव नव्हे, चोरेगाव. तें अजून आमच्या पाहण्यात आलेलें नाहीं. पण या बाडावरून असें वाटतें, तो मठ संशोधनाच्या दृष्टीनें पाहण्यासारखा असावा. आत्मारामानीं श्रीसमर्थचरित्र शके १७८९ त लिहिलें आणि प्रस्तुतच्या बाडात एके ठिकाणीं लेखनकाल आला

आहे तो शके १७९८ चा आहे. सुमारें साठ वर्षांमागें श्रीसमर्थसंप्रदायांत कसे अधिकारी पुरुष होऊन गेले, याची कल्पना या बाडावरून होणार आहे.

( २ ) हें बाड मुख्यतः आत्मारामांच्या च कवितेचें आहे, पण त्यांत क्वचित् ठिकाणीं श्रीसमर्थ, कल्याण, तुकाराममहाराज, कबीर, जनी, हैबती निरंजन आणि मच्छिंद्रनाथ यांचीं पदपदार्थें आढळलीं. संख्या मोजली नाहीं, पण आत्मारामांचे चार पांचशें अभंग या बाडांत सहज असतील. शिवाय त्यांचीं पुढील प्रकरणें आहेत : (१) मातापुरनिवासिनी रेणुकेची आरती, (२) वेदांत, सिद्धांत, धादांत यांचें विवेचन करणारें आत्मबोध प्रकरण, ( ३ ) संतनामावल्या अनेक प्रसंगीं, अनेक प्रकारांनीं लिहिलेल्या, ( ४ ) गर्भगीतेवर टीका, (५) योगवाशिष्ठांतील कांहीं श्लोकांवर टीका, (६) भागवतांतील कांहीं श्लोकावर अभंग, ( ७ ) निर्गुणरूप म्हणून श्रीसमर्थचरित्रपर ५४ ओव्या, पृष्ठांक २२ वर, ( ८ ) पृष्ठांक २३ ते ३५ गीताभाव म्हणून श्रीमत् भगवद्गीतेवर अध्यायवार एकंदर ७६७ ओव्या, ( ९ ) श्रीसमर्थांचें स्वरूप, ओ. सं. ८१, ( १० ) चौसष्ट अध्यात्मरामायणसार, पृष्ठांक ३७, ( ११ ) ५० व्या पानावर गीतातत्त्व, ओवीसंख्या १५०, या प्रकरणांत सहजगत्या तुकाराममहाराजांची महती वर्णन करून आत्माराम म्हणतात— गीतेचें अर्थासाठीं । बहुतीं केली आटाआटी । तुका सहज बोले गोष्टी । तें चि गीतातत्त्व ॥ ११३ ॥ ( १२ ) आदिपुरुष– ओ. सं. ९०, पृ. ५२, ( १३ ) बाराखडी– ओ. सं. ३१३, ( १४ ) नमन– ओ. सं. २००, ( १५ ) रामकथा, ( १६ ) विराट पुरुष- ओ. १००, पृ. ६३, ( १७ ) ब्रह्मनिरूपण–ओ. १००, पृ. ६५, ( १८ ) ब्राह्मणोऽस्य मुखमासीत् । इत्यादि

( ३ ) आत्मारामांच्या अभंगांत भक्तिप्रेम ओतप्रोत भरलेलें आहे. आमच्याच्यानें आता होणें नाहीं, पण ही सारी कविता कोणी छापून प्रसिद्ध केल्यास संप्रदायाच्या वैभवांत भर च पडेल. श्रीसमर्थचरणांवर जडलेली आत्मारामांची निश्चल दृष्टि त्यांच्या सर्व कवितेंत आढळते. प्रेमाच्या भरांत त्यांच्या कवितेचा अखंड प्रवाह सारखा वाहत चालला आहे, असें वाटतें.

माझी सद्गुरु माउली । वनीं एकटी राहिली ॥ १

माझे सद्गुरु माये । वत्सालागीं धांवत ये ॥ १

माझा सद्गुरु करुणाकर । दीना सांभाळी वारंवार ॥ १

सद्गुरूशी विनविलें । तेणें माझें सार्थक जालें ॥ १

सद्गुरु कैवल्यनिधान । तयापासीं समाधान ॥ १

सद्गुरु पैलाड पैलाड । तेथें नाहीं माया आड ॥ १

सद्गुरु दाता कनुवाळ । दीना दासाचा प्रेमळ ॥ १

सद्गुरु दाता नेणे कांहीं । उंच नीच सर्वां ठाईं ॥ १

सद्गुरुनाथ भक्तराये । कोणा मोकलिले सांगूं काये ॥ १

सद्गुरु उदाराचा राणा । भक्त घरींचा पोसणा ॥ १

सद्गुरु हा अभिमानी । भक्त घरींचा बंदीखानी ॥ १

अशा चरणांनीं आरंभिलेले पांच पांच दहा दहा चरणांचे त्यांचे शेंकडों अभंग आहेत, ते वाचतांना कोणाचें हि देहमान हरपेल ।

सद्गुरूसी जन्मांतर । घेणें घडे अवतार ॥ १

( इतर अवतारांचा उल्लेख करून पुढें म्हणतात )

पुढें होणार कलंकी । ऐसें बोलताती लोकीं ॥ ११

भक्तवचनासाठीं । जन्म घेणें उठाउठी ॥ १२

रामदासा जन्म घेणें । आत्मारामा संघटणें ॥ १३

पुढें कळवळून म्हणतात

बहु बोलिलों वाचाळ । तुम्ही हरा तळमळ ॥ १

माझें जीर्ण करा खरें । मी तों बोलिलों लेकुरें ॥ २

भीष्मप्रतिज्ञा खरी केली । आतां ब्रीदें सोडियेलीं ॥ ३

तुम्ही दीनाचे दयाळ । दीनालागीं कनुवाळ ॥ ४

येऊनिया मजलागीं । उचलोनी घेईं वो वोसंगीं ॥ ५

भेटी अंतीं सविस्तर । सकळ कळे तो मजकूर ॥ ६

रामदासा भेटी न होतां । आत्माराम दुःखभरिता ॥ ७

असे शेंकडों अभंग नको प्रकाशित व्हावयाला ? संशोधनवृत्तांत याहून पाल्हाळ किती करूं !

( ४ ) पृ. ३५ वर गीताभाव समाप्त करतांना लेखनकाळ वगैरे दिला आहे तो असा :

इति श्री भगवद्गीता । संपविली ओव्या गातां ।
भीष्मपर्वणी म्हणता । जेथें तेथें ॥ ७९

बहुता पंडितांनीं । व्याख्या केली इयालागुनी ।
तो चि मार्ग धरूनी । गाइल्या ओव्या ॥ ८०

सके १७९८ सतरासे अठ्याणव । ते संवत्सरीं गीताभाव ।
बोलियली लाघव । आत्मारामसुतें ॥ ८१

चोरेमठीं जाण । समास करविलें लेखन ।
श्रीमारुतीचें चरण । स्मरोनिया ॥ ८२

श्रावण शुद्ध त्रयोदसी । पूर्ण केले गीतेसी ।
अध्याये जाण अष्टादशी । भावार्थबळें ॥ ८३

( ४ ) हें बाड मूळचें असून आत्मारामांच्या च हातचें असावें, असें वाटतें. तें चोरेगांवमठांत असावयास पाहिजे होतें. तें मिरज मठांत कां मिळावें, समजत नाहीं.

## ६२६ ] दुमडलेला एक कागद [ १०

कागदाच्या एका बाजूस अभंग प्रयाणकाळीचे लिहिले आहेत व दुसऱ्या बाजूस समर्थचरित्रांतील अपूर्ण ओव्या आहेत. त्या ओव्या मागच्या च ६२५ व्या बाडांकांत आत्माराम कृत निर्गुणरूप म्हणून श्रीसमर्थचरित्रपर ज्या ५४ ओव्या आहेत, त्यापैकीं च आहेत. अभंगापैकीं पहिले दोन अभंग प्रकाशित आहेत, पण ते ' अंतकाळीचे ' म्हणून मुद्दाम निर्दिष्ट केले आहेत, शिवाय त्यांत पाठांतरें हि आहेत. शेवटच्या अभंगांत तर फार च फरक आहे. यासाठीं ते अभंग येथें उतरून घेणें अवश्य वाटतें. या कागदाला अधिकृतपणा यावा म्हणून च कीं काय, ' लेखनावधी ' असा लेखनसमाप्तीचा शिक्का त्यावर दिला आहे.

### अभंग प्रयाणकाळीचे

उतावेळ चित्त भेटीचे आरत । पुरवी मनोरथ मायेबापा ॥ १
रात्रंदिवस मज लागलासे सोस । भेटी घात्री आस उचाट हा ॥ २
पराधीन जिणें नको करूं रामा । नेईं निजधामा आपुलीया ॥ ३

तुजवीण रामा मज कोण आहे । विचारूनि पाहे मायबापा ॥ ४
रामीं रामदास बहु निर्बुजला । मीतूंपण ठेला मोळऊनि ॥ ५

जन्मोनीया तुज भजलों या च बुद्धी । प्राणत्यागसंधी सांभाळीसी ॥ १
उचित न चुके आचिंत्य श्रीरामा । आपुले रूपीं आम्हां ठाव देई ॥ २
जन्मवरी तुज धरिलें हृदई । आतां या समई पावे तव ॥ ३
निष्कामतर तुज सेवायाची आशा । अंतीं रामदासा सांभाळावें ॥ ४

इतकें वचन बोलोन । केलें श्रीरामाचें ध्यान ।
देह अचेतन । जाला तेव्हां ॥ १

मुखांतुनी ज्योती निघालीसे तेव्हां । मूर्तिमुखीं जेव्हां प्रवेशली ॥ २
हर हर शब्द जाहाली गर्जना । चाकाटला राणा अयोध्येचा ॥ ३
सर्व हि मंडळी सावधान जाली । भजनीं लागली समर्थांच्या ॥ ४
विधियुक्त क्रिया ब्राह्मणांनीं केली । संस्कारवेळी अग्निसंगें ॥ ५
तिसरे दिवशीं रक्षा काढिली सर्वांनीं । नवल ते स्थानीं येक जालें ॥ ६
अखंड ती शिळा मंत्रा पै सहित । गीता भागवत श्लोक तेथें ॥ ७
सर्वांनीं वाचिले बहु शोक केले । गुप्त प्रगटले शब्द कानीं ॥ ८
आकाशवाणी जाली शब्द प्रगटले । समाधान केलें समर्थांनीं ॥ ९

माझी मूर्ति गेली खरी । परी मी आहे जगदांतरीं ॥ १
तुम्ही पाहा शोधुनी । दासबोधीं रामवाणी ॥ २
रामें सांगितला बोध । दासें लिहिला संवाद ॥ ३
अर्थ तेथींचा एक । भजा जानकीनायेक ॥ ४
रामदास सांगे खूण । हें चि परमार्थाचें धन ॥ ५

## आनंदमूर्तींचें ब्रह्मनाळ

हें या दौऱ्यांतील आठवें ठिकाण होय. कृष्णाकांठीं असून कांठावर आनंदमूर्ति व त्याचे गुरु रघुनाथस्वामी यांच्या समाधी आहेत. स्थान रम्य आहे. निस्सीम व अलौकिक गुरुभक्तीबद्दल आनंदमूर्तींची प्रख्याति आहे. ते आपल्या गुरूंच्या जो[illegible] संवळींत वागवीत व त्याची पूजा करीत, हें कोणास ठाऊक नव्हतें. ते एकदां वडगांवीं जयरामस्वामींच्या गुरूंच्या पुण्यतिथीला गेले असतां संवळी ठेवून स्नानास गेले होते, तेव्हां कोणास गीतेच्या पोथीची

जरूरी लागली असतां यांच्या संवळीत गीता असेल म्हणून पाहिलें ती जोड्यादेरजीं त्यास गीता च आढळली, हे स्नानाहून आले, सवळी कोणी पाहिली म्हणून यांस कळलें, मनांत खजिल झाले, पण खजिल होण्याचें कांही कारण च नव्हतें, कारण जोड्याची गीता च झाली होती, ही गोष्ट यांच्या चरित्रांत विख्यात आहे. गोष्टीचें तात्पर्य इतकें च कीं, गुरुक्षेत्रींचे भोंडे पशु पक्षी श्वान। सर्वे पूज्यमान गुरुदासा॥ असा सिद्धान्त आहे. तो जोडा येथें मठात अद्यापि हि पहावयास मिळतो. आनंदमूर्ति हे श्रीसमर्थपंचायतनांपैकीं एक होत. त्यांचा समाधिकाल वैकुंठ चतुर्दशी १६१८ व त्यांच्या गुरूंचा भाद्रपद शु. २ शके १५८८ होय. मठात त्यांची परंपरा समजली ती अशी : श्रीशंकराचार्य–वासुदेवानंद–परमानंद–वैकुंठानंद–कृष्णानंद–रंगनाथस्वामी–काशीराजस्वामी–रघुनाथस्वामी–आनंदस्वामी. आनंदमूर्ति हे गृहस्थाश्रमी होते.

६२७ ] कागदांच्या तीन गड्डया [१००–२००

(१) आनंदमूर्तींच्या मठांतील ७७ अस्सल सनदांच्या नकला. या अस्सल सनदा एकवार पहावयास मिळाल्या होत्या. त्यांच्या नकलाची ही गड्डी होय. आदिलशाही, मराठेशाही, पेशवाई यांच्या काळातील या सनदा आहेत. त्या छापून तरी निघाव्या किंवा त्यांचा अभ्यास करून कोणी एकादें टांचण तरी तयार केलें पाहिजे. या नकला आप्पासाहेब रणदिवे यानीं केल्या आहेत.

(२) दुसरी गड्डी ४२ सनदांपत्रांच्या नकलांवरून केलेल्या नकलांची आहे. हे हि कागद, आनंदमूर्तींचें चरित्र तयार करताना उपयोगी पडतील. या नकला कृष्णराव करमरकर यानीं करून ठेवल्या आहेत.

(३) तिसऱ्या गड्डींत गोपाळात्मज बापानंद कृत आनंद-चरितामृत नांवाचें सोळा अध्यायाचें आनंदमूर्तींचें ओवीबद्ध चरित्र आहे. मूळ चरित्र ब्रह्मनाळ येथें आहे, त्याची ही नकल दासविश्रामधामाच्या प्रस्तावनेंतील श्रीधरपंतांच्या हातची आहे.

## जांबेच्या आसमंतात्

१८२९ चैत्र शु. १३ पासून चैत्र व. १० पर्यंत बारा दिवस जांबेच्या

समोंवार हिंडलो. त्या हिंडण्यात जाब, गुंज, हिवरें, आसनगाव, पोखरी, पाटोदे, मेंढाळे, पिंपळगांव, आनंद, जळगाव, साहेगाव हीं मुख्य ठिकाणें घेतलीं. या भागात ठोसरांचीं पाच पचवीस घरें आज हि आहेत. ठोसरांचे उपाध्ये चाभाडे, यांचीं घरें मेंढाळे आणि पिंपळगांव येथें आहेत. जांबेच्या पूर्वी श्रीसमर्थांचे पूर्वज हिवरें येथें च रहात असत. मातापुरची देवी व हिवऱ्याचा मुंजा हीं ठोसरांचीं कुलदैवतें होत. मुंजाचें हल्लीं जें देवालय आहे तें महारुद्रस्वामींनीं बांधलें, असें कळलें. मार्गशीर्ष शु. ४ ला मुंजाचा कुलाचार असतो. गुंज येथें १००।१२५ वर्षामागें राजारामबुवा म्हणून कोणी होऊन गेले, त्यांची समाधी गोदातीराला आहे ज्याहमादव हें गाव पैठणच्या अलिकडे ६।७ कोस आहे. तेथील कुळकर्ण्यांच्या मुलाला भेग्रांची मुलगी दिली होती. त्या घराण्यातील कोणी पुरुष पोखरी येथें राममंदिर बांधून रहात असतात त्यांचे कडे १७३५ तील एकवीसक्समासीची प्रत पाहण्यात आली होती. त्या प्रतीचें हस्ताक्षर ' जयरामसुत बाळभट जोशी जांबकर ' यांचें होतें. तसें च त्यांच्या जवळ १७५९ तील मनाच्या श्लोकांची एक सुंदर वही होती. ती महारुद्रस्वामींच्या हातची आहे, असें ते म्हणाले होते दासबोधाची प्रत १७७४ तील होती. पिंपळगावीं उपाध्यांच्या कडे बरा च संग्रह आहे. ' लोलींबाढखानविनोदार्थे कविना यापमल्लविरचित चिंतामणिसुतरामचंद्रेण लिखित ' असें एक आठ पृष्ठांचें विचित्र प्रकरण त्या संग्रहात होतें. त्या संग्रहात हनुमंतस्वामींनीं लिहिलेल्या बखरीची प्रत होती, ती मिळाली.

आंबड हें गाव बरें च महत्त्वाचें दिसतें. तसें च तें जुनें हि आहे. तेथील पोखरणीचा तलाव, महादेवाचा डोंगर, खंडोबाचें देऊळ, देवीचें देऊळ, हीं स्थळें प्रेक्षणीय आहेत. देवीच्या देवालयात देवी अहिल्याबाई होळकर यांची साक्ष आहे देवालय लहानशा टेकडीवर आहे व वरपर्यंत जाण्यासाठीं ज्या पायऱ्या आहेत त्या अहिल्याबाईनीं बांधल्या आहेत देवालयाच्या दक्षिण दरवाज्याच्या बाहेर पाच ओळींचा एक शिलालेख आहे, पण तो बरा च पुसून आणि घुळून गेल्यामुळें अस्पष्ट झाला आहे दुसऱ्या ओळींतील ' अपि त पुराण करा श्रवण मनन, ' तिसऱ्या ओळींतील ' महिमा पर्वताचा ' आणि पाचव्या ओळींतील ' सन ११६० ' एवढा च मजकूर आम्हांस लागला या गावचीं देशमुखदेशपांड्यांचीं घराणीं महत्त्वाचीं आहेत. त्यांच्याकडे संशोधनाला पुष्कळ वाव आहे. देशपांड्यांच्या पैकीं एका

घरीं हनुमंतस्वामींनी लिहिलेल्या बखरीची प्रत मिळाली, ती या दौऱ्यांत मिळालेली दुसरी प्रत होय व कांहीं थोडीं कागदपत्रें नुसतीं पाहण्यांत आलीं. आश्रमस्वामींचा मठ म्हणून एक प्रख्यात ठिकाण आहे. आम्ही त्या मठात च उतरलों होतों. मठाची परंपरा अशी : श्रीसमर्थ-कल्याण-जगन्नाथ-यादव-राघव-अच्युताश्रमस्वामी. अच्युताश्रमस्वामी यांनीं हा मठ स्थापिला. १७४५ श्रावण शु. १२ स स्वामींनीं समाधि घेतली. त्याच्या पश्चात् त्र्यंबक-जीवन-गणेश-रंगनाथ, अशी परंपरा चालत आली आहे. मठात ग्रन्थसंग्रह विपुल असून तो डाव्या बाजूच्या बळदात व्यवस्थित ठेवलेला होता. या खेपेस तो फक्त पाहण्यास मिळाला. संग्रहात दासबोधाच्या दोन प्रति, १६४४ व १६५३ या शकातील ज्ञानेश्वरीच्या दोन प्रती, उद्धवसुतकृत श्रीसमर्थचरित्र इत्यादि ग्रन्थ होते. त्यात श्रीमत् भगवद्गीता, विष्णुसहस्रनाम, भीष्मस्तवराज, अनुस्मृति आणि गजेंद्रमोक्ष, अशा पंचप्रकरणाची अप्रतिम, सुंदर, सचित्र पंचरत्नीगीतेची बांधलेली पोथी होती. त्या वेळीं जरी ती पोथी मिळाली नाहीं आणि मिळणें शक्य नव्हतें, तरी अखेरीस मिळाली. ती कशी, याची हकिकत, श्रीरामदासी संशोधनाच्या प्रथम खंडात आरंभीं जे सिद्धान्त सांगितले आहेत, त्यापैकीं सातव्या सिद्धान्तात आली आहे. त्या च वेळीं दुसरी एक सुटी पंचरत्नीगीतेची पोथी व तिच्या पोटात जुळून असलेलें सुदामचरित्र अशी मिळालीं. या तिन्ही ग्रन्थांची नोंद येथें च करणें इष्ट होय.

**६२८ ]** ६½ × ४½" आकाराची बांधलेली पोथी-पत्रें २२७ अपूर्व, प्रेक्षणीय ग्रन्थ [२००

सचित्र पंचरत्नीगीता

सर्वांगसुंदर अशी ही पोथी आहे. तिचा मुख्य विशेष म्हणजे ती सचित्र आहे. तिच्यात शंभर सुंदर चित्रें व बावीस सोनेरी वेलबुट्या वगैरे आहेत. हीं सारीं चित्रें रंगित आहेत. चित्राच्या भोंवती जें नक्षीकाम केलेलें आहे, तें प्रत्येक चित्रात निरनिराळें आहे. प्रत्येक अध्यायाच्या आरंभीं व मध्यें तर चित्रें आहेत च, पण गीतेच्या दहाव्या अध्यायात भगवंताच्या ज्या विभूति सांगितल्या आहेत, त्या प्रत्येक विभूतीचें चित्र आहे. वर चित्र व खालीं त्या त्या विभूतीच्या संबंधाचा श्लोकातील चरण, अशा रीतीनें चित्राकडे पाहात एक एक पान उलटीत च विभूतियोगाचा अध्याय वाचीत जावयाचा. मला हि त्यातलें ज्ञान नाहीं व देणारास हि तितपत च समजत असावें, म्हणून मला ही पोथी

दीडशें रुपयांस मिळाली, पण, उदाहरणार्थ जर्मनींतला एकादा जाणता, विद्या आणि कला यांचा अभिमानी मनुष्य पोथीची किंमत, न जाणों, कांहीं हजार करील! या सर्व चित्रांचे 'फोटो' काढून तीन रंगांत तीं चित्रें तयार करविलीं आणि अशी सचित्र गीतेची प्रत प्रकाशित केली तर तिचा प्रसार जगभर होईल, यांत शंका नाहीं. सभेला सामर्थ्य नाहीं, पण कोणा सामर्थ्यवान् गीताभक्तानें या पोथीच्या प्रकाशनार्थ दहा पांच हजार रुपये खर्च केले तर ते रुपये कांहीं जास्त च घेऊन परत येतील, असें वाटतें.

६२९ ] ५¾" × ३·१५" आकाराची सुटी पोथी

पत्रें २४१ [ १२८

सचित्र पंचरत्नीगीता

या मागची च ६२८ क्रमांकाची पोथी पाहण्यांत नसती आणि न मिळती, तर या च प्रतीचें मला कौतुक वाटलें असतें. पण ६२८ पुढें ही प्रत फिकी पडते. हिचें हि अक्षर सुंदर आहे. हिच्यांत हि वीस रंगित चित्रें आहेत. ६२८ प्रतीबरोबर या हि प्रतीसाठीं सात रुपये जास्त देऊन ती मिळविली. प्रतीच्या पोटीं पावती ठेवली आहे.

या प्रतीच्या शेवटीं 'संवत् ॥ १८७२ ॥' असा लेखनकाल दिलेला आहे.

६३० ] पोथी-पत्रें २४

[ १५०

कचेश्वर कृत सुदामचरित्र—श्लोक १०१

ही पोथी मागील बाडांक ६२९ च्या पोटांत होती. संपूर्ण चरित्र आहे. शेवटीं लेखनकाल वगैरे आहे :

" शके १७०६ क्रोधिनाम संवत्सरे आश्विन वद्य ५ रविवारि पुस्तक लेखन संपूर्णमस्तु ॥ हस्ताक्षर ॥ त्र्यंबकभटात्मज अवधूतभट जोसि मौजे राणेडचेगांवकरेण लिखितं ॥..."

यांवरून तसें च खालीं उतरून मार्गांत जळगांव आणि साडेगांव येथील मठ पाहून

श्रीसमर्थप्रतापकार गिरिधर

यांच्या बीड गांवीं चैत्र व. ११ ( ता. ८-५-०७ ) स पोंचलों. जळगांव आणि साडेगांव येथें गोदावरीच्या स्नानापलिकडे कांहीं प्राप्ती झाली नाहीं. हे

दोन्ही मठ श्रीसमर्थशिष्य दादेगांवमठपति देवदास यांच्या परंपरेंतील होत. देवदास-हरिस्वामी-उद्धव अशी शिष्यपरंपरा. उद्धवाचे पुत्र कृष्ण यांनी मळगांवचा मठ पुत्रपरंपरेनें चालविला व शिष्य माधव यांनी दादेगांवचा मठ शिष्यपरंपरेनें चालविला. या दोन्ही मठांत या लेखेचें कार्य होण्याचा योग नव्हता. त्यानंतर हि तेथें अजून जाणें झालें नाहीं. पण लवकर च एकदां जाईन असें म्हणतों. मळगांवमठांत काहीं विशेष नसावें, पण दादेगांवची मला आशा आहे; असो.

बीडास पोंचलों, तेथील दोन्ही मठ पाहिले, संग्रह पाहिला आणि कांहीं त्या लेखेस आणि कांहीं दुसऱ्या लेखेस मिळविला, गिरिधर आणि नंतर झालेले पुरुष यांच्या समाधींचें दर्शन घडलें, श्रीसमर्थप्रताप हातास लागला आणि डोळे दिपले, गिरिधरांचें कार्य नजरेस पडलें आणि ज्या गिरिधरांना संशोधनारंभीं महाराष्ट्रानें गिरिधाई ठरविलें होतें, ते गिरिधाई नसून एके काळीं या संप्रदायांत अपूर्व कामगिरी करून गेलेले, श्रीसमर्थांच्या भेटीविषयीं उतावीळ झालेले, त्यांच्या पाशीं गडावर कांहीं काळ राहिलेले, बेचाळिस ग्रन्थांचे आणि विशेषतः श्रीसमर्थप्रतापाचे कर्ते बीडमठस्थापक पुरुष होते, हा बोध होऊन अज्ञानाची लाज वाटली, मन लज्जित झालें आणि समाधीपुढें नम्र होऊन गिरिधराची क्षमा मागून, तुम्ही भाग्यवान् कीं तुम्हास श्रीसमर्थांचा सहानरणीं सहवास घडला, आतां आम्हांस त्याचें इत्थंभूत चरित्र सांगा, अशी त्यांची प्रार्थना केली. गिरिधराचा महाराष्ट्रास संदेश काय आहे, तो त्यांच्या ग्रन्थांवरून आणि मठांतील संग्रहावरून कळणार आहे. पत्रवाल्यांनीं कोल्हापुरास जो थोडा संग्रह हवालीं केला होता, त्यांतील कांहीं या च मठांतील होय. येथें दोन मठ आहेत. एकांत गिरिधरांच्या कन्येचा पुत्र माणिक्य याचे पासून पुत्रपरंपरा चालत आली आहे व दुसऱ्यांत गिरिधरांचे बंधु भीम, त्या भीमाचे पुत्र गोविंद याचे पासून पुत्रपरंपरा च चालत आली आहे. पहिल्या मठांत विद्यमान पुरुष श्रीराम होते व दुसऱ्यांत सीताराम होते, म्हणून मी या मठांना श्रीराममठ आणि सीताराममठ, असें आजपर्यंत संबोधीत आलों आहे. पण यापुढें आतां हा भेद न ठेवतां बीडमठांतील एकंदर संग्रहाचें स्वरूप प्रथम पाहूं आणि नंतर गिरिधराविषयीं कांहीं जास्त सांगावेसें वाटल्यास तें सांगून संशोधनवृत्त पुढें चालवूं. बीडचा हा सारा संग्रह अत्यन्त मौल्यवान् आहे. त्याला मोल नाहीं.

काहीं पोथ्या अति जीर्ण झाल्या आहेत.

बीड मठांतील संग्रह

# ६३१ ]

पोथी–पत्रें ११६ [ २११

श्रीसमर्थप्रताप

या ग्रन्थाचे व्यक्तिशः मजवर अगणित उपकार आहेत. महाराष्ट्राला हि तो ग्रन्थ मान्य आणि प्रिय झाला आहे. श्रीसमर्थांच्या चरित्रावर आणि संप्रदायावर या ग्रन्थानें पुष्कळ च नवीन प्रकाश पाडला. हा ग्रन्थ सभेनें शके १८३४ त श्रीरामदासी ग्रन्थमालेंत आठवा भाग म्हणून प्रकाशित केला. त्याच्या प्रस्तावनेंत गिरिधरांच्या बेचाळिस ग्रन्थांचा थोडक्यात परिचय करून देण्यात आला आहे. ग्रन्थाची पहिली आवृत्ति संपून कैक वर्षे झालीं. सवड झाली म्हणजे दुसरी आवृत्ति काढूं.

ग्रन्थ अस्सल असून गिरिधरांच्या हातचा आहे. पहिल्या मुखपृष्ठाला जाडपणा देण्यासाठीं त्याच्यामागीं जो कागद डकविला आहे तो तत्कालीन एक पत्र असून तें ' चिरंजीव विजईभव राजेश्री अवधूतपंत यास प्रती आकाबाईनें ' लिहिलेलें आहे.

# ६३२ ]

बाड–पृ.सं. १०१×२=२०२ [ २११

( १ ) श्रीसमर्थप्रताप ग्रन्थाची दुसरी प्रत. ६३१ पोथीवजा आहे व हें बाड आहे. ही हि प्रत गिरिधरांच्या च हातची आहे.

( २ ) बाडांचीं पुठ्ठिपत्रें तयार करतांना तत्कालीन कागदपत्रें, जमाखर्चाचे कागद वगैरे यांचा उपयोग केलेला आहे. मागच्या बाजूच्या पुठ्ठिपत्रात

श्रीरामसमर्थ

श्रीसकळतीर्थस्वरूप धर्ममूर्ती माहाराज राजेश्री गीरमाजीबाबा गोसावी व तथा राजेश्री येसोबा व तथा राजेश्री भीमाजी गोसावी स्वामीराजांचे सेवेसी बाळके रामाजी चौदळ

एवढ्या च मजकुराचा एक पत्राचा फाटलेला तुकडा वाचता येत आहे. गिरमाजी म्हणजे आपले गिरिधर व यशवंत आणि भीम असे त्यांचे पुत्र होते, हें प्रतापावरून आपणांस ठाऊक झालें च आहे.

(३) पृष्टिपत्राचा दुमडलेला जो तुकडा पडला आहे त्यांत " गिरिधराख्यकृतं स्तोत्रं त्रिकालं यः पठेन्नरः। सर्वसिद्धिमवाप्नोति गुरुदेवप्रसादतः ॥ २१ ॥ इति श्रीमद्गिरिधराख्यविरचितं श्रीसद्गुरुस्तोत्रं संपूर्णं श्रीसद्गुरुनाथार्पणमस्तु " अशा एक स्तोत्राचा शेवट वाचावयास मिळतो.

(४) प्रतापाला आरंभ करण्यापूर्वी पहिल्या पानावर रामायणांतील एक सात श्लोकांचें कबंधवाक्य उतरून घेतलेलें आहे, तें अकारण नसावें.

६३३ ] पोथी–पत्रें १५९ [२२१

निवृत्तिराम

हा हि अप्रतिम ग्रन्थ मालेंतील १४ वा भाग म्हणून शके १८३८ त छापला गेला आहे. त्याची हि पहिली आवृत्ति केव्हां च संपली. दुसरी निघाली पाहिजे. या ग्रन्थाकडे मात्र महाराष्ट्राचें जितकें लक्ष जावें, तितकें गेलेलें नाहीं. गिरिधरांच्या हातची ही प्रत आहे.

६३४ ] पोथी–पत्रें १४५ [२२१

निवृत्तिराम ग्रन्थाची दुसरी प्रत. ही हि गिरिधरांच्या च हातची आहे.

६३५ ] पोथी–पत्रें १६० [१००

निवृत्तिराम ग्रन्थाची तिसरी प्रत. ही मात्र बीड मठांतील नसून कै. विनायकराव लक्ष्मण भावे यांनीं पाठविली होती. तिन्ही प्रती एका च क्रमांत नोंदल्या जाव्या, म्हणून ही प्रत येथें नोंदीत आहे.

६३६ ] पोथी–पत्रें ११७ [२००

श्रीवेणाबाई कृत सीतास्वयंवर

श्रीरामदासी मालेंत छापलेला बारावा भाग. अति गोड काव्य आहे. स्त्रियांना विशेष आवडावें, असें आहे. पण वाचण्यांत येईल तर.

# ६३७ ]

बाड–पृ. सं. ४० × २ = ८० [२११

गिरिधर कृत दहा हकिकतवाके

हे या च बाडावरून रामदासी मालेंत भाग चोविसावा म्हणून छापण्यांत आले आहेत. कल्पना, रचना, काव्य इत्यादि दृष्टीनें ग्रन्थ महत्त्वाचा आहे, पण त्याच्याकडे महाराष्ट्राचें जावें तसें लक्ष गेलें नाहीं, याला कोण काय करणार !

# ६३८ ]

पूर्णापूर्ण सुटे हकिकतवाके–१५ कागद [२११

# ६३९ ]

एक मोहरेदार कागद [२११

गिरिधर कृत रामजानकीविवाहाची आमंत्रणपत्रिका–श्लोक ४. हस्ताक्षर गिरिधरांचें च दिसतें.

# ६४० ]

एक कागद [२११

गिरिधर कृत एक स्वतंत्र असच्छिष्यसच्छिष्यवाका. ६३७ त किंवा ६३८ त जे वाके आहेत, त्यांहून हा निराळा आहे. याची रचना हि निराळ्या पद्धतीची आहे. हा वाका श्लोकबद्ध असून त्याचे ३३ श्लोक आहेत. शेवटचे दोन श्लोक देतों :

असच्छिष्य सच्छिष्य नीवेदिले हे ।
समर्थां पदीं सर्व ही लागले हे ।
जयाचा जसा भाव त्या देव आहे ।
समर्थांसि वाका पदीं ठेविलाहे ॥ ३१

उदासी गिरीस्वामिचा वाग्विलासु ।
त्रिवेणीतटीं श्रीपदीचा निवासु ।
गुरुनाथ भद्रासनीं ऐकताती ।
गुरुभक्त वाके सुखें वाचिजाती ॥ ३२

# ६४१ ]

पोथ्या-पत्रें ४, ११, १२, ४, ७, ८=४६ [१५०

श्रीसमर्थ कृत पूर्वारंभ, मानसपूजा, आत्माराम, जुनाट पुरुष, चतुर्थ योग आणि अंतर्भाव

कागद जीर्ण झाला आहे व फाटला आहे. या सर्व पोथ्या एका च हातच्या आणि सारख्या आकाराच्या आहेत.

# ६४२ ]

पोथी-पत्रें ५ [२५०

श्रीसमर्थ कृत जनस्वभाव

जुनी, सुंदर प्रत. कागद ठिसूळ झाला आहे. हात लावण्यास भीति वाटते. प्रकरणाचें नांव दिलेलें नाहीं.

# ६४३ ]

एका जीर्ण बाडाचा गळांठा

पृ. सं. सुमारें २४० [२५०

( १ ) हा एका बाडाचा गळांठा इतका जीर्ण झाला आहे कीं, आणखी फार तर दोन चार वेळां त्यास हात लागला म्हणजे त्याचें काम संपेल. त्यांत प्रकरणें महत्त्वाचीं आहेत. यापुढें एकवार च तीं प्रकरणें ताडून पाहतांना या बाडास हात लावण्याचा विचार आहे.

( २ ) त्यांत श्रीसमर्थ कृत अंतर्भाव, आत्माराम, पंचमान, मानपंचक, पंचसमासी, मानसपूजा, चतुर्थयोग, पंचीकरण योग, जुनाट पुरुष, पूर्वारंभ आणि षड्रिपु, अशीं अकरा प्रकरणें आहेत.

( ३ ) अगदीं शेवटीं ' इति श्रीपद्मपुराणे श्रीशिवपार्वतीसंवादे सारकमहारासमंथग्रन्थे हृदयस्थनिरूपणं ' आहे. तें उतरून काढलें पाहिजे.

( ४ ) शिवाय त्यांत कौलाचे श्लोक , दासबोधांतील १ × ४ समास, एकनाथकृत डोहळ्याची कथा, सखा कृत एक पाळणा व कोनेरीनंदन गंगाधर आणि गोसावीनंदन यांचें एकाद दुसरें पद, अशीं आहेत.

( ५ ) हें बाड धीडमठांतील च आहे, अशी खात्री नाहीं.

# ६४४ ]

पोथ्या-पत्रसंख्या एकंदर १२५ [२००

(१) श्रीसमर्थ कृत अंतर्भाव, जुनाट पुरुष, आत्माराम, मानपंचक, पंचमान, सगुणध्यान, निर्गुणध्यान, चतुर्थयोग, मानसपूजा, पंचसमासी, अशीं दहा प्रकरणें

(२) या सर्व पोथ्या सुंदर आणि सबंध आहेत. त्या एका च हातच्या आणि सारख्या आकाराच्या आहेत.

६४५ ] पोथी–लिहिलेलीं पत्रें १४ व कोरीं पत्रें १६ [१५०

श्रीसमर्थ कृत एकवीससमासी पैकीं समास १ ला, ७ वा व १४ वा अपूर्ण.

६४६ ] पोथी–पत्रें ७ [२५०

श्रीसमर्थ कृत सप्तसमासी पैकीं समास १ ला व ६ वा. तत्कालीन प्रत आहे. हें सप्तसमासी प्रकरण महत्त्वाचें आहे. श्रीमत् ग्रन्थराज दासबोधाचे वीस दशक पूर्ण झाल्यावर ही सप्तसमासी श्रीसमर्थांनीं सांगितली, असा पुरावा दहाव्या समासांत आहे. लघुकाव्यांचा जो अकरावा भाग काढणें आहे त्यांत हीं सारीं प्रकरणें येतील च.

६४७ ] पोथी–पत्रें ११ [२५०

श्रीएकनाथ कृत स्वात्मसुख

तत्कालीन संपूर्ण, सुंदर, शुद्ध प्रत. श्रीसमर्थांशिवाय इतर बहुतेक साधुसंत-कवींचे ग्रन्थ अशुद्ध छापले गेले आहेत व त्यांच्या ग्रन्थांच्या शुद्ध आवृत्त्या निघाल्या पाहिजेत, या आपल्या कल्पनेला या प्रतीनें पुष्टि मिळत आहे.

प्रत अति जीर्ण झाली आहे. एकवार च केव्हां तरी उपयोगांत आणावी.

६४८ ] बाड–पृ. सं. १०७ × ९ = २१४ [२१०

गिरिधर कृत छंदोरामायण

हा सबंध बाडांत छंदोरामायण आहे. बाड मिश्रणीव आहे. तें गिरिधरांच्या च हातचें आहे. गिरिधरांच्या या व इतर रामायणांविषयीं थोडक्यांत हकिकत

श्रीसमर्थप्रतापाच्या प्रस्तावनेंत आली च आहे. हीं सर्व रामायणें अवश्य प्रकाशित झालीं पाहिजे.

श्रीरामदाससमर्थजीप्रति आवडे प्रभुची कथा ।
अंतरीं जगदांतरीं मज भेटती प्रभु तत्त्वता ।
संतसज्जन वाल्मिकी कविराणि वेणिपरंपरा ।
सुंदरा वरदायका गिरिनायका करुणा करा ॥ यु. ३८६

## ६४९ ]

बाड–पृ. सं. ४३ × ४ = १७२ [१५०

( १ ) या बाडांत गिरिधर कृत दोन प्रकरणें आहेत : ( १ ) सुंदर रामायण व ( २ ) गुरुवाक्यमाला

( २ ) हें हि बाड गिरिधराच्या हातचें असून प्रेक्षणीय आहे. या बाडाला वापरलेला कागद अवघा ४$\frac{1}{8}$" रुंदीचा असता प्रत्येक पृष्ठाचा कागद, तीन तीन इंच रुंदीचे दोन कागद एकत्र डकवून कां केलेला आहे, न कळे.

## ६५० ]

बाड–पृ. सं. ८० × ४ = ३२० [२२०

( १ ) गिरिधर कृत छंदोरामायणांतील युद्धकांड–श्लोकसंख्या " आठावन अकरें ६३८ "

( २ ) गिरिधर कृत मंगलरामायणांपैकीं युद्धकांड–श्लोकसंख्या " चौऱ्याशी अकरें १२४ "

## ६५१ ]

बाड–पृ. सं. ५७ × ४ = २२८ [२००

( १ ) छंदोरामायणाच्या युद्धकांडांतील पहिला प्रसंग

( २ ) नऊ श्लोकाचा एक स्वतंत्र हकिकतवाका

नमस्कारिलें सद्गुरुरायजींतें । तथा लेसकां हस्तकां मंत्रियांतें ।
हजूरी अमिन् जागिरीलागिं गेले । हकिकत ल्खोटे कचेरीसि आले ॥ १
हजूरी गुरुबंधु हे पुण्यमूर्ती । हकिकत समर्थांस हे जाणवीती ।
कचेरी बरी दाटली साधकांची । सभा बैसली श्रोतयां सज्जनांची ॥ २

( ३ ) मंगलरामायणांपैकीं किष्किंधा आणि सुंदरकांड

( ४ ) भावार्थरामायणाच्या बालकांडांतील कांहीं ओव्या

# ६५२ ] पाट–पृ. सं. ५५ × ४ = २२० [२२०

श्री गिरिधर कृत मंगलरामायणांतील बाल, अयोध्या आणि अरण्य अशीं तीन कांडें.

फार गोड आहेत, धन्य आहे गिरिधरांची! हीं रामायणें लिहिण्याविषयीं त्यांना श्रीसमर्थांची आज्ञा होती. गिरिधर म्हणतात, मला काय त्यांचा हेतु माहीत, ते बोलवितात आणि मी बोलतो :

हेतातीत समर्थ स्वामि मजला हेतूरुपें बोलवी ।
कुर्यात् मंगल राघवं विजयते रामायणं मंगलम् ॥

अशीं हीं गिरिधरांचीं सर्व रामायणें प्रसिद्ध करण्याची जबाबदारी श्रीसमर्थाभिमानी महाराष्ट्रावर नाहीं काय?

आर्धीं मंगलमूर्तिते मग पुढें वागीश्वरी वंदिली ।
श्रीवाणी शुभ बोलिली मग नमूं श्रीसद्गुरुपाउलीं ।
देवां दुल्लभ ते चि सुलभ पदें कृष्णातिरीं फावलीं ।
कुर्यात् मंगल राघवं विजयते रामायणं मंगलम् ॥ अयोध्या १

श्रोते सज्जन हो तुम्ही सकळ ही रामायणु ऐकिलें ।
तेथें युक्ति प्रयुक्ति शक्ति नसतां कां हें येथें बोलिलें ।
माझें मीपण वारलें परि हरीगुणार्णवीं थारलें ।
कुर्यात् मंगल राघवं विजयते रामायणं मंगलम् ॥ २

आत्माराम जगद्गुरु जनवनीं हा येकदेशी नसे ।
दंडारण्य अरण्य सेवित असे कृष्णातिरीं तो दिसे ।
त्याची भव्य परंपरा जगमुखें विख्यात वेणी पुढें ।
कुर्यात् मंगल राघवं विजयते रामायणं मंगलम् ॥ १२०

१८५६ वैशाख शु. ८

टीप—आजची च गिरिधरांची पुण्यतिथि होय. त्यांचें स्मरण करण्याचा व त्यांच्या मठाची हकिकत देण्याचा आज च योग यावा, याचा आनंद वाटतो. त्यांना समाधिस्थ होऊन आज पावेतर २०५ वर्षे झालीं.

# श्रीरामदासी संशोधनाचें उपांत्य फळ

श्रीरामदासी संशोधनाचा हा विजय होय. दहा पाच ओळींचें एकाद दुसरें पत्र नव्हे, तर स्वतः श्रीसमर्थांनीं बालवयात उतरून घेतलेली चोवीस हजार श्लोकांची वाल्मीकीय रामायणाची संपूर्ण प्रत उपलब्ध झाली असून ती आज महाराष्ट्रदेवतेच्या चरणीं अर्पण करावयाची आहे. एकाद्या सामान्य, विद्यासंपन्न, पूर्वजाभिमानी, गुणग्राहक, उत्साही, स्वतंत्र देशात असला प्रसंग मोठ्या राष्ट्रीय उत्सवाचा मानला गेला असता ! कल्पना करा. मोठमोठे मथळे घालून ही बातमी वर्तमानपत्रांनीं जाहीर केली असती, जगभर तारा घडकल्या असत्या, सर्वत्र कुतूहल, आनंद आणि अभिमान यांचें साम्राज्य पसरलें असतें. कल्पना कशाला, असले अपूर्व प्रसंग इतर भाग्यशाली देशांतून मोठ्या थाटानें साजरे झाल्याचें आपण वाचलें आहे. पण आमच्या आजच्या भगलेल्या शापित महाराष्ट्राला त्याचें काय होय ! पूर्वजांच्या असल्या जुन्या ठेवण्याची, ' पुरलेलीं मढीं ' म्हणून संभावना करणारे पुरुष आज महाराष्ट्रात आढळतात ! आपण अन्य काहीं विशेष पराक्रमाच्या गोष्टींत गुंतलेले असतों, अशा भ्रमात असणारे लोक ही मळ्याची भाषा बोलत असतात व इतर भोळे लोक न जाणता तिचा च उच्चार करीत असतात. पण आज आम्ही मढीं बनलों आहोंत, का आमचे पूर्वज, याचा हे लोक थोडासा तरी विचार करतील काय ? जाणते जाणतात कीं, दिसण्यात जिवंत असलेले आम्ही प्रेतवत् होऊन पडलों आहोंत आणि आमचे गेलेले पूर्वज कीर्तिरूपानें चिरंजीव आहेत. पूर्वजांच्या अभिमानाची थोडीशी जरी धुगधुगी आमच्यात उरलेली असेल, तर ' संशोधन म्हणजे जुनीं मढीं उकरून काढण्याचा धंदा होय ' असली अभद्र भाषा बंद पडली पाहिजे. आमचें सर्वस्व गेलें, तरी आमच्यातील सहृदयता गेली न पाहिजे. पूर्वजांचा यथायोग्य गौरव करण्याचें आमच्यात सामर्थ्य उरलें नसलें, तरी त्यांच्या विषयींची आमची आदरबुद्धि नष्ट झाली न पाहिजे.

सत्तावीस वर्षे झालीं, बीड येथील दोन्ही मठातून शोधशोध समग्र आपला होता. त्या वेळीं श्रीराममठात वाल्मीकिरामायणाची प्रत पाहण्यात आली होती, परण तेव्हा तिचें महत्त्व लक्ष्यांत आलें नव्हतें आणि फार आग्रा

करू नये, नाहीं तर द्यावेंच हि जावयाचें, हा अनुभव हि भेटसावीत होता, म्हणून ती प्रत तेव्हा घेतली नाहीं. प्रतीचें स्मरण होतें, ती सभेच्या संग्रहीं असावी, असें पुढें वारवार वाटूं लागलें, म्हणून ती मिळविण्याविषयीं श्री. शेषबुवा ऊर्फ श्रीसमर्थदास याना विनंति केली. त्याप्रमाणें त्यानीं ती मिळवून आमेकडे पाठविली. तींतील बालकांड १५४४ तील रामेण रामदासेन लिखितम्, अयोध्याकांड १५७१ तील राघवनाम्ना लिखितम् व सुंदरकांड १५४५ तील रामेण रामदासेन लिखितम् होतें, पण अरण्यकांड १६११ तील, किष्किंधाकांड १६१२ तील, युद्धकांड १६१३ तील व उत्तरकांड १६१४ तील होतें. तीन कांडें पूर्वीचीं व चार कांडें नंतरचीं श्रमरदीडचीं वर्षांचीं असावीत, असें का, असा प्रश्न पडला.

गेल्या श्रावणात हैद्राबादेहून परत येत असता मार्गात कांहीं दास हडुरशोधन येथें मठात उतरलों होतों, तेव्हा श्रीसमर्थदास यानीं, बीड मठातील कांहीं कागदपत्रें त्यानीं दरम्यान मिळविलीं होतीं तीं आमच्या हवाली केलीं. त्यात दोन कागद महत्त्वाचे होते : एक १६५३ भाद्रपद शुद्ध १३ चा होता व दुसरा १६६६ कार्तिक शुद्ध ११ चा होता. दोन्ही कागद भिमाजी गोसावी यांनीं येसोबा गोसावी यास करून दिलेले होते. भिमाजी आणि येसोबा हे उभयता श्रीसमर्थप्रतापकार गिरिधर याचे वधु होत. १६५३ च्या कागदानें या उभयतात वाटणी झाली होती, तरी कांहीं वस्तु समायिक राहिल्या होत्या, त्याची विभागणी १६६६ तील कागदानें करण्यात आली होती. हा दुसरा कागद प्रस्तुत प्रसगीं विशेष महत्त्वाचा होय. देवार्चन, वाल्मीकिरामायण, अध्यात्मरामायण व पन्नास रुपये अशा वस्तु समाईक होत्या. पचानीं पन्नास रुपये निमे निम वाटून दिले. देवार्चन येसोबाकडे होतें व ते वडील म्हणून तें पचानीं त्याच्या च कडे रहावें असें ठरविलें, परंतु भिमाजीगोसावियाच्या विनंतीवरून येसोबा गोसावी यानीं तें स्वसंतोषानें भिमाजीगोसावी यास दिलें. अध्यात्मरामायण—ग्रन्थसख्या सहा हजार–येसोबाजवळ होतें व वाल्मीकिरामायण–ग्रन्थसख्या चोवीस हजार–भिमाजीबावाजवळ होतें. दोन्ही मिळून तीस हजार ग्रन्थसख्या झाली. प्रत्येकाच्या वाट्याला पधरा पंधरा हजार ग्रन्थसख्या आली. सहा हजाराचा अध्यात्मरामायण ग्रन्थ येसोबाजवळ होता च व वाल्मीकिरामायणापैकीं नऊ हजाराचा ग्रन्थ भिमाजीनीं येसोबास द्यावा असें ठरलें. तो नऊ

हजारांचा ग्रन्थ म्हणजे च बाळकांड, अयोध्याकांड व सुंदरकांड हीं तीन कांडें होत. म्हणून च हीं तीन कांडें मेरोबांच्या परंपरेतील श्रीरामबुवा यांच्या मठांत आलीं व ग्रन्थ अपुरा राहूं नये म्हणून शंभर दीडशें वर्षांनीं तत्कालीन पुरुषांनीं इतर चार कांडें लिहून ग्रन्थ पुरा केला होता. अर्थात् बाकीचीं चार कांडें भिमाजीबावांच्या परंपरेतील सीतारामबावा यांच्या मठांत असलीं पाहिजेत, अशी कल्पना झाली. सीतारामबुवा गत झाले आहेत, त्यांचा मुलगा गंगाराम अज्ञान असून मठ पंचांच्या ताब्यांत आहे. गंगाराम श्रीसमर्थदासांच्या च जवळ असतो. परवां जांबेहून परततांना त्यास बोलाविलें होतें. त्यास घेऊन बीडास गेलों. त्यांच्या मठांत अस्ताव्यस्त पडलेला संग्रह पेट्यांत भरून ज्येष्ठ शु. ७ (ता. २१।५।३४) स धुळ्यास रवाना करून आम्ही परंडा, डोमगांव मार्गांत जाऊन आलों. दरम्यान येथें येऊन ठेवलेला संग्रह स्वरूपपणें व्यवस्थित लावीत असतां नेमकीं हीं चार कांडें आढळलीं व आम्हांस अत्यानंद झाला. त्या आनंदाचा उपभोग सर्वांस घेतां यावा म्हणून पूर्वी मिळालेल्या सर्व रामायणाची व आतां मिळालेल्या चार कांडांची आज येथें आधीं नोंद करून मग बीड येथील इतर जुन्या नव्या संग्रहाकडे वळूं.

**६५३ ]** वाल्मीकीय रामायणाची पोथी [ १६१ ते ३१२
पत्रसंख्या १२६

(श्री) आदिकांड ... ... ... पत्रें ७०

(१) मुखपृष्ठावर प्रत्येक कांडाचे सर्ग आणि श्लोक यांची एकुणात दिलेली आहे, ती अशी :

| | | |
|---|---|---|
| ६४ | प्रथमकांडे | २८५० |
| ८० | द्वितीयकांडे | ४१०० |
| ११४ | तृतीयकांडे | ४१५० |
| ६४ | चतुर्थकांडे | ३९३५ |
| ४३ | पंचमकांडे | २०४५ |
| ११२ | षष्ठकांडे | ४५०० |
| ९० | सप्तमे कांडे | ३९६० |
| ५६७ | | २४६०० |

(२) ग्रन्थारंभीं दोन श्लोक दिले आहेत ते :

जयति रघुवंशतिलकः कौसल्याहृदयनंदनो रामः ।
दशवदननिधनकारी दाशरथिः पुंडरीकाक्षः ॥ १ ॥
नमः तस्मै मुनीशाय श्रीगुवाय तपस्विने ।
सर्वज्ञानाधिवासाय वाल्मीकिमुनये नमः ॥ १ ॥

(३) शेवटीं कांडाचा लेखनकाल वगैरे दिला आहे तो :

॥ शक संवत् १५४४ ॥ दुंदुभिनाम संवत्सरे माघ शुद्ध १२ रवौ अस्मिन् शुभदिने रामेण रामदासेन लिखितमिदं पुस्तकं ॥ ॥ श्रीरघुनाथार्पणमस्तु ॥ ॥ रमाकांतप्रीतो भवतु ॥ ॥ श्रीराम राघव रमेश्वर रामचंद्र राजीवनेत्र रघुवर्य रमेश ईश ॥ श्रीरामभद्र भुवनेश्वर तीर्थपाद कंठे करोमि सततं तव नाममालां ॥ १ ॥

या च शेवटच्या पानाचें चित्र येथें दिलें आहे. मूळ पोथीच्या पत्राचा आकार १०¼" × ६" आहे. समास सोडून मुख्य लेखनाचा गाभा ८¾"×४" आहे. चित्रांतील लेखनाचा गाभा ७" × ३¼" आहे. यावरून मूळ प्रतीच्या आकाराची यथार्थ कल्पना होईल.

(४) अयोध्याकांड ... ... ... पत्रें १४१

(१) या कांडाच्या शेवटीं दिलेला लेखनकाल वगैरे :

श्रीमत् शके १५७१ विरोधीनाम संवत्सरे उत्तरायणे फाल्गुनमासे कृष्णपक्षे सप्तम्यां पुण्यतिथौ अस्मिन् शुभदिने राघवनाम्ना कश्चित्सत्पुरुषचरणानुचरस्तेनालेखि ॥

(५) अरण्यकांड ... ... ... पत्रें १४४

लेखनकाल—१६११ विरोधीनामसंवत्सरे मार्गशीर्ष कृष्ण ८ अष्टमी सौम्यवासर

(६) किष्किंधाकांड ... ... ... पत्रें १२२

लेखनकाल—१६१२ विकृतीनामसंवत्सरे भाद्रपद शुद्ध सप्तमी इंदुवासरे

(७) सुंदरकांड ... ... ... पत्रें ७२

(१) आरंभीं श्लोक दिला आहे तो :

कूजन्तं रामरामेति मधुरं मधुराक्षरं ।
आरुह्य कविताशाखां वंदे वाल्मीकिकोकिलं ॥

( २ ) ग्रन्थारंभीं दोन श्लोक दिले आहेत ते :

जयति रघुवंशतिलक कौशल्याहृदयनंदनो राम ।
दशवदननिधनकारी दाशरथि पुंडरीकाक्ष. ॥ १ ॥
नम तस्मै मुनीशाय श्रीयुताय तपस्विने ।
सर्वज्ञानाधिवासाय वाल्मीकिमुनये नम ॥ १ ॥

( ३ ) शेवटीं कांडाचा लेखनकाल वगैरे दिला आहे तो
॥ शक संवत् १५७४ ॥ दुंदुभिनाम संवत्सरे माघ शुद्ध १२ रवौ अस्मिन् शुभदिने रामेण रामदासेन लिखितमिदं पुस्तकं ॥ ॥ श्रीरघुनाथार्पण मस्तु ॥ ॥ रमाकांतप्रीतो भवतु ॥ ॥ श्रीराम राघव रमेश्वर रामचंद्र राजीवनेत्र रघुवर्य रमेश ईश ॥ श्रीरामभद्र भुवनेश्वर तीर्थपाद कंठे करोमि सतत तव नाममाला ॥ १ ॥

या च शेवटच्या पानाचें चित्र येथें दिलें आहे. मूळ पोथीच्या पत्राचा आकार १०½″ × ६″ आहे. समास सोडून नुसत्या लेखनाचा गाभा ८¾″×४″ आहे. चित्रांतील लेखनाचा गाभा ७″ × ३¼″ आहे. यावरून मूळ प्रतीच्या आकाराची वाचकास कल्पना होईल

( ब ) अयोध्याकांड ... ... ... पत्रें १४१

( १ ) या कांडाच्या शेवटीं दिलेला लेखनकाल वगैरे.

श्रीमत् शके १५७१ विरोधीनाम संवत्सरे श्रुत्तरायणे फाल्गुनमासे कृष्णपक्षे सप्तम्यायां पुण्यतिथौ अस्मिन् शुभदिने राघवनाम्ना कश्चित्सत्पुरुषचरणानुचरस्तेनालेखि ॥

( म ) अरण्यकांड ... ... ... पत्रें १४४

लेखनकाल—१५९१ विरोधीनामसंवत्सरे मार्गशीर्ष कृष्ण ८ अष्टमी सौम्यवासर

( यां ) किष्किंधाकांड ... ... ... पत्रें १२२

लेखनकाल—१५९२ विकृतीनामसंवत्सरे भाद्रपद शुद्ध सप्तमी इंदुवासरे

( य ) सुंदरकांड ... ... ... पत्रें ७३

( १ ) आरंभीं श्लोक दिला आहे तो :

कूजन्तं राम रामेति मधुरं मधुराक्षरं ।
आरुह्य कविताशाखां वंदे वाल्मीकिकोकिलं ॥

परगुणपरिदानमस्तुताशेषदृश्या निजगुणकलिताभिर्लोकमामोदयंत. ।
अविदितपरदोषज्ञानपीयूषपूर्णा करकृतमपराधं क्षंतुमर्हंति संत ॥ ॥
श्रीमत्तुल्स्यै नम ॥ ॥ हरिः ॐ ॥ ॥ ... ॥ रामेण रामचरितं प्राप्त
यदुकुलोद्भव । अनेन जगदीशोयं रामचंद्र प्रसीदतु ॥ १ ॥ शके १५६७
पार्थिवसंवत्सर कार्तिक शुद्ध दशम्यां शुभदिने कांडउत्तर समाप्त ॥. .

यांप्रमाणें हे दोन महत्त्वाचे पाठाक आहेत. ते प्रेक्षणीय, आदरणीय, चिंतनीय आहेत. ६५३ वील आदि, अयोध्या आणि सुंदर अशीं तीन कांडें आणि या अंकातील चार कांडें मिळून संपूर्ण रामायण होत आहे. प्रत्येक कांडाच्या शेवटीं जो लेखनकाल दिला आहे, त्यावरून असें दिसतें, प्रथम शहजिरा आदिकांड लिहिलें गेलें आणि नंतर पंधरा दिवसांच्या आंत आरण्य कांड लिहिलें गेलें. हीं दोन्हीं कांडें १५४४ च्या माघांत लिहिलीं गेलीं. नंतर १५४५ च्या आश्विनांत किष्किंधा कांड व मार्गशीर्षांत सुंदर कांड अशीं कांडें पुरीं झालीं आणि १५४६ ची वैशाख शुद्ध ३ या शुभ दिवशीं युद्धकांड पुरें झालें. हीं पांच कांडें १५४४ च्या माघापासून तों १५४६ च्या वैशाखापर्यंत म्हणजे बरोबरी सवा वर्षांत लिहिलेलीं आहेत. तीं श्रीसमर्थांनीं च लिहिलेलीं असतील तर त्या वेळीं त्यांचें वय पंधरा सोळा वर्षांचें होतें व टाकळीस पुरश्चरण चालू होतें. नंतर एकवीस वर्षांनीं प्रथम उत्तरकांड १५६७ च्या कार्तिकांत लिहिलें गेलें आणि त्यानंतर चार वर्षांनीं शेवटीं अयोध्याकांड लिहिलें जाऊन रामायणाची प्रत पूर्ण झाली. या दोन काळांत श्रीसमर्थ मसूरब्रह्मपुरचंद्रगिरिचाफळ या भागांत होते. पहिल्या पांच कांडांच्या आणि या दोन कांडांच्या लेखनांत हि कालपरत्वें पडलेला फरक दिसून येत आहे.

पण मुख्य प्रश्न असा, हीं कांडें कोणी लिहिलीं?

## रामेण रामदासेन,

रामेण, राघवनाम्ना, रामेण रामदासेन सह गोपिनाथेन म्हणजे कोणी? मला शंका उरली नाहीं, पण चिकित्सकाचा शिक्का मोर्तब झाला पाहिजे. रामेण रामदासेन म्हणजे रामीरामदासांनीं म्हणजे श्रेष्ठांनीं अशी कांहीं काळ शंका उद्भवली होती व तिला श्रीसांप्रदायिक विविध विषयांक ४७ यानें किंचित् बळकटी हि आणली होती. त्या विविध विषयांत तंजावरमठपति जगन्नाथ-महाराज यांनीं अशी माहिती नमूद केलेली आहे कीं, श्रेष्ठांचें पाळण्यांतलें नांव राम होतें. पण ही माहिती उघड चुकीची दिसते. श्रेष्ठांच्या दोघा मुलांपैकीं एकाचें

नांव रामजी होतें व थेट्यांचें नांव राम असतें तर त्यांच्या च मुलाचें नांव राम कसें ठेवण्यांत आलें असतें ? त्यांपेक्षां श्रीसमर्थांना च लहानपणीं **राम** म्हणून संबोधण्याचा फार संभव होता. त्यांचा जन्म च मुळीं श्रीरामजन्माच्या तिथीला आणि घटकेला झाला होता. दासविश्रामधामाच्या पंधराव्या अवधानांत श्रीसमर्थांचीं जीं छत्तीस नांवें दिलीं आहेत त्यांत **राघोबा** हें एक नांव आहे. जयरामस्वामी श्रीसमर्थांना **राघोबा** म्हणून हांक मारीत, तें हि उगीच नव्हे. **रामीरामदास** हें श्रीसमर्थांचें हि नांव होतें व तें त्यांच्या कवितेंत हि कित्येक ठिकाणीं योजिलेलें आहे. श्रीसमर्थांपाशीं कांहीं काळ असलेले, वेणाबाईच्या परंपरेंतील गिरिधर यांच्या मठांत हें रामायण मिळावें, ही गोष्ट हि कमी महत्वाची नाहीं. वेणाबाईच्या परंपरेंत रामायणें व्हावीं, अशी श्रीसमर्थांची आज्ञा होती व त्या आज्ञेप्रमाणें गिरिधरांनीं सात प्रकारचीं रामायणें रचिलीं हि. (श्रीसमर्थप्रताप १९×६०।६२ पद्य) अशी आज्ञा करतांना च स्वतः लहानपणीं लिहिलेली प्रस्तुतची श्रीवाल्मीकिरामायणाची प्रत श्रीसमर्थांनीं गिरिधरांच्या हवालीं केली असण्याचा फार संभव आहे. येसोबा व भिमाजी १६५३ त इतर सर्व पोथ्यापुस्तकें वाटून घेतात पण अध्यात्मरामायण आणि वाल्मीकिरामायण असे दोन ग्रन्थ समाईक ठेवतात व अखेरीस १६६६ त वाल्मीकिरामायणाचीं काडें वाटून घेतात, हा प्रकार हि हें च सुचवितो कीं, त्यांना हि ही प्रत महत्त्वाची वाटत होती. श्रीसमर्थांचें हस्ताक्षर एका च कडे कां, दोघां हि कडे असावें, ही च भावना काडें वाटून घेतांना त्यांची असावी. तात्पर्य, रामेण,राघवनाम्ना, रामेण रामदासेन म्हणजे श्रीसमर्थांनी च होय।

आरण्यकांड लिहितांना श्रीसमर्थांना सहाय्य करणारा भाग्यशाली गोपिनाथ कोण ? श्रीसमर्थांच्या बालमित्राचें हें पहिलें च नांव आज महाराष्ट्रास कळत आहे. संशोधनास जागा झाली !

महाराष्ट्राचें हें केवढें भाग्य कीं, श्रीसमर्थांनीं लिहिलेली ७१० पत्र-संख्येची वाल्मीकीय रामायणाची संपूर्ण प्रत उपलब्ध व्हावी ! श्रीसमर्थांच्या हातचें वाल्मीकिरामायण असा ग्रन्थ या प्रतीवरून छापून निघावा, असें मनांत फार येतें. हल्लीं छापलेल्या ज्या प्रती आहेत त्यांशीं ताडून पाहतां फार फरक आढळतो. या प्रतीवरून रामायण जरूर छापलें जावें व श्रीसमर्था-भिमानी महाराष्ट्र मनांत आणील तर त्वरित छापलें हि जाईल, ती प्रत प्रत्येक महाराष्ट्रीय शिरोधार्य मानील !

१८५६ ज्येष्ठ वद्य ५ शनिवार (२-६-३४)

## बीड मठांतील संग्रह पुढें चालूं

**६५५ ]** संस्कृत पोथी–पत्रें ३०६
दुर्दैवानें पहिलीं दोन नष्ट [२७३

महार्णवाभिधानः निबंधः

" ॥ स्वस्ति श्री शके १७८३ दुर्मतीनामाब्दे फाल्गुन शुद्ध पौर्णिमा बुधे लिखितमिदं पुस्तकं ॥ "

**६५६ ]** पोथी–पत्रें ८ [२१०

श्रीसमर्थसद्गुरुस्तोत्र गिरिधरकृत

हें संस्कृत स्तोत्र श्रीसांप्रदायिक विविध विषयांक १०८ यांत छापलें आहे.

**६५७ ]** बाड–पृ. सं. ४३ × ४ = १७२
याच बाडाला पूर्वी ' ण ' म्हणून संबोधिलें होतें [२१०

श्रीसमर्थकृत पदांची वही. श्रीसमर्थकृत पदपदांतरांचा मालेंतील भाग पंचविसावा, यांत हीं सर्व पदें छापलीं आहेत.

**६५८ ]** पोथी–पत्रें ७ [२१०

गिरिधर कृत शिवरहस्य–श्लोक १०२. मुखपृष्ठावर हि शिवरहस्य नांव लिहिलें होतें, तें खोडून त्याचें नाममहिमा केलें आहे. तात्पर्य, नामस्मरण हें च शिवोपदेशाचें रहस्य होय.

**६५९ ]** उसवलेलें बाड–पृ. सं. ४० × २ = ८०
पहिलीं २ पृष्ठें नष्ट [१५०

श्रीसमर्थ कृत मनाचे श्लोक–यशवंतकृत आरतीसह. पहिले नऊ श्लोक नष्ट झालेल्या दोन पृष्ठांत गेले.

**६६० ]** बाड–पृ. सं. २४ × ४ = ९६ [२१०

(१) दीन श्याम कृत रागमालेवर एक पद

( २ ) गिरिधर कृत करुणाराम-श्लोक १८२

( ३ ) गिरिधर कृत सतरा पदें-प्रत्येकाचें ध्रुपद :

श्रीराम जयराम राम राम राम ।
तारकब्रह्म नाम राम राम राम ॥
किंवा दुसऱ्या चरणाऐवजीं
अयोध्यावासी नाम राम राम राम ॥

( ४ ) गिरिधर कृत तुळजापुरच्या अंबेची आरती

( ५ ) श्रीधर गुरुदास कृत जगज्जननीवर पद

## ६६१ ]

बाड-पृ. सं. ५९ × २ = ११८ [ २१०

गिरिधरकृत आत्मानुभव. मालेंतील विरावा भाग श्रीमत् दासबोधाची किल्ली म्हणून छापला आहे, त्यांत गिरिधराचीं जीं चार प्रकरणें गोविलीं आहेत, त्यांत हें एक प्रकरण आहे.

## ६६२ ]

बाड-पृ. सं. ४३ × ४ = १७२
आ. व शे. कांहीं नष्ट [ १५०

( १ ) श्रीसमर्थकृत चतुर्थयोग, पंचीकरणयोग व मानसपूजा हीं पूर्ण प्रकरणें व कांहीं स्फुट श्लोक

( २ ) यं मातुः ० हें पंचक

( ३ ) श्रीज्ञानेश्वरविरचित नमनस्तुति-ओ. १०८

( ४ ) एकनाथी रामायणांतील कांहीं भाग

( ५ ) वेणाबाई कृत नावेचे श्लोक ४४

## ६६३ ]

बाड-पृ. सं. ३० × २ = ६० [ २००

( १ ) श्रीसमर्थ कृत पंचीकरण ओंव्या-४ अभंग, प्रकाशित आहेत

( २ ) जनजसवंताचीं तीन पदें

( ३ ) गिरिधरकृत दासबोधाची आरती व एक पद

( ४ ) गिरिधरकृत गुरुदेवनमन व काशीयात्राकथन हीं दोन प्रकरणें

( ५ ) गिरिधरांचे कोणी जनार्दन शिष्य असावेत, त्यांनीं केलेलें चवदा श्लोकांचें बंधमोचनस्तोत्र. गोड आहे. शेवटचे सहा श्लोक देतों : -

रामदास समर्थ सद्गुरु रामचंद्र अराधिला ।
ब्रह्मचर्य स्वयंभ मारुति धर्मस्थापक देखिला ।
दासबोध करूनियां निज मंत्र तो उपदेशिला ।
त्या नमू जगतीं गुरुप्रति ब्रह्मरूप ठसावला ॥ ९

श्रीगुरु चिद्‌शक्ति वेणि त्रिवेणिचा पुर चालिला ।
वाङ्मयापद्‌जीवनीं जड मूढ लोक निमज्जिला ।
ब्रह्मअब्धिसुधाब्धिश्रीकरुणाब्धिसंगमि मीनला ।
त्या नमूं जगजननीप्रति ब्रह्मरूप ठसावला ॥ १०

श्रीपदीं गिरिनामकाप्रति पूर्ण बोध प्रबोधिला ।
तो चि लाभ सुधाकरीं निज सेवकांप्रति दीधला ।
निवृत्तिराम प्रबोधुनी अपरोक्ष अंतरिं दाविला ।
त्या नमूं गिरिस्वामियांप्रति ब्रह्मरूप ठसावला ॥ ११

श्रीसमर्थपरंपरा निजसद्गुरुवचनीं भला ।
साधुनी निज संभ्रमें मनिं संशयोमल टाकिला ।
चेर्कि येक अनेक सारुनि ऐक्यरूप सुभावला ।
त्या नमूं गिरिराजयाप्रति ब्रह्मरूप ठसावला ॥ १२

बिंबतां द्वय भास जाउनि सर्व संशय छेदिला ।
लवण जीवनिं मीळतां मग भिन्न भाव दुल्हाविला ।
बद्ध मुक्त विमुक्त श्रीपदिं तो हरीजन मीनला ।
त्या नमूं गिरिनाथजीप्रति ब्रह्मरूप ठसावला ॥ १३

बंधमोचनस्तोत्र हें भवबंधमोचनकारणी ।
ऐकतां पढतां मनीं जनिं सज्जनीं जनतारणी ।
पूर्णकाम अराम राम स्वरूपधाम सुदर्शनी ।
वेणिस्वामि जगद्गुरु गिरिनाथ पूर्ण जनार्दनीं ॥ १४

**६६४ ]** बाड–पृ. सं. ३३ × ४ = १३२ [ २१०
सुंदर बाड, मोहरेदार कागद

( १ ) गिरिधर कृत अद्भुतरामायण, हरिलीला व देवसवाद हीं तीन प्रकरणें

(२) गिरिधरदास कृत हिंदुस्थानी भार्षेतील श्लोकबद्ध दोन स्तोत्रें व एक सद्गुरूची आरती. पैकीं दुसरें स्तोत्र विशेष महत्त्वाचें आहे. त्यांत श्रीसमर्थवर्णन आहे. या वर्णनानें श्रीचरित्रांतील कित्येक प्रसंगांना विश्वसनीयता येत आहे. विस्ताराची भीति वाटते, पण त्यापेक्षां हि तें स्तोत्र कदाचित् केव्हांच छापलें जाणार नाहीं, ही भीति जास्त वाटत असल्यामुळें ते चवदा श्लोक येथें च दिलेले थेट. भाषा बरोबर अवगत नसल्यामुळें शब्द तोडण्यांत चुक्या झाल्या असतील, त्या वाचकांनीं दुरुस्त करून श्लोक वाचावे.

### श्रीगुरुनाथ

श्रीगुरुनाथ अनाथके नाथ सनाथ श्रीनाथ सरूप उदासी।
विधिहरविष्णु सुदेव गुणातित घटमठव्यापक अंतरवासी।
मस सदोदित है रुप उदित भाग बडे तिनके अविनासी।
गिरिधरदास कहे सुन साधु सु पगंतु हूं कविचित्त विलासी॥ १

येक समो फलभोजन षडरस येक समो जलप्राशन साइ।
येक समो मधु पान हि पावत साइ सरिस न पावन कोइ।
येक समो सूद्र मंचक सोवत येक समो तृणमंचक वो हि।
गिरिधरदास कहे मधु दौरत पांउ खुले श्रुति मोतनताहि॥ २

येक समो वनवास हि तापस गोवलसों सिरपालन पांधे।
येक समो जनवास विलासत छटिपटि भगंरि भालसुसोंधे।
येक समो कफनी पेहनी छरमोतन चादर कंमर बांधे।
गिरिधरदास कहे गुरुनाथ चढे गढ ले विरकंकन बांधे॥ ३

येक समो रजपूत हि टेट छपेट धनुर्धर राम विराजे।
येक समो वरछिधर सुंदर केसर भालसुकुंकम राजे।
येक समो सुळपानि महेसर अंग विभूत हि रंगन बाजे।
गिरिधरदास कहे गुरुनाथजि महासभासद ब्रह्म विराजे॥ ४

येक समो हरिकीर्तन नर्तन ताल पखावज रंग उडावे।
येक समो हरि दर्शन स्पर्शन सुर नर किन्नर रंग छुडावे।
येक समो हि फकीर भडंग भडादित अंतर भेद तजावे।
गिरिधरदास कहे गुरु साइसु जोगजुगत हि भेद दिखावे॥ ५

येक समो पगडि छरमोतन छडकत चंपक हात गलोला।
येक समो सरकेळियें दौरत कंकर सुनत जातकलोला।

येक समो कवि सिंधु कहावत लहर सिखावत सिखसुमेला ।
गिरिधरदास कहे प्रभुपास रहियें उदास लियें पग हेला ॥ ६

येक समो गिरिकंदरवास प्रभुजु उदासिन पास न कोइ ।
येक समो प्रभुरास पलक मुलुक मिळे सब लोक दुन्याइ ।
येक समो दिन दिन जनावर लोक गुनी पर प्यार चलाइ ।
गिरिधरदास कहे येक दिन पगॉ सिवराजकी आरजन पाइ ॥ ७

येक समो सरनेमोहि उदित भगतनके तन राखत पासें ।
येक समो आपने हि रूप दौरत संतनके मनके हित पासें ।
येक समो सब तीरथ आटन पट्टण धामर मौजनिवासें ।
गिरिधर सांइजु देहरे बनावत काज आटक रहे रहिवासें ॥ ८

येक समो फुलबाग लगावन हार हि हार गुहागर साइ ।
येक समो जलभरतन खोदन पार हि पार नदिपुळमांहि ।
येक समो नदिके पुरेतिसें गाढ रहे प्रभु जोगकमाइ ।
गिरिधरदास कहे गुरुराज गरीबनवाज हि परगट तांहि ॥ ९

येक समो सब संत महंत गुनि गुन तंत प्रभु पहचाने ।
येक समो जिव जंत असंत कुसंत अनंत सुधारस छाने ।
येक समो अति निश्चळ चंचल देह बिदेह गुनि गुन मानें ।
गिरिधरदास कहेजु उदास प्रभुजुके पास गुनि गुन जानें ॥ १०

येक समो जगतीतलमंडल राम हि राम कलोल उठावे ।
येक समो प्रभु सर्वभुमंडळ रामके नौमिके रंग लुटावे ।
येक समो सब सिख मिळाकर ग्यानसुपर्वेनि मेळ फुटावे ।
गिरिधरदास कहे गुरुनाथजु श्रीपदसें सब संत हटावें ॥ ११

येक समो बन व्याघ्र हि सिंह छरे प्रभुजुसें हरिहर दोन्हो ।
येक समो रघुराज धनुर्द्धर संग फिरें हें सरूपसो चिन्हो ।
येक समो प्रभु बाट दिखावत आपन हात पितांबर पेन्हो ।
गिरिधरदास कहे हनुमान प्रभु भये रामसीताफणि तिन्हो ॥ १२

येक समो गुरुनाथ सबों घर येकहि दिन लिये मेजमानि ।
येक समो पुरु पश्चम उत्तर दखनकुं येक रूप निशानि ।
येक समो कैलास बिकुंठ मनोमय दौरत अंजनरयानि ।
गिरिधरदास कहे गुरुनाथकी कोन कबि गुनकीर्त बखानि ॥ १२

येक अनेक यदा करतार भुमंडल मंडळ सो सब तारे ।
येक अनेक यदा अवतार उदासिन योग हि भोग सिधारे ।
येक हि येक अनेक प्रभु पर देह विदेह पर्ण सिरधारे ।
गिरिधरदास कहे प्रभु पास त्रिवेणि निवास करें जीवहारे ॥ १४

६६५ ] पाड—पृ. सं. २० × २ = ४० [२००

(१) गिरिधर कृत छंदोरामायणापैकीं युद्धकांडाचा चतुर्थ प्रसंग
(१) गिरिधर कृत शंकरवर्णनपर स्फुट ओव्या

६६६ ] छोटें बाड-पृ. सं. ६ × २ = १२ [२००

(१) गिरिधर कृत दोन पदें व दहा भाषाश्लोक
(श्री) श्रीरामा राघवा हो जयरामा राघवा जी ।
(रा) ऐसो निगमपंथका न्यारा कोई जोगी है रे अनमो ।
(म) चले जाव मुसलमान हिंदु खुदाईं ।

६६७ ] बाड-पृ. स. ११४ × २ = २२८ [२००

श्रीगिरिधर कृत काशीखंड

६६८ ] बाड-पृ. स. १८ + १६ = ३४ × २ = ६८ [२००

शेवटचीं दोन पाटलीं

(१) श्रीसमर्थकृत मुसलमानी श्लोकाष्टकें :

| | | |
|---|---|---|
| (१) आलस वो निरजन कैसा हये रे ॥ | एकूण श्लों. | ५ |
| (२) करामत करे सो खुला है दिवाना ॥ | " | ५ |
| (३) पवनका सबो हि हद्दी खेल भाई ॥ | " | १७ |
| (४) जिसो परत लंका लिई है रहिर्मे ॥ | " | ६ |
| (५) हमे तूं न ये तब फकिरी काहा थी ॥ | " | १२ |
| (६) जिसो वख्त जैसो मिला सो हि खाना ॥ | " | ५ |
| (७) खुदाके दि दर्गी जिसे है रे ज्याना ॥ | " | १६ |
| (८) दर पर दछ यादछ महिमछ जौ कुछ मपलुछ है शुछ सारे ॥ | " | १२ |
| (९) राजमो राज महाराज रघुराज० ॥ | " | २ |

(२) श्रीसमर्थकृत विरकोळ अष्टकें

(३) गिरिधरकृत हिंदुस्थानी " सीतास्वैंवर "–कडवीं २८

(४) घेंडाकथन–ओ. १६ अपूर्ण–बहुधा गिरिधरकृत

**६६९ ]** बाड–पृ. ब १६ × २ = ३२ गिरिधर कृत शकरवर्णनपर स्फुट ओव्या [२१०

**६७० ]** बाड–पृ. ब २१ × ४ = ८४ शिवाय काहीं नष्ट [२००

(१) दासबोधमन्थपरत्वा दिली आहे ती

| दशक ५ | दशक १० | दशक १५ | दशक २० |
|---|---|---|---|
| ३२६ | ४१३ | २८७ | ३०२ |
| ४६८ | ५६४ | २९४ | २९५ |
| ५८० | ६४१ | २९९ | २८८ |
| २९४ | ४१८ | ४०६ | २८४ |
| ५७२ | ३५२ | ३३७ | ३०८ |
| २२४० | २३८८ | १६२३ | १४७७ |
| ४६२८ | | ३१०० | |
| ७७२८ | | | |

(२) अनेक सुभाषितें आहेत. शिवाय श्रीसमर्थ, गिरिधर, रगनाथ, जनभगवत, जनार्दनसुत, कृष्णदास जयराम, तुलसीदास, निंबक, गोसावीनंदन, वेणाबाई, अनंतदास, देवदास, पुरंधरविठ्ठल, सुरदास, केशव, शकर किंकर, गोविंदसुत इत्यादिकांचीं पदपदातेरें

(३) कोनेरीनंदन गगाधर कृत सप्तमालिका–कडवीं २७

(४) श्रीरामदासचरित वक्षे कलिमलापहम् ॥ श्लोक १३

(५) वेणी कृत कृष्णस्तवनपर २८ श्लोक व श्रीरामस्तवनपर १० श्लोक

(६) पद्मपुराणे श्रीशिवपार्वतीसंवादे तारकब्रह्मराममन्त्रमथे हृदयस्थ निरूपणम् ॥ श्लोक २६

(७) निरनिराळ्या रागांचीं हिंदुस्थानी पदें

( ८ ) दशावताराचे अकरा श्लोक, पारशीधर्मग्रन्थांतील उतारा, तेलंगी पद, सुवर्णाच्या संपत्तीचे श्लोक, अपूर्ण अश्वमेध — ओ. २१, लक्ष्मीविधेचा संवाद, इत्यादि स्फुटें

( ९ ) पौराणिक भूगोल

( १० ) अस्त्रविद्या कौशिकें दिल्या त्यांचीं पंचावन नांवें

( ११ ) देवदासांचीं श्रीसमर्थांवर दोन स्फुटें आहेत. त्यांतील एक :

जगांत रामदास रे ।

समर्थ रामदास हा । उदास दास तो पहा ।
जनास ना कळे स्थिती । मनासि ना कळे गती ॥ १
प्रपंच वारिला सळें । विवेक लाधला बळें ।
समस्त द्वैत सारिला । रिपु बळें चि मारिला ॥ २
कुदांत काय बापुडें । कदां न पाहे वांकडें ।
उदास दास नाचती । नभांत घोष गाजती ॥ ३
भला समर्थ दास हा । प्रयोजिला चि या पहा ।
उदास वृत्ति फारसी । मनांत वृत्ति गाढसी ॥ ४
जनांत रामदास रे । बहुत मान्य त्यास रे ।
तया पदीं च वास रे । करीत देवदास रे ॥ ५

दुसऱ्या स्फुटाचा शेवट आहे तो असा :

जगांत रामदास रे । तया पदीं च वास रे ।
निमग्न देवदास रे । विरोन देहभास रे ॥ ६

( १२ ) गिरिधरांनीं लिहिलेले पत्रवजा पांच श्लोक आहेत. त्यांत कांहीं संकेत असल्यास कोण जाणे पण भावार्थ कांहीं लक्ष्यांत येत नाहीं. इतकें अनुमान काढता येतें कीं, कोणत्या हि ठिकाणीं लोक गोळा व्हावयाचे असले म्हणजे तेथें सर्वत्र फिरून तेथील सर्व हरद्द जाणण्यासाठीं श्रीसमर्थांचे निस्पृह शिष्य जात असावेत.

तें पत्र

नमस्कार साष्टांग अनन्य भावें । अती लीन विज्ञप्ति हेतुप्रभावें ।
कृपेच्या गुणें पांडुरंगा अरामा । सुखें देखिलें जी हृदयाभिरामा ॥ १
पुढें चंद्रभागा कळावृद्धि जाली । पुरी वेष्टिता सव्य देवासि घाली ।
सुखें कृष्णपक्षीं श्रीगोपाळकाला । सोहळाह उछाह हा थोर जाला ॥ २

किती येक ते संत यात्रेसि आले । समर्था प्रभूचे उदासीन आले ।
सुखें निरद्वंद्व फीरती अंतरंगें । कथाकीर्तनें ऐकती प्रेमरंगें ॥ ३

गुणग्राहिकीं गुण ते सोडवीले । ऋषी देव गंधर्व स्वर्गासि गेले ।
अनुसे प्रमाणें भिमापार स्वामी । दयेच्या गुणें क्षेम कल्याण धामीं ॥४

पदीं हेत नीवेदिले ते चि आतां । घडावें प्रसंगें चि स्वामी समर्था ।
गिरी दीन अनन्य पाईं धरावे । समर्था पदीं स्फूर्ति माझी स्वभावें ॥ ५

६७१ ] बाड—पृ. सं. २० × २ = ४०      [ २१०

( १ ) महायात्राक्रम – संस्कृत प्रकरण – श्लोक १८४-गिरिधर कृत असावें. प्रकरण अपूर्ण सोडलेलें दिसतें.

( २ ) हनुमत्स्तोत्रम् —श्लो. ८

६७२ ] बाड-पृ. सं. १० × २ = २०      [ २००

गिरिधर कृत करुणारुद्र—श्लोक १२१

६७३ ] बाड-पृ. सं. ५० × २ = १००      [ २००

( १ ) श्रीसमर्थ, तुकाराम, शिवराम यांचीं किरकोळ पदपदांतरें

( २ ) गिरिधर कृत लोकस्वभाव-या प्रकरणाचे नऊ अभंग असून ओवीसंख्या २३३ आहे.

( ३ ) गिरिधर कृत स्वरूपार्णवकथन म्हणून चार प्रकरणें : ( १ ) रामरूप-ओवीसंख्या ४३, ( २ ) सीतारूप-ओ. ५४, ( ३ ) प्राणनाथ-ओ. ५२, ( ४ ) श्रीयोगीराज-ओ. ५०, एकूण ओ. सं. १९९

( ४ ) गिरिधरांचें कल्याणरागांतील एक चौताळ पद :

माउले राघवे तूं वो मज्ञांडव्यापकरूपें ।
कनवाळे याद्वये तुझा योग हो का मनीं ॥ ध्रु०

६७४ ] बाड-लिखित पृ. सं. ३२ × २ = ६४      [ २००

( १ ) वेणी कृत फौड-श्लोक २६

(२) श्रीमत्परमहंसपरिव्राजकाचार्य श्रीमत्पूर्णानंदघनलक्ष्मीनारायणानुचर शिवराम कृत पंचीकरण. हें प्रकरण सुबोध असून त्याच्या साहाय्यानें पंचीकरणाचा चांगला बोध होतो.

६७५ ] बाड–पृ. सं. २० × २ = ४० [२००

(१) वेणाबाई, जन जसवंत, तुकाराम, गोसाईनंदन, जयवंत, शिवराम, कौंडण्यात्मज हरिहर, गोपवत्स, बाळगोपाळ यांचीं पदपदांवरें. शेवटचीं तीन नावें नवीन आहेत.

(२) गोपवत्स कृत मनपंचक, वाणीपंचक, कर्णपंचक व नेत्रपंचक अशीं चार पंचकें—एकूण २० श्लोक

(३) गिरिधर कृत रामेश्वरयात्रा—१६ श्लोक

(४) बाळगोपाळ कृत रामनवमीचे सात श्लोक हिंदुस्थानी भाषेंत

(५) सुभाषितें-संस्कृत मराठी–, स्फुट ओव्या श्रीपदवामुद्रिकचिन्हें इत्यादि.

६७६ ] बाड–पृष्ठें १३ ते १५९
पहिलीं १२ आणि शे. सुमारें २५ नष्ट [२००

(१) श्रीसमर्थ कृत युद्धकांड—अपूर्ण ११०० श्लोक

(२) श्री श्लोक मनाचे—श्लो. २०१. कोणचे तरी मधले च चार श्लोक गळाले आहेत.

(३) करुणाष्टक ७३ वें

(४) नागेशविरचित चंद्रावळी—श्लो. ३२२

(५) सीतास्वयंवर—अपूर्ण ८२ श्लोक

(६) स्फुट

६७७ ] किरकोळ बाड–पृ. स. १२ × ४ = ४८
बाकीं नष्ट [१५०

(१) रंगनाथ, सुरदास, वामन, मीराबाई, केशव, कबीर, मानपुरी यांचीं किरकोळ पदपदांवरें

( २ ) श्रीसमर्थ कृत स्फुट श्लोकांपैकी स्फुट ५९ वें

( ३ ) गिरिधर कृत स्वामीचें पद देखतां विवरितां०

**६७८ ]** जीर्ण बाड-पृ. सं. १७४ × २ = ३४८ [ २१९

( १ ) श्रीसमर्थ, कृत मनाचे श्लोक ११९ च ( मधले च बहा श्लोक गळालेले दिसतात ) व कांहीं आरत्या

( २ ) वेणी कृत फौलाचे श्लोक २६

( ३ ) विठ्ठल कृत विल्हणचरित्र-श्लोक १२१. त्यांचा शेवटीं लेखनकाल वगैरे आहे तो असा :

शके १६२० बहुधान्यनामसंवत्सरे श्रावण वदि प्रतिपदा
गुरुवार तद्दिनि लिखितं यथाप्रति ॥ हस्ताक्षर नारो नृसिंह
कुळकर्णी मौजे गोठेगांव पागणे भूम शुभं भवतु ॥

( ४ ) याशिवाय या बाडांत अनेक मंत्रतंत्रयंत्रें आहेत, सुभाषितें आहेत, अपूर्ण प्रकरणें आहेत, ज्योतिषाचा भाग आहे, कानडीलिपींत कांहीं भाग आहे, तुकाराम, श्रीधर, समर्थ यांचीं किरकोळ पदपदांतरें आहेत.

**६७९ ]** बाड-पृ. सं. ५३ × २ = १०६ शिवाय कांहीं नष्ट [ १५९

( १ ) श्रीसमर्थ, रंगनाथ, दास ब्रह्मानंद, कोकिळ किंवा कोकिळ गंगाधर, वामन, केशव, श्रीधर, तुका, एकनाथ, शिवराम पूर्णानंद, विठा रेणुकानंदन, जनी, पुरुषोत्तम एकनाथ, हरिदास, त्र्यंबक ( चिंतामणी देव यांवर आरती ), निरंजनदास इत्यादिकांचीं पदपदांतरें

( २ ) नृहरिसुत कृत मुकुंदराजमुनिचरित्र—ओवीसंख्या १०३. हे मुकुंदमुनि आद्य मुकुंदराज नव्हत. ते अलिकडे झाले. ते पैठणास असत. साधनें केली, खजुर आणि दूध यावर राहिले, साक्षात्कार झाला, त्याप्रमाणें गोदातीरीं नृसिंहक्षेत्रीं कोकिळ नामें योगनिष्ठ ब्राह्मण होते त्याच्या कडे जाऊन गुरुकृपा संपादिली. गुरूनीं चतुर्थाश्रम घेऊन व ब्रह्मानंद नांव धारण करून मार्गशीर्ष वद्य ६ गुरुवारीं जलसमाधी घेतली. नंतर मुकुंदमुनींनी हि १६१७ मन्मथनाम संवत्सरीं वैशाख कृष्ण १ सौम्यवासरे जलसमाधी घेतली. हें चरित्र नृहरिसुतांनीं

नृसिंहक्षेत्रापासून एक योजनावर असलेल्या चकाभिधान गांवीं मन्मथ संवत्सरीं च ज्येष्ठ शुद्धांत लिहिलें. अशी हकिकत या चरित्रांत आहे. तें नवीन आहे व प्रकाशित झालें पाहिजे. मार्गशीर्ष व. ६ गुरुवार हा दिवस १६१० तील असावा.

( ३ ) या च बाडांत दास ब्रह्मानंद यांचीं व कोकिळांचीं वरीं च पदपदांतरें आहेत. कोणाला तरी संशोधनाला एक विषय झाला.

( ४ ) एकनाथ कृत चिरंजीव पद– ओ. ४०

( ५ ) वामन कृत भामाविलास–श्लोक ४७. याच्या शेवटीं लेखनकाल दिला आहे तो :

शके १६२६ जयनाम संवत्सरे आश्विन कृष्ण ६ भौम्यवासर तद्दिवसिं लेखन वानवळियाच्या दिवानखानियांत समाप्त केलें असे ॥

एक कोडें : मुकुंदमुनिचरित्र ज्याच्या हातचें लिहिलेलें आहे त्याच्या च हातचा भामाविलास आहे. बाडाच्या पृष्ठ ११ वर मुकुंदमुनिचरित्र आहे व पृष्ठ २३ वर भामाविलास आहे. भामाविलास १६२६ त लिहिला, तर त्याच्या आधीं लिहिलेल्या मुकुंदमुनिचरित्रांत १६१७ तील समाधीकालाचा उल्लेख कसा येऊं शकला !

## ६८० ]

दुर्दशा पावलेलें बाड
पृ. सं. ९१ × २ = १८२ [ १७५

( १ ) श्रीसमर्थ, गोरा कुंभार, दीनेश गिरिधर किंवा दीनानाथ गिरिधर किंवा दीनेशके प्रभु गिरिधर साहेब किंवा मोघम दीनानाथ, गिरिधर, केशव, ज्ञानदेव, चांगा वटेश्वर केशवीं आटला, नामदेव, मुक्ताबाई, भानुदास, शिवरामाचा येका, रंगनाथ, मानपुरी, कबीर, शिवदिनकेसरी, एकनाथ, तुकाराम, मच्छनाथ, मुक्तेश्वर, बसवेश्वर, नरसिंहदास इत्यादिकांचीं पदपदांतरें. त्यांत श्रीसमर्थ, दीनेश गिरिधर, केशव, गिरिधर यांच्या पदांचा भरणा विशेष आहे.

श्री राम जय राम जय जय राम । रसने रस हा सेवी नित्य नेम ॥ या ध्रुवपदाचें दीनेशाचें एक पद आहे.

( २ ) गिरिधर गुरु जंबुखेटकग्रामवासी ॥ असा चवथा चरण असलेलें एक अष्टक

( ३ ) श्रीसमर्थ कृत पंचसमासी पूर्ण

( ४ ) गिरिधर कृत शंकरवर्णनपर स्फुट ओव्या—८३ अभंग

( ५ ) गिरिधरांचीं श्रीसमर्थांवर पांच महत्वाचीं अप्रतिम पदें. हीं समर्थप्रतापाच्या दुसऱ्या आवृत्तींत परिशिष्ट म्हणून द्यावीं.

६८१ ] एका मोठ्या बाडाचीं अवशिष्ट पृ. सं. १९ × २ = ३८ [ २००

एकनाथ, शिवराम पूर्णानंद, नामदेव, श्यामसुतांकित, कृष्णदास, शाह हुसेन फकीर, मानपुरी, आनंदपुरी, भास्करसुत, जनजसवंत यांचीं पदपदांतरें

६८२ ] जीर्ण बाड–पृ. सं. ८० × २ = १६० [ २००

( १ ) श्रीसमर्थांचीं बरीं च पदपदांतरें आहेत. त्यांत कांहीं अप्रकाशित आहेत. ताडून पाहणें आहेत.

( २ ) याशिवाय फकीर, गोसावीनंदन ( यांचीं बरींच आहेत ), जगजीवन, अनंतदास, श्रीधर, कल्याण, तुकाराम, एकनाथ, शिवराम पूर्णानंद, केशव, माळोनरहरी, कृष्णदास, जुनाई, वेणी यांचीं पदपदांतरें

( ३ ) श्रीसमर्थ कृत कांहीं करुणाष्टकें, ईश्वरविवाहाचे ११ श्लोक वगैरे

६८३ ] बाड–पृ. सं. २३ × २ = ४६ [ २००

( १ ) वल्लभदीक्षितविरचितं ( १ ) यमुनाष्टकं, ( २ ) नवरत्नं, ( ३ ) श्रीकृष्णाय स्तोत्रं

( २ ) अग्निकुमारप्रोक्तं सर्वोत्तमं स्तोत्रं

( ३ ) विठ्ठलदीक्षितविरचितं ( १ ) श्रीवल्लभाष्टकं, ( २ ) छप्पश्लोकी

( ४ ) वल्लभाचार्य कृतः ( १ ) अंतःकरणप्रबोधः ( २ ) चतुःश्लोकी

( ५ ) भागवते दशमस्कंधे गोपिकागीतम्–अध्याय २१ वा व ३५ वा हीं सर्व संस्कृत प्रकरणें आहेत. नंतर कांहीं हिंदुस्थानी कवित्त आहे.

६८४ ] बाड–पृ. सं. २५ × २ = ५० [ २१०

गिरिधर कृत तीन हकिकतवाके—श्रीसमर्थप्रतापाला अनुसरून श्रीसमर्थचरित्रपर

**६८५ ]** किरकोळ बाड–पृ. सं. २७ × २ = ५४ [२००

( १ ) तुकाराम, सुरदास, मानपुरी, नामदेव, माधोदास यांची पदपदातेरें. माधोदास कृत अठकाऱ्या प्रत्येक श्लोकाचा चवथा चरण :

शेषाद्रीरमणा विपत्वहरणा तूं सार नारायणा ॥

( २ ) या बाडात सुरा सन ११४४ म्हणजे शके १६५६ तील काही कर्जखतें उतरलेलीं आहेत, त्यावरून त्या वेळीं व्याजाचा दर दरमहा दर रुपयास रु॰ ०४ होता असें दिसतें.

**६८६ ]** बाड–पृष्ठें ११ ते ९१ = ७९ × २ = १५८
पहिलीं व शेवटचीं १२।१२ गेलीं [९१२

( १ ) श्रीसमर्थ, वासुदेव, केशव, सामराज्य अथवा साम्राज्य, एकनाथ, तुका, नामा केशवाचा, वामन, ज्ञानदेव, माल्हो, शिवतनय, उद्धवचिद्घन, श्याम, मुक्ताबाई, विष्णुदास नामा यांची पदपदातेरें

( २ ) त्यात वासुदेव यांच्या पदपदातराचा भरणा फार आहे. त्याच्या आत्मबोध म्हणून १५ ओंव्या आहेत. गीतेच्या नवव्या अध्यायातील पहिल्या पधरा श्लोकावर त्याचे समश्लोक आहेत.

( ३ ) बाडाच्या आरंभीं रामरक्षेचे १९ ते २७ श्लोक आहेत.

( ४ ) पृष्ठ ५२ च्या मागील बाजूस एक नोंद आहे :

" सक १६७२ साल्वरी नाम सवंतरीं पुस वद्य सस्टी
रविवारीं जन्मला ठाकुर देव । मासीक नाव हरी ।
स्वभावीक नाम । मल्हार गोसावी ।"

**६८७ ]** बाड–पृ. सं. २३ × २ = ४६
आ. व शे. काहीं गेलेलीं [१४४

( १ ) वेणीस्वामी कृत फौजाचे श्लोक १२ ते २६ व नावेचे श्लोक १ ते ४३.

( २ ) यशवंत कृत सद्गुरुचपदीस्तोत्र–अति अशुद्ध

(१) एका पृष्ठावर शके १७१२ तील हिशोब आहे

## ६८८ ] बाड-पृ. सं. ५९ × २ = ११८ काहीं गेलेलीं [१५०

श्रीसमर्थ, रघनाथ, तुकाराम, केशव, नानाजीनंदन, शिवराम पूर्णानंद, मानपुरी, सज्जनरंजन, चिंतामणिसुत मुद्गल, कल्याण, अमृतराय, उद्धवाचिद्घन, एकनाथ, नामा, जनार्दन, वामन, रंगेशात्मज ( कृत तेराक्षरी मंत्रावर चवदा श्लोक ), मुक्ताबाई, गणेशनाथ, आनंदसुत, नारायण सदाशिव हिरदे, येका शिवराम, राघवदास, माली अशा चोवीस सत्पुरुषांचीं पदपदातरें. त्यांत पहिल्या चौघाचा भरणा विशेष आहे.

## ६८९ ] न शिवलेलें बाड-पृष्ठें ३ ते ११ [१५०

रामहृदय, रामगीता, इत्यादि संस्कृत भाग

## ६९० ] बाड-पृ. स. ८३ × ४ = ३३२ [१००

(१) श्रीसमर्थ, सीताराम, परमहंस, गिरिधर, वेणी, नामा, निवृत्तिदास, ज्ञानदेव, तुकाराम, शिवदिनकेसरी, एकनाथ, कोकिळ, केशव, उद्धवचिद्घन, गोविंदसुत, कृष्णदयार्णव, रघनाथ, रंगानुज आत्मज, नरहरि, येका शिवराम, मध्वमुनेश्वर, श्रीधर, भीम अशा तेवीस जणांचीं पदपदातरें. त्यांत श्रीसमर्थ, गिरिधर आणि केशव यांच्या पदांची संख्या विशेष आहे.

(२) यांत अप्रकाशित पदें पुष्कळ च आहे. परमहंस आणि गिरिधर, केशव, आणि शिवदिन यांचीं पदें नवीन आणि सरस आहेत. श्रीसंप्रदायाविषयीं कल्पना होण्याला गिरिधरांचीं पदें उपयोगीं पडणारीं आहेत. सर्व पदें येथें देण्याला सवड नाहीं, तथापि शिवदिनांचीं तीन पदें टाळून पुढें जाण्याला आम्ही असमर्थ आहोंत. त्यांतलें पहिलें पद श्रीकल्याणांना अनुलक्षून असावें, असें आमच्या मनानें घेतलें आहे. तें पद वाचा आणि पहिल्या खंडांतील बाडांक ५२ त दिलेलें कल्याणस्वामींचें चित्र पहा, म्हणजे तुम्हास हि आमच्या प्रमाणें च वाटेल. नंतरच्या दोन पदांत श्रीसमर्थांचा स्पष्ट उल्लेख च आहे.

## [ १ ] तो ब्रह्मचारी

नित्यानित्यविवेकें अंतरीं जाला निर्विकारी । तो ब्रह्मचारी ॥ ध्रु०
स्नानसंध्या जप हा अखंड करितो दशमद्वारीं ।
सद्गुरुवचनें भिक्षा दृढ विश्वासें स्वीकारी ।
येकीं येकपणाची निद्रा मीतूंपणेंविण सारी ॥ १
मूळ ब्रह्मवंशाचा कौपिन सहजीं सहज नेसे ।
सत्वशुद्धभस्मोज्वळणाचें अखंड ज्याला पिसें ।
त्यावरी अक्षमाळाभूषण सर्वांगीं ज्या विलसे ।
ब्रह्मपणलीनतेचें चिन्ह सबाह्य अंतरीं दिसे ॥ २
सच्चिदानंदाचें यज्ञोपवीत राहे स्कंधीं ।
यमनियमप्रत्याहारें वासनांतर जो छेदी ।
कर्णी कुंडलदीप्ति झळकती आदिसिद्धांतादि ।
चहुं देहाच्या सुटल्या गांठी जीवशिवउद्बोधीं ॥ ३
आठवनाठवातीत ज्याला घाणे स्थितिमुद्रा ।
अबोल बोलें बोलत त्याची न कळे गति सुर इंद्रा ।
केसरिसद्गुरुसेवा करितां नेणे आळस निद्रा ।
शिवदिन ऐसा विरळा निवडे मथनीं दैवसमुद्रा ॥ ४

## [ २ ] रामदासस्वामी

मुमुक्षुचकोरा इंदु । वैराग्याचा मूळकंदु ।
सच्चिदानंद पूर्ण सिंधु । रामदासस्वामी ॥ ध्रु०
साधु सज्जनगडीं । उभवूनि भावार्थगुडी ।
राहिला सहजस्थिति आवडी । रामदासस्वामी ॥ १
अनुभवग्रथांची खोटी । दासबोध दासांसाठीं ।
वदला अबोल गोड गोष्टी । रामदासस्वामी ॥ २
सबाह्यअंतरीं येक । देखणें समान देख ।
पुरता श्रीरामउपासक । रामदासस्वामी ॥ ३
केसरी मनोहर नाथ । सकळ पूर्ण काम अर्थ ।
देखुनी नयनीं जालों कृतार्थ । रामदासस्वामी ॥ ४

## [ ३ ] रामदासका राम हि प्यारा

रामदासकी पग्धूळ जै ये । घोय चरण तीरथ पीये ॥ ध्रु०
रामदासका पावन मंदर । ठाकुर आप हि बाहर मंदर ॥ १

रामदासकी सीतल छैया । झारूं सीस दोउ पांव पन्हैया ॥ २
रामदासकी संगत धरणा । छिनमों भवजल पार उतरणा ॥ ३
रामदासका दर्सन जिनकों । च्यार मुगत कर ज्योरत तिनकों ॥ ४
रामदासका छींदा लागत । जन्ममरण दुख सब हि भागत ॥ ५
रामदासका राम हि प्यारा । सिवदिनप्रभु केसरी सारा ॥ ६

( ३ ) श्रीरंगानुज आत्मज कृत श्रीरंगसंतमाळा ओवीसंख्या ६१, गद्यांत असलेलें सच्चिदानंदस्वरूपाचें वर्णन, गिरिधरकृत सांप्रदायिक पदें व भीम कृत गिरिधर या चतुराक्षरी मंत्रावरील पद, इत्यादि भाग केंव्हा तरी प्रकाशित झाला पाहिजे.

( ४ ) या बाडांत एके ठिकाणीं १६५६ तील एक नोंद आहे.

६९१ ] बाड–पृ. सं. ३० × २ = ६० [ २००

श्रीसमर्थ कृत सगुणध्यान आणि अवर्भाव

हीं दोन्हीं प्रकरणें या बाडातील प्रमाण मानून उतरावीं.

६९२ ] बाड–पृ सं. ४६ × २ = ९२ [ २००

( १ ) श्रीसमर्थ कृत सगुणध्यान आणि निर्गुणध्यान

( २ ) श्रीसमर्थ कृत पद—पळा पळा महापिसा येतो जवळी।

( ३ ) कोणी शिव कृत श्रीरामावर एक पद आहे.

( ४ ) पुस्तपृष्ठाच्या आतल्या बाजूस सन ११३२ म्हणजे शके १६४४ तील एक मोडी अस्सल पत्र डकविलेलें आहे, तें सबंध वाचता येतें. पतरूब मा बीड येथील देशमुख देशपांडे यांचे कडून खंडेराव गोविंद यास कीं, महाराजी रघुनाथ याज गुमास्तेगिरीवरून दूर धरून भगवंतराउ यास गुमास्तेगिरी सांगितली आहे.

हें हि बाड ६९१ इतकें च प्रमाण आहे.

६९३ ] बाड–पृ. सं. ७ × २ = १४ [ २००

हें बाड गिरिधरांच्या एका पदापुरतें च आहे. तें पद रामाबाईवर आहे. त्याचीं तेरा कडवीं आहेत. आठव्या कडव्यांत

पाविनकरुविद्या घर्में कोहीं कोहीं आलें हातों वो ॥
घरिसार्णव दाटला विंदु प्राशन करीतों भावां वो ॥
अशीं दोन चरणें आहेत, तीं वाचून आम्हांस ६५३–६५४ या प्रतीची आठवण झाली.

## ६९४ ]

अपूर्व बाड–पृ. सं. ८० × ४ = ३२०

सूची [३१०

सवा आणि दीड इंच यांच्या दरम्यान रुंदी आणि चार इंच–लांबी असलेलें हें बाड आहे. तें मुठींत मावतें व मुठींत मावावें, अशी च त्याची योजना असावी.

(१) आरंभीं भजन दे देवराया। व पाळिलें पोसिलें मज हीं श्रीसमर्थांचीं दोन पदें दिलेलीं असून, नंतर दासबोधांतील निपटक भाग, कोणाचे श्लोक, मामलमटपीकेदान, ईश्वरविवाद, सुंदरकांड व बहुधागोंसावी यांतील ओंव्या आणि श्लोक यांच्या प्रथम चरणांतील दोन चार शब्द सूचनार्थ उतरलेले आहेत. नंतर ५८ वें स्फुट श्लोकाचें प्रकरण व १५८ वें करुणाष्टक हीं पूर्ण देऊन पुन्हां दासबोधांतील कांहीं भागाची सूची आहे.

(२) या सूचीवरून गिरिधरांच्या पाठांतराची कल्पना होते.

## ६९५ ]

१३/४" × ३३/४" आकाराचें बाड

पृ. सं. ६० × २ = १२० [१०१

(१) आणिक नेणे हो

नाम जाणे हो रामनाम जाणे हो। रामनामनेम जाणे आणिक नेणे हो ॥ १
चंद्र जाणे हो रामचंद्र जाणे हो। इंद्र राघवेंद्र जाणे आणिक नेणे हो ॥ २
नाथ जाणे हो दीनानाथ जाणे हो। रामायण ग्रंथ जाणे आणिक नेणे हो ॥ ३
दीक्षा जाणे हो रामदीक्षा जाणे हो। दीक्षा रामरक्षा जाणे आणिक नेणे हो ॥४
राज्य जाणे हो रामराज्य जाणे हो। रामचरण पूज्य जाणे आणिक नेणे हो ॥५
उत्तम जाणे हो रघोत्तम जाणे हो। सदा म्हणे राम जाणे आणिक नेणे हो ॥६

(२) गिरिधर कृत श्रीसमर्थकरुणा – श्लोक १०१

(३) गिरिधरांनीं वृद्धपणीं पथ्यावेर गुरुदेवीं पाठविलेली चतुःश्लोकी पत्रिका

## ६९६ ]

बाड–पृ. सं. १७ × ४ = ६८ [ १५०
आ. प शे. कांहीं गेलेलीं

( १ ) वामन, राघवसुत किंवा राघवतनुज, किंकर, कृष्णदासमुद्गल, वहिरा, रोहिदास, एकनाथ, केशव यांचीं पदपदांतरें

( २ ) किंकर कृत सीतास्वयंवराच्या सवाया

( ३ ) वामन कृत कृष्णजन्मकथनाचे श्लो. २८

( ४ ) रासोत्सव–१० श्लोक. अनेक संस्कृत मराठी सुभाषितें

( ५ ) नृसिंहात्मज कृत रामायणी कथा—अपूर्ण ओ. ९३

## ६९७ ]

बाड–पृ. सं. ६३ × २ = १२६ [ २००

( १ ) श्रीसमर्थ, गिरिधर, ज्ञानदेव, त्रिंबक, बसलिंग, शिवराम, रंगनाथ, केशव, श्रीधर, यांचीं पदपदांतरें

( २ ) गिरिधर कृत ( १ ) महाराज पहुडले । रघुराज पहुडले ॥ (२) महाराज पहुडले । स्वामीराज पहुडले ॥ अशीं दोन पदें, प्रत्येक अकरा अकरा कडव्यांचें

( ३ ) गिरिधर कृत गणेशरामस्तोत्रम्–श्लो. ११, सीतासरस्वती-स्तोत्रम्–श्लो. १० व श्रीसमर्थसद्गुरुस्तोत्रम्–श्लो. १० अशीं तीन संस्कृत स्तोत्रें

( ४ ) स्वामींचें पद देखतां विवरतां तद्रूपता लागली । हे गिरिधरांचें दहा श्लोक

( ५ ) श्रीधर कृत पारधीकथा–ओवीसंख्या ४१

( ६ ) श्रीधर कृत संतमाळा–श्लोक २२ होते, पण पहिले २१ फाटण्यांत गेले आहेत.

## ६९८ ]

एक जीर्ण कागद [ १५०

हरिहर कृत रामनामावळी. हिचा मथळा “ नामावळी सप्तकांड रामायण ” असा आहे. ही नामावळी सभेनें छापली आहे. भालगांवमठपति श्रीसमर्थशिष्य त्रिंबक त्यांचे हे हरिहर शिष्य होत.

६९९ ] बाड–पृ. सं. २४ × ४ = ९६ [ ४००

( १ ) श्रीसमर्थ, गिरिधर, रंगनाथ, शिवराम यांचीं पदपदांतरें
( २ ) भक्तिरहस्यांतील ६५ वें प्रकरण
( ३ ) स्वामीचें पद देखतां ० गिरिधरांचे दहा श्लोक

७०० ] बाड–पृ. सं. १० × २ = २० [ १५०

पंचीकरणरत्नाष्टिकम
गद्यांत. उपयुक्त आहे. शेवटच्या पृष्ठाचा अर्धा भाग फाटून गेल्यामुळें शेवटचा मजकूर नाहीं.

७०१ ] बाड–पृ. सं. २४ × ४ = ९६ [ २००

या बाडाच्या तळाचा एक दोन बोटे भाग कसरीनें खाल्यामुळें तें निरुपयोगी झालें आहे.

( १ ) आरंभीं कोणतें प्रकरण आहे, कोण जाणे. त्याच्या १७६ ओंव्या असून तें तेथें अपुरें च सोडलें आहे. ओळखीसाठीं पहिली ओवी :
ॐ नमोजी सच्चिदानंदा । जगदादि आनंदकंदा । निजांगें अभयवरदा । सद्गुरुराया ॥ १
( २ ) किंकरी, येसाबा, गिरिधर यांचीं पदपदांतरें
( ३ ) गिरिधर कृत ग्रन्थभावार्थ

७०२ ] बाड–पृ. सं. ४१ × २ = ८२
व्या. छे. व मधलीं कांहीं नष्ट [ १५०

( १ ) विष्णुदासनामा कृत येकादशीमहिमा–ओ. ७४ वे १५४
( २ ) नामदेवचरित्र–ओवीसंख्या ९८–कोण कृत आहे तें ठरवा.

नामा पन्य पळुगामाधारी । त्याचा पुत्र विठो अवधारी ।
भक्तिमधे भजन करी । त्यासी श्रीहरी कृपाळु ॥ ३
हरि ही होऊनियां प्रसन्न । मज घावें जी वरदान ।
नामयाचें पूर्ण कथन । मजप्रती सांगावें ॥ ४

यग आरंभ मयन शेवटची ओवी आहे ती :

विष्णुदासनामयाचा विटा । सरता जाला वैकुंठा ।
भक्तप्रियें दिधला वांटा । विठ्या मल्हारीचरणीं ॥ ९८

( ३ ) विष्णुदासनामाविरचित बुधयावनी

( ४ ) नियुत्तिज्ञानेश्वरसंवाद—ओवी २६

**७०३ ]** सुटे पद तीन [ १५०

जोगि प्रकरण-कडवीं ४९. कोण कृत न कळे. प्रकाशना योग्य

**७०४ ]** दोन पोथ्या—पत्रें १३ + ८ = २१ [२००

( १ ) श्रीरुद्रयामळे ईश्वरगोरोद्धारे उमामहेश्वरसंवादे गुरुपूजनरहस्यं

( २ ) कौळमार्ग—बहुधा पांडुरंग कृत

**७०५ ]** बाड पृ.-सं. ७० × २ = १४० [ १५०

( १ ) श्रीसमर्थ, तुकाराम, मध्वमुनेश्वर, माळो, ज्ञानदेव, नामदेव, जनि, मुकुंद यांचीं पदपदातरें

( २ ) उद्धवचिद्धन कृत श्रियाळचरित्र—कडवीं २२

**७०६ ]** बाड-पृ. सं. ३७ × २ = ७४ [ २००

गिरिधर कृत श्लोकबद्ध व्याकरण—श्लोक ८४

**७०७ ]** बाड-पृ. सं. ३० × २ = ६० [ ३००

( १ ) श्रीसमर्थ कृत पूर्वारंभ आणि ओव्याशतकापैकीं शतक पहिलें आणि आठवें

( २ ) कांहीं सुभाषितें व हिंदी पदें

( ३ ) मुकुंददास कृत कृष्णलीलावर्णनपर हिंदी पदें

**७०८ ]** बाड–पृ. सं. २६ × ४ = १०४ [ २००

श्रीसमर्थ कृत सगुणध्यान–अक्षर सुंदर–बाकी नंतर कोणी तरी लिहिलेला किरकोळ भाग.

**७०९ ]** बाड–पृ. सं. ११ × ४ = ४४ [ २००

श्रीसमर्थ कृत करुणाष्टक १५८ वें आणि ईश्वरविवाह

**७१० ]** बाड–पृ. सं. २४ × २ = ४८ [ २००

( १ ) राघवरंक कृत ६४ ओव्यांचें एक सुंदर प्रकरण. एक भय-रोगी सद्गुरुवैद्याकडे गेला आहे व वैद्य रोग्याची परीक्षा करून, त्यास काय होत आहे तें सांगत आहेत, व त्याच्या कल्याणार्थ अनुपानासह, औषध घेण्याचा त्यास आग्रह करीत आहे, अशी कल्पना आहे. प्रकाशित नाहीं, असें वाटतें. प्रकाशना योग्य आहे.

( २ ) गिरिधर कृत रामकुंडी भवानी–श्लोक १५

( ३ ) पंडित कृत अंबास्तुतिपर पद

**७११ ]** बाड–पृ. सं. १८ × २ = ३६ [ १०

( १ ) सुअर्चा – श्लोक ६, बहुधा गिरिधरांचे.

( २ ) पांच पदें, श्रीसमर्थकृत, प्रकाशित आहेत.

( ३ ) केशव कृत रामगडी केला श्री रामगडी केला ॥

( ४ ) गिरिधर कृत गणपति, सरस्वती, स्वामी, देव, अवघे देव, सर्वांच्या शक्ति, इंद्र, चंद्र, ब्रह्मा, विष्णु, महेश, सूर्य, पृथ्वी, आप, तेज, वायु, आत्माराम, भक्ति, ज्ञान, वैराग्य, यावर एक एक पद. या पुढचीं पांच पृष्ठें फाटलेलीं आहेत. त्यांत गिरिधरांचीं च कांहीं पदें असावीत. त्यांना आपण मुकलों.

**७१२ ]** बाड–पृ. सं. ४८ × २ = ९६ [ १००

(१) कृष्णचरित्रांतील निरनिराळ्या प्रसंगांवर एकंदर २६६ ओव्या. कोण कृत तें दिलेलें नाहीं. बहुधा गिरिधरकृत असाव्या, असें वाटतें.

(२) संस्कृत व्याकरणावर २५ श्लोक

(३) वेणीस्वामी आणि गिरिधर यांचीं पदें

**७१३ ]** बाड–पृ. सं. २० × २ = ४० [१००

गिरिधर कृत ६० श्लोक विविधजनस्वभावाचे. त्यांच्या आधारें तत्कालीन समाजस्थितीची कल्पना होऊं शकेल.

**७१४ ]** बाड–पृ. सं. १० × २ = २० [३००

श्रीसमर्थ कृत दहा वीस पदें

**७१५ ]** बाड–पृ. सं. ११ + १८ = २९ × २ = ५८ [२००
मधलीं च पृष्ठें फाटलेलीं

(१) उपदेश तैसा करितां खळाला ॥ असा चवथा चरण–श्लो. ८

(२) गिरिधर कृत नाना पंथ वर्णनपर पदें

(३) गिरिधरांचीं अष्टकें, पदें, अभग वगैरे

(१) घडो भेटि कृष्णातिरीं स्वामियाची ॥
(२) चला रे चला रामनौमी पहाया ॥
(३) चला रे चला रामनौमीस जाऊं ॥
(४) समर्थांसि हर लीहिला विश्वपाका ॥
(५) गुरुदेवें मज सांगितलें नाम ।
श्रीराम जयराम जयजयराम ॥
(६) गुरुमुखाविणें नाम हें विन्मुख ।
होतसे सन्मुख गुरुमुखें ॥
(७) गुरुदेवें मज उपदेशिलें वर्म ।
तत्त्वमसि ब्रह्म राम नाम ॥

(४) ज्ञानदेव, जनार्दन, यादववीर, श्रीधर यांचीं पदपदांतरें

**७१६ ]** बाड–पृ. सं. २० × २ = ४० [१००

मुद्गल पंडितांचीं निरनिराळ्या रागांवर पदें

७१७ ] लहान आकाराचें बाड-पृ. सं. १००×२=२०० [ २००

( १ ) यांत मुख्यतः वेणाबाईंच्या पदांचा भरणा आहे.
( २ ) शिवाय श्रीसमर्थ, यादव, केशव, गिरिधर, कृष्णदास मुद्गल यांचीं पदपदांतरें

७१८ ] बाड-पृ. सं. १६ × २ = ३२ [ १५०

वामनपंडित कृत ( १ ) द्वारकाविजय सर्ग तीन-श्लोकसंख्या अनुक्रमें ५६, ४४, ३६, ( २ ) ध्यानमाळा-श्लो. १६ व ( ३ ) प्रियसुधा-श्लो. १८

७१९ ] सुटीं पत्रें ५ [ १५०

वामनपंडित कृत राधाभुजंग-श्लो. ५७

७२० ] पोथी-पत्रें ८ [ २००

रघुनाथ शिवात्मज कृत वैदेहीत्रिजटासंवाद-श्लोक ११५. हे कवि पूर्वी ज्ञात नव्हते. या प्रकरणाच्या शेवटीं हि पुढच्या प्रकरणात सीता आणि हनुमंत यांचा संवाद होईल असा निर्वाळा दिला आहे. प्रकाशना योग्य.

७२१ ] पोथी-पत्रें १० [ १५०

कृष्णदयार्णवांकित कृत दत्तजननोत्साहवर्णन-ओवीसंख्या १२६ हे हि कवि आणि त्यांचें काव्य हीं नवीन आहेत. प्रकाशना योग्य.

७२२ ] पोथी—पत्रें २४ [ १५०

श्री श्लोक मनाचे २०५ आरतीसह. अशुद्ध लेखन. लेखकानें आपलें व गुरूचें नांव शेवटीं दिलें आहे: "श्रीगुरु विश्रामरवेरणी दीनकर व्यंकटेश नीरतर"

**७२३ ]** पोथी–पत्रें ३४३ [ २००

वेणीगिरिधरकृत संकेतरामायण—संपूर्ण प्रत

**७२४ ]** पोथी—पत्रें ४८९ [ २००

वेणीगिरिधरकृत संकेतरामायण—संपूर्ण दुसरी प्रत. हें रामायण अति सुंदर आहे. त्याची ओवीसंख्या ६७४१ असून तें श्रीरामदासी ग्रन्थमालेंत तेविसावा भाग म्हणून एकवार छापलें होतें. त्याची पहिली आवृत्ति केव्हां च संपली. त्याची दुसरी आवृत्ति केव्हां निघणार, कोणास ठाऊक.

**७२५ ]** कागदपत्रें पाऊणशें शेंमर [ १००-२००

या कागदपत्रांचा अभ्यास व्हावयाचा आहे. तो केव्हां तरी कोणी तरी करून त्यांतील महत्त्वाचे कागद प्रकाशित केले पाहिजेत व त्यांच्या आधारें एखादें टांचण लिहिलें पाहिजे.

**७२६ ]** गळाठा [ १००-२००

येणें प्रमाणें श्रीसमर्थप्रतापकार गिरिधर यांच्या मठांतील संग्रह आहे. फक्त श्रीराममठांतील बाड विसावें गिरिधरांच्या तेरा प्रकरणाचें व सीताराम-मठांतील बाड पस्तीसावें गिरिधरांच्या आठ प्रकरणाचें, अशीं दोन बाडें नोंदावयाचीं राहिलीं आहेत, तीं शेवटीं नोंदूं. तूर्त आतां परवां सीताराम-मठांत ६५४ क्रमांकाचीं वाल्मीकीय रामायणांतील जीं श्रीसमर्थांच्या हातचीं काडें मिळालीं त्या च वेळीं आणखी जो संग्रह हातीं आला त्याचें टांचण करावयाचें योजिलें आहे. हा संग्रह बहुमोल आहे, पण त्याची झालेली दुर्दशा पाहवत नाहीं. बाडें फाटलीं आहेत, पोथ्या विस्कळित झालेल्या आहेत व पावसाचें पाणी गळून भिजल्यामुळें कांहीं पोथ्यापुस्तकांच्या दणकट भाकरी बनल्या आहेत ! केवढें भाग्य म्हणावयाचें कीं, अशा या जणूं रणखंदळांत ६५४ क्रमांकांत नोंदलेलीं चार हि काडें मात्र सुरक्षित राहिलीं होतीं ! या नवीन उपलब्ध झालेल्या संग्रहामुळें श्रीसमर्थ आणि श्रीगिरिधर यांच्या विषयीं आपणास नवीन माहिती कळणार आहे.

## बीड मठांतील नवीन संग्रह

**७२७ ]** १४" × ६½" आकाराची पोथी–पत्रें १४६ [ १६१

### अध्यात्मरामायण

प्रतीची दुर्दशा झालेली आहे. तथापि १६६६ त वाल्मीकीय रामायणाबरोबर ज्या प्रतीची वांटणी झाली, ती ही प्रत नव्हे. वाल्मीकीय रामायणाप्रमाणें ती हि प्रत श्रीसमर्थांच्या च हातची असावी, असें वाटतें. नऊ हजार ग्रन्थसंख्येचीं तीन कांडें व सहा हजारांचें अध्यात्मरामायण अशी पंधरा हजार ग्रन्थसंख्या श्रीराममठाच्या वांटणींत गेली होती. संपूर्ण अध्यात्मरामायणाची ती प्रत श्रीराममठात असावी. त्या मठांतील संग्रह या खेपेस पाहण्यांत आला नाहीं. प्रस्तुतची प्रत सीताराम मठांतील पुरुषांनीं त्या च प्रतीवरून करून घेतली असावी. या प्रतीचा लेखनकाल : " संवत् १८३० पर्वे मासोत्तम माघमासे शुक्लपक्षे ३ तिथौ । श्रीशनिवासरे । अवंतीमध्ये ॥ " म्हणजे शके १६९५ तील ही प्रत होय.

**७२८ ]** १४" × ६½" आकाराची पोथी–पत्रें ७१ [ १६०

### विवेकसिंधु

त्याच आकाराची त्या च सुमारास लिहिलेली ही पोथी दिसते. तिच्यावर पत्रांचे क्रमांक दिलेले नाहींत व पत्रें अस्ताव्यस्त झालेलीं आहेत.

**७२९ ]** पोथी–पत्रें ५५६ [ २००

### एकनाथी भागवत

पाणी पडून कांहीं अध्यायांची माकरी झाली आहे । सावधानतेनें व युक्तीनें पत्रें उलगडतां येतील. कांहीं अध्याय नाहींत हि.

शेवटीं लेखनकाल दिलेला नाहीं. श्लोकसंख्या व टीकेची ओवीसंख्या नमूद आहे : " उत्तरार्धे श्लोक ॥ ७२० ॥ उत्तरार्ध टीका ॥ ११०६ ॥ पूर्व संपूर्ण पूर्वार्धे उत्तरार्धे ग्रंथ ॥ श्लोक ११७० ॥ –ि– श्रीरामनामार्पणमस्तु ॥ "

**७३०** ] पोथ्या—पत्रें ८, ७, ७, १०, ९, ८, ७, २ [१५०

श्रीसमर्थांचीं प्रकरणें ( १ ) मानपचक, ( २ ) षड्रिपु, ( ३ ) पंचीकरणयोग, ( ४ ) पंचसमासी, ( ५ ) पवमान, ( ६ ) सगुणध्यान, ( ७ ) निर्गुणध्यान अपूर्ण व ( ८ ) चतुर्थयोग अपूर्ण

**७३१** ] १२" × ८½" आकाराची पोथी–पत्रें ११६ [२५०

भावार्थरामायण – अपूर्ण

सुंदर आणि मोठें अक्षर, कागदाचा आकार हि मोठा. बालकांडाचीं पत्रें २०—८६, अयोध्याकांडाचीं पत्रें १५८—१६१ व २२०—२२६ आणि सुंदरकांडाचीं पत्रें १०४—११३. कालाय तस्मै नमः।

**७३२** ] १०" × ६" आकाराची पोथी-पत्रें ४०७ [२५०

भावार्थरामायणातील फक्त सुंदरकांड

संपूर्ण, सुंदर, सचित्र प्रत. भिजल्यामुळें थोडी खराब झाली आहे. एकंदर पाच पचवीस चित्रें आहेत. त्या वेळचे दागिने, कपडे, चित्रकला याविषयीं ज्यांना माहिती करून घेण्याचा नाद असेल त्यांना हीं चित्रें उपयोगी पडतील. श्रीसमर्थांना प्रिय व सम्प्रदायांत आवडतें असें हें काव्य आहे.

**७३३** ] पोथी—पत्रें ३४५ [९०

महिपतिकृत संतविजय

सत्तावीसाव्या अध्यायापर्यंत. प्रतीचा लेखनकाल वगैरे :

" शके १७६६ साडासष्टीस। क्रोधीनाम संवत्सरास। श्रावण वद्य चतुर्दशीस। गुरुवारीं लेखन समास॥ हे पुस्तक रोपराव भुजंगराव मामलतदार प्रगणे बीड यांचे असे॥ हस्ता आक्षेर गोविंद कृष्णराव पावळ साकीन चकले ओंव तरफ मानुर प्रगणे मजकुर॥ "

**७३४** ] पोथी—पत्रें ३२ [१६६

श्री एकनाथ कृत स्वात्मसुख

प्रत सुंदर आहे. ज्यांच्या हातची पुढची ७३५ वी पोथी आहे त्यांच्याच हातची ही हि पोथी आहे.

७३५ ] पोथी—पत्रें ३१ [१६९

ब्रह्माणी मुंडोजी कृत प्रकाशदीप

संपूर्ण, सुंदर प्रत. हा ग्रन्थ अप्रकाशित आहे. तो प्रकाशनाला योग्य आहे. त्याचीं पांच प्रकरणें आहेत : ( १ ) सत्स्वरूपनाम—ओवीसंख्या २४, ( २ ) लिंगदेहनिरसन—ओ. ११३, ( ३ ) कारणदेहनिरसन—ओ. ७८, ( ४ ) महाकारणदेहनिरसन—ओ. १०४ व ( ५ ) तत्पदनिरसन—ओ. ७१. प्रतीचा लेखनकाल वगैरे शेवटीं आहे तो :

"सके १६९० सर्वधारी नाम संवत्सरे मधुमासे शुक्लपक्षे भौमवारे त्रितीय प्रहरे राजग्रामे इदं पुस्तकं समाप्तं ॥ महादेवेन लिखितं ॥ हे पुस्तक विठोबा नाईक कडपेकर याचे असे ॥"

७३६ ] पोथी–पत्रें १२ [१९

रामचंद्रविरचितं राधाविनोदकाव्यं सटीकं

प्रतीचा लेखनकाल : माघे मासे सिते पक्षे पंचम्यां सौम्यवासरे । तद्दिने लिखितो ग्रंथो रामकृष्णेन धीमता ॥ १ ॥ पण यात संवत्सराचें नांव नाहीं.

७३७ ] पोथी–पत्रें ७५ [३००

जयदेवकविविरचितं गीतगोविंदकाव्य

श्रीमहामहोपाध्यायशंकरमिश्रविरचिता रसमंजरीनामधेया टीका तया सह

७३८ ] पोथी–पत्रें ४७२ [२१०

गिरिधर कृत संकेतरामायण

तिवरी संपूर्ण, सुंदर प्रत. तिचे हाल झालेले दिसतात.

७३९ ] पोथी–पत्रें ५ [१५०

दोन मंगलाष्टकें

७४० ] पोथी-पत्रें १६१ [ १६७

श्रीमत् भगवद्गीता

प्रतीचा लेखनकाल : शके १६८९ सर्वजित् नाम संवत्सरे भाद्रपद कृष्ण २ गुरुवासर लेखन समाप्त

७४१ ] एक वेटाळें [ २००

गिरिधर कृत राजशासनीवारा

गिरिधरांचे जे प्रसिद्ध दहा वाके आहेत व जे श्रीरामदासी ग्रंथमालेंतील चोविसावा भाग म्हणून छापले आहेत, त्यांतला हा दहावा वाका होय.

७४२ ] तीन पानें [ २१०

ग्रन्थराज दासबोधाची अनुक्रमणिका

प्रत्येक दशकाचें नांव, प्रत्येक समासाचें नाव, प्रत्येक समासाची ओवीसंख्या व एकूण ओवीसंख्या अशीं या अनुक्रमणिकेंत दिलीं आहेत. एकूण ओवीसंख्या दिली आहे ती फाटण्यात गेली आहे, पण ती ७७२९ असली पाहिजे.

( १ ) समेच्या प्रतीशीं ताडून पाहतां जेथें फरक आढळला तेवढीं स्थळें येथें नमूद करितों. ओवीसंख्येंत फरक आहे तो :

| दशक आणि समास | | | समेची प्रत | | | ही अनुक्रमणिका |
|---|---|---|---|---|---|---|
| २ × ७ | ... | ... | ८८ | ... | ... | ८६ / |
| ३ × २ | ... | ... | ६५ | ... | ... | ६४ |
| ४ × १ | ... | ... | ३४ | ... | ... | ३३ |
| ५ × ४ | ... | ... | ३६ | ... | ... | ३५ |
| ६ × ८ | ... | ... | ५० | ... | ... | ५१ |
| ६ × १० | ... | ... | ६१ | ... | ... | ६० |
| ८ × १ | ... | ... | ६० | ... | ... | ५९ |
| ८ × ४ | ... | ... | ६० | ... | ... | ५९ |
| ८ × १० | ... | ... | ८२ | ... | ... | ८१ |
| ९ × ६ | ... | ... | ५४ | ... | ... | ४६ |
| ९ × १० | ... | ... | ३७ | ... | ... | ३६ |

| | | | | | | |
|---|---|---|---|---|---|---|
| १० × ४ | ... | ... | ४६ | ... | ... | ४५ |
| १० × १० | ... | ... | ६८ | ... | ... | ६७ |
| १३ × ४ | ... | .. | २४ | ... | ... | २३ |
| १७ × ३ | ... | ... | ३० | ... | ... | २९ |
| १७ × ५ | ... | ... | २४ | ... | ... | २३ |
| १९ × ८ | ... | ... | ३० | ... | ... | २९ |

विशेष फरक ९ × ६ त आहे. इतका फरक कसा पडावा ? अनुक्रमणिकेंत हस्तदोषानें चुकीचा अंक पडला असावा. चीडमठांत मिळालेल्या दासबोधाच्या दोन प्रती उभेच्या समर्थी आहेत. दोहोंत हि ९ × ६ च्या ओव्या ५४ च आहेत. आपल्या प्रतींतील संख्या १३ नें वाढते व १ नें घटते, म्हणजे एकदरींत २२ नें वाढते. म्हणजे आमच्या प्रतीची एकूण ओवीसंख्या ७७५१ येते.

(२) समासाच्या नांवांत फरक आहे तो :

| | | | | |
|---|---|---|---|---|
| ४ × १० | ... | मुक्तिचतुष्टय | ... | भक्तिचतुष्टय |
| ७ × १० | ... | देहांतनिरूपण | ... | देहातीतनिरूपण |
| ९ × ८ | ... | देहांतनिरूपण | ... | बद्धजन्मलक्षण |
| १० × ९ | ... | पुरुषप्रकृती | ... | संचितनिरूपण |
| ११ × ७ | ... | चंचळ नदी | ... | गुप्त गंगा |
| १६ × ८ | ... | आत्माराम निरूपण | ... | अंतरात्मानिरूपण |
| २० × ४ | .. | आत्मानिरूपण | ... | शिवशक्तिनिरूपण |

(३) दशकांपैकीं फक्त एका च दशकाच्या नांवांत फरक आहे :

१८ वा दशक ... ... बहुजिनसी ... ... बहुधा

## ७४३ ] काहीं अपूर्ण पोथ्या

[ १५०-२००

(१) कृष्णदाससुमुद्गल कृत युद्धकांड. सुंदर अक्षराची प्रत, पण दिल्या ४०८ पत्रांपैकीं अवघीं २०१ पत्रें शिल्लक आहेत. लेखनकाल वगैरे शेवटच्या ४०८ व्या पृष्ठावर आला आहे तो : " रुधिरोद्गारी संवत्सर फाल्गुन शुद्ध ३ या भानुवासरे ग्रंथलेखन समाप्त ॥ पाटमामकरोपनामक रघुनाथसुत येकदेशेन लिखित पुस्तकमिदं ॥ " म्हणजे शक १६६५ येतो. शेवटीं पुढील श्लोक दिला आहे :

विराजनेत्र परिपूर्णनाम सीतावल्लभ सुरपरिवारं ।
सौमित्रिमित्र जगत्र - पवित्र श्रीरामचंद्र भगवोऽसि नित्य ॥ १ ॥

( २ ) मुक्तेश्वर कृत सभापर्व—६३ पत्रें, अति जीर्ण

( ३ ) मुक्तेश्वर कृत विराटपर्व—पत्रें १ ते ११, ओ. १ ते १५५

( ४ ) नारायण विरचिता धर्मप्रवृत्तिः—पत्रें १०६–२३२; अर्थात् पहिलीं १०५ पत्रें गेलीं. २३२ वें शेवटचें पत्र होय. त्यावर लेखनकाळ दिला आहे : " शके १६८५ सुभानुनामसंवत्सरे मार्गेश्वर वदि ५ रविवार तदिने लिखितं ॥ "

( ५ ) मुकुंदराज कृत विवेकसिंधु–९८ पत्रें

( ६ ) मोरोपंताची केकावली—पत्रें १–१३, श्लो. १–९४

( ७ ) कृष्णदासजयराम कृत अपरोक्षानुभूति—अवघीं १७ पत्रें

( ८ ) सप्तशती—पत्रें ८९, मधलीं कांहीं नाहींत.

( ९ ) विष्णुसहस्रनामस्तोत्रम्—लेखनकाल— " शके १६६८ क्षयनामसंवत्सरे आश्विने मासे कृष्णपक्षे चतुर्थी ४ रविवासर समाप्त॥"

( १० ) रामरक्षा-पत्रें २, श्लो. १६-३५. फार पाठांतरें आहेत, कांहीं श्लोक निराळे आहेत. लेखनकाल वगैरे : " शके १७०० विलंबीनामसंवत्सरे श्रावणशुक्लद्वादश्यां गोविंदेनेयं रामरक्षा लिखिता ॥ "

( ११ ) सूर्यसहस्रनाम-पत्रें ३–७, श्लोक ७–३२

७४४ ] बाड-लिहिलेली पृ. सं. १४८ × २ = २९६ [ २१०
सुंदर बाड, सुंदर अक्षर, प्रेक्षणीय

( १ ) गिरिधर कृत मंगलरामायण—युद्धकांडसमाप्तीपर्यंत, उत्तरकांडासाठीं कोरीं पानें सोडलेलीं आहेत.

( २ ) आरंभींच्या एका कोऱ्या पानावर जयदेवकवि कृत गंगास्तवनपर पद आहे.

७४५ ] बाड–पृ. सं. ७५ × २ = १५० [ २१०
मागील बाडाप्रमाणें सुंदर, प्रेक्षणीय

( १ ) मंगल, संकेत, छंदो, लवकुश, सुंदर, अब्द आणि माया अशीं सात रामायणें गिरिधरांनीं लिहिलीं होतीं, असा स्पष्ट उल्लेख प्रवादात आहे. ( १९ × ६२ ). पण पूर्वी आपणांस मंगल, संकेत, छंदो, सुंदर आणि अब्द अशीं फक्त पांच च रामायणें उपलब्ध झालीं होतीं, तेव्हां

कदाचित् सुंदररामायण तें च लवकुशरामायण व छंदोरामायण तें च भापारामायण असेल, अशी आपण मनाची समजूत करून घेतली होती. पण ती समजूत चुकीची होय.

( २ ) प्रस्तुतच्या बाडांत श्लोकप्रबंधात्मक रामायण असून तें पूर्वीच्या पाचाहून निराळें आहे.

बालकांडाचीं तीन शतें असून श्लोकसंख्या ३७२ आहे,
अयोध्याकांडाचीं हि तीन शतें असून श्लो. सं. ३४५ आहे,
अरण्यकांडाचें एक च शत असून श्लोक १३४ आहेत,
किष्किंधाकांडाचीं दोन शतें असून श्लो. सं. २७२ आहे व

सुंदरकांडाचीं चार शतें असून श्लो. सं. ४११ आहे. एकूण श्लोकसंख्या १५३४ होते पुढचीं दोन कांडें–युद्ध व उत्तर–हीं लिहिलीं नसावींत असें वाटतें. कारण सुंदरकांडानतर स्वतंत्र ८ श्लोक आहेत, त्यांतील एक एक श्लोक एक एक कांडाला देऊन, हे श्लोक जो नित्य वदेल त्याला शत हि कांडें गायिल्याचें श्रेय मिळेल, असें आठव्या श्लोकांत म्हटलें आहे

( ३ ) हें रामायण म्हणजे च भापारामायण काय ?

७४६ ] बाड–पृ. सं. १८२ × २ = ३६४ [ २५७

श्रीसमर्थ कृत रामायण

म्हणजे फक्त सुंदरकांड आणि युद्धकांड. या बाडाचा कागद अति ठिसूळ झाला आहे. हात लावण्याची सोय नाहीं. युद्धकांडाच्या अकराव्या शतापर्यंत सर्व भाग ठीक आहे, पुढचीं पृष्ठें अलग होऊन कांहीं गळालीं आहेत, त्यामुळें शत बारा आणि तेरा, या शतांचे कांहीं श्लोक नाहींत. प्रत जुनी आणि प्रेक्षणीय आहे. शेवटीं तीन पृष्ठें शिंकेच्या शकुनाचीं आहेत.

७४७ ] बाड–पृ. सं. ३६ × ४ = १४४ [ ३००

गिरिधर कृत हरिलीला

१८५६ श. आषाढ शु. १५

७४८ ] बाड–पृ. सं. ३२ + १४ = ४६ × २ = ९२ [२२५
सिवाय ५।२५ पृष्टें नष्ट

(१) हें बाड अति महत्त्वाचें आहे, पण दुर्दैव असें कीं, त्याचीं कितीं तरी पृष्ठें नष्ट झालेलीं दिसतात. उरलेल्या पृष्ठांत केवळ गिरिधरांचीं च अपूर्व पदपदांतरें आहेत, यावरून मूळ सबंध बाड त्यांच्या च स्फुट कवितेचें असावें असें वाटतें आणि त्यामुळें जीं पृष्ठें गेलीं त्यांतील कवितेस आपण कायमचे च मुकलों कीं काय, अशी भीति वाटते.

(२) उरलेल्या पृष्ठांत आरंभीं गिरिधरांनीं श्रीसमर्थांना किंवा बाइयाबाईंना लिहिलेलीं सहा श्लोकबद्ध पत्रें आहेत. हीं सर्व पत्रें, आहेत तशी छापलीं गेलीं पाहिजेत. तोंवर त्यांचा भावार्थ सांगून ठेवतो.

(१) पहिल्या पत्राचे पहिले ३ श्लोक नाहींत, ४ ते १० श्लोक आहेत. त्यांत म्हटलें आहे, आपण मला ही दीक्षा देऊन जनसेवेला लावले खरे, पण घरच्या मंडळींना माझी ही वृत्ति न आवडून ते कष्टी झाले आहेत, तरी महाराज

घडेना कदा निश्चयो स्वामिराजा। बरा निश्चयो जाहला पूर्ण आज्ञा॥

मी आपला बालक आहे, माझ्या हातून चुका घडतील त्या कृपा करून सांगत चला,

मपंच्या गुणें या सदा लागताती। करूं काय ते सूण सांगें मला ती।
कितेका खुणा ग्रंथगर्भीं च देसी। कसा जाहलों या जनीं येकदेसी॥

(२) दुसरें पत्र दोन च श्लोकांचें आहे

दिसंदीस तो दीसतो रामराजा। मनीं ध्यायो येतसे योगिराजा।
तुझें नाम मुद्रांकितु दीन जालें। नको वीसरूं जें तुला दीनबोलें॥

(३) तिसऱ्या पत्रांत गिरिधर म्हणतात, गुरुबंधु जातां येतां भेटतात, ते म्हणतात, घरीं काय बसून रहावें, बाहेर पडावें, फिरावें, उदंड देशाटन करावें, परंतु

प्रभू मी विदेशासि नाहीं च गेलों। मठीं देवदेवार्चनीं मग्न जालों।
कथा रम्य रामायणीं मी बुडालों। सदा ग्रंथपारायणीं मग्न ठेलों॥

हें पत्र मूळचें ११ श्लोकांचें आहे. अकराव्या श्लोकांत गिरिधर म्हणतात, समर्था आपण तरी एकवार इकडे यावें, किंवा

न यावें तरी हे गिरी चाळ न्यावें ।

येथें मूळ पत्राचा शेवट झाला आहे. पण असें दिसतें, गिरिधरांचा हेतु पाहून पुढें श्रीसमर्थांचें त्याप्रमाणें आगमन झालें होतें, म्हणून पुढील साराचा श्लोक मागाहून जोडला आहे :

गर्भी हेत जाणोनियां स्वामि आले । मोहछाह उछाह ते थोर जाले ।
प्रसंगें चि गोदातिरीहूनि येती । पुढें पंढरी जावया सिद्ध होती ॥

(४) चवथ्या पत्राचे दहा श्लोक असून त्यांत एक विशिष्ट प्रसंग वर्णिला आहे. उपासना करूनियां पुढें। पुरवलें पाहिजे चहुंकडे ॥ १९-१०-८ तें कसें याचें हें उदाहरण आहे. आरंभींचे दोन श्लोक :

नमस्कार साष्टांग स्वामी समर्था । पदीं पत्रिका धाडिली या चि अर्था ।
अनुज्ञेसि वंदूनियां स्वार जालों । उकडगावसिद्धीपुरीमाजि गेलों ॥१
तेथें येक तो देखिला मित्र स्वामी । तया भेटलों मी जसा मी तसा मी ।
पुढें रामउपासना ते करूनी । निघालों स्वरें सर्व चित्तें हरूनी ॥ २

मन्थराजाचा पंधरावा जो आत्मदशक त्यांत अंतरात्म्याची म्हणजे आत्मारामाची उपासना सांगितली आहे, पण ती समजण्याला आणि आचरण्याला कठीण आहे, म्हणून गिरिधर सातव्या श्लोकांत म्हणतात :

मला नातुडे मुख्य तो राम आत्मा । म्हणोनी मला दाविली हे प्रतीमा ।
समर्थें चि कृष्णातिरा चाढि केली । कसी तेथिची पूर्ण माघी उदेली ॥ ७

(५) पांचव्या पत्राचे अवघे ८ श्लोक असून त्याच्या पहिल्या तीन श्लोकांत श्रीराममूर्तीच्या प्रतिष्ठेचा व संवत्सराचा उल्लेख आला आहे. तेव्हां हा संवत्सर कोणता व हें पत्र केव्हां लिहिलें आहे, हें वाचकांनीं ठरविलें पाहिजे.

वंदूनियां सद्गुरुपादकंजीं । चरापदीं लुब्धुनि चित्त गुंजी ।
आज्ञारुपें अर्चनकार्य जालें । कार्तीक मासिं हे मठासि आले ॥ १
माघामधें मुहूर्त अपूर्व आहे । पुढें पुढें शुक्र चि अस्तताहे ।
उछाह दोन्ही आणसी प्रतिष्ठा । द्या बुद्धियोगु वरवा वरिष्ठा ॥ २
संवछरू ईश्वर माघरूपी । शुद्ध द्वितीया ग्रह सोमरूपी ।
श्रीरामचंद्रा वरवी प्रतिष्ठा । केली असे सद्गुरु श्रीवरिष्ठा ॥ ३

गिरिधरांचा समाधिशक १६५१ निश्चित आहे. तेव्हां ईश्वर संवत्सर म्हणजे १६१९ चा_च असला पाहिजे, १५५९ चा संभवत नाहीं. अर्थात् हें पत्र

श्रीसमर्थांना नसून गिरिधरांचे वहुत बाइयाबाईं यांना असलें पाहिजे. हें पत्र बाइयाबाईंना असेल तर मागचें चवथें पत्र व पुढचें सहावें पत्र हीं हि त्यांना च असलीं पाहिजेत. कारण चवथ्या पत्राच्या शेवटच्या श्लोकांत

कथीं करूं मूर्तिचि सुप्रतिष्ठा ।

असें विचारलें आहे, तर सहाव्या पत्रांत

प्रतिष्ठेपुढें दोनि उछाह जाले ।

इत्यादि प्रतिष्ठेविषयीं उल्लेख आले आहेत.

( ६ ) सर्व पत्रांत हें सहावें पत्र मोठें आहे. त्याचा मथळा " पत्र करुणावृत्तांत " असा असून त्याचे ४४ श्लोक आहेत. ३३ व्या श्लोकांत

दिल्हें अर्चेनु या दिनाल्हा दयेनें । कथा रम्य रामायणाच्या सयेनें ॥

असा रामायणाचा उल्लेख केला आहे, तसा च तो तिसऱ्या पत्रांत हि केला होता. हे दोन्ही उल्लेख श्रीसमर्थलिखित वाल्मीकिरामायणाच्या प्रतीला अनुलक्षून असावेत, असें आमच्या मनात येऊन गेलें.

( ३ ) नंतर गिरिधरांची पांच पंचवीस ड्फगाणीं, पदें वगैरे आहेत. हीं सर्व प्रकाशित झालीं पाहिजेत. त्यांतील कांहीं कांहीं वचनें चटका लावतात. त्यांतील थोडीं वचनें व एक पद वाचकांस सादर करितों :

( १ ) मागील जन्म मागें जाला । पुढील आशापाश तुटला ।
तेव्हां जन्मासी मजला । कोण घाली ॥ ३५
मन हें आत्माराम जालें । देहें जड मढें मेलें ।
मढें मेलें हें ऐकिलें । नाहीं कोण्ही ॥ ३६
परि हा भ्रम कितेक काळ । नसतें चि जाहालें हें भूगोळ ।
त्याचें तदंश देहफळ । वृक्षीं आलें ॥ ३७
फळ भ्रमरूप सफळ । संभ्रम स्वामीकृपावेळ ।
येन्हविं जाणा हे निर्फळ । नासिवंत ॥ ३८
याला कृपाजीवन दिल्हें । कर्णीकडूनि पोटीं गेलें ।
मग हें बोलोंसे लागलें । कांहीं येक ॥ ३९
पहिले देहधारक बाउलें । समर्थकासेसी लागलें ।
मग तें सदयें नवाजिलें । कैसें जालें ॥ ४०

लोक म्हणती कैसें होतें । काय देखें हें भगवंतें ।
गोष्टी सांगे हें अवचितें । थोरथोरा ॥ ४१

* * *

देवें श्रीगुरुदातीं दिव्हें । समर्थेचें उपचारिलें ।
दुसणें दाईंचें काढिलें । नवल जालें ॥ ४७

* * *

जाली वृत्ति उदासीन । वदोनि गेलें प्रपंचभान ।
असो जावो हें धन कण । ऐसा भावो ॥ ५१

* * *

इतुकें समर्थांनें केलें । मीपण माझें समूळ नेलें ।
गिरिधर बाळक धन्य जालें । प्रचीतीनें ॥ ५२

(२) जैसी चैत्र शुद्ध नवमी । तैसी माघ वद्य नवमी ।
तिसरी निर्गुणभक्ति नवमी । स्वामियांची ॥ ४

* * *

गुरु जायेना येईना । ऐसें कां रे हा समजेना ।
दासबोधीं कां उमजेना । पंचम दशकीं ॥ १४

* * *

रामदासाचें मंडण । ज्याचे हनुमंती निशाण ।
दास म्हणउनि अभिधान । समर्थांचें ॥ २२

समर्थपुण्यतिथी करा । समर्थग्रंथा प्रेमें विवरा ।
येणें गुरुपरंपरा । वाढेल पुढें ॥ २३

समर्थतीर्थं घ्यावावें । समर्थनाम जपत जावें ।
नाना मतीं न सांपडावें । उदासरूपें ॥ २४

ऐसें मजला उपदेशिलें । स्वामीचरणोदक पाजिलें ।
बाळक गिरिनें उपासिलें । समर्थांसी ॥ २५

(३) वादिमदकविद्या धर्में कांहीं वाहीं आठे दावीं वो ।
चरितार्णव दाटला निंदु प्राशन करितां आवा वो ॥

(४) श्रीरामा जयरामा जयजयरामनामा ।
जपसी जपसी जयजय होसी जासी मंगलधामा ।

माझ्या राघोबाच्या नामें हर पावे विश्रामा ।
तूं हि हररूप होई होई गाई रामा ॥ ध्रु०

असें हें एक तेराचरी पद फार गोड आहे. त्यांत एका चरणांत गिरिधर म्हणतात :

मजला प्रचित आली लटिकें बोलेल तो अधम ॥

( ५ ) दुसऱ्या एका पदात असे च प्रचीतीचे बोल त्यांनी काढले आहेत :

मी रे तरलों म्हणुनि सांगों काय ।
तुज फळावें म्हणुनि हा उपाय ।
जरि जपसी तरी च दावी पाय रे ॥

( ६ ) आमच्या गिरिधरांची योग्यता सर्वांच्या प्रत्ययास यावी म्हणून विस्तार करण्याच्या मोहांत सांपडलों. एक सबंध पद देऊन थांबास विश्रांति देतों :

आज्ञा जाली जितुकी तितुकी सेवा नाहीं जाली ।
कुबुद्धि पळकट आली तेणें तगमग आंगा आली ।
आली परि ते धारिक भली करुणाकर माउली ।
त्रिविध तापा विझविल आली सीतळ सुख साउली ॥ १

रघुवीरे रघुवीरे मायें मायेवीण माहेरें ।
माया म्हणतां माया नाहीं कोठेसी आहे रे ॥ ध्रु०

सपनीं सांपडली परि मज नाहीं सांठवली ।
अवचिति सावली परि मज नाहीं ते मावली ।
वाचा कुंठित जाली जाणीव नेणीव हे विराली ।
वाचा वंचुनि बोलों भाता अबोलबोलें बोली ॥ २

गुणा सारुनि गुणा गाऊं निर्गुण गमकें पाहूं ।
वाचा वारुनि निःशब्दवचनीं अबोल बोलुनि दाऊं ।
आगमांतर निगमांतर अंतर निजगुज विवरुनि राहूं ।
गिरिधर सेवक अनन्य भावें अभिन्न देवा वाऊं ॥ ३

७४९ ] बाड–पृ. सं. १७९ × २ = ३५८ [ २५०
सुंदर, प्रेक्षणीय, महत्त्वाचें बाड

करुणाष्टकें, धाव्या, सवाया, प्रास्ताविक श्लोक वगैरेंचा जो श्री रामदासी मालेंतील दहावा भाग छापला आहे, तो सर्व या बाडांत आला

आहे. शिवाय या बाडांत कांहीं करुणाष्टकें वगैरे नवीन आढळलीं. तीं उत्तरावस्थेचीं आहेत.

बाडाची पुढची फळ फसरीनें खाल्ल्यामुळें कांहीं अक्षरें गेलीं आहेत, पण तीं वाचतां येतात. करुणाष्टकादिकांचा क्रम आणि कांहीं पाठांतरें विचार करण्यासारखीं आहेत.

**७५० ]** बाड–पृ. सं. १७५ × २ = ३५० [ ११८
आ. म. शे. कांहीं नष्ट

( १ ) हें बाड बहुतांशीं संस्कृतांत आहे. संस्कृतांतील उतारे व सुभाषितें विपुल आहेत.

( २ ) प्रातःस्मरामि, जान्हवीस्तुति, चतुःश्लोकी भारत, विदुरनीति, दत्तजन्म, श्रीशंकराचार्य विरचित उपदेशपद्यपंचक, पंचरत्नस्तोत्र, निर्वाणाष्टक, मनीषापंचक, अद्वैतपद्धति इत्यादि संस्कृत प्रकरणें.

( ३ ) सटीक वेदस्तुति ग्रन्थ–पृष्ठ ८५ ते ११६. शेवटीं लेखनकाळ दिला आहे तो :

शाके धातरि पत्वशिवनभूमिसमन्विते ।
पौषे कृष्णे बुधे पष्ठयां सत्स्तुतेर्लेखनं कृतं ॥ १ ॥ शके १७२८

**७५१ ]** बाड–पृ. सं. ६२ × २ = १२४ [ ११५
आ. शे. वो कांहीं नष्ट

( १ ) श्रीज्ञानेश्वर कृत अमृतानुभव संपूर्ण

( २ ) मुक्ताबाई, सोपान, कृष्णदयार्णव, तुका, चोखला, एकनाथ, अमृतेश्वर, नरहरि माळी व नामदेव यांचें एकाददुसरें पद किंवा अभंग आहे, परंतु कोणी शुद्धबावा यांचे सुमारे पंचवीस तीस अभंग आहेत. हे शुद्धबावा पूर्वी ऐकून ठाऊक नव्हते.

( ३ ) महावाक्याचें संस्कृतांत विवरण व भागवतांतील कांहीं उतारे–ब्रह्मस्तुति, मुचकुंदस्तव व भीष्मस्तुति.

( ४ ) पुढील अभंग कोणाचा ?

देखतां दिनमणि नेत्रासी पारणी । उलुकासी पळणी नव्हेल काय ॥ १
सेवितां अमृत अमर होइजे सत्य । राहोसी तें मृत्य नव्हेल काये ॥ २
पक्वान्नपक्वे रुचि वाटे सर्वांसी । विष रोगियासी नव्हेल काये ॥ ३

पर्वतां मुक्तासी आनंद हंसासी । प्रळय वायसासी नव्हेल कायें ॥ ४
देखतां दर्पण सकळां समाधान । निर्नासिका अपमान नव्हेल कायें ॥५
रामदास करितां राघवाचें दास्य । हतभाग्या विष नव्हेल कायें ॥ ६

७५२ ] बाड–पृ. सं. १६ × २ = ३२ [ २२०
प्रेक्षणीय, सुंदर

गिरिधर कृत सवायावृत्तांत हिंदुस्थानी मार्फत श्रीरामचरित्रपर पांच प्रकरणें. पांच हि मिळून ५९ सवाया आहेत. प्रकाशना योग्य.

टीप–या बाडाच्या मलपृष्ठाला जें वापड चिकटविलें आहे त्याच्या विणण्याची तऱ्हा बारकाईनें पाहण्यासारखी आहे.

७५३ ] पोथी–पत्रें ९ [ २००

श्रीसनत्कुमारसंहितायां नारदोक्तं श्रीरामस्तवराजस्तोत्रम् श्लोक ९८

७५४ ] पोथी–पत्रें २ [ १५०

हनुमदुपनिषद् व रामोपनिषद्

७५५ ] पोथी–पत्रें ३ [ १२५

रुद्रयामले शिवप्रोक्तं गणेशाष्टकस्तोत्रम्

७५६ ] बाड–पृ. सं. १२४ × २ = २४८
शिवाय आ. श. ५।५० नष्ट [ १५०

( १ ) उद्धवचिद्घन, मच्छनाथ, जनी, चोखामेळा, रंगनाथ, ज्ञानदेव, आनंदतनय, अमृतेश्वर, केशव, मालो, शिवदिनकेसरी, एकनाथ, निवृत्ति, गोपाळनंदन, हरिकवि, इत्यादिकांची पदपदार्थें

( २ ) आरंभीं तुकारामांचे ९ ते २०२ अभंग आहेत.

( ३ ) श्रीसमर्थांचे १२ अभंग, पंचकें करुणाष्टकें, व कांहीं पदें आहेत. त्यांत तीन अप्रकाशित आहेत.

( ४ ) रामजीसुत मूढ माधव कृत दशावताराचे श्लोक

(५) तुकाराम कृत दामाजीपंताची रसद

(६) मीरा कृत नरसी मेहत्याची हुंडी

(७) दहा वीस हिंदीवांचे आढावे दिले आहेत. त्यांचा मथळा 'बरावर्तीचे श्लोक' असा आहे. बरावती म्हणजे काय? बरावर्द म्हणजे दरमहाचे हिशेब असा शब्द कोशांत आढळतो. हे आढावे प्रसिद्ध करण्यासारखे आहेत.

(८) पाळीची कारिका, सुभाषित दोहरे, सीताचक्र, शालिग्रामपरीक्षा, पत्रें, आंतरभेदस्या, वामनकृत श्रीकृष्णजन्म व कपिलमुनि, रावणाची संपत्ति, रामशैलिनसंवाद, आनंदवर्धनकस्तोत्रम् इत्यादि स्फुट प्रकरणें

(९) शिवदिनकेसरी कृत (१) मुकुंदराज सद्गुरु संत पंथाकारे गाथा। (२) रामदास सद्गुरु अविनाशी हार्दमसें जपना। अशीं दोन पदें.

# ७५७ ] बाड–पृ. सं. १०० × २ = २०० [२५०

(१) तीन बाडें एकांत एक शिवून हें बाड बनलें आहे. तें फार च जीर्ण झालें आहे. केव्हां तरी पाण्याचा संबंध येऊन तें बुरसलें होतें. जपून वाचलें म्हणजे सर्व लागतें. बाड महत्त्वाचें आहे, कारण त्यांत निदान चार नांवें नवीन आहेत.

(२) श्रीसमर्थ, एकनाथ, रवामंदस्वामी, शानदेव, बहिरा, कृष्णदास जयराम, स्वात्मबोध सिद्ध दास आदिकमबोध, गोसावीनंदन, रोहिदास, नामदेव, विष्णुदास नामा, कबीर, नरहरि, परिसा भागवत, सदानंद किंवा सदयानंद, राघवदास, रमावल्लभदास, सुरतबोध, अचलसिद्धसावेद यांचीं पदपदांतरें

(३) यांपैकीं ठळक अक्षरांतील नांवें प्रथम च पेकिवांत येत आहेत. या प्रत्येकाचीं पांच पंचवीस पदपदांतरें या बाडांत आहेत. सदानंद म्हणून जे घेऊन टाकत आहेत, ते आणि हे सदानंद भिन्न होत. त्याचे गुरु चिद्‌वानंद होते व याच्या गुरूचें नांव पुरुषोत्तमस्वामी असें एका पदांत आलें आहे. यांचें या बाडांत बुद्धिभक्तिसंवाद म्हणून प्रकरण आहे, तें प्रकाशना योग्य आहे.

(४) सर्वत्र आह्निक्यबोध असें च आहे. म्हणजे बहुधा ऐक्यबोध होय. ही सारी मंडळी केव्हां होऊन गेली कोणी - सांगावें ! संतांची हि काळजी करणारे स्वानंदस्वामी हे कोण होते, कोण जाणे ! त्यांचें एक पद–

हे संतमंडळी सुखरूप राहो रे । साहाकारी जयाचा देवराव रे ॥ ध्रु०
जना तारक जे क्षमाशील रे । अभिवृधीतें पावो त्यांचें कुळ रे ॥ १
ज्यांच्या संगें दुर्जय भव नासी रे । त्यांचें कल्याणलक्ष लक्षुमीसी रे ॥२
म्हणे स्वानंदस्वामी हृषीकेसी रे । संतमंडळी अखंड सौरक्षी रे ॥ ३

(५) ज्ञानदेव विरचित लिखित—ओवीसंख्या ५३. लिखित म्हणजे पत्र.

(६) या बाडांत एका पृष्ठावर कांहीं हिशेब असून सन दिलेला आहे, पण तीं अधरें मला लागलीं नाहींत.

**७५८** ] बाड–पृ. सं. ८८ × २ = १७६
शि. आ. चीं ५ व शे. कांहीं नष्ट [ १५०

(१) या बाडांत संस्कृत प्रकरणें आहेत तीं:—

(रा) लीलाशुकविरचित कर्णामृत–तीन परिच्छेद. पहिल्याचे ५० ते १०१, दुसऱ्याचे १०४ व तिसऱ्याचे ११४ श्लोक

(म) लोलिंबराजकविविरचित हरिविलास – तीन सर्ग, बालक्रीडावर्णनाचा पहिला सर्ग, श्लोक ३१, रासवर्णनाचा दुसरा सर्ग, श्लो. ४४ व ऋतुवर्णनाचा तिसरा सर्ग, श्लो. ४४

(दा) श्रीमत् शंकराचार्यविरचित प्रबोधसुधाकर

(स) अनेक सुभाषितें

(२) मराठी प्रकरणें आहेत तीं:—

(रा) जयरामाचा कुमरसुत किंवा जयरामसुतसुत कृत श्रीरामचरित्रपर व श्रीकृष्णचरित्रपर दोन मोठालीं पदें

(म) वामन कृत गृहरिदर्पण

(थे) आदिनारायणाचीं कांहीं पदें

७५९ ] बाड-पृ. स. ७० × २ = १४०
एक कोपरा करटीनें खाल्लेलें [१५०

( १ ) श्रीसमर्थ, एकनाथ, शिवराम, केशव, रंगनाथ, कृष्णदयार्णव, उद्धवचिद्धन, सहजानंद, जनजसवंत, तुलसीदास, वेणाबाई, कौंडण्यात्मज, गिरिधर यांचीं पदपदातेरें. त्यांत केशव आणि दयार्णव यांचीं विशेष आहेत.

( २ ) या बाडाचा एक विशेष असा कीं, त्यांत जीं पदपदातेरें आहेत, त्यांपैकीं बहुतेकांना समानार्थी संस्कृत श्लोक दिले आहेत.

( ३ ) या या रीतीचा योगी वंचार रे । हें पद श्रीकल्याणस्वामींचे त्यांचे शिष्य आपचंदमठपति शिवराम यांनीं केलेलें असावें, असें मी एकवार मानलें होतें, पण तें पद त्या शिवरामाचें नसून पूर्णानंदाच्या शिवरामाचें दिसतें.

७६० ] बाड-पृ. स. २७ × २ = ५४
सगळीं किरकोळ [१००

( १ ) श्रीसमर्थ, मध्वमुनेश्वर, जनी जनार्दन, आनंदनंदन, एकनाथ, अमृतराय, कबीर, तुका

( २ ) एका पृष्ठावर लेखकाचें नांव आलें आहे तें :

" हस्त अक्षर दत्तात्रय हरी सहस्रबुधे उर्फ फडणीस करकबकर हल्ली मुकाम निंब गणेश "

७६१ ] बाड-पृ. स. १०२ × २=२०४
शिवाय काहीं नष्ट [१५०

( १ ) हें बाड मुख्यतः वामनाच्या कवितेचें आहे. त्यांत वामन कृत उखलबंध, राजयोग, भीष्मप्रतिज्ञा, रासोत्सव, चित्सुधा, गजेन्द्रमोक्ष, कात्यायनीव्रत, रुक्मिणीविलास, राधाविलास, नामसुधा, बालक्रीडा कृष्णाची, नृहरिदर्पण व सीतास्वयंवर हीं प्रकरणें आहेत

( २ ) त्याशिवाय भास्करनंदन, अमृत, जयरामतनयतनय किंवा जयरामात्मजतनय, फकीरराज, नामा विष्णुदास यांचीं थोडीं पदपदातेरें.

७६२ ] बाड-एका मोठ्या बाडाची
अवशिष्ट पृ. स. १३ × २ = २६ [१२५

( १ ) श्रीसमर्थ, नाथमुनगसुत, अनुचर, दामा, त्रिंबक, कबीर, सूरदास, माणिकदास वगैरेंचीं पदपदातेरें

( २ ) शतमुख आख्यान–अपूर्ण; वामन कृत गोपीगीत; विठ्ठल कृत कारुण्याष्टक

( ३ ) अमृतेश्वर कृत फटका–हा प्राणी व्यर्थ जन्मला जन्मुनि वाया गेला ॥

( ४ ) कृष्णाचा नाच–एक गोड पारमार्थिक आणि व्यावहारिक पद

आरंभ—नाच नाच या कसा गुणाचा तूं चक्रपाणी ।
तुझा नाच चांगला मला सांगती गौळणी ॥
मध्य— देशमुख देशपांडे नाचती पाटील चौधरी ।
कुलकर्णी रयेत नाचती भणंग भिकारी ।
हाकम नाचतो गर्डांत भवताले शिबंदी सारी ।
मुजुमदार फडनवीस नाचती सर्व हि अधिकारी ॥
शेवट—यश्वदेसी भ्रांती पडली करि विस्मय मनीं ।
धन्य धन्य केशवा तुझी कोण्या कळेना करणी ॥

७६३ ] जमाखर्चाच्या वहीवरलें लांबट
बाड–पृ. सं. ४१ × २ = ८२. कांहीं पृष्ठें अपूर्ण [ १२५

( १ ) ज्याची पूर्ण समाधि सज्जनगडीं हा एक, वरील हुर्मुजि भर्जरी हा दुसरा व

सोळाशेंवरि पंच अब्द गणना माघा तिथीचे दिनीं ।
तीथी ते नवमी सुदीन वरवा स्वानंद वोंदे मनीं ।
तेव्हां ते समई स्मरारिस्मरणें श्रीरामदास प्रभु ।
गेले हो निज मोक्ष पावन गुहा साम्राज्यभोक्ता विभु ॥ ३

असा तिसरा श्लोक आहे. तेव्हा हा तिसरा श्लोक हि अनंतकवींचा च म्हणावा काय? नवल असें वाटतें, १६०५ शक अनेक ठिकाणीं कां आढळावा? विचार केला पाहिजे कीं काय ?

( २ ) 'ज्याची पुण्यतिथी सुदीन नवमी' या पदाऐवजीं या बाडांत 'ज्याचे पुण्यतिथीस दीन नव हीं' असा पाठ आहे.

( ३ ) या बाडांत अनेक संस्कृत सुभाषितें आहेत व त्यांना भीष्मर्य, शिवराम पूर्णानंद, तुकाराम जयरामात्मज, उद्धवचिद्धन, गिरिधर, रंगनाथ, आनंदनंदन, एकनाथ, केशव, वामन, ज्ञानेश्वर, गोविंदात्मज, मध्वनाथ, माधवदास, इत्यादिकांचीं समानार्थी वचनें व पदपदांतरें दिलीं आहेत.

(४) आत्मानुभवि योगियां भय कासयाचें ॥ ध्रु०
देहअहंभावत्यागें मृत्य मारुनि आगें । आपण चि देव जाळियां ॥ १
ज्ञानें संशयो जाळी योगें कर्मातें गाळी । मुळीचा ठायां आलियां ॥ २
पूर्णानंदीं पूर्णपणीं दुजा भाव दृष्टी नाणी । शिवराम चि होउनि ठेलियां॥३

(५) बाडाच्या पहिल्या पृष्ठावर १७३१ तील जमाखर्च आहे व त्या च पृष्ठावर गिरिधरांच्या समाधीवरील श्लोक उतरलेला आहे. तो श्रीसमर्थप्रतापाच्या प्रस्तावनेंत प्रसिद्ध समाधीवरून च उतरून घेतलेला दिसण्यांत आला च आहे.

७६४ ] जीर्ण बाड–पृ. सं. ६४ × २ = १२८ आ. शे. कांहीं नष्ट [ २५०

श्रीसमर्थ, रघु गोपाळ, सनतीदास, नामा, विष्णुदास नामा, नरहरि, गोसावीनंदन, कबीर, शिवराम, देवीदास, निरंजन माधवदास, माधवदास, रंगनाथ निजानंद, रघुनाथदास, परसा भागवत, चांगा, निजदास, गोपाळदास, मुक्तेश्वर, येका, येको जनार्दन इत्यादिकांचीं पदपदांतरें

७६५ ] सामान्य बाड–पृ. सं. २८ × २ = ५६ कांहीं पृष्ठें नष्ट [ २००

(१) श्रीसमर्थ, कृष्णदयार्णव, गरीब, मानपुरी यांचीं पदपदांतरें

(२) मध्वमुनीश्वरांचें एक अप्रकाशित पद—

जय जय ब्रह्मगिरी । झुळझुळ गंगा वाहे शिरीं ॥ ध्रु०

(३) बरीचशीं औषधें

७६६ ] बाड–पृ. सं. १८ × २ = ३६ [ १५०

श्रीसमर्थ कृत अंतर्भाव आणि आत्माराम

७६७ ] पोथी–पत्रें २४ [ १५०

मुक्तेश्वर कृत विराटपर्वांतील कांहीं भाग

## ७६८ ]

बाड-पृ. सं. ६८ × २ = १३६ [ १५०

हें सबंध बाड संस्कृत प्रकरणांचें असून ते दोन्ही बाजूंनीं लिहिलेलें आहे.

( १ ) एका बाजूनें ( १ ) शांतिपर्वांतील गोसावित्रीस्तोत्र, श्लोक १७, ( २ ) नृसिंहपुराणे सर्वार्थसाधन नाम श्रीलक्ष्मीसहस्रनामस्तोत्रम्, श्लोक २३६, ( ३ ) अश्वमेधपर्वांतर्गत पांडवगीता, श्लो. १२६, ( ४ ) भागवत, तृतीय स्कंधातील विष्णूचें ध्यान, श्लो. १४, ( ५ ) भीष्मपर्वांतील दुर्गास्तोत्र, श्लो. २८, ( ६ ) पद्मपुराणातील संकटनाशनस्तोत्र श्लो. ५, ( ७ ) इंद्राक्षिस्तोत्र, श्लो. १२

( २ ) दुसऱ्या बाजूनें ( १ ) नृसिंहपुराणातील नृसिंहमाला, श्लो. १३, ( २ ) ब्रह्मांडपुराणातील नृसिंहस्तवराज, श्लो. ४३, ( ३ ) नृसिंहपंजरस्तोत्र, श्लो. २८ व ( ४ ) श्रीलक्ष्मीनृसिंहकवचमाला, श्लोक ३९

## ७६९ ]

बाड-पृ. स. ८० × २ = १६० [ १५०

ज्ञानेश्वरीचा दहावा अध्याय-विभूतियोग, ओ. सं. ३३५

## ७७०-७७१ ]

दोन बाडें-पृ. स. ३०० व १०० [ २००

या संग्रहांत हीं दोन बाडें आपल्या अनास्थेचें प्रदर्शन करीत राहतील ! पावसाचें पाणी गळून सुमारें ३०० पृष्ठांच्या पहिल्या बाडाची निवळ भाकरी बनली आहे व सुमारें १०० पृष्ठांच्या दुसऱ्या बाडाची पोळी झाली आहे. त्यांचें एक एक पृष्ठ मोकळें करणें अशक्य आहे. दहा वीस पृष्ठांचा एक एक थर असा मोकळा करतां येईल, पण तें हि नाजुक च काम आहे. त्यात हात घालण्याला धैर्य होत नाहीं.

## ७७२ ]

बाड-पृ. स. सुमारें १०० [ २००

या हि बाडाची दुर्दशा झालेली आहे. तें फाटलें आहे, चिकटलें आहे, सोडवत नाहीं.

त्यांत श्लोकबद्ध लीलाभागवत व ओवीबद्ध गीतामाहात्म्य असा दोन अप्रकाशित ग्रन्थांचे अनेक अध्याय दिसतात.

७७३ ] बाड-पृ. सं. २६ × २ = ५२ [ १६१

( १ ) तुका, विठ्ठलकवि, सुरदास, नामदेव यांची प. प. ( २ ) संस्कृत सुभाषितें २८ ते ८५, ( ३ ) जयदेवविरचित अष्टपदी, ( ४ ) वामन कृत गोपीगीत, ( ५ ) ज्योतिषाचा कांहीं भाग.

लेखनकाल पौष वद्य ११ शके १६८७

७७४ ] बाड-पृ. सं. ४३ × २ = ८६ [ २००

( १ ) जगजीवन कृत कौशल्येचें स्वप्न, ( २ ) उद्धवचिद्घनकृत मृत्युंजयचरित्र, ( ३ ) अनंत कृत हनुमंतभेट, ( ४ ) हिंदुस्थानी भाषेत रुक्मिणीस्वयंवर, ( ५ ) निरनिराळे दृष्टान्त, ( ६ ) आनंदतनय विमलसुत यांचीं पदपदार्थें

७७५ ] अपूर्ण पोथ्या [ १००-२५०

( १ ) महिपति कृत संतविजय, ( २ ) परमामृत, ( ३ ) दासबोध, (४) रघुवंश-विराग सर्ग, ( ५ ) गुरुचरित्र, ( ६ ) प्रल्हादचरित्र-ओवीसंख्या २६२, ( ७ ) रामायण-बहुधा कृष्णदासमुद्गलकृत, ( ८ ) एकनाथ कृत रुक्मिणीस्वयंवर

७७६ ] पोथी-पत्रें ५१५ [ २५०

श्रीमत् दासबोधाची सुंदर प्रत पण दुर्दैवानें दशक २, ७ व शेवटचे तीन दशक १८, १९, २० मिळून पाच दशक नाहींत. कागद जीर्ण आणि ठिसूळ झाला आहे.

पंधराव्या दशकाच्या शेवटीं वेगळाचें एक पद लिहिल्या सारखें आहे, तें असें :

निजात्मज्ञानडोहीं । बुडोनियां गेले पाहीं ॥ १
तनु त्याग होतां त्यांची । मग सगुणीं भेटी कैंची ॥ ध्रु०
अहंभाव वाटुनि प्याले । परब्रह्म जिता चि जाले ॥ २
म्हणे केशव दिसती डोळां । तव पाहावे वेळोवेळा ॥ ३

७७७ ] कागदांचें पुडकें–कागद सुमारें १४० [ १००–२५०

हीं पत्रें तरी पुढच्या गठ्ठ्यांतून च निवडलेलीं आहेत.

७७८ ] गठ्ठा [१००–२५०

सर्व महत्त्वाचा. कागदपत्रांची आणि पोथ्यापुस्तकांची कशी वाताहत आणि दुर्दशा झाली, त्याचा हा पुरावा. तथापि त्यांत हि अनेक सुवर्णकण हातीं लागतात.

( १ ) त्यांत श्रीसमर्थ, वेणाबाई, गिरिधर, गोविंदात्मज, चूडामणीसुत, नामदेव, दासोत्तम, कृष्णदयार्णव श्रीगुरुवाचुनी । साधनीं चाचपडे ॥, गिरिधरदास, एकनाथ, तुकाराम, तुकयाबंधु, रामीरामदास, गिरिधरशिष्य भास्कर, कवि किंकर, गंगाधर, शिवराम पूर्णानंद, जनार्दनावरी तूं दया करी। सत्वरें घरीं आपुल्या करीं । पापमंजनीं दैन्यहारिणी । रक्ष रक्ष बो माय योगिनी ॥, विष्णुदास नामा, त्रिमल्लदास, आनंदनंदन, केशव, वामन, गिरिधरशिष्य उद्धव, उद्धवचिद्धन, एका रक, ज्ञानदेव, निवृत्ति, रंगनाथ, श्रीधर, किंकर विरचित रामभुजंगस्तोत्र, जयराम, जयरामसुत, जयदेव, मध्वनाथ, शेष, शिवसुत, शाहा हुसेन,

भीम कृत गिरिधर चतुराक्षरीमंत्रावर पद–

रक्षुनि वर्णाश्रमधर्माते करि जगदोद्धार ।
रघुपतिभजनीं अखंड दीक्षा जैसा स्मरहर ।
रजुस भुजंग भ्रांती कैंची मत ज्याचें स्थीर ।
रमती योगी जे स्थानीं त्या राहे निरंतर ॥ १ ,

जनी, विश्व खेचर, रमावल्लभदास, माधवराव ऊर्फ उत्तमश्लोक यांची कृष्णदयार्णवांची आरती, मेघश्याम, शिवदिन केसरी, जनार्दनसुत, अनंत कवि, माळो, नरहरि माळो, काशीराज, चिंतामणीसुत मुद्गल, जयवंत, गोसावी-

सुत, नारायण सहजानंद, देवदास, अशा पंचावन सत्पुरुषांचीं पदपदांतरें आहेत. त्यांत कित्येक अप्रकाशित हि असतील.

( २ ) श्रीसमर्थांचे अभंग आणि पदें, जीं सभेनें छापलीं आहेत, तीं शुद्ध छापलीं आहेत. जीं अजून कोणी च छापलीं नाहींत व अप्रकाशित राहिलीं आहेत तीं सभेकडून छापलीं जातील, कारण तीं आम्ही लिहून काढीत आहोंत, पण याशिवाय इतर अभंग आणि पदें जीं इतर प्रकाशकांनीं छापलीं आहेत, तीं आतां सभेकडून छापलीं जातील, अशी सभा आशा नाहीं. गैरसमज न होऊं द्यावा, पण दुर्दैव असें कीं, इतरांकडून झालेलें त्यांचें प्रकाशन गतानुगतिकन्यायानें अति अशुद्ध झालें आहे! तेव्हां त्यांचें शुद्ध प्रकाशन करण्याचें अति जिकीरीचें काम यापुढें कोणी तरी करावें. हें आज मनांत येण्याचें कारण, पळा पळा ब्रह्मपिसा येतो धावली। हें श्रीसमर्थांचें पद. हें पद महत्त्वाचें आहे. श्रीसमर्थांनीं एकवार एक वर्षभर मौन धारण केलें होतें. त्या मौनानंतर जो पहिला उद्गार निघाला तो हें पद. तें इतरांनीं छापलेलें आहे, पण अशुद्ध. तेवढें तरी आज येथें शुद्ध द्यावें, असें मनांत आणलें.

पळा पळा

पळा पळा ब्रह्मपिसा येतो धावली । रामनामें हाक देऊनि होये कोंडोळी ।
वृत्ति झाली बंधनेंवीण सदा मोकळी । संसाराची धुळी करुनि आंगीं उधळी ॥ ध्रु०
वीट हात गजें नवा दाहे विलुळलें । दाहवा दाव येथें टिमळ दियलें ।
ऐसें हें हि मन अनावृत्ति गुंतलें । फिरोन आलें म्हणोनि तेणें जिरें चि मारिलें ॥ १
प्रपंचउकरडयावरी बैसणें ज्याचें । मीपणा पाळा घालुनि वान पाहे भविष्याचें ।
उठोनि धांवे देखोनि पळे दरप वाटेचें । अद्वयाचें दान घेतां न घडे कोणाचें ॥ २
मीपणाचें शादागपण अज्ञाने गादें । कवण वाहे देहबुद्धियसाचें पोतें ।
मळके कागदा भान अभिमानाचें हुतें । गुरु बोध घेतां मीपण उडालें माझें ॥ ३
जन देखोनियां तो हे धार धरितो । आपणा ऐसें देखोनियां उमज धरितो ।
आतें भेटी येते त्यासी पिसें लाविती । रामीरामदास ऐसें अबद्ध बोलतो ॥ ४

कृपा करून वाचून पहा म्हणजे पूर्वी प्रकाशकांनीं कसा अनर्थ केला आहे तो पाहून दृग् येईल. उठोनि धांवे देखोनि पळे दरप वाटेचें। अद्वयाचें दान घेतां न घडे कोणाचें ॥ या ऐवजीं धांवूनि येत उठोनि पळे दरप वाटेचें अद्वयाचें। दाहनें घेतां न घडे कोणाचें ॥ असें छापलेलें आढळतें! जन देखोनियां तो हे

धार करितो । याच्या ऐवजीं कोणी आम्ही जन धन देतोनि धार करितों। असें, तर कोणी आम्ही जन धन देतोनी विचार करितों। असें छापून स्वतःच नाना चार केलेले आढळतात। जी कथा या एका पदाची ती च सर्व पदाची आणि अभंगांची। पुढें मागें अन्य कोणी तरी श्रम घेऊन इतरत्र प्रसिद्ध असलेल्या अभंगादिकांची शुद्ध आवृत्ति काढली पाहिजे.

( ३ ) गिरिधराचें एक श्लोकबद्ध पत्र. सात आठ श्लोक आहेत. पर्दीं लागले दास दासी अनंत । तयाच्या पदीं लीन मी भाग्यवंत ॥

( ४ ) एका तुकड्यावर 'केशवराजाची वाग्देवता वदति' असें म्हणून केशवाचे श्लोक दिलेले आहेत.

( ५ ) शिशुपालवध, किरातार्जुनीय, अमरकोश, रामावचक्र, चर्पटपंजरिकास्तोत्र, रामकृष्णकृत त्रिलोमाधरकाव्य, इत्यादिकांचीं त्रुटित पत्रें. तसें च एकनाथकृत भावार्थरामायण, देवदासकृत व्यंकटेशस्तोत्र व मुकुंदराजकृत विवेकसिंधु यांचीं काहीं पत्रें.

( ६ ) वेणाबाई कृत कौलाचे श्लोक संपूर्ण.

येणें प्रमाणें या घटकेपर्यंत बीड येथील कार्य झालें आहे, तरी अजून पुष्कळ राहिलें आहे. तें मजकडून होईल किंवा अन्य कोणाकडून होईल. असो, बार्शीवरून नगरास व नगराहून

## देवदासांच्या दादेगांवीं

जाण्यासाठीं चैत्र व. १४ स बीड सोडलें. त्या काळीं बीडाहून बार्शीस जाण्यास बैलगाडीशिवाय अन्य वाहन नव्हतें. प्रथम तीन कोसावर पाली गाव लागलें. गावाबाहेर वटवृक्षाच्या छायेखालीं एक पुरातन शंकराचें देवालय आहे. सुभारात पिंडी आहे. बाहेरच्या बाजूस एक २२½×२ वितींचा संस्कृत शिलालेख असून त्याच्या वरच्या एक दोन ओळी व खालच्या दोन चार ओळी गेलेल्या होत्या. सुमारें २० ओळी घड होत्या. नंतर घाट लागला. नंतर वडगाव, चौसाळें, पारगाव, दर्इ, पिंपळगाव, वाशी, कडकनाथाची वाडी, काटेगाव, आगळगाव, भाईरे अशीं गावें लागलीं आणि तिसऱ्या दिवशीं बार्शीस पोचलों. तेथून आगगाडीनें नगरास अक्षय्य तृतीयेस पोचलों व लागलीं च टांगा करून दादेगावीं गेलों. दादेगाव मठाची श्रीसमर्थ–देवदास–कृष्णाजी–जनार्दन–दाजी–आत्माराम–नारायण अशी शिष्यपरंपरा असून गादी ब्रह्म-

चारित्र्याची आहे. देवदासांची पुण्यतिथी माघ व. ३ स होते. मांदळमोही, शहेगाव, सोमलगाव येथें या मठाखालील मठ आहेत. देवदासांची समाधी गांवापासून सांवापासून एक फर्लांगावर आहे, पण समाधीची नित्य पूजा नसते, समाधीच्या मागें मारुती आहेत. समाधी आणि मारुती या दोघांवर तेल ओतलेलें असतें, त्यामुळें तेथाचीं पुटें चढलेलीं होतीं. अशी तऱ्हा इतर कोणाच्या हि समाधीची पाहण्यांत आलेली नाहीं.

## देवदासांचा संग्रह

फार थोडा मिळाला. मठांत ठाण्याखालचा संग्रह नव्हता, निदान माझ्या पाहण्यांत आला नाहीं. देवदासाच्या कवितेचें एक महत्त्वाचें बाड रा. अमृत बापुजी रसाळ यांचे पासून पुढें तीन वर्षांनीं मिळालें होतें. हें आणि इतर किरकोळ संग्रह यांची नोंद करणें आहे. फडेकर देशमुख आणि भिंगारकर देशमुख यांच्याकडे देवदासाच्या कवितेचा संग्रह असण्याचा संभव आहे.

**७७९** ] बाड–पृ. सं. १९२ × २ = ३८४ पैकीं आ. २० × २ व शे. १९ × २ नष्ट [२५०

(१) हें बाड महत्त्वाचें आहे. त्यात श्रीसमर्थशिष्य देवदास यांचे अभंग व श्लोक आहेत. बाडाचें अक्षर मोठें, ठसठशीत, एकसारखें आहे. कागद जीर्ण झाला आहे. दुर्दैवानें पहिलीं २० पत्रें म्हणजे ४० पृष्ठें व शेवटचीं १९ पत्रें म्हणजे ३८ पृष्ठें नष्ट झालेलीं आहेत. १२० पत्रापर्यंत देवदासांचे अभंग आहेत व नतर स्फुट श्लोक आहेत. नंतर श्रीसमर्थांचीं तीन पदें व १०४ श्लोकापर्यंत मनाचे श्लोक आहेत.

(२) हें समग्र बाड, न जाणों, देवदासांच्या हातचें असेल. त्यांची कविता प्रेमळ व भक्तिभावानें ओथंबलेली आहे. ती सारी प्रकाशित झाली पाहिजे. सी, जयू, पुढिलांना या सूचना देऊन ठेवीत आहे. एकाद दुसरा अभंग व एकादें श्लोकाष्टक येथें सादर करितों :

(१) गुरुकृपा

आयुष्याचा सर्व । करिती गाभेरा । शरण जा माहेरा । सद्गुरुसी ॥ १
सद्गुरुसी जातां । शरण तत्क्षणीं । गुरु मोक्षपाणी । मोक्ष देतो ॥ २
मोक्ष देतो मागें– । वेगळे करीतो । दास्य सोडवितो । प्रचीतीनें ॥ ३
देवदास म्हणे । आला अनुभव । गुरुकृपें ठाव । जन्ममृत्यु ॥ ४

[ २ ] रामनामरसायण

माझेवरी नाश । घेतली नामाची । त्रिविध तापाची । धुळी झाली ॥ १
वैद्य तो सद्गुरु । भेटला आम्हांस । तेणें भवपाश । तोडियेले ॥ २
रामनामरस । रसायन केलें । तें आम्हीं घेतलें । आवडीनें ॥ ३
देवदास म्हणे । त्याचा गुण झाला । उतार पडिला । जन्मदु सा ॥ ४

[ ३ ] समर्था !

पूर्ण पुण्यें आम्हां । जाला तुझा योग । तो काहीं वियोग । होत नाहीं ॥ १
तुझा योग जेथें । दुःख कैचें तेथें । हें वाक्य समर्थ । सत्य कीजे ॥ २
सत्य कीजे देवा । प्रतिज्ञा आपुली । उपेक्षी हे बोली । वाक्य तुझें ॥ ३
तुझें वाक्य मिथ्या । होयसें न करीं । देवदास धरी । पादाबुजें ॥ ४

( ३ ) या संप्रदायाची शिकवण कर्मयोगाची आहे. तो प्रयत्नवाद शिकवितो. एकांतांत बसून देवाचें ध्यान करावें, तो हृदयस्थ होऊन स्फूर्ति देईल, त्याप्रमाणें कार्य करावें, तनमनधनें करून शिजावें, झटून यश येतें ! अशी या संप्रदायाची सांप्रदायिकांना शिकवण आहे. देवदास एका श्लोक-पंचकांत शिकवितात :

[ १ ] प्रयत्नवाद

जें जें करावें तें तें चि होये । करांचिना तें काहीं न होये ।
म्हणोनि यत्नीं घाली मनाला । तें भाग्य येत नेमस्त त्याला ॥ १

यत्नी तयाला तो देव पावे । प्रयत्न नाना करीत जावे ।
सुचीत चित्तें जो धीवरेना । तयास कांहीं वरें सुचेना ॥ २

देणार बुद्धी तो देव ध्यावा । धाता चि होतो हृत्स्थ सेव्हा ।
सुचे बरेंसें त्याचे दयेनें । प्रयत्न तैसा कीजे तनानें ॥ ३

दे देव दाता जैसी च बुद्धी । तैसें करावें ते कार्य सिद्धी ।
तनेंमनेंसीं कांहीं झिजेना । तयास काहीं हो भाग्य येना ॥ ४

येणें प्रकारें जाणे विचार । तो जाणता हो नेमस्त थोर ।
त्या मस्तकीं हो श्रीराम आहे । हा देवदासु सांगे उपाये ॥ ५

७८० ] हनुमतस्वामीकृत बखर—अपूर्ण पत्रसंख्या सुमारें ७५ [ १०

७८१ ] पोथी-पत्रें २१ [ ८८

शिवराम कृत पंचीकरण. प्रतीचा लेखनकाल १७६८. लेखक रावजी भागवंत सुधि.

७८२ ] गठ्ठा [ १५०

( १ ) एका मूळच्या सुंदर बाडाचीं विस्कळित पत्रें ४२. त्यांत श्रीसमर्थांचे अभंग आहेत. ( २ ) हरिविजयाचीं चार पत्रें

तेथून निघून वैशाख शु. १० श. १८२९ येथें सज्जनगडास जाऊन

## परळी खोऱ्यांत

बापदासी, कामथी वगैरे भागांत हिंडलों. तीन बाडें व कांहीं गठ्ठा हातीं आला. पण सबंध परळीखोऱ्यांत अजून कोणी हिंडल्यास बरें च संशोधन होण्याचा संभव आहे.

७८३ ] जीर्ण बाड-पृ. सं. १२७ × २ = २५४ [ १५०
शिवाय आ. पे. कांहीं नष्ट

( १ ) श्रीसमर्थ, शिवदिन, केशव, ज्ञानदेव, मुक्ताबाई, एकनाथ, रंगनाथ, जगजीवन कल्याण, तुका, उद्धवसुत, वेणी, गैनी, कमळदास यांचीं पदपदांतरें. त्यात श्रीसमर्थ आणि श्रीतुकाराम याचा भरणा विशेष आहे.

( २ ) " माझी काया गेली खरी।० " या ओव्यांवर " समार्थातून उघवाय " असा मथळा आहे.

( ३ ) केशव आणि समर्थ यांचीं ' पनोत्तरें ' व ' भोंवरा डोंगराचा फेर ' हे प्रकरणें

( ४ ) एक अपूर्ण अभंग :

... ... ... ... ... । दूध पाजी नामदेव ॥ ३
विठ्ठे असाध्य चि केलें । मुर्दी वेदा वेद बोले ॥ ४
तारी तुरयाचें पुस्तक । देव महाडनायक ॥ ५
हाका मारि कृष्णातीरीं । दासा भेटे जळांतरीं ॥ ६

( ५ ) " नमू अधिष्ठाता मुख्य विष्णु साधु " हें प्रकरण. तें शुद्ध श्रीसमर्थांनीं तुकारामास सांगितलें, म्हणून समग्र ग्रंथात आढळतें. पण तें श्रीसमर्थांचें असावें, असें मला कधीं क्षणभर हि वाटलें नाहीं. रा. आळतेकरानीं तर लिहिलेल्या श्रीसमर्थचरित्राचा हा पाया च मानला आहे! या बाबत या प्रकरणाला " वैशावळी " असें नाव दिलेलें असून तीं कोणा तरी श्रीसमर्थशिष्यानें सांगितली असावी, असें स्पष्ट दिसतें.

७८४ ] जीर्ण बाड–पृ. स. १६६ × २ = ३३२ [ १५०
शिवाय काहीं नष्ट

( १ ) मागच्या च बाडाकाप्रमाणें यात हि श्रीसमर्थांच्या पदपदावराचा भरणा विशेष आहे. शिवाय रंगनाथ, केशव, शिवराम पूर्णानंद, तुळसीदास, कबीर, नामदेव, तुकाराम, जगजीवन, आनंदतनय यांची कांहीं कांहीं पदपदावरें.

( २ ) वामन कृत रामजन्म, ( ३ ) वेणाबाईचे कौलाचे श्लोक, ( ४ ) रामदास सद्गुरु अविनाशी हृदसें जपना ॥

( ५ ) रामचरित्राचे १६१ श्लोक. १६१ वा श्लोक .

जानयन निवाया चालिला स्थीर भूप ।
प्रतिपदिं वनिता घोंवाळिती रत्नदीप ।
अनुजनिजवधूसीं राम धामासि आला ।
निजसुख सकळांतें दास चित्तीं निवाला ॥ १६१

( ६ ) एक अष्टक. पहिला आणि शेवटचा श्लोक
स्वधामासि जातां विभु रामचंद्र । स्वयें प्रार्थिला मारुतीराज रुद्र ।
स्वयें देतसे आत्मता त्यासि भारी । तयां मारुती दीन तीं अधिकारी ॥ १
सदा सर्वदा रामदासासि पाळी । तयाची मळा सगतीची नव्हाळी ।
कृपासाक्ष हे याणळी राघवा जी । दिनानाथजी भक्ति ते हे चि माजी ॥ ८

७८५ ] उभे बाड–पृ. स १२६ × २ = २५२ [ ६०

( १ ) हें बाड गणेश गोविंद जास्ती याच्या हातचें आहे. त्यांत एका पृष्ठावर गोविंदराव जाखी याना तिसरा मुलगा १७३८ त व चवथा मुलगा १७४२ त झाला असें म्हटलें असून त्याच्या जन्मपत्रिका दिल्या

आहेत. यांतले कांहीं लिखाण १७७१ तील तर कांहीं १७९६ तील आहे. हे गणेश गोविंद गुरुभक्त होऊन गेले असें दिसतें. त्यांनीं केलेले अभंग, पदें, आरत्या यांत आहेत. त्यांच्या गुरूचें नांव हरिदास.

( २ ) बोरवनात कोणी छाकुबाई म्हणून साक्षात्कारी बाई होऊन गेल्या. त्या निजधामास गेल्याचा शक १७९६ दिला आहे.

( ३ ) शुद्धयजुर्वेदोक्तार्चन, तारक ब्रह्म, पंचाक्षर स्तोत्र अशीं संस्कृत प्रकरणें असून कित्येक संस्कृत सुभाषित श्लोक आहेत.

( ४ ) वैराटपुराणे शंकरपार्वतीसंवादे योगशास्त्र, पटलें १ ते ७, व शिवस्वरोदय अशीं प्राकृत प्रकरणें असून ज्ञानेश्वरांचे बरेचसे अभंग दिलेले आहेत. शिवाय अमृतराय, मध्वमुनेश्वर, सोपान, मुक्ताबाई, बोधला, एकनाथ, तुका, महिपति, उद्धवसुत, यांचीं पदपदांतरें आलीं आहेत.

**७८६** ] उपवलेलें बाड–पृ. सं. १४ × २ = २८ कांहीं पृष्ठें नष्ट [ ७५

( १ ) सगुणध्यान, ( २ ) आत्मत्वाचें अनुचिंतन, ( ३ ) किरकोळ

**७८७** ] महत्त्वाचा कागद–अपूर्ण भाग [ १००

मारुती अवतार स्वामि प्रगटला । उपदेश केला तुजलागीं ॥ ३
रामनाममंत्र तारक केवळ । जालासे शीतळ उमाकांत ॥ ४
उफराटें नाम जपतां वाल्मीक । जाला पुण्यश्लोक तात्काळीक ॥ ५
तो चि बीजमंत्र वसिष्ठउपदेश । त्याहूनि विशेष काय आहे ॥ ६
आतां धरूं नको भलत्याचा संग । राम पांडुरंग कृपा करी ॥ ७
धरूं नको आस आमुची कृपाळा । रामदासीं डोळा लावी आतां ॥८
तुझी चाड आम्हा नाहीं छत्रपती । आम्ही छत्रपती त्रैलोक्याचे ॥ ९
चारी दिशा आम्हा भिक्षेचा अधिकार । न मिळे भाकर भक्षावया ॥१०
पांडुरंगीं जाली आमुची हि भेटी । हातांत करोटी दिल्ही देवें ॥ ११
आतां पडूं नको आमुचिया काजा । पवित्र तूं राजा रामभक्त ॥ १२
विठ्ठलाचे दास केवळ भिकारी । आम्हालागीं हरी उपेक्षिना ॥ १३
शरण असावें रामदासालागीं । नमन साष्टांगी घाली त्यासी ॥ १४
तुका म्हणे राया तुज असो कल्याण । सद्गुरु शरण असे बापा ॥ १५

आणि नंतर, आतां हि विनंती प्रधान अष्टक। हा अकरा कडव्यांचा अभंग आहे. त्यांत हि महत्त्वाचे पाठांतर आहेत च. हे अभंग नव्हतात म्हणून असमर्थनीय कारणें पुढें करून विरोधक हे अभंग प्रक्षिप्त मानीत असतात.

## ७८८ ] गठांठा [ ५०-१५०

( १ ) श्रीसमर्थ, कल्याण, रंगनाथ, तुकाराम, नरसिंहसुत, दास तोडरमल्ल, जयरामात्मज, मत्स्यमुनेश्वर, उद्धवचिद्धन यांचीं पदपदांतरें

( २ ) श्रीसमर्थांवर कांहीं पदें, श्लोक, हनुमत्कवच, तेराक्षरी मंत्राचें महत्त्व, रामवंशावळ, पंचपदी, महादेव कृत जोहार, उद्धवचिद्धन कृत संत-मालिका, कांहीं संस्कृत सुभाषितें

( ३ ) मी जाले दासी । या गुरुरायाची । हो मी जाले ॥ ध्रु०
संसारसागर सांडुनि सारा । राहिन चरणापाशीं । हो मी० ॥ १
चरण झाडिन आपुले केशीं । नाटवे प्रयाग काशी । हो मी० ॥ २
रामदास म्हणे पूर्ण मी धाले । प्राशुनि ब्रह्मरसासी । हो मी० ॥ ३

**नंतर** कार्तिकांत इंदुरबोधन येथील संग्रह पाहून महत्त्वाचा उतरून तरी आणावा म्हणून आधीं पत्रव्यवहार करून दोघे चौघे मिळून शके १८२९ च्या कार्तिक शु. ४ ला इंदुरास जाऊन पोंचलों, तों समजलें कीं, एकाएकीं येव ठरून मठपति आत्माराम महाराज महायात्रेस निघून गेले ! या खेपेस खोलीला असलेलें कुलूप पाहून च परतावें लागलें ! परततांना मार्गांत धर्माबादेपासून जवळ असलेला

### कुंडलवाडीचा मठ

पाहून जावें, असें ठरवून कुंडलवाडीस शु. ५ ला गेलों. येथें एकेहाळीच्या आत्माराममहाराजांच्या मठाची माहिती मिळाली. कुंडलवाडीचा मठ आत्माराममहाराजांनीं च स्थापिला होता. तेव्हां अर्थात् आत्माराममहाराजांच्या पूर्वीची आणि नंतरची परंपरा अशी : श्रीसमर्थ–कल्याण–शिवराम–रामचंद्र–आत्माराम–यादव–मारुती–सखाराम–भगवंत व रामकृष्ण व भगवंताचे आत्माराम.

मठांत संग्रह पाहण्यांत आला तो : जुना दासबोध, दासप्रबोध, पंचमान, षड्रिपु, पंचसमासी, चतुर्थमान, जुनाट पुरुष, निर्गुणध्यान,

आत्माराम, बहुधा सोळाशी, पूर्वारंभ, अंतर्भाव, सप्तसमासी, सगुणध्यान, साक्षरपदबंधा, पंचीकरण, अष्टाक्षरी, कृतनिर्वाहाचा एक समास, मुखबद्ध व दासबोध. दासबोधाची प्रत शक १७५७ तील आहे. तिच्या शेवटीं " एकूण ओव्या ७७४३ " असें म्हटलें आहे. जुन्या दासबोधाची पोथी मात्र सरी च जुनी दिसली.

१८३० च्या चैत्रवैशाखांत चाफळ व सज्जनगड या भागांत गेलों होतों व पैठणांत सांप्रत श्री. वासुदेव महाराजांचा मुक्काम होता म्हणून त्यांना भेटावयास गेलों होतों. तेव्हां त्यांनीं इंदुरबोधन मठाची हकिकत सांगितली, बरोबर मनुष्य आणि पत्र दिलें आणि इंदुरास जाऊन गाड मारून ठेवलेलें दप्तर हातीं आलें. ती सारी हकिकत पहिल्या खंडाच्या आरंभीं जे सिद्धांत दिले आहेत, त्यांतील एका सिद्धान्तांत आली आहे. या खेपेस जांबभागांत हनुमंतरामांच्या बखरीच्या दोन प्रती व भक्तिरहस्यांतील पहिलीं ६८ च प्रकरणें मिळालीं.

१८३१ च्या वैशाखांत जरा मोठा दौरा झाला. पुणतांबे, नेवासें, पैठण, शेवगाव, तिसगाव, बीड, केज व अंबा जोगाई अशीं

## आठ प्रमुख ठिकाणें

घेण्यांत आलीं. पुणतांब्यास चांगदेवांच्या समाधीपाशीं व नेवाशास श्रीज्ञानेश्वर महाराजांच्या खांबापाशीं एक एक दिवस मुक्काम करून वैशाख शु. ९ स

## पैठण

येथें पोंचलों. " जन्मा येऊनि येकवार तरि पैठणशहरीं जावें रे । " असें या पुरातन नगराचें माहात्म्य आहे. एकनाथ, कृष्णदयार्णव, अमृतराय आणि शिवदिनकेसरी अशा चौघा सत्पुरुषांचे येथें मठ आहेत. एकनाथांचा समाधिशक कोणता मानावा, हा प्रश्न आहे. श्रीसमर्थांच्या जन्मानंतर १५३१ त मातुःश्री राणुबाईंनीं आपलीं दोन्हीं मुलें पैठणास नेऊन नाथमहाराजांच्या पायावर घातलीं होतीं, असें हनुमानस्वामींच्या बखरींत आहे, तर पैठणास एका जुन्या कागदावर पुढील दोन श्लोक आमच्या पाहण्यांत आले :

शालीवाहन पंधरा शत शके येकागळी विंशती ।
वर्षी नाम विकार मास वाद्य फाल्गून षष्ठामती ।
षष्ठी वासर भानु या शुभदिनीं निर्याण स्वच्छंदता ।
पावे श्रीगुरु येकनाथ प्रभु हा साम्राज्यसायुज्यता ॥ १

भूपाहुशरचंद्रमा शक विधी क्षेत्री तिजा जो क्रमे ।
अद्दामाजि विकारिनाम करवी मीन गृहीं संक्रमे ।
षष्टी फाल्गुन वद्य मिश्र शशिवज्ञाख्य याणिज्यते ।
पावे श्रीगुरु पेकनाथ प्रभु हा साम्राज्यसायुज्यते ॥ २

य हा दुसरा श्लोक नाथांच्या समाधिमंदिरावर हि कोरलेला आहे. त्यात समाधिमंदिरावरील तो संपूर्ण लागत नाहीं. म्हणजे शक १५२१ येतो. नाथांच्या पश्चात् समाधिमंदिर तत्काळ होऊन हा श्लोक कोरला गेला असता तर त्याचें प्रामाण्य निर्विवाद मानता आलें असतें. पण तसें झालेलें नाहीं. हा श्लोक कृष्णदयार्णवकृत आहे व कृष्णदयार्णवांचा समाधिकाळ १६६२ आहे. अर्थात् वरील श्लोक नाथांच्या नंतर पुष्कळ वर्षांनीं रचलेले असले पाहिजेत.

केशवकृत नाथचरित्र पाहण्यांत आलें. तुकाराम तात्यांनीं तें छापलेलें आहे, पण त्यात शेवटच्या ९० ते १०२ ओव्या गाळलेल्या आहेत. त्या ओव्यांत चरित्रकार केशव यांची परंपरा आहे ती : एकनाथपौत्र यदव-माधव-राघव-त्र्यंबक-केशव. केशवांनीं हें चरित्र शके १६८७ त लिहिलेलें आहे.

कृष्णदयार्णवांच्या मठांत तीन समाधी आहेत : एक कृष्णदयार्णवांची, दुसरी त्यांचे नातु काशीनाथ याची व तिसरी त्याचे शिष्य उंबरखेडकर उत्तमश्लोक यांची. तिन्ही समाधींवर समाधिशकांचे श्लोक कोरलेले आहेत. ते जसे आहेत व जसे लागले तसे उतरून घेतले आहेत.

श्रीगुरवे नमः ॥ रौद्रीं द्वि षट् षट् शशि शाका वर्षी ।
सत्पंचमी शुक्लसु मार्गशीर्षी । नैर्गुण्यश्रीकृष्ण
दयार्णवासी । तत्पादुका पूज्यसुरैकराशी ॥ १ ॥

म्हणजे १६६२ मार्गशीर्ष शु. ५ ही कृष्णदयार्णवांची पुण्यतिथी होय.

श्रीगुरवे नमः । सोयं गौतमगोत्रपूर्वपुत्रराशीर्न्नागमु संवत्के
शाके दुर्मुख सुक्ल कृष्ण प्रतिपद्यप्रापमन्वैस्तुवन् । श्रीमत्
कृष्णदयार्णवान्वयवति श्री काशिनाथाह्वयः सचिद्रूप
पादपद्मगुरुप्रभासः परं तद्गेः ॥

बरोबर बोध होत नाहीं. पण दुर्मुख संवत्सर १६९८ ला होता. त्या वर्षी काशीनाथांनीं देह ठेवला.

श्रीगुरवे नमः । शाके वसुव्योमसूर्यांत्रे संख्ये पराभवे
चैत्र सिते चतुर्थ्यां श्रीउत्तमश्लोक निजं प्रपेदे तत्पादुकेयं

'परमैश्वयपूज्या ॥१॥ जीर्णोद्धार शके १७८० कालयुक्तनाम संवत्सरे गोविंदमुनिः ॥

म्हणजे १७०८ चैत्र शु. ४. १७०८ ला पराभव होता.

अमृतरायांनीं जलसमाधि घेतली होती. त्यांची पुण्यतिथी चैत्र शु. ६ स पाळण्यांत येते.

शिवदिनांचा समाधिशक १६९६ जयनाम. पुण्यतिथी माघ वद्य १३.

पैठणास कांहीं ग्रन्थ पहावयास मिळाले, पण संशोधन झालें नाहीं. येथें आणि जवळ पास संशोधनाला वाव मात्र पुष्कळ आहे, अशी कल्पना झाली.

पैठणाहून निघून मार्गांत शेवगांवीं थांबून तेथें अमृत बापुजी रसाळ यांना भेटून व त्यांजकडून मिळालेला संग्रह घेऊन श्रीसमर्थशिष्य दिनकर यांच्या तिसगांवीं वैशाख शु. १२ ला पोंचलों. तिसगांवचे मजवर महदुपकार आहेत व मोह होतो कीं,

दिनकर नामा स्वधर्ममार्गीं । महा व्युत्पन्न शास्त्रमार्गीं ।
तीक्ष्ण बुद्धि देखूनि स्वामिमगें । दिनकर नाम ठेविलें ॥

त्या दिनकरांच्या गुणकथा गाव्या, पण तो मोह आंवरून धरून व त्या कथांसाठीं श्रीरामदासी ग्रन्थमालेंतील सहावा भाग श्रीस्वानुभवदिनकर व सोळावा भाग श्रीदिनकरांची स्फुट कविता हे दोन ग्रन्थ पहावे, अशी शिफारस करून अनेकांकडून मिळालेल्या दिनकरांच्या संग्रहाकडे आपण आज एकदम वळणें च इष्ट होईल.

## श्रीस्वानुभवदिनकरकारांचा संग्रह

७८१ ]

पोथी

श्रीस्वानुभवदिनकर [ २२५

श्रीरामदासी ग्रन्थमालेंत सहावा भाग म्हणून छापलेला ग्रन्थ. ग्रन्थ प्रसिद्ध होतां च कै. विष्णु मोरेश्वर ऊर्फ आण्णासाहेब महाजनि यांनीं पत्र पाठवून कळविलें कीं, आरणांत हा ग्रन्थ दासबोधापेक्षां हि महत्त्वाचा वाटतो. आम्ही याचा अर्थ इतका च केला कीं, ग्रन्थ इतका सरस आहे. दासबोधाहून श्रेष्ठ ग्रन्थ कोणता च नाहीं. दासबोध हा सूर्य होय, त्याच्या प्रकाशानें इतर श्रीसांप्रदायिक ग्रन्थ प्रकाशणार. श्रीसमर्थशिष्यांत दिनकरांइतके व्युत्पन्न दुसरे कोणी महुधा नसते.

**७९० ]** पोथी–पत्रें २७६ [२१२
श्रीसीतारामसंवाद

दिनकराचे पुत्र आणि शिष्य रामचंद्र. त्यांनीं हा ग्रंथ शके १६४४ चैत्र शु. १ स पूर्ण केला ही बहुधा रामचंद्राच्या च हातची पोथी दिसते. जीर्ण झाली आहे. ग्रन्थ प्रकाशनाला योग्य आहे पिता पुत्र दोघे हि सारख्या योग्यतेचे होते.

**७९१ ]** बाड–पृ. स. ९२ × २ × २ = ३६८ [२५०

सुंदर, प्रेक्षणीय बाड. त्यांत बहुतेक दिनकरांची स्फुट कविता–श्लोक, अभंग, पदें, आरत्या– आहे, यात या बाडाचें सौंदर्य आहे. मालेंतील सोळाव्या भागांत ही बहुतेक कविता छापली आहे. दिनकराची कविता अति श्रेष्ठ दर्जाची, स्वानुभवाची आहे आणि या क्षणीं जें मनांत येतें तें च एकवार दु:खानें बोलून दाखवितों कीं, या कवितेकडे महाराष्ट्राचें आणि त्यांत हि श्रीसमर्थाभिमानियाचें जावें तसें लक्ष गेलें नाहीं, हें कोणाचें तरी दुर्दैव होय !

दिनकराच्या शिवाय या बाडांत श्रीसमर्थांची थोडीं पदपदांतरें आहेत, 'चंचळ नदी गुप्त गंगा' हा समास व 'भोंवता डोंगराचा फेर' हें हरिगाणें, अशीं आहेत. शिवाय क्वचित् गोसावीसुत, मुकुंदानंद, जनार्दन यांचीं पदपदांतरें आहेत. भिन्न भिन्न हस्ताक्षरें आहेत.

**७९२ ]** उभें बाड–पृ स. १३० × २ = २६० [२५०
शि. आ. व शे ८।१० नष्ट

हें हि मागील बाडाप्रमाणें च महत्त्वाचें होय. त्यांत दिनकराची बरीचशी व रामचंद्राची थोडीशी स्फुट कविता आहे. दोघांच्या कवितेचें अक्षर भिन्न आहे. बाड मूळचें च दिसतें व दिनकराच्या कवितेचें अक्षर दिनकराचें च व रामचंद्राच्या कवितेचें रामचंद्राचें च असावें, असें मला वाटतें. पुढील ७९९ शीं ताडून पाहतां माझी तशी खात्री होते. बाड प्रेक्षणीय आहे.

**७९३ ]** बाड–पृ. स. ९२ × २ × २ = ३६८ [२००
शिवाय कांहीं पृष्ठें नष्ट

( १ ) श्रीसमर्थ, दिनकर, रामचंद्र किंवा दिनकरतनय, तुकाराम, उद्धवचिद्घन, सदानंद, कृष्णदास, एकनाथ, लतिफ, कबीर, शाहहुसेन, वामन, रंगनाथ, ब्रह्मदास, शिवरामपूर्णानंद, बस्वेश्वर, मानपुरी, कोकिळ ( एकनाथ चतुराक्षरी मंथावर पद ), केशव, नाथनिरंजन ( हिंदुस्थानी व मराठी ), ज्ञानदेव, सोपान, रामानंद, मुकुंदराजयोगी, बापरसुमादेवीवर, ज्ञानदेवदास मुक्ताई, जयराम, उद्धवलिंग, नामदेव, गोरा, परसा भागवत, रेणुकानंदन, मच्छमुनेश्वर, माधोनाथ, शिवदिनकेसरी, श्रीधर, विष्णुदास नामा, गोविंद, मीरा, गोसावीनंदन, माळो, रुद्रदास, नागेश, विठ्ठलतनय, अमृतराय, कृष्णदयार्णव, भीमराज, संतीदास, दत्त, बाबा सराफ, माधवदास, शिवसुत, ब्रह्मानंद, अनंत, आनंदतनय, मुद्गल, राघोनंदन, ईशसुत, देवदास, यादव, गणेश, नरहरि, जनी, मेघश्याम, अशा पासष्टांचीं पदपदावरें. त्यांत दिनकर, रामचंद्र, नाथनिरंजन, ज्ञानदेव यांच्या कवितेचा विशेष चे भरणा.

( २ ) बाडाच्या अगदीं आरंभीं एक बरें च मोठें, आरंभ आणि शेवट नसलेलें अभंगात्मक प्रकरण आहे. त्याचीं १०० ते ६५५ कडवीं आहेत. शिवाय ( १ ) कृष्णदासकृत कृष्णजन्म, कडवीं ३३, ( २ ) मनश्लोक, श्रमराच्या श्लोकात हि कर्त्यांचें नांव नाहीं, बहुधा दिनकरकृत असावें, ( ३ ) वामनकृत भामाविलास-श्लो. ४८, ( ४ ) हिंदुस्थानी भाषेंत रुक्मिणीस्वयंवर-उत्तरार्ध, ( ५ ) त्र्यंबकशिष्य रंक कृत हनुमंतार्जुन-भेट-श्लो. ४३, ( ६ ) त्या च रंकाचें शिवपार्वतीदर्शन-श्लो. २९, ( ७ ) श्रीधरकृत पारधीकथा-श्लो. ४०, ( ८ ) विष्णुदासनामाकृत पांडुरंगमाहात्म्य-कडवीं ३४, ( ९ ) ब्रह्मानंद कृत जोहार-कडवीं ११, ( १० ) श्रीधरकृत श्रीरामसगुणध्यान-श्लो. ६०, ( ११ ) जयदेवकृत अष्टपदी, ( १२ ) वामनकृत सीताशोपामुद्रासंवाद - श्लो. ३४, ( १३ ) वामनकृत श्रीरामजन्म - श्लो. ४९, ( १४ ) रामचंद्रकृत दिनकरांची संस्कृत आरती.

( ३ ) बाडाच्या शेवटच्या पृष्ठांना फार लागलेली आहे. त्यांत अनंत कृत गीतेची एक महत्त्वाची आरती आहे. मधला मधला भाग कसरीनें खाला आहे. ती आरती इतरत्र मिळविली पाहिजे किंवा पुरी केली पाहिजे.

गीतेची आरती

वेदाचें ( जें ) सार शास्त्राचा सुपुटीं पुराण मात्रें ( तु ) झिता पडिली महु पुटी।
यदुपति समरीं सांगे पार्थेसीं गोष्टी जे आवडि स्मरतिल्या श्रीहरीचे भेटी ॥ १

जय देवी जय देवी जय भगवद्गीते
श्रवणें पुजनें पाठें मन तारिसी माते ॥ ध्रु०

शंकर श्रीधर अच्युत म ( धुसू ) दन वक्ते निवृत्ति ज्ञानेश्वर सोपान परतें।
दिगंबर अ ( गणित ) ( य ) हु थोर ज्ञाते टीका करितां करितां मुक-
( ले तुज ) गीते ॥ २

त्रिकांड प्रवाह श्लोक सात शतें अ ( अंत प ) हातां अनंत न करित तुज परतें।
प्रसय होसि तदा ते (जे) भजती तुतें म्हणउनि अनंतदास न करित तुज परतें॥३

७९४ ] बाड–पृ. स. १८० × २ = ३६० [२५०
काही नष्ट

( १ ) श्रीसमर्थांची थोडीं व दिनकरांचीं पुष्कळ पदपदांतरें

( २ ) अगदीं आरंभीं तत्त्वपद आहे.

( ३ ) पृ. ६७ वर मथळ्याचे जागीं " शक १५८२ " लिहून देहे देवालयं प्रोक्तं। आत्मा विश्वेश्वरो हरिः। अज्ञाननिर्माल्यं त्यक्त्वा। सोहंभावेन पूजयेत्॥ १ ॥ असा श्लोक देऊन त्यावर ओवीबद्ध टीका सुरू करून ४० व्या ओवीपर्यंत लिहून टीका अपुरी च सोडली आहे. कोण कृत कळण्याला मार्ग नाहीं.

( ४ ) बुका तयार करण्याला लागणारीं बावीस औषधें पृ. ७१ वर दिलेलीं आहेत.

( ५ ) पृ. ७८ वर शके १५९९ आश्विन शु. ७ स रखमाजी राजे मोहिते यांना झालेल्या मुलीची पत्रिका आहे व पृ. १५७ वर गोब्राह्मणप्रतिपालक राजश्रीराजमान रत्नोजी राजे घाटगे यांना १५९९ फाल्गुन शु. ५ शुक्रवारीं झालेल्या मुलीची पत्रिका आहे. त्या च पानावर त्र्यंबक नाईक यांना १६०३ त झालेल्या मुलीचा जन्मकाळ दिलेला आहे.

( ६ ) पृ. १२९ वर शके १६०४ त राजश्री चहिणाजी गोसावी यास चार रुपयांचे करून दिलेलें हवालापत्र आहे व पृष्ठें ९९, १०२, १५५, १५८ वर १६१२ तील काहीं कर्जरोखे व इतर व्यवहार यांचा जमाखर्च

आहे. तत्कालीन आर्थिक परिस्थितीचा विचार करणारास हे जमाखर्च उपयोगी पडणारे आहेत. त्यात यादव सराफ, रामाजी गोसावी, येकोजी राजे पाटये, मलजी राजे निंबाळकर, वहिणाजी गोसावी, द्वारकाबाई, सयाबाई, अंताजीपंत कुळकर्णी मौजे चिचोंडी, श्यामभट्ट, इत्यादिकांचा संबंध आला आहे. रुका म्हणजे काय, टका म्हणजे काय हें जाणण्यास व वस्तूंचे भाव काय होते तें समजण्याला या जमाखर्चात साधन आहे.

( ७ ) कांहीं संस्कृत सुभाषितें, चर्पटपंजरी व नित्य परिचयांत असलेल्या शिवाय विठ्ठलकवींचे निराळे कूटात्मक श्लोक, असें या बाडांत आहेत.

## ७९५ ]

बाड–पृ. सं. १९ × २ = ३८ [२३०

### औषधें आणि जमाखर्च

( १ ) दारुण संग्रहणीनाशार्थ मधुपाकि हिरडी याची क्रिया; हेमगर्भ करावयाची क्रिया; संनिपात, हागवण, अतिसार, रक्तपिती, मूळव्याधींचे सहा प्रकार, बहुत दिवस फुटलेले कान, यांवर औषधें

( २ ) शके १६१२ ते १६१५ व शक १६२६ यांतील जमाखर्च. त्यांत बाबाजी नाईक कोरडे, रानोजी राजे पाटोंगे, रामचंद्र, केवळराम, वेंकाजी हरिभक्त, शामजी, शिवाजी, येकोजी राजे, निंबाळकर, रघुनाथ भट्ट, मलजी राजे, द्वारकुबाई, काशीबाई, बिंबाबाई, अंताजीपंत कुळकर्णी मौजे चिचोंडी, यादव सराफ, जीवाजी नाईक कोरडे, दत्ताजी कुळकर्णी मौजे नारायण डोह, इत्यादिकांचा संबंध आला आहे.

## ७९६ ]

बाड–पृ. सं. ६९ × २ = १३८ [१५०

( १ ) श्रीसमर्थ, एकनाथ, तुका, मिठा, मानुदास व गोणाई यांचीं प. प. त्यात तुकारामाचा भरणा विशेष

( २ ) श्रीकृष्णभगवंताची नामावळी—४० नावें, श्रीराम दाशरथीची नामावळी—२६ नावें, येकनाथ कृत भक्तमाळा—ओ. १८, वरवालिंग कृत संतमाळा.

## ७९७ ]

उभे बाड–पृ. सं. २५ × २ = ५० [२००

( १ ) श्रीसमर्थ, तुकाराम, दिनकर, अमृतराय, मध्वमुनेश्वर, कोकिळ, आनंदतनय, यादव कवि ( निंदित स्वाभाविक कर्म कोणाचें नुचारावें ॥ध्रु०॥ .. आळशी यादवकवि स्वभावें । परि हरिगुण काहिं वदावे ॥ ३ ), बहिणी, माळो, केशव, अनंत, जनी, रंगनाथ यांचीं पदपदांतरें

( २ ) मुक्तेश्वर कृत आदिपर्वांतील अध्याय ३६, ३७ व ३८

( ३ ) मुक्तेश्वर कृत शतमुखरावणवध—ओ. सं. १३१. याच्या शेवटीं लेखकानें आपलें नांव एका ओवींत गोविलें आहे :

इति श्री हनुमतनाटकीं कथा । शतमुखरावणवध समाप्ता ।
मेघःशामें लेखन केलें आत्मार्था । बाळकृष्णगुरुप्रसादें ॥

दिनकराचे बंधु शामराज, त्या शामराजाचे पुत्र बाळकृष्ण व बाळकृष्णाचे पुत्र मेघश्याम होय.

( ४ ) श्रीधराच्या रामविजयांतील बराच मोठा उतारा.

# ७९८ ]

बाड–पृ. सं. ६२ × २ = १२४
शेवटचीं कांहीं पृष्ठें नष्ट [ २५०

या सबंध बाडांत श्रीसमर्थकृत पदें आहेत. बाडाच्या पानावर पत्रांक आहेत व ते क्रमशः ६२ पर्यंत आहेत, पण ते घालण्यापूर्वी च कांहीं पानें गळून नष्ट झालेलीं दिसतात. उदाहरणार्थ १ व २, ४ व ५, ९ व १० मधील संदर्भ पहा. बाड महत्त्वाचें आहे. कांहीं पदें आतापर्यंत न मिळालेलीं अशीं आहेत. सर्व ताडून पाहणें आहेत.

# ७९९ ]

पोथीचें एक च पान
दिनकराचे हस्ताक्षर [ २९२

मूळ संस्कृत एकादश स्कंधाच्या शेवटच्या अध्यायाचें हें शेवटचें पत्र आहे. त्याच्या शेवटीं लेखनसमाप्तीचा मजकूर आहे तो असा :

यदक्षर पदभ्रष्ट मात्राहीन तु यद्भवेत् । तत्सर्वं क्षम्यतां देव नारायण नमोस्तु ते ॥ ५ ॥ यादृश पुस्तकं दृष्ट्वा तादृशं लिखितं मया । यदि शुद्धमशुद्धं वा मम दोषो न विद्यते ॥ ५ ॥ शके १५६४ चित्रभानुनामसंवत्सरे उत्तरायणे ज्येष्ठमासे शुक्लपक्षे तिथौ ५ इंदुवासरे पुष्यदिवसनक्षत्रे तद्दिवसे मिद एकादशस्कधाख्य

प्रथलेखणसमाप्तोयमिति ॥ दिनकररामदासगोस्वामि स्थाई भींगार-
कर जोसि तस्येद पुस्तकं ॥ श्रीरामार्पणमस्तु ॥ श्रीरस्तु ॥

पत्राच्या एका बाजूचा येथें शेवट झाला. मागील बाजूस दोन ओळी आहेत त्या :

॥ ७ ॥ श्रीरामिरामदाससद्गुरवे नम. ॥ ७ ॥

॥ ७ ॥ दिनकररामिरामदास गोसावि ॥ ७ ॥

हें मला अपूर्व हि कोडें च वाटतें. स्वानुभवदिनकराच्या प्रस्तावनेंत तें उलगडण्याचा केलेला प्रयत्न बरोबर आहे, असें वाटत नाहीं. आज एक आणखी कल्पना सुचवावयाची आहे. १५७६ त श्रीसमर्थांची भेट होण्या-पूर्वी श्रीसमर्थांचें वडील बंधु श्रेष्ठ उर्फ रामीरामदास याचा आणि दिनकराचा संबंध जडला असावा. आतापर्यंत महाराष्ट्रास कल्पना नव्हती, पण त्या काळीं जांबेच्या समोंवार पाच पन्नास कोसांत श्रेष्ठाच्या चरित्राची आणि विद्वत्तेची प्रभा पडली होती. त्या प्रभेच्या कक्षेंत श्रीसमर्थप्रतापकार गिरिधर आणि स्वानुभव-दिनकरकार दिनकर आणि इतर तरुण मंडळी प्रथम आली होती आणि नंतर ती धारी मंडळी जास्त प्रतिभासंपन्न प्रतापवान् धाकट्या बंधूच्या कार्यक्षेत्रांत सामील झाली. साहित्याच्या दृष्टीनें गिरिधर आणि दिनकर यांच्यावर श्रेष्ठाच्या वाङ्मयाचा जास्त परिणाम झालेला आढळतें, याचा हि उलगडा या कल्पनेनें होत आहे. तथापि अजून हि हा प्रश्न विचारविनिमयाला खुला आहे, असें च आपण धरून चालूं.

सध्या इतकें खरें कीं, श्रीसमर्थांनीं आपल्या वयाच्या पंधराव्या सोळाव्या वर्षी केलेली वाल्मीकीय रामायणाची प्रत महाराष्ट्रास परवा आषाढांत पहावयास मिळाली व श्रीसमर्थांचे अत्यन्त धुरंधर शिष्य दिनकर यांनीं हि वयाच्या पंधराव्या सोळाव्या वर्षी च केलेल्या भागवताच्या प्रतीच्या शेवटच्या पृष्ठानें दर्शन महाराष्ट्रास आज भाद्रपदांत घडत आहे !

८०० ]

पोथी अपूर्ण–पत्रें २६ [ १५०

नरसिंह कृत सामुद्रिक ग्रन्थ थेंबोपद. पुरुषाचीं सामुद्रिक लक्षणें ओवीसंख्या १ ते १४०, नंतर स्त्रियांचीं लक्षणें १ ते १२७ अपूर्ण.

यकातील प्रतीवरून त्यांनी छापलें होतें, याचा पुरावा छापील प्रतीवरून लागत नाहीं. छापील प्रतीला प्रस्तावना नाहीं, किंवा दोन शब्द हि जोडलेले नाहींत. त्या प्रतीशीं आम्ही ही प्रत मधून मधून ताडून पाहिली. अनुभव एक च. सहज एक च उदाहरण देतों. आरंभींच्या च सहाव्या ओवींत 'कंठींप्रदेशीं सूत्र' असें छापील प्रतींत आहे. सूत्र काय कंठीं असतें ! प्रस्तुत प्रतींत 'कटिप्रदेशीं' आहे. मुख्य फरक म्हणजे छापील प्रतीचे ७८ प्रसंग आहेत, तर प्रस्तुतच्या प्रतींत ८० प्रसंग आहेत.

( ३ ) सांप्रदायिकांनीं या रामायणाचा अभ्यास केला पाहिजे, कारण तें श्रीसमर्थांच्या वाचण्यांत आलें होतें.

( ४ ) प्रस्तुतच्या प्रतींत दोन ठिकाणीं लेखनकाल दिलेला आहे : एक तिसाव्या प्रसंगाच्या शेवटीं व दुसरा अगदीं ग्रन्थाच्या शेवटीं. तिसाव्या प्रसंगाच्या शेवटचा उल्लेख : ' श्रीसंवत् ॥ १६३९ ॥ हेमलंब संवत्सरे आषाढ शुद्ध येकादस्यायां इंदुवासर । तदिवा कुंभकर्णवध समाप्त ॥ ' प्रतीच्या अगदीं शेवटीं सविस्तर उल्लेख आहे, तो असा :

स्वस्ति श्रीमत् नृपशालिवाहन शके सोळासें चाळिस ॥ १६४० ॥ विलंबीनामसंवत्सरे आश्विने मासे कृष्ण पक्षे ... तदिवा ग्रंथ ...
आत्मसंग्रहार्थ ...
करेन लिखि ... यत्नेन प्रतिपालयेत् ॥ १ ॥ ... सोतिकथंधनात् । मूर्खहस्ते न दातव्य एवं वदति शारदा ॥ २ ॥........ पोथिसंख्या ॥ ८०००८०० आठ सहस्र आठ शत ॥ रामार्पणमस्तु ॥ ५ ॥

८१५ ] पोथी–पत्रें १६९ [ २५०

एकनाथ कृत भावार्थरामायणांपैकीं बालकांडाचे पहिले अठरा प्रसंग. पत्र १५१ पर्यंतचें लेखन बरें व जुनें आहे, त्यापुढचें नंतरचें आहे. या प्रतींतील अठरावा प्रसंग तो छापील प्रतींतील सतरावा च दिसतो. तो च अनुक्रम.

८१६ ] पोथी–पत्रें २६२ [ २५०

एकनाथ कृत भावार्थरामायणांपैकीं उत्तरकांड. प्रत जुनी आहे.

पण दुर्दैवानें शेवटचें च पत्र गहाळ झालें आहे. शेवटच्या पत्रावर लेखकाचें नाव व लेखनकाल असण्याचा संभव असतो.

ही गोष्ट आता अगदी ठरल्यासारखी झाली आहे कीं, सज्जनें प्रसिद्ध केलेलें श्रीमत् दासबोधादि श्रीसमर्थवाङ्मय व श्रीमत् ज्ञानेश्वरीची राजवाड्यांनीं छापलेली प्रत, यांशिवाय इतर प्राचीन ग्रंथ शुद्ध छापण्याची आजपर्यंत प्रकाशकांनीं पर्वा केली नाहीं व वाचकांनीं हि, आम्हास शुद्ध च पाहिजे, असा निष्ठुर आग्रह कधीं धरला नाहीं. जें जसें कोणी वाचकाच्या पदरात टाकलें तसें तें त्यांनीं मान्य केलें! निष्काळजी प्रकाशकांना उदार वाचक भेटले, म्हणून आजपर्यंत निभावलें!

शेवटच्या पत्रात किती ओंव्या गेल्या हें पाहण्यासाठीं छापील प्रत पाहिली. तींत ६३ व्या ओंवींत श्रीकृष्णाविषयीं " आसक्त होवोनि वनितीं। चोरावया हिंडतसे " असें छापलेलें आढळलें! प्रस्तुत प्रतींत 'वनितीं' नसून 'नवनीतीं' आहे.

## ८१७ ]

पोथी–पत्रें सुमारें ४०० [२००

एकनाथ कृत भावार्थरामायणापैकीं बालकांड, किष्किंधाकांड व सुंदरकांड अशीं तीन अपूर्ण कांडें व अयोध्याकांडाचें एक च पान. दुर्दशा पावलेली प्रत!

पुष्कळ प्रसंगाच्या आरंभीं " श्रीआनंदमूर्तिसद्गुरवे नमः " असें नमन असल्यामुळें आनंदमूर्तीच्या एकाद्या शिष्यानें ही प्रत केलेली असावी, असें वाटतें.

## ८१८ ]

पोथी–पत्रें ३८ [२८६

एकनाथी भागवताचा चवदावा अध्याय. फार सुंदर, नाथांच्या नंतर पन्नास वर्षांच्या आत झालेली प्रत. प्रत करणारानें आपल्या आवडीनें या एका च भक्तिरहस्य-अवधारण-अध्यायाची प्रत केलेली दिसते. छापील प्रतींत या अध्यायाच्या ५४८ ओंव्या आहेत, तर प्रस्तुत प्रतींत त्या ५३९ च आहेत. प्रतीच्या शेवटच्या पत्राची तळाची कड झडली असल्यामुळें काहीं महत्त्वाचीं अक्षरें लागत नाहींत. प्रतीचा शेवट :

स्वस्ति श्री नृपशालिवाहन शकें ॥ १५७० ॥ वर ( पे ) सर्वधारि नाम संवत्सरे। पुष्यमासें। कृष्णपक्षें। दसमीया। सुक्रवारें। तद्दिनें। करविरक्षे

× × × नारोऋषिंहि वाचो । येकादशस्कंदें । आध्या चवदावा । संपूर्णमस्तु ॥
... ... लिखितं चिखो नरसिंयं × × × × × ×

८१९ ] पोथी–पत्रें सुमारें ५०० [ २३५

कृष्णदासमुद्गल कृत रामायणयुद्धकांड

महत्त्वाची, पण अति दुर्दशा पावलेली प्रत. पहिलीं दहा पत्रें नाहींत, शेवटचे चार प्रसंग नाहींत. मध्यें च येचालिसाव्या प्रसंगाचे शेवटीं लेखनशक देण्याची लेखकाची लहर लागली, म्हणून आज आपणास प्रतीचा लेखनकाल समजण्याला साधन झालें. तो शक असा :

॥ " शके शालिवाहन ॥ १६२१ ॥ प्रमाथीनामसंवत्सरे कार्तिक शुद्ध तृतीया "

म्हणजे ही प्रत अठरा एकोणवीस वर्षांनी ८१४ च्या बाडाकाच्या हि पूर्वीची आहे.

८२० ] पोथी–पत्रें ८ [ १००

श्रीमत् शंकराचार्य विरचितं सौंदर्यलहरीस्तोत्रम्

शेवटी शक नाहीं, पण प्रत जुनी आहे. ८१३ शीं ताडून पाहण्यास योग्य.

८२१ ] पोथी–पत्रें २४ [ १००

बुद्धिविलास

मागील बाडांक ८११ शीं ताडून पाहण्यास योग्य.

८२२ ] पोथी–पत्रें १६ [ २००

व्यवहारसार नांवाचा ज्योतिषावरील संस्कृत ग्रन्थ—अपूर्ण

८२३ ] पोथी–पत्रें अवघीं ६
५८,६०,८२,९१, अंक उडालेले आणि १०१ वें [ ३५०

नाथपूर्वकालीन पोथी कृष्ण रुक्मिणी स्वयंवर? — उपाहरण ग्रन्थ

ज्ञानेश्वर आणि एकनाथ यांच्या दरम्यान जो तीनशें वर्षांचा काळ लोटला तोच काय केवळ अंधार च होता, या प्रश्नाचें नकारार्थी उत्तर देण्याला हा ग्रन्थ उपयोगी पडतो. या अपूर्ण ग्रन्थाची प्रथम ४१ पत्रें मिळाली ती कै. राजवाडे यांच्या दप्तरी होती व ती त्यांनी छटोप छापिलेली

भारत–इतिहास–संशोधक–मंडळाच्या १८३३ च्या अहवालांत महाभयास मिळतात. परंतु तचीं सहा पत्रें नंतर हातीं लागलीं. हा संपूर्ण ग्रंथ कधीकाळी उपलब्ध होईल काय ?

चोंभा हे गुरुतें नांव हि पूर्वी ठाऊक नसल्यामुळें कै. राजवाडे व प्रो. पोतदार यांनीं छापलेल्या देवदासकृत संतमालिकेंत कसा घोटाळा झाला होता, त्याचें आविष्करण भारत–इतिहास–संशोधक मंडळाच्या १८३५ च्या इतिवृत्तांत करण्यांत आलें होतें. एकानें ' चाव माव काम उपेश ' छापलें तर दुसऱ्यानें ' चाऊ भाउ कामदेश ' छापलें आणि पाहिजे होतें सरळ ' चोंभा येका प्रुपेश. '

## ८२४ ]

दोन सारख्या पोथ्या
पत्रें अनुक्रमें १२ व ६ [ २२६

( १ ) मुकुंदराज कृत विवेकसिंधु– पत्रें ११० ते १२१
( २ ) ज्ञानेश्वर कृत अमृतानुभव–पत्रें ४७ ते ५२
( ३ ) वरील दोन्ही ग्रन्थांचीं तीं तीं पत्रें शेवटचीं च आहेत, दोन्ही प्रती अगदीं सारख्या आहेत. सारखा आकार आहे व अक्षर एकाचें च आहे. अक्षर सुंदर आहे. विवेकसिंधूच्या शेवटीं लेखनशक दिला आहे, अमृतानुभवाच्या शेवटीं नाहीं, पण प्रती एका च वेळच्या असल्यामुळें विवेकसिंधूचा लेखनशक तो च अमृतानुभवाचा असला पाहिजे.
( ४ ) विवेकसिंधूचा शेवट : ' एवं ग्रंथ ॥ १६५० ॥ शके १६२० बहुधान्यसंवत्सरे कार्तिके शुक्लपक्षे दशमि गुरुवासरे लेखन समाप्त ॥
( ५ ) अमृतानुभवाच्या शेवटीं ग्रन्थसंख्येचा अंक ८०० आहे.
( ६ ) दोन्ही प्रती सुंदर असून त्या त्रुटित मिळाल्या याचें वाईट वाटलें.

## ८२५ ]

पोथी–पत्रें २६ [ २२७

रुद्रपद्धति म्हणून संस्कृत ग्रन्थ. शेवट :

संवत् शके १६२९ सर्वजित्नामसंवत्सरे श्रावण वदि त्रयोदश्यां पुणाख्यपर्गणांत एकुतपुरनामग्रामे सह्याद्रि पश्चिमभागे श्रीपरशुरामकृत शूर्पारकाख्यदेशोद्भवेन सावर्डेमहाल्मध्ये नंदिग्रामवासिना मोघे इत्युपनामकेन महादेवभट्टात्मजेन गणेशभट्टेनेदं पुस्तकमलेखि स्वार्थे परार्थे च ॥ अज्ञानदोषा मन्मतिविभ्रमाश्च यत्किंचिदूनं लिखितं मयेह तत्सर्वमार्यैः परिशोधनीयं प्रायेण मुह्यंति हि ये लिखंति ॥ १ ॥

८२६ ] अपूर्ण पोथी–पत्रें १७ ते २५ [ २४७
श्रीव्यंकटेशसहस्रनाम–शेवट :

इति श्री स्कांदपुराणे व्यंकटगिरिमहात्म्ये वसिष्ठनारदसंवादे व्यंकटेश-सहस्रनामचतुर्विंशोध्याय : ॥ संवत १६०९ प्रभवाब्दे भाद्रपद कृष्ण तद्दिने इदं पुस्तकं मुद्गलनामनः पर्वोपनाम्ना गोविंदेन लिखित्वा दत्तमस्ति

प्रतीच्या मागील बाजूस 'तिमणभट देवळे याचि पोथि' असा मजकूर आहे.

८२७ ] पोथी–पत्रें ५ [ १७५

गणेशदैवज्ञविरचित गोत्रप्रवरनिर्णयम्

लेखकाचें नांव शेवटीं आहे तें : " हस्ताक्षर बाळकृष्णरामराजदिनकर-रामदासस्येदं ॥ " बाळकृष्ण हे दिनकराचे पुत्र होत.

८२८ ] पोथी–पत्रें ८४ [ २४७
श्रीरामार्चनचंद्रिका

संपूर्ण, सुंदर प्रत. प्रतीचा शेवट :

श्रीसरपरमहंसपरिव्राजकाचार्यश्रीमन्मुकुंदवनश्रीचरणशिष्यानंदवनविर-चितायां श्रीरामार्चनचंद्रिकाया पंचम पटलः ॥ ५ ॥ शके १६०९ प्रभवसंवत्सरे श्रीमद्रामचंद्रसंतप्रीत्यर्थे भारोगणरठ नरदैवविचित्रिर्लिखित्वा दत्तमिदं पुस्तकम् ॥

८२९ ] पोथी अपूर्ण [ १५०
२४ पत्रांपैकीं १२ उपलब्ध

गणेशोपनिषद्

शेवट—" हस्ताक्षर निधिवासिस्थ बापाजीसुतरामदैवज्ञेन लिखितं श्रावण शुद्ध १२ भानुवासरे समाप्तं "

८३० ] एका कागदाचे तीन तुकडे [ १५०
पोर्पंत्रजा

गणेशपत्रं—श्लोकसंख्या २५

१८५६ गोंधळपुर्णी

८३१ ] पोथी–पत्रें ११ [२५०
फक्त १ लें पत्र नाहीं

आदित्यहृदयं स्तोत्रम्–श्लोकसंख्या १६८

८३२ ] पोथी–२ पत्रें [२५०
अपूर्ण

॥ रामाजि दिनकर रामदास गोस्वामिन् ॥ यांच्या सटीक भगवद्गीतेच्या पोथीचीं पहिलीं दोन च पत्रें

८३३ ] पोथीचें एक च पत्र [२४०
तें हि फाटकें पण प्रेक्षणीय

ब्रह्मपुराणांतील गंगामाहात्म्य या मूळ संस्कृत ग्रन्थाच्या १०४ व्या अध्यायाचें शेवटचें २३८ वें पत्र.

"शके १६१६...फाल्गुनशुक्लसप्तम्यां...पुण्यस्तंभनिवासिना...त्र्यंबकात्मजेन...श्रीमत् कउलगीरुपनामगोपाळेन गंगामाहात्म्यं लिखित्वा त्र्यंकेशचरणयोरर्पितम् ॥"

८३४ ] बाड–पृ. सं. ४९ × २ = ९८ [२४४

( १ ) नवग्रहमंत्रम्, शालिग्रामतीर्थमहिमा, ग्रामविचारः, पल्लिपतन–विचारः, भालूचा प्रश्न, सरड्याचा प्रश्न, वास्तुप्रकरणं, कांहीं इतर ज्योतिष प्रकरणें, ग्रहांशफळ

( २ ) 'शके १६७० त मोरोबा तानवडे यांचे घरीं मांडीं ठेवलीं त्यांची यादी' बाडाच्या पोटांत आहे व मलपृष्ठावर शके १६३१ चा सहज उल्लेख आहे.

( ३ ) शके १६१२ प्रमोदाब्दे माघ शु. ८ भौमवासरे वगैरेचें 'बाळकृष्णस्य जन्मपत्र'. बाळकृष्ण म्हणजे दिनकरांचे पुतणे.

८३५ ] बाड–पृ. सं. ५० × २ = १०० [ १५०

( १ ) तुकाराम, केशव, उद्धवचिद्घन, नामदेव, वामन, इत्यादिकांचीं पदपदार्तें

( २ ) मुकुंदराजविरचित परमामृत–प्रकरणें १४, वोवी ३२५

**८३६ ]** बाड-पृ. सं. ४८ × २ = ९६ [ १५१
मधली पृष्ठें २८ व २९ नाहीं

देवदास कृत त्र्यंबकेश्वरस्तोत्र-प्रतीचा लेखनकाळ शके १६९७

**८३७ ]** पोथी-पत्रें ६ [ १५०

ज्ञानदेव विरचित शुकाष्टक-ओ. सं. ४०

**८३८ ]** बाड पृ. सं. ४५ × ४ = १८० [ १२८

( १ ) या बाडांत ज्योतिषिक विविध माहिती आहे.

( २ ) पुढील प्रमाणें घटी, पळें इत्यादिकांसह सहा जणांच्या जन्मवेळा नोंदलेल्या आहेत : ( १ ) १७१८ आश्विन शु. ४ स अबाजी सोनईकर यास मुलगी झाली, ( २ ) दादभट जोशी याना एक पुत्र १७०८ आश्विन व. ६ स व ( ३ ) दुसरा पुत्र १७१२ भाद्रपद व. १४ स झाला, ( ४ ) त्र्यंबक जोशी याना १७०७ श्रावण व. १३ मुलगा, ( ५ ) १७१० भाद्रपद व. ६ स मुलगी व ( ६ ) १७१३ भाद्रपद व. ९ स मुलगा, अशीं अपत्यें झालीं.

( ३ ) ताम्रभस्मक्रिया, पुष्पत्रास क्रिया, सर्दुमीस औषध, खोकल्यास औषध, गंडमाळास औषध, अशा औषधांच्या क्रिया दिल्या आहेत.

( ४ ) पुष्करांचें वजन, चंद्रज्योतीचें वजन, बंदुकीचें वजन, अशीं वजनें दिलीं आहेत.

( ५ ) दशावतारजन्माचे श्लोक दिले आहेत.

**८३९ ]** पोथी-पत्रें ४ [ १५०
सिद्धलक्ष्मीस्तोत्रम्

**८४० ]** एक कागद [ १५०

श्रीरंगनारायण कृत कान्होपात्राचरित्र-ओवीसंख्या ७२
हें प्रकरण अप्रकाशित आहे, सर्व पाहावें. प्रकाशना योग्य.

८४१ ] शके १७४४ चें संपूर्ण पंचांग [११२

८४२ ] पोथी–पत्रें १२
पैकीं दुर्दैवानें ११ वें नष्ट [२००

लीलाशुकेन विरचितं श्रीकृष्णकर्णामृतस्तोत्रम्—श्लोक ११२

८४३ ] पोथी–पत्र १ [२५०

श्रीमत् शंकराचार्य विरचितं पंचरत्नस्तोत्रम्

८४४ ] दोन बाडें–पृ. सं. १७ व २५
व दोन पोथ्या–पत्रें २ व १७ [१५०

देवदास कृत व्यंकटेशस्तोत्राच्या चार अपूर्ण प्रती

८४५ ] पोथी–पत्रें ८, ७ वें नष्ट
हनुमत्कवचम् [२००

८४६ ] बाड–पृ. सं. ४१ × २ = ८२
शिवाय बरीं च पृष्ठें नष्ट [१५०

( १ ) तुकाराम, नामदेव, तुकयाबंधु, विष्णुदास विठा, रामेश्वर, केशव, ज्ञानदेव, जनी, एकनाथ, कबीर, मीरा, नागोराम, मत्स्येंनाथ, इत्यादिकांचीं पदपदांतरें, त्यांत कांहीं नवीन आहेत, तुकारामाचा मरणा विशेष.

( २ ) हिंदुस्थानी भाषेंत नामदेवांचें चरित्र–कडवीं ४१, बहुधा गोविंदकृत

( ३ ) जयरामसुत कृत द्रौपदीचा धांवा

( ४ ) उद्धवचिद्घन कृत गोराकुंभार व वहिरंभट यांचीं चरित्रें

( ५ ) उद्धवचिद्घनांच्या धर्तीवर दासमहिपति कृत केशवस्वामींचें चरित्र

( ६ ) जनजसवंत, कबीर, कमाल यांचीं अपूर्ण चरित्रें.

( ७ ) पंडित वैदिक अथवा दशग्रंथी । त्यांसी न पवती तुकयाची ॥ १

शास्त्रें हि पुराणें गीता नित्य नेम । वाचितां जें वर्म न पडे ठाईं ॥ २
वेद अभिमान वर्ण अभिमान । नाडले ब्राह्मण कळयुगीं ॥ ३
तैसा नोहे तुका वाणी देवसाई । भाव ज्याचा पाईं विठोबाचा ॥ ४
संतृताची वाणी बोलियला शुद्ध । म्हणे या अशुद्ध ऐसा कोण ॥ ५
मागें थोर थोर जाले कवीश्वर । नेलें कलेवर ऐसें कोणी ॥ ६
बहु हि वेदाचें केलें विवरण । अर्थ हि गहन करोनिया ॥ ७
म्हणे रामेश्वर सकळा पुसोनी । गेला तो विमानीं बैसोनिया ॥ ८

**८४७ ]** किरकोळ बाड–पृ. सं. ४३ × २ = ८६ [ १५०
पहिलीं २ नष्ट

कांहीं भाग ज्योतिषाचा असून शिवाय श्रीसमर्थ, मानपुरी, अनंत, माधव, नरहरि, एकनाथ, ज्ञानदेव, कृष्णदास, उद्धवचिद्धन, दिनकर, शिवदिनकेसरी, गोसावीनंदन, श्रीधर महानंद यांचीं पदपदांतरें.

**८४८ ]** किरकोळ जमारवर्ची बाड
पृ. सं. १२ [ ११६

( १ ) काचारविपळगांवचे बापुजीपंत कुळकर्णी यांची शके १७४० सालं रोजकीर्दीची वही.

( २ ) विप्ररामदास कृत नवरात्रावर एक पद

**८४९ ]** १०″ × ५″ पोथी–पत्रें १९८
जीर्ण प्रत, ठिसुळ कागद [ ११३

मुक्तेश्वर कृत सभापर्व–प्रसंग १७, ओ. २६००

( १ ) प्रतींत पंधरावा प्रसंग नाहीं व अगदीं आरंभींचीं तीन पत्रें नाहींत.

( २ ) प्रतीचा लेखनकाळ वगैरे : शके १६६३ माघ शुद्ध ७ रवौ " श्रीगुरुबाळकृष्णगोसावियांचे हस्तें भाव हस्ताक्षर मेघशाम गोसावि कसबे खिसगांव. " बाळकृष्ण हे दिनकरांचे पुतणे व मेघशाम हे बाळकृष्णाचे पुत्र होत.

**८५० ]** १०″ × ५″ पोथी–पत्रें १८१
दुसऱ्या प्रसंगाचें शेवटचें पत्र नाहीं [ १७५

मुक्तेश्वर कृत आरण्यपर्व–प्रसंग १७, ओ. २६३१

**८५१ ]** १२" × ५½" पोथी-पत्रें १२० [२००

मुक्तेश्वर कृत आरण्यपर्व- संपूर्ण, प्रसंग १८

**८५२ ]** ९½" × ५½" पोथी-पत्रें ३८ जीर्ण प्रत [२००

मुक्तेश्वर कृत आरण्य ( वन ) पर्व-पहिले ५ प्रसंग

**८५३ ]** उभें बाड-पृ. सं. ७१ × २ = १४२ सुंदर बाड-एकसारखें अक्षर [२००

मुक्तेश्वर कृत विराटपर्व-प्रसंग ८ संपूर्ण.
शेवटचें पान अर्धे फाटलें आहे व मधलीं काहीं तशीं च फाटलीं आहेत.

**८५४ ]** एका प्रचंड पोथीपैकीं एकटें एक पत्र [२००

हें पत्र वरील ८५० व्या क्रमांकाच्या पोथीच्या पोटीं होतें. मुक्तेश्वरांचीं पहिलीं चार व सौप्तिक अशीं पर्वें उपलब्ध आहेत व त्यामुळें त्यानीं सर्व पर्वें लिहिलीं असावींत अशी कल्पना करून बाकीच्या पर्वांची महाराष्ट्र वाट पहात बसला आहे. पण आम्हास वाटू लागलें आहे कीं, मुक्तेश्वरानीं बाकीचीं पर्वें लिहिलीं च नसावींत. त्यानीं लिहिलेलीं नेमकीं वरील पाच पर्वें वगळून बाकीचीं पर्वें विष्णुदास नामा यानीं लिहिलीं होतीं. म्हणून वाटू लागतें कीं तीं बाकीचीं पर्वें मुक्तेश्वरानीं लिहिलीं च नसावींत.

प्रस्तुतचें पत्र विष्णुदास नामा यानीं लिहिलेल्या द्रोणपर्वापैकीं दिसतें. तें जीर्ण झालें असून त्याच्या कडा झडलेल्या आहेत. तें पुढील बाडाकातील दिसत नाहीं.

**८५५ ]** ९" × ५½" पोथी-पत्रें १० अति जीर्ण द्रोणपर्व [२५०

अपूर्ण-ओवीसंख्या १ ते ११८. कोण कृत पाहिलें पाहिजे.

**८५६ ]** ८¾" × ४¾" पोथी-पत्रें ८ ते १६ शल्यपर्व-प्रसंग १ [२५०

दुर्दैव-अपूर्ण-ओ. ६५ ते १४९. कोण कृत तें शोधिलें पाहिजे. जीर्ण प्रत.

८५७ ] १३½" × ५½" पोथी–तीन च पत्रें
३१७, ३१९ व ३२० [२५०

संस्कृत आनुशासिक पर्वाची तीन सुंदर पत्रें.

८५८ ] पोथी–पत्रें ५६
अति जीर्ण प्रत [२५०

कृष्णदास दामा कृत आदिपर्व–अपूर्ण

(१) प्रसंग १, २ व ४ ते ८. मधला च तिसरा प्रसंग नाहीं. आहे त्या प्रसंगांची ओंवीसंख्या ७७७ भरते. कागद इतका जीर्ण आणि ठिसुळ झाला आहे कीं, पुन्हा हात लावण्याची सोय नाहीं! यास्तव शक्य आहे, अक्षरें जात आहेत. आहे त्याची एकवार प्रत करावी.

(२) संतकविकाव्यसूचींत ' नामाचे ऐवजीं दामा हें चुकून पडलेसें दिसतें ' असें म्हटलें आहे, तें बरोबर नाहीं. दामा असें स्पष्ट नांव या ग्रन्थांत शंभर वेळा आलें आहे. कृष्णदास किंवा विष्णुदास असा विकल्प आहे, पण सर्वत्र दामा च आहे.

(३) अनुक्रमांक ८४९ ते ८५८ पाहून अनेक अनुमानें सुचतात. एक तर एका काळीं हे सारे ग्रन्थ पूर्ण असून आज आमच्या अनास्थेमुळें त्यांची अशी दुर्दशा झाली आहे! आणि दुसरें श्रीसमर्थसंप्रदायिकांना रामायणाप्रमाणें च महाभारताचा हि चांगला परिचय असे.

८५९ ] पोथी–पत्रें ६
संस्कृत शिवकवचम् [१५०

८६० ] पोथी–पत्रें २
संस्कृत शालिग्रामशंसस्य फलश्रुतिः [१००

८६१ ] पोथी–पत्रें २१
संस्कृत [२·

पद्मपुराणे मायोपाख्याने रेणुकाभारताचे ओंकारपंचुगसंवादे शंकरप्रो श्रीरेणुकासहस्रनामस्तोत्रम् । संपूर्ण, सुंदर प्रत

८६२ ] पोथी-पत्रें २१ [१५०
मधलीं च काहीं नष्ट

श्रीसमर्थकृत सप्तसमासी-अपूर्ण

८६३ ] न शिवलेलें बाड-पृ. स. ४९ × २ = ९८ [१५१
फक्त पहिलें पान नाहीं

संस्कृत हनुमन्नाटक

( १ ) एकदर अंक १३ व श्लोकसंख्या ४४७. तिसऱ्या अंकाचे शेवटीं मजकूर आहे तो " यथाप्रतीन लिख्यते दोष न मृवत क्षमापण। शके १६९७ श्रावणे शुक्ल १२ गडमंडळस्थान लिख्यते "

( २ ) अकराव्या अंकाचे शेवटीं " यथाप्रति अवलोकन लिख्यते। प्रति बहुत जीर्ण मी काय करूं मजला दोष न० "

( ३ ) अगदीं शेवटीं मजकूर आहे तो • " पुस्तक जीर्ण यास्तव लेखण गाबाळ जालें। श्रीशके १६९७ दक्षणायणे वरुपारतो श्रावणमासे कृष्णपक्षे तिथौ चतुर्दश्यायां गुरुवासरे रामजन्मसमई समाप्त। लेखणस्थळ रेवातीमंडळें हस्ताक्षर सतचरणानुरज नीळकंठ। पूर्वंबधरचना हनुमत्कृत तें सिंधुगत असतां हेमाद्रपंति कहाडुन श्रीमदुसूदनाचार्य यानी इकुन तिकुन श्लोकसाहित मेळऊन ग्रंथ सज्ज केला आसे॥ "

८६४ ] मागील क्रमांकाप्रमाणें [१५२
न शिवलेलें बाड-पृ. स ७४ × २ = १४८

संस्कृत मुरारिनाटकरामायण

( १ ) अगदीं आरंभीं " प्रारभसवत् १८३२ भाद्रपद शुद्ध २ सोमवारे " देऊन " अथ समाप्ती " म्हणून पुढें एका ओळीची कोरी जागा सोडली आहे.

( २ ) तिसऱ्या अंकाऱ्या शेवटीं " स्वस्ति श्रीनृपविक्रमार्कें १८३२ तथा शालिवाहन १६९७ आश्विन कृष्णे १३ रविवारे " असा लेखनकाळ दिला आहे.

( ३ ) सहाव्या अंकाच्या शेवटीं एकूण श्लोकसंख्या ४१२ दिली असून सातवा अंक ४७ व्या श्लोकानंतर न लिहितां अपुरा च सोडला आहे.

(४) मागील बाडाचे लेखक ते च या हि बाडाचे लेखक आहेत. दोन्हीं बाडें सारखीं आहेत.

८६५ ] पोथी-पत्रें ९९
पैकीं पहिलें पत्र नष्ट [२५७
वैद्यकसार

(१) नांवाचा वैद्यकीचा महत्त्वाचा प्राकृत गद्य ग्रन्थ. इंग्रजींतील हुबेहुब Materia Medica च्या धर्तीवर औषधींच्या गुणधर्मीचें विवेचन करणारा वैद्यशास्त्राचा हा ग्रन्थ अपूर्व होय.

(२) त्याचें पहिलें पान नष्ट व्हावयास नको होतें! प्रत जीर्ण झाल्यामुळें मधून मधून कांहीं भाग-पण थोडा-उडाला आहे.

(३) प्रतीचा लेखनकाल वगैरे : " शके १५९९ पिंगलनाम संवत्सरे फाल्गुण सुध १० वार ब्रहस्पतवार ते दीसी वैद्यकसार पुस्तक कृष्णाजी नायेक भावार्थी यांच लीहीलें हस्ताक्षर दिन नारायण विठल पुढेगांवकर लीहीलें असे ॥ प्रतिष्ठान महानगरि । गोदावरिचीये तीरिं । मंथु लीहीला अवधारिं । वैद्यकसार संग्रहो ॥ १ ॥

८६६ ] पोथी-पत्रें ३८
शेवटचें च पत्र नाहीं [२००
श्रीमत् भगवद्गीता

८६७ ] अपूर्ण पोथी-पत्रें ४३
[३५०
विशेश्वरशिष्य विश्वनाथ कृत प्राकृत ओवीबद्ध ब्रह्मांडपुराण

(१) ८२३ तील चोंभा कृत उपाहरण ग्रन्थाच्या जोडीला हा एक दुसरा ग्रन्थ उपलब्ध होत आहे. त्याप्रमाणें हा हि दुर्दैवानें अपूर्ण आहे. ज्ञानेश्वरोत्तर आणि एकनाथपूर्वकालीन हा ग्रन्थ आहे. प्रत हि तत्कालीन आहे.

(२) भांबमर्यांच्या काळात किंवा त्याच्या पूर्वकाळात " झाला " असें कधीं सापडावयाचें नाहीं, " जाला " असावयाचें, " झाला " असें रूप आढळलें तर तें ऐतान नतरचें आहे, असें समजावें, अशी माझी आजपर्यंत समजूत होती. पण नाथाच्या हि पूर्वी लिहिलेल्या या ग्रन्थात सर्वत्र " झाला " असें रूप आहे.

**८६८ ]** पोथी–पत्रें ४ ते १४ = ११
ज्ञानेश्वरी अध्याय ९ वा [३००

ओवी २७ ते १२९, प्रत श्रीसमर्थकालीन.

**८६९ ]** पोथी–पत्रें ३ ते ४४ = ४२
वैद्यकीचा ग्रन्थ [२००

अपूर्ण असल्यामुळें ग्रन्थाचें नांव समजलें नाहीं. ८६५ याअंकाच्या नमुन्याचा ग्रन्थ, पण हा ग्रन्थ ओवीबद्ध आहे आणि तो गद्यात्मक आहे.

**८७० ]** पोथी–पत्रसंख्या १३५ [२४२

## मुकुंदराज विरचित विवेकसिंधु

सुंदर प्रत; ४०१, ४९३ प्रमाणें च; फक्त उत्तरार्धांतील सतराव्या आणि अठराव्या प्रकरणांतील एक एक पत्र हरवलेलें. शेवटीं एका पत्रावर प्रकरणवार ओवीसंख्या देऊन एकुणात दिलेली आहे : पूर्वार्ध प्रकरणें ७ ओवी ७७८, उत्तरार्ध प्रकरणें ११ ओवी ८७८, एवं संख्या प्रकरणें १८ ' वोवीयासंख्या १६५६. ' ४९३ त ही संख्या अनुक्रमें ७७० + ९१४ =१६८४ आहे. विचार करावा.

शेवटीं लेखनकाल दिला आहे, तो असा : " स्वस्ती श्री शके ॥ १६१४ अंगीरा नाम संवत्सरे सींमगा सुद आंष्टमी अदीत्येवार "

**८७१ ]** पोथी–पत्रें सुमारें ४००
जीर्ण, अपूर्ण प्रत [२५०

## दादोसुत मुद्गल कृत अश्वमेध

ग्रन्थ आणि ग्रन्थकार नवीन आहेत, म्हणजे पूर्वी अन्यत्र कोठें ऐकण्यांत नव्हते. ग्रन्थ प्रचंड असावा, पण त्याची दुर्दशा झालेली आहे. प्रस्तुत प्रतीचीं पहिलीं २३ प्रकरणें नसून तिचा २४ व्या प्रकरणापासून आरंभ झाला आहे व शेवट ५९ व्या प्रकरणांत झाला आहे. मधलीं हि दोन चार प्रकरणें नाहींत. २२६ ते ६५२ पत्रें आहेत. विषय गोड व वाणी प्रेमळ आहे. संपूर्ण प्रतीचा महाराष्ट्रानें शोध लावला पाहिजे.

**८८२ ]**

पोथी–पत्रें १५१ शिवाय
शेवटचीं थोडीं व मधून मधून कांहीं नष्ट [२७५

मैराळ संतिदास कृत हरिवंश–प्रसंग वेरा, ओवीसंख्या सुमारें १८००, ग्रंथ अप्रकाशित.

**८८३ ]**

पोथी–पत्रें २३८
फक्त ७ व्या अ. चीं व. चीं २१४ पानें नष्ट [१३३

एकनाथ कृत रुक्मिणीस्वयंवर

प्रतीचा लेखनकाल – १७२३ दुर्मति अ. ज्येष्ठ वद्य ५ भौमवार

**८८४ ]**

पोथ्या–पत्रें सुमारें ४००
अपूर्ण [१५०–२५०

एकनाथ कृत रुक्मिणीस्वयंवराच्या चार अपूर्ण प्रती. पैकीं तीन ग्रन्थाच्या पूर्ण आहेत.

**८८५ ]**

पोथी–पत्रें १७२
अपूर्ण [१७५

महीपति कृत भक्तविजय

अध्याय १ ते ९, अ. १७, २१, ३०–३२ आणि श्रीरामदासचरित्राचा अध्याय ४७ वा अपूर्ण, एवढे च अध्याय आहेत.

**८८६ ]**

पोथ्यांचीं मुद्रित पत्रें ३४ [२००

श्रीसमर्थ कृत सप्तसमासी, येकवीससमासी, पंचीकरणयोग व आत्माराम या प्रकरणांचीं मुद्रित पत्रें

**८८७ ]**

पोथी–पत्रें १४
शकुनवंती [१५०

**८८८ ]**

पोथी–पत्रें ७
[२११

स्कंदपुराणे काशीखंडे श्रीगंगासहस्रनामस्तोत्रम्–श्लोकसंख्या १००. लेखनकाल : संवत् शके १५६५ पार्थिवनामसंवत्सरे श्रावणमासे कृष्णपक्षे

ग्रन्थ प्रसिद्ध केला आहे, त्यांत गार्डा नांवाच्या पोर्तुगिजानें इ. स. १६९५ त लिहिलेल्या श्रीशिवचरित्रांत जो रामजीचा उल्लेख आला आहे, तो श्रीसमर्थां-विषयीं च असावा, या कल्पनेला बळकटी येत आहे. ( श्री रामदासी मालेंतील भाग २९ वा ' श्रीरामदासीचीं ऐतिहासिक टिपणें ' टिपण तिसरें पहा. )

८९३ ] पोथी-पत्रें ९ व २०
रघुवंश-सर्ग १ व २, ३ अपूर्ण [ १५०

८९४ ] छपन पूर्णापूर्ण संस्कृत प्रकरणें [ १००-३००

( १ ) आरुण्युपनिषद्—पत्रें २. शेवटीं पुढील मराठी श्लोक आहे:

न देखे चित्तंतु जगजडपटीं हा जन कसा ।
नसे ठावा आत्मा स्थिरचरजगीं जो कनकसा ।
जलक्षीरन्यायें जड अजड जाणोनि फुगले ।
न सर्वज्ञ ज्ञानी म्हणविति नमावे चि उगले ॥ १ ॥

( २ ) अथर्वणवेदरहस्ये उत्तरखंडे नारायणहृदयस्तोत्रम्—पत्रें ६

( ३ ) नंदिकेश्वरपुराणोक्त कालाग्निरुद्रोपनिषद्—पत्रें ४

( ४ ) नंदिग्रामस्थ केशवदैवज्ञ विरचित जातकपद्धति—श्लोक ४१, पत्रें १५

( ५ ) केशव कृत ताजकपद्धति—श्लोक २५, पत्रें १२. निराळा ग्रन्थ, बाकी ताजक म्हणजे जातकाचा च एक प्रकार.

( ६ ) सोमवतीव्रत—पत्रें ७, लेखनकाल वगैरे : शके १७१८ मार्गशीर्षमासे बापुभटात्मजसखारामेण पुण्यस्तंबक्षेत्रे लिखितम्

( ७ ) वर्षफलानि—पत्रें २२. अंतर्गत विधानांवरून मला असें वाटतें कीं, मूळ ग्रन्थ केशवांनीं शके १५२१ त लिहिला असावा व त्यावर हा ग्रन्थ म्हणजे विश्वनाथांनीं केलेली टीका होय. तज्ज्ञांनीं ठरवावें.

( ८ ) भावफलानि—पत्रें ९. प्रतीचा लेखनकाल १७२१ माघ शुद्ध १ मंदवासर. शिवतग्रामस्थित राजाराम नारायण यांनीं ही प्रत करून निधिवासस्थित अनंत जोशी यास अर्पण केलेली आहे.

(२४) मार्कंडेयपुराणे सावर्णिके मन्वंतरे देवीमाहात्म्यम्-दोन प्रती, एक पत्रें ३ ते १६, तेरा अध्याय व दुसरी प्रत पत्रें २-१२ व ३४-५९.

(२५) आदित्यहृदयस्तोत्रम्—पत्रें २३, पूर्ण प्रत. दुसऱ्या प्रतीचें एक च पत्र.

(२६) वृषभस्तुतिः—पत्रें २, श्लो. ४८, अपूर्ण

(२७) तीर्थनमस्कारमंत्रः—पत्रें १६

(२८) पार्थिवविधानें—अपूर्ण, पत्रें १० पैकीं ५ नष्ट. लेखनकाल : १७५३ पौष शु. १२ शनिवार.

(२९) श्रीस्कंदपुराणे नळशनैश्चरसंवादे नळप्रोक्तं शनिस्तोत्रम्—पत्रें ४, पैकीं २ रें कमी.

(३०) शिवकवचस्तोत्रं—पत्रें १४, पैकीं ११ व १२ नष्ट

(३१) विश्वेश्वरीपद्धतिः—पत्रें ४१, मधलीं थोडीं दुर्दैवानें नष्ट. ग्रन्थ सुमारें ३०० वर्षांमागचा.

(३२) अवधूतगीता—सात प्रकरणें पूर्ण, पत्रें ३१

(३३) संध्या—पत्रें २२, कांहीं नष्ट. जुनी प्रत.

(३४) रामकवच—पत्रें ९, अपूर्ण

(३५) प्रजापतिवै०—पत्रें ६

(३६) गृहस्थापनविधिः —पत्रें १६, अपूर्ण

(३७) भरतसावित्रीस्तोत्रं—पत्रें ११

(३८) श्राद्धकल्पः—पत्रें ३ ते ११

(३९) यजुषां वाजसनेयानां संध्याविधिः—पत्रें ३ ते ९. शेवटीं पुढील श्लोक दिलेला आहे तो, रामा ! जानवीं तोडणारांना आणि पाळणारांना, सर्वांना आदरणीय वाटो, अशी प्रार्थना आहे.

विप्रो वृक्षो मूलकं तत्र संध्या  
वेदः शाखा धर्मकर्माणि पत्रं ।  
तस्मान्मूलं यत्नतो रक्षणीयं  
छिन्ने मूले नैव वृक्षो न शाखा ॥ १ ॥

या श्लोकांत विप्र म्हणजे ब्राह्मण्य मानावें. ब्राह्मण्य रक्षावें आदरें । अशी आज्ञा आहे.

( ४० ) गणपतिपूजनं, मातृकापूजनं, नांदीश्राद्धं—प. १६

( ४१ ) सर्वोपनिषत्सारं—पत्र ९ वें, १० वें, १२ वें

( ४२ ) मुहूर्तमार्तंड—पत्रें २२, अपूर्ण

( ४३ ) हनुमत्कवचं—पत्रें ८, अपूर्ण

( ४४ ) भागवत—एकादशस्कंध—पत्रें अवघीं २४, अपूर्ण

( ४५ ) रुद्र—पत्रें ५६, अपूर्ण

( ४६ ) त्रिचाकल्पः —पत्रें ३ ते १५

( ४७ ) हेमाद्रिसंकल्पः —पत्रें १–८, अपूर्ण

( ४८ ) श्रि. दी. माधवीये वेदार्थप्रकाशके यजुरारण्यके सांहितासुपनिषदि अनुवाकाः —पत्रें ५२, अपूर्ण

( ४९ ) ब्रह्मपुराणे गौतमीमाहात्म्यं-पत्रें १५६, अपूर्ण

( ५० ) म. र. सं.-पत्रें २०, अपूर्ण

( ५१ ) ज्योतिषग्रन्थ-पत्रें ३-२७ व ४९ वें, अपूर्ण

( ५२ ) व्याकरणग्रन्थ-पत्रें ६४, अपूर्ण

( ५३ ) वामनपुराणे व्यंकटगिरिमाहात्म्यं-पत्रें ७८, अपूर्ण

( ५४ ) पारस्करानुसार प्रयोगपद्धति-पत्रें ४४, अपूर्ण

( ५५ ) दामोदरगुरुशिष्यकृत शूद्रधर्म-पत्रें १५७, अपूर्ण

( ५६ ) पंचसंस्कार, पंचामृतविधी, गोपालसहस्रनाम, रामानुजाचार्यकथितं रामपद्धतिपटलं, गोपालस्तवराज, हरिनाममाला, तुलसीमाहात्म्य, गजेन्द्रमोक्ष, माधवस्तवराज, चर्पटपंजरी, चौविसगायत्री, षोडशोपचारपूजा, गायत्रीहृदय, नारदगीता, गर्भगीता, सनत्कुमारसंहिता, विष्णुसूक्त इत्यादि संकीर्ण प्रकरणें-पत्रसंख्या १४३, हस्ताक्षर जयकृष्णदासजी अथवा वैष्णवध्यानदासजी यांचें.

८९५ ] पोथी-पत्रें ७ ते ३१ [२५०
अपूर्ण, जीर्ण प्रत

ब्रह्मवंसी, विष्णुवंसी व रुद्रवंसी अशा तीन प्रकरणांचा प्राकृत ज्योतिषग्रन्थ.

८९६ ] पोथी-पत्रें १२ [२१०
अनंतव्रताची पोथी

शेवटचा मजकूर- " भविष्योत्तरपुराणे कृष्णार्जुनसंवादे अनंतव्रत
रा. सं. २२

संपूर्ण ॥ ... शके १६४६ क्रोधि नाम संछर मार्गेश्वर शुद्ध १० दसमी ते दिवसि समाप्त ॥ दस्तक नन्दूर भट जोसी ... "

# ८९७ ]

पोथी–पत्रें १–३, ८–३३, ३६–३७, शेवटचें एकादें च नष्ट [ २००

सटीक काळज्ञान ग्रन्थ. मूळ संस्कृत श्लोक ४४ व ओवीसंख्या ३८१. शेवटचें च पृष्ठ नसल्यामुळें ग्रन्थकाराचें नाव कळत नाहीं. ग्रन्थ महत्त्वाचा आहे. त्यात हटयोग, लययोग, मंत्रयोग, राजयोग, इत्यादि विषयाचें प्रतिपादन आहे.

परि केलियाविण करणि । केवि सिद्धिते पावे प्राणि ।
जैसा भोजनेविण कल्हणि । तृप्त नव्हे ॥ ३२९
नांतरि परदिपिचि वार्ता । नेत्र न घाति ऐकतां ।
यात्रा केलियाविण तरता । न पवणे जेवि ॥ ३३०
तैसें शाब्दि प्रतिपादन । करित असति सर्व जन ।
परि आंगि जेवि साधन । न घडे कवणा ॥ ३३१
जो साधुन पाहिल । तयासि देहसिद्धि होइल ।
येर ते अवघडि पडतिल । काळामुखि ॥ ३३२

# ८९८ ]

पोथी–अति जीर्ण
मधलीं मधलीं अर्धी ३१ पृष्ठें [ २००

नाना रोगावरील औषधें

# ८९९ ]

बाड–पृ. सं. २२ × ४ = ८८
बरीं च नष्ट, सुस्पष्ट बाड [ ३००

( १ ) ब्रह्मांडपुराणे उत्तरकाडे अध्यात्मरामायणे श्रीरामहृदयं नाम प्रथमोध्याय : – श्लोक ६० हल्लींच्या प्रकाशित ग्रन्थात अगदीं आरभीं जें अध्यात्मरामायणमाहात्म्य दिलेलें असतें, तें च हें.

( २ ) पट्चक्र, षड्विकाराः, सप्तधातवः, षड्रूर्मयः

( ३ ) देहचतुष्टयानिर्णयः ( पचीकरण, अष्टविंशतितत्त्वें, अजपा-गायत्रीमंत्र, महावाक्यें इत्यादि )

( ४ ) श्रीशंकराचार्यविरचितं रामाष्टकस्तोत्रम्

( ५ ) कोरी जागा पाहून या बाडात मधून मधून दिनकरांचे पुत्र रामचंद्र यानीं स्वतः स्वतःचे काहीं श्लोक लिहिले आहेत.

९०० ] बाड-पृ. सं. १७ × ४ = ६८ [ ३०० 
अवशिष्ट भाग, संस्कृत बाड

( १ ) गुरुमाहात्म्य, ( २ ) ब्रह्मांडपुराणे नारदागस्तिसंवादे श्रीहनुमत्कवचस्तोत्रम्, ( ३ ) काहीं सुभाषितें–उदाहरणार्थ–कस्यचित्किंमपि नो हरणीयं। मर्मवाक्यमपि नोच्चरणीयं। श्रीपतेः पदयुगं स्मरणीयं। लीलया भवजलं तरणीयं ॥

याशिवाय मागच्या बाडाप्रमाणें या हि बाडांत कोरी जागा पाहून रामचंद्रांनीं स्वहस्तें पदपदांतरें लिहिलीं आहेत.

९०१ ] बाड-पृ. सं. ३४ × २ = ६८ [ २२१ 
ज्योतिषाचें बाड

गोपिराजदैवज्ञसुत रामकृष्णकृत गोत्रनिर्णय वगैरे लहान प्रकरणें
बाडाचा लेखनकाल शक १६१५

९०२ ] बाड-पृ. सं. २० × २ = ४० [ २५० 
दोन्ही बाजूचीं कांहीं नष्ट

प्रत्येक पानावर एक एक प्रश्न व त्याचें उत्तर, अशीं चाळीस प्रश्नोत्तरें आहेत. प्रश्नांचीं उदाहरणें :

" गायास गेलिया कार्य होईल की नव्हे, हा उदीम करीता बरवे की काये, हे केले टेविता लाभ होईल की नव्हे, हा रोगु बरवा होईल की नव्हे, हे गुरू गेल ते गवसल की काये, हे रांण येईल की न ये, यासी लेकरे काये गुण नव्हती, गर्भीनीस पुत्र की कन्या होईल, आवंदा कटक होईल की काये " इत्यादि

९०३ ] उधवलेलें बाड-पृ. स १२ × २ =२४ [ १५० 
कोण जाणे किती नष्ट

( १ ) प्रातः स्मरामि भवभीतिहरं सुरेशं। श्लोक ४
( २ ) प्रातः स्मरामि रघुनाथमुखारविंदं। श्लोक ६
( ३ ) प्रातः स्मरामि खलु तत्सवितुर्वरेण्यं। श्लोक ४
( ४ ) प्रात स्मरामि शरदिंदुकरोज्वलाभां। श्लोक ४
( ५ ) येकश्लोकी सहस्रनाम, येकश्लोकी गीता, येकश्लोकी भागवत, येकश्लोकी भारत, सप्तश्लोकी रामायण
( ६ ) चर्पटपंजरी, काहीं सुभाषितें, वगैरे

**१०४ ]** बाड-पृ. सं. १३ × ४ = ५२ [१५०

(१) श्रीसमर्थ, ज्ञानदेव, अनंतप्रभु, आनंदतनय, नामदेव, एकाशिवराम, गंगाधरसुत, मच्छनाथ, रामीरामदास, केशव, तुका यांचीं पदपदांवरें

(२) ज्ञानदेव कृत हरिपाठाचे व नाममाळेचे अभंग

**१०५ ]** बाड-पृ. सं. १२ × ४ = ४८
शिवाय १४ × ४ = ५६ नष्ट [१५०

" श्रीमद्भटरुमदामसुतनाटारकृतापन्याख्या "

**१०६ ]** बाड-पृ. सं. १५ × ४ = ६०
आ. व शे. चीं ६।६ नष्ट [१००

(१) ब्रह्मांडपुराणे क्षेत्रखंडे श्रीमल्लारीमाहात्म्ये श्रीमल्लारीकवचं, (२) ज्ञानदेव कृत नमन

**१०७ ]** बाड-पृ. सं. १६ × ४ = ६४ [१२

या बाडांत पांच पन्नास मंत्र, यंत्रें, चोडगे दिलेले आहेत. उदाहरणार्थ-गुराशी रोग न व्हावा, मिरगी जाण्याचा, सर्व वेथावरी, श्रोत्यांचे समई पहिलवाना सन्मुख म्हणावयाचा, दाताचा, पोटशूळाचा, इत्यादि मंत्र दिलेले आहेत व हींव जाण्याचें, भूतचेष्टा न होण्याचें, बाळकाशी दृष्टि न होण्याचें, चोराचें भय नसण्याचें, पित्तें जाण्याचें, इत्यादि यंत्रें दिलेलीं आहेत. जारण, मारण, उच्चाटण, सर्व कांहीं आहे.

**१०८ ]** बाड-पृ. सं. ८ [२१६

जन्मपत्रिकापद्धतिः—लेखनकाल गतकलि ४८२१-लेखक देवकृष्ण-सुत श्रीकृष्ण

**१०९ ]** पोथी-प. सं. १५० × २ = ३०० [२००

महादेवी नांवाचा ज्योतिषाचा एक प्रचंड ग्रन्थ. त्यांत शक १५४०, १५५१ इत्यादि शकांतील उदाहरणें दिलेलीं आहेत.

९१० ] पोथी-प. सं. ८१ × २ = १६२ [२००

खेटरत्नाकर नांवाचा ज्योतिषग्रन्थ

९११ ] पोथी-प. सं. ३५ × २ = ७० [२००

तिथिरत्नाकर नांवाचा ज्योतिषग्रन्थ

९१२ ] पोथी-प. सं. ४२ × २ = ८४ [२००

चिंतामणिरत्नाकर नांवाचा ज्योतिषग्रन्थ यांत शक १५५६ चीं उदाहरणें घेतलीं आहेत.

९१३ ] पोथी-प. सं. २९ × २ = ५८ [२५०

पंचांगसारणी ग्रन्थ. यांत १५४४ पासूनचीं उदाहरणें घेतलीं आहेत.

९१४ ] पोथी- प. स. ८ × २ = १६ [२००

लघुयवनजातक ग्रन्थ. यवन नांवाचे एक मुनि होते.

९१५ ] पोथी-प. सं. २० × २ = ४०
शारदातिलक संस्कृत ग्रन्थ [२००

९१६ ] पोथी-एक च पत्र
अनिरुद्धसरस्वतीदेवतामंत्र [४००

मंत्राचें महत्त्व आहे च, पण लिपी ४०० वर्षांपूर्वींची आहे.

९१७ ] पंचांग-शके १७६७ चें
फाल्गुन महिन्याचें शेवटचें पृष्ठ नष्ट [८९

९१८ ] पोथी-पत्रें ३ ते १४ [२५३

राजावळिपुस्तकम्

लेखनकाल वगैरे : " शके १६०३ दुर्मतिसंवत्सरे चैत्राधिक वद्य ३० भौमवासरे तद्दिने पुस्तकं समाप्तं हस्ताक्षर रामभट्टेन लिखितं आत्मार्थं ॥ "

११९ ] पोथी– पत्रें २९ [२४०
फक्त मधलें ११।१२ चें जोड पत्र नाहीं.

मेघमाळा–प्राकृत ग्रंथ

( १ ) एकवार छापला गेला पाहिजे. ग्रंथाला आरंभ केला आहे तो : ईश्वरु कैलासीं। सावधान येकांतीं पार्वतीसी। हास्यवदन जगदेश्वरीसी। बोलता होये ॥ १

( २ ) अनुभव पाहण्यासाठीं कांहीं ओव्या देतों :

पौष शुद्ध मासे। अभ्र सरळें आकाशें। शत तारका चौथी असे। सौरस आषाढ शुध चौथीस पडे सत्तराग्र प्रजन्य ॥ २३ ॥ पुस शुध सप्तमी अष्टमी नवमी। पुर्वीचे अभ्र वीजु दिसे व्योमीं। आषाढ शुध मासीं। मेघवर्षे सप्तद्वीपीं ॥ २४ ॥ पुंस वद्य सप्तमी। अभ्र दिसे व्योमीं। तरि श्रावण शुध सप्तमी। प्रजन्यु होये ॥ २५ ॥ पुंस वद्य चतुर्दशी। अभ्र दिसे आकाशीं। तरी भरवसा मानिसी। भरद्वाचा ॥ २९ ॥ पुंस वद्य अयसे। आकाशीं अभ्र वसे। तरी पाऊस पुनर्वसाचा ॥ ३० ॥ माघ शुध पाडवा। मेघु नीरत्ता देखावा। प्रजन्यु सांगावा। पुष्याचा ॥ ३१ ॥ माघ शुध बीजे। मेघु नीरखा पाहिजे। पाउस भाकिजे। आश्लेषाचा ॥ ३२ ॥ माघ शुध तीजे। मेघु मंदळीं देखिजे। पाउस बहु सांगिजे। मघाचा ॥ ३३ ॥ माघ शुध चौथी। आकाशीं मेघ दिसती। तें पाउस धरिंपे हातीं। पूर्वांचा ॥ ३४ ॥ माघ शुध पंचमी। अभ्र देखसी व्योमीं। उदक होईल संभ्रमी। उत्तराचा ॥ ३५ ॥ माघ शुध षष्ठी। आकाशीं दिसे अभ्राची दाटी। पाउसाची परी मोठी। हस्तु वर्षे ॥ ३६ ॥

( ३ ) लेखनकाळ वगैरे : " शके १६१६ भावा संवत्सरे कार्तिक शुद्ध ९ भौमवारे तद्दिनीं मेघमाळा पुस्तक समाप्त। हस्ताक्षर मोर जोसी मुळे भिगारकर ॥"

१२० ] पोथी–पत्रें ६ [२३१
अति जीर्ण कागद

मंगळपद्धतिः अथवा मंगळपूजाविधिः

लेखनकाळ वगैरे—" संवत १७५९ सहनो श्रावण वदी पडवा लीखीतं पंड्या हरीरामेण स्वहस्तं "

**९२१ ]** पोथी–पत्रें ४ अति जीर्ण कागद [२३५

## सर्वतोभद्रदेवतापूजनम्

लेखनकाल वगैरे—" इद पंड्या हरी रामस्य मानजी नरोतमस्य पुस्तक ॥ संमत् १७५५ म्हनो जेठ सुध ११ पुस्तकं लीखीत "

**९२२ ]** पोथी–पत्रें ५ ते १२ [१६५

शक १६११ तील महमदाची पोथी

**९२३ ]** एक महत्त्वाचें पत्र [२८४

संकष्टचतुर्थीव्रताच्या पोथीचें शेवटचें पांचवें पान. श्रीस्वानुभवदिनकरकर्ते दिनकर यांच्या वडिलाचें नाव नन्हेर व आजोबाचें नाव कोनेर होतें. त्या कोनेराच्या हातची ही पोथी होती, म्हणून या एका हि पानाचें महत्त्व विशेष होय. त्यावरील शेवटचा मजकूर :

" शकें १५७२ विकृति नाम संवत्सरे आषाढ वदि १ गुरौ तद्दिने गणेशचतुर्थीव्रत सपुर्णमस्तु पुस्तक कोनेर ज्योसि भिंगारकर तस्य पुस्तकं..."

**९२४ ]** पोथी–पत्रें ७ मधलें ६ वें नाहीं [२५०

## प्रजापतिं वै

या पोथीचें महत्त्व असें कीं, ती बहुधा दिनकराचे वडील नन्हेर याच्या हातची असावी. पोथीच्या पहिल्या पत्रावर मजकूर आहे तो : " प्रजापतिं वै नन्हेर पाठकस्य पुस्तक "

**९२५ ]** पोथी–पत्रें ८ शिवकवच [२५०

शेवटचा मजकूर–" इति श्रीमत्स्कंदपुराणे ब्रह्मोत्तरखंडे शिवकवचकथन नाम द्वादशोध्याय ॥ १२ ॥ ... हें पुस्तक वासुदेव भटात्मज योगिराजेन लिखित ... "

# १२६ ]

पोथी-पत्रें २

[२५०

( १ ) पहिल्या पत्राच्या वर चार ओळी आहेत त्या :

॥ श्री भागवत एकादशस्कंधारंभं ॥
॥ नन्हेर जोसि कसबे भिंगारकर मूळे ॥ छ ॥
॥ तस्य सूत बहिनाजी गोसांवि ॥ श्रीराम ॥ छ ॥
॥ तस्य सूत रामचंद्र गोसावि ॥ जयराम ॥ छ

पहिली ओळ एकाच्या हातची, दुसरी व तिसरी दुसऱ्याच्या च हातची व चवथी ओळ आणखी निराळ्या च हातची आहे.

( २ ) दुसऱ्या पत्राच्या पाठीमागें भागवताची आरती आहे ती रामचंद्र कृत असून त्यांच्या च हातची दिसते.

आरती भागवताची

भागवतग्रंथ केवळ मोक्षाचा गाभा ।
भावें श्रवण करितां मुक्ति सुलभा ।
भाव भक्ति विवेक वैराग्य गाभा ।
भावें पुस्तकसंग्रह ज्ञानाच्या शोभा ॥ १
श्री देव जय देव जय श्री भागवत श्री जय भागवत ।
श्रवणें पठणें सहजें जड जिव जीवन्मुक्त ॥ ध्रु० ॥
गर्जुनि वेदव्यासें भक्ति ज्ञान भाग ।
ग्रंथ केला नारदभाषें अव्यंग ।
गणना करितां अपार पुण्याची सीग ।
गति मति गर्व अहंकृति निरशे दुसंग ॥ २
वर्णिलि भगवत्कीर्ति चरित्रें अपूर्व ।
वर्णिलें सगुण निर्गुण स्वरूप स्वयमेव ।
वर्जुनि माया ममता स्थापुनि भक्ति भाव ।
वर्णाश्रमधर्म रक्षुनियां सर्व ॥ ३
तथ्यविचारें पाहातां ग्रंथ आद्यत ।
तत्वस्वरूप केवळ राजा परीक्षित ।
तरणोपायासाठीं शुकदेव वदत ।
तत्वमसि वाक्यें तन्मय दिनकरसुत ॥ ४
१८५६ पौष शु. ८

९२७ ] पोथी–पत्रसंख्या १४ × २ = २८ [२५०
गायत्रीरहस्य

यो नोऽस्माकं तु जीवानां स्वस्मिन् बुद्धिः प्रचोदयात् ।
तस्य देवस्य सवितुर्भर्गो नित्यमुपास्महे ॥ ४
संध्योपासनया मुख्येरपरमात्मा परमेश्वरः ।
वर्ण्यते तच्च गायत्रीरहस्यं परमार्थिकम् ॥ ५

९२८ ] पोथी–पत्रें १९ [२००
कुमारसंभव–सर्ग पहिला

" इति श्रीपदवाक्यप्रमाणपारावारपारीणश्रीमहोपाध्यायकोलच-
मल्लीनाथसूरिविरचितायां संजीविनीसमाख्यायां प्रथमः सर्गः ॥ १ ॥
॥ श्रीमद्वृत्रारिसपत्नवातानुजाग्रजाय नमः " ॥

९२९ ] पोथी–पत्रें ११ [१५०

श्रीदिवाकरदैवज्ञात्मजविश्वनाथदैवज्ञविरचितचंद्रग्रहणाधिकारः ।
यांत शके १५४२ मार्गशीर्ष शुद्ध पौर्णिमेचें उदाहरण घेतलेलें आहे.

९३० ] उसवलेलें बाड–पृ. सं. २४ × २ = ४८ [२००

प्रश्न व मुहूर्त पाहण्याचा प्राकृत ग्रन्थ

९३१ ] एक सबंध कागद [१५०
अनंतव्रत

प्राकृत–९६ ओव्या – शेवटच्या ओव्या नसल्यामुळें कोण कृत तें पाहिलें पाहिजे.

कोण पूर्वी यातें आचरला । केवी मृत्युलोकीं प्रकाशला ।
हे सर्व श्रुत करी मजला । अनंतव्रत श्रीकृष्णा ॥ ४४
नामीं वसलें त्याचें चित्त । तयासी सादृश्य मी अनंत ।
त्याचीं संकटें निवारित । निजभक्त म्हणोनियां ॥ ९६

९३२ ] बाड–पृ. स. ६ × २ = १२ [१५०
संतमालिका

(१) संतमालिका ९५ व्या ओवीपर्यंत असून पुढचीं पृष्ठें गेलेलीं असल्यामुळें ही मालिका कोणी केलेली आहे तें ओव्याकरून ठरविलें पाहिजे.

जय जया जी पंढरीनाथा । भक्तवत्सला रुक्मिणीकांता ।
तूं चि माझी माता पिता । बंधु सुल्लता तूं गणगोत ॥ १
रामदासाची भक्ती देखोनी । ठाकोनि आलासी द्वारकेहुनी ।
वाळभर सुवर्ण घालता त्यानीं । पारडें उचलोनि वर गेलें ॥ ६२
हें सर्व संताचे सुयेंकरोनि । कीर्ति ऐकिली चक्रपाणी ।
त्याचा विश्वास धरोनि मनीं । तुझे भजनीं लागलों ॥ ८०

(२) या बाडाची एक विचित्र तऱ्हा पाहिली कीं, त्याचें लिहिणें उर्दुपद्धतीप्रमाणें शेवटून आरंभाकडे आलेलें आहे. असें मराठी बाड दुसरें आढळलें नाहीं.

९३३ ] किरकोळ बाड–पृ. सं. १२ × २ = २४ [२०२

(१) सखा (कृत द्रौपदीचा धांवा, ओवी १०), एकनाथ, श्रीधर, एकाचिवराम, तुका, यांचीं पदपदांतरें

(२) बाडाचा लेखनकाल–१६५४ श्रावण व. १२. हस्ताक्षर बापु मल्हार क्षा तिसगाउ याचें

९३४ ] गहत्वाचें पण दुर्दशा पावलेलें बाड
पृ. स. २५ × २ = ५० [२००

विवाय आरंभीं आणि शेवटीं मिळून १०० पृष्ठें सहज गेलीं असावींत.

(१) अगदीं आरंभीं "लीलाभागवतें दशमस्कंधे पंडित कृत महाराष्ट्रवचनें" यात ते सतरा असे सहा अध्याय आहेत. अर्थात् पहिले अकरा अध्याय आरंभींच्या नष्ट झालेल्या पृष्ठांत गेले. बाराव्या अध्यायाचे हि आरंभींचे ५८ श्लोक गेले आहेत. या उपलब्ध सहा अध्यायांचे मिळून २८१ श्लोक होतात. काव्याच कर्ते पंडित मला ऐकून ठाऊक नव्हते. काव्य श्लोकपद्य अवन सरस आहे. उपलब्ध आहे तेवढें सुद्धा प्रकाशना योग्य आहे. श्लोकाचा सहज एक नमुना देतों :

नाना वर्दे कुतर्के वाप करिती नाना मतें स्थापिती ।
नाना वाद विवादती परमती उच्छेदिती भांडती ।

वेदांसी तरि हे अभिन्न म्हणती भेदें किती गर्जती । ( )
तो हा सुंदर गोपसूनु नटला येथें यशीं श्रीपती ॥ १६

( २ ) नंतर दिवाकरात्मज रामचंद्र यांचीं श्लोकांचीं सुमारें आठ नऊ दशकें आहेत, म्हणजे एकूण ८०।९० श्लोक आहेत. त्यांचा मासला

तुजविण मज रामा न भ्रमे सर्वथा ही ।
घटि पळ युग जातें तें युगासाम्य पाही ।
झडकरि करुणाब्धी येई या येकि वेळा ।
दिनकरतनयातें अंगिकारी दयाळा ॥ १ ॥
परम सदय तूतें चित्त मी जाणतों रे ।
म्हणउनि करुणा हे भाकितों पै तुतें रे ।
जननि जनक बंधु सर्व ही तूं स्नेहाळा ।
दिनकरतनयातें अंगिकारी दयाळा ॥ २ ॥

## ९३५ ] महत्त्वाचें पण दुर्दशा पावलेलें एक बाड–पृ. सं. ७७ × २ = १५४ [२५०

( १ ) या बाडांतील बहुतेक लिहिणें दिनकरांच्या हातचें आहे. त्याच्या दोन्ही बाजूंनीं किती तरी पृष्ठें गळून नाहींशीं झालीं आहेत. उरलेलीं पृष्ठें मूळ बाडाच्या एक तृतीयांश असावींत. इतकीं तरी ठिकाणावर राहिलीं हें आपलें भाग्य होय.

( २ ) या बाडांत दिनकरांचीं पदपदांतरें विपुल आहेत. शिवाय श्रीसमर्थांची हि बरी च कविता आहे. तान्हाजी कवि कृत दहा श्लोकांत कृष्णचरित्र आहे. शिवाय कबीर, अमृत यांचीं पदपदांतरें असून अनेक सुभाषितें आहेत.

( ३ ) श्रीसमर्थांची जी कविता आहे तींत दासबोधांतील १४-१-१ ते ३२ ओव्या उतरलेल्या आहेत व पंचीकरणयोगांतील पहिले चार योग उतरून घेतले असून त्यांना अनुक्रमें अतर्कळा जगज्जोती, ज्ञानयोग, तत्त्वयोग व भक्तियोग अशीं नावें योजिलेलीं आहेत.

## ९३६ ] कांहींसा उमगलेला गळांठा [१००–१५०

या एकंदर संग्रहाचें मूळ स्वरूप कसें होतें त्याची कल्पना होण्याला या गळांठ्याचा थोडासा उपयोग होणार आहे.

( १ ) गणेश कृत श्रीरामदासांची आरती, ( २ ) तुकारामरामदासांच्या अभंगांचा कागद; ( ३ ) ब्रह्मास्त्रप्रयोगमंत्राचा कागद, ( ४ ) दिनकर कृत गणेशशारदासमर्थ यांच्या नमनाचे दोन श्लोक, ( ५ ) मध्वनाथ कृत 'राघोबा आवड माझी वेडी' असें वीस कडव्यांचें पद, ( ६ ) पार्वतीस्तवनं, ( ७ ) मेरु व अनंतकवि यांचे श्रीसमर्थांवरील श्लोक- 'परंधाम चिद्रूप' व 'सह्याद्री- गिरिचा' ( ८ ) पंचीकरणाचा कागद, ( ९ ) सात दिवारांच्या अष्टकांचा कागद, ( १० ) अथर्वणरहस्ये उत्तरभागे लक्ष्मीनारायणहृदयं, ( ११ ) मेघमाळा ग्रन्थाचे दोन कागद- निराळी प्रत, ( १२ ) सर्व ज्वरावर औषध, ( १३ ) शत्रुविध्वंसिनीस्तोत्राचा शेवटचा भाग, ( १४ ) संध्येच्या पोथीचीं पांच पत्रें, ( १५ ) नक्षत्रांचा नकाशा, ( १६ ) श्रीरामस्तव- एका सुंदर पोथीचीं दोन च पत्रें ( १७ ) जनीच्या अभंगांचा कागद, ( १८ ) कांहीं प्रश्न- एका बाडाचीं ९ ते १२ जोडपृष्ठें, ( १९ ) 'सर्वोपनिषदाख्यं ग्रन्थं' चीं १, ६, ७, १३ व १४ अशीं पत्रें असून त्यांत मांडुक्य, जाबाल, कैवल्य, कालाग्निरुद्र व नारायण या उपनिषदांचे भाग असून शेवटीं अतिवर्णाश्रमि- लक्षणांना आरंभ झालेला आहे. ( २० ) आदित्यहृदयं- अपूर्ण, हस्ताक्षर- 'बाळ जोशी गों धर्माधिकारी ग्रामउपाध्ये निवृत्ग्रामकर,' ( २१ ) वामन- पुराणे व्यंकटगिरिमाहात्म्यं-दोन पत्रें, ( २२ ) बहुधा चयनजातकाच्या पोथीचीं तेरा पत्रें, ( २३ ) पंचसंस्काराः, ( २४ ) श्रीशंकराचार्यविरचितानि सरस्वतीद्वादशनामानि, ( २५ ) हनुमन्नाटकरामायणाचें शेवटचें पत्र-शक १६९७ तील, ( २६ ) रेणुकासहस्रनामस्तोत्राचें शेवटचें पत्र ( २७ ) रघुवंशकाव्यांतील दोन पत्रें ( २८ ) भूमिरंतरिक्षवाद्मण-तीन पत्रें-संपूर्ण, शेवट: " शके १६७१ ईश्वर नाम संवत्सरे कार्तिक वद्य १३ इदं पुस्तकं नानभटात्मजबाळंभट जोशी गों धर्माधिकारी कसबे तीसगाव त्याचे असे", ( २९ ) सारसंग्रहे तुलसीमाहात्पारणं प्रकरणं-एक पत्र, पठनार्थी वैष्णवध्यानदासजी, ( ३० ) महापुराणे कार्तिकमाहात्म्ये प्रथमोध्याय: , ( ३१ ) 'केशवीचें उदाहरण'- चार पत्रें, ( ३२ ) शिशुपालमहाकाव्याचें एक पत्र-जुनी प्रत, सुंदर अक्षर, ( ३३ ) माधवाचार्य कृत वेदार्थप्रकाशाचें एक पत्र, जुनी प्रत, अति सुंदर अक्षर, ( ३४ ) वैश्वदेव-एक पत्र, ( ३५ ) संस्कृत भागवत एकादश स्कंद-पत्रें ६० ते ६७, सुंदर प्रत, ( ३६ ) प्रवरनिर्णय-एक पत्र, ( ३७ ) औषधाचा कागद, ( ३८ ) भार्गवसुत कृत पदाचा कागद,

( ३९ ) नरहरि कृत महिषासुरमर्दिनीची आरती, ( ४० ) तुकयाबंधूंच्या अभंगाचा कागद, ( ४१ ) आपोशनविधिः, ( ४२ ) नामदेवाच्या अभंगांचा एक कागद, ( ४३ ) भारत–आदिपर्व, ५७ ते ५९ अर्धी १३"×६" आकाराचीं पत्रें, अक्षर अप्रतिम, ( ४४ ) मुहूर्तचिंतामणीचीं दोन पत्रें, (४५) एका हिंदुस्थानी पदाचा कागद, त्यात जसवंत आणि रामदास यांचीं नावें आलीं आहेत, (४६) ताम्रमत्स्यक्रिया, (४७) श्रीधरब्रह्मानंदकृत एकवीस कडव्यांचा अभंग, ( ४८ ) शुकरंभासंवादः, श्लो. २०– "संवत् १७५९ शके १६२४ प्रवर्तमाने कार्तिक शुद्ध तृतीया सोमे भटमाधवेन लिखितं पठ्या श्रीहरीरामकस्येदं पुस्तकं", ( ४९ ) ओवीबद्ध रामायण–एक पत्र, कृष्णदासमुद्गल व एकनाथ यांशिवाय कोणाचें तरी, ( ५० ) रामनामलक्षउद्यापनं–एक पत्र, (५१) कागदाचा तुकडा–त्यावर पुढील अर्धवट अभंग, त्याचें शेवटचें कडवें राममार्गे येणें कृतकृत्य होणें। रामदास म्हणे स्वानुभवें ॥ ९ ॥ ( ५२ ) कार्तवीर्यकवचं–एक पत्र, ( ५३ ) शंकराचार्यविरचित भवानीभुजंगस्तोत्रं–एक पत्र, ( ५४ ) आनंदतनय कृत अभंगाचा कागद, ( ५५ ) कोणी दत्तात्रयविप्रानें आपल्या शिष्यासाठीं केलेल्या सर्वोद्धार ग्रन्थाचीं दोन च पत्रें. ग्रंथ उपयुक्त असावा, पण इलाज काय ! विदुषां ब्राह्मणानां च गणकानां तथैव च । एतेषां हितवद्ग्रंथः सर्वोद्धाराभिधः स्मृतः ॥ ८ ॥ पूर्वसागरपर्यंताद्यावत्पश्चिमसागर. । हेलया क्रमते नित्यं स मां पातु दिनेश्वरः ॥ ९ ॥ उदयाचलपर्यंताद्यावदस्ताचलं मही । दत्तात्रयकृतस्तस्मात्सर्वोद्धारश्च विश्रुतम् ॥ १० ॥ ( ५६ ) श्रीगणेशं नमस्कृत्य केशरीनामपद्धते : । गणितं विश्वनाथेन क्रियते बालबोधये ॥ १ ॥ —एक च पत्र, ( ५७ ) श्रीसमर्थपूर्वकालीन लिपींत लिहिलेलीं श्लोकबद्ध कृष्णचरित्राचीं चार पत्रें, ( ५८ ) वास्तुशांतिप्रयोग, ( ५९ ) "येकिवीस समासी" चें एक पत्र, ( ६० ) "तत्पदार्थद्वयस्त्वंपदार्थशुद्धवर्णनं नाम चतुर्थ प्रकरणं... वोवियासंख्या ॥ १०५ ॥" असा मथळा असलेलें पोथीचें एक जीर्ण पान. एक ओवी लागते ती : माया कवणाचि शक्ति । किं पृथक आहे ईंचि व्यक्ति । ईश्वर कैसा आणि जीव कोण हे युक्ति । सांगिजे स्वामि ॥ ३ ॥ ( ६१ ) श्रीसमर्थकृत मानसपूजेचीं चार पत्रें, ( ६२ ) नांदीश्राद्ध–शेवटचें पत्र, "हस्ताक्षर बाबाभट जोसि तिसगांवकर तस्य सुत त्रिंबकभटेन लिखितं ॥ सके १६९९ नंदनाम संवत्सरे श्रावण वद्य ११ सोमवार...", ( ६३ ) ज्ञानदेव कृत गीतासार–तीन पत्रें, "शके १६७१ अधिक मासे

कृष्ण पक्षे तिथि पतोथि वास्तव्य कालपि मिता समाप्ता ", ( ६४ ) श्रीधर ब्रह्मानंद कृत ' पूर्ण ब्रह्म होय रे वर्णूं आतां काय रे । नंद ज्याचा वाप जाणा येशोदा ती माय रे ॥ ' ( ६५ ) कथाकल्पतरु–एक पत्र, ( ६६ ) सीतारामसंवादाची दोन पत्रें, ( ६७ ) रत्नयामळे परमहंसरहस्यां गौरीकल्प । उमामहेश्वसंवादे गुरुस्तोत्रम्–एक पत्र, अक्षर सुंदर, जुना नमुना, ( ६८ ) शिवादिन कृत " भला भला पंढरिच्या पाटला हरि तूं धांव गड्या ॥" ( ६९ ) समर्थ कृत–एक पृष्ठ , ( ७० ) कालिदास विरचितं मंगलाष्टकं–एक पत्र, ( ७१ ) बगलामुखिपद्धति:–शेवटचें पत्र, १६२४ तील, ( ७२ ) मत्स्यपुराणे एकादशीव्रतोद्यापनकथा–शेवटचें पत्र, १६७० तील, सदाशिवतनुरजेन जनार्दनेन लिखितं, ( ७३ ) विधीचिंतामणी–शेवटचें पत्र, १७०२ तील, त्र्यंबकभटात्मज बाजिभट उपनाव मुळे, ( ७४ ) शक १५६० चें उदाहरण घेतलेल्या एका ज्योतिषरत्नाकराचें पहिलें पत्र, ( ७५ ) सामुद्रिकशास्त्रे पुरुषस्त्रीशुभाशुभलक्षणानि–शेवटचें पत्र, १७१२ तील, हस्ताक्षर राजाराम बापदेव जोशी मुळे का॥ तीसगाव..., ( ७६ ) वैद्यकाचा एक अपूर्ण ग्रन्थ, अध्याय १० वा, पत्रें ८, ( ७७ ) विष्णुदासनामा, तेरा पत्रें, ( ७८ ) एका ओवीबद्ध संतमालिकेचीं १० पत्रें, तेरा दिवस उदकांत । तुकयाचे अभंग बुडाविले होते । तुवां उभे राहोनि जळांत । कोरडे चि ग्रंथ रक्षिले ॥ ७१ ॥, ( ७९ ) हनुमंतवडवानलस्तोत्रं – एक पत्र, ( ८० ) दिवाकरराम जाचे अभंग – दोन पत्रें, ( ८१ ) आदित्यपुराणे प्रल्हादकृत ऋणहर गणपतिस्तोत्रं – शेवटचें पान, ( ८२ ) साठ संवत्सरांचें फळ – पत्रें ५, ( ८३ ) ओवीमिश्र गुप्त पंथ हा सांपडे । गुज ठाईं पडे योगियांचें ॥ ३६ ॥ पत्रें ४, ( ८४ ) एका जुन्या बाडाचें शिल्लक राहिलेलें नुसतें लठ्ठ पृष्ठीपत्र – त्यावर रथारूढ सूर्याचें व इतर दोन, अशीं तीन प्रेक्षणीय चित्रें असलेलें.

## १३७ ] न उमगलेला गठ्ठा [१००–३५०

१३६ पेक्षा तिपटीनें मोठा आहे. तो चाळून पाहिला, पण फारसा उमगला नाहीं. तो सारच आहे, असें कोणी समजूं नये. मला उमगलें नाहीं, तें इतरांना जरूर उमगेल.

या सर्व संग्रहावरून वाचकांस सहज अनुमान होईल कीं, श्रीसमर्थांचे वेळीं हें फार मोठें विद्यापीठ असलें पाहिजे. या सर्व पीठाची प्रस्तुतची

देण्यावरच्या गेल्या शंभर वर्षांतली आहे. या शंभर वर्षांत च त्याचें मूळचें ध्येय सुटलें व सर्वांनसोबत त्याना हि निराळी दिशा लागली. त्यामुळें सर्व मठाची आज वाताहत झालेली आढळते. आपल्या ऐन वैभवाचे वेळीं तिसगावचें विद्यापीठ म्हणजे धर्मग्रंथाचें एक प्रचंड भाडागार च असलें पाहिजे, असें अनुमान होतें. प्रत्येक मठातील प्रमुख सचालक मठपति ज्या गुणानीं आणि विद्यानीं विभूषित असे, त्या गुणाची आणि विद्याची त्या त्या मठात विशेष उपासना व्हावी, हें स्वाभाविक होय. दिनकराच्या घराण्यात पूर्वजापासून वैदिक कर्म तर चालत च होतीं, पण त्यात हि मुख्य भर ज्योतिष आणि वैद्यक या दोन शास्त्रावर विशेष होता, असें प्रस्तुतच्या संग्रहावरून दिसतें. आज हि या दोन शास्त्राचा ज्याना व्यासग असेल, त्याना या संग्रहात पुष्कळ अपूर्व खाद्य आढळेल, असें वाटतें.

१८३१ वैशाख शु. १३ सोमवार, दिवसरात्र, वृद्धेश्वराच्या सानिध्यात काढून दुसरें दिवशीं बीडास जावयास निघालों. त्या खेपेला बीड येथें आणखी बरा च संग्रह मिळाला, तो घेऊन वैशाख व. ४ स श्री. रघोत्तमराव महारुद्र देशपांडे ऊर्फ देसाईसाहेब याच्या

## केज गांवीं

पोंचलों. सहज आठवतें, आदल्या दिवशीं मार्गात एका झाडाखालीं स्वयपाक होऊन यावटळीनें पानात केर उडतो च आहे, वर उन्हानें डोकें तापतें च आहे, अशा थाटात भोजन झालें होतें तों दुसऱ्या दिवशीं देसाईसाहेबाकडे चागेंत थंडगार, हवाशीर बगल्यात पेशवाई थाटाचें जेवण मिळालें. या गावीं तीन मठ आहेत, निदान तेव्हा होते, एक रामदासी मठ, दुसरा बालाजी मठ आणि तिसरा मारुतिमठ. रामदासी मठातील विद्यमान पुरुष ७०।८० वर्षांचे आहेत, पण त्याना मठाची परपरा माहीत नाहीं. " श्रीसमर्थांचे कोणी उद्धव म्हणून शिष्य होते, त्याचा हा मठ. चाळीस वर्षांपूर्वीं आपले वडिल नवद वर्षांचे होऊन वारले, ते सागत कीं, उद्धव हे जाबभागातील होते, त्याचें उपनाम दशपुत्रे होतें, ते ब्रह्मचारी असून हिंडत हिंडत येथें येऊन राहिले होते. उद्धवानीं शिष्यसप्रदाय केला नव्हता, पण त्याचा पुतण्या येथें येऊन राहिला होता, त्याची बायको लक्ष्मीबाई ६०।७० वर्षामागें ८०।९० वर्षांची होऊन वारली, ती आपण पाहिली होती, " अशी माहिती मठपति देतात. श्रीसमर्थांच्या शिष्यमडळींत तीन उद्धव होते, असें दिसतें : एक

टांकळी व इंदुरबोधनचे प्रख्यात पद्माभिमानी, दुसरे उद्धवबाळक म्हणून श्रीसमर्थप्रतापांत दोनदां संबोधिलेले व ते च हे केजचे नरसप्पास हे तिघे. या उद्धवांची समाधि मात्र येथें आहे. गांवाच्या ईशान्य बाजूला जांभळीचे वृक्षाखालीं मोठा चबुतरा असून वर समाधि आहे. मठांत ग्रन्थसंग्रह नाहीं. बालाजीमठांत शके १६११ त राघवांनीं लिहिलेला संदेहहरण नांवाचा, ४१४८ ओव्यांचा ग्रन्थ, नकल करून घेण्यापुरता मिळाला. समर्थांच्या संप्रदायी नक्कल केलेले जे ग्रन्थ आहेत, त्यांची नोंद शेवटीं एका च जागीं करूं, त्यांत संदेहहरणाची ही प्रत नोंदूं. मारुतिमठांत मुकेश्वरांच्या चार च पर्वांची प्रत, १७३१ त केलेली व ज्ञानेश्वरांची उत्तरगीता असे ग्रन्थ पाहण्यांत आले. या गांवीं जो थोडा संग्रह मिळाला तो असा :

## केजचा संग्रह

९३८ ]

बाड–पृ. सं. १५ × ४ = ६०

महत्त्वाचें बाड .[ २५०,

( १ ) बाड उसवलेलें असल्यामुळें १५ व्या पृष्ठानंतरचीं पोटांतील सुमारें तितकीं च पृष्ठें दुर्दैवानें हरवलेलीं आहेत.

( २ ) बाडाच्या मुखपृष्ठावर "पंचरत्नें श्रीहनुमंतादि समर्थकृत" असा मथळा असून आंत १५ व्या पृष्ठापर्यंत पंचाध्यायी चे चार अध्याय आहेत. या च पंचाध्यायीला दासगीता म्हणून संबोधण्यांत येतें. दुर्दैव म्हटलें तें अशासाठीं कीं, ही दासगीता दहा पाच ठिकाणीं उपलब्ध झाली असून नेमका पांचवा अध्याय च उपलब्ध नाहीं, तो या बाडांत असावा, तर नेमकीं तीं च पृष्ठें हरवलेलीं आहेत! नंतर भीमरूपी महारुद्रा हें स्तोत्र व फणिवर उठवीला हें अष्टक असून " इति श्री पंचरत्नें " संपूर्ण केलीं आहेत. अर्थात् मधलीं जीं पृष्ठें नष्ट झालीं त्यांत, असल्यास पंचाध्यायीचा पांचवा अध्याय व दोन रत्नें गेलीं!

( ३ ) नंतर कोपला रुद्र जे काळीं हे सहा श्लोक व हिणाहूनि मी हीण जैसे भिकारी हे पांच श्लोक असून शेवटीं

देवें दयाळें करुणा करावी । भक्ताभिमानें धरणी धरावी ।
हें रामनौमी तरणी तरावी । दासां समस्तां भरणी भरावी ॥

या श्लोकानें बाड संपविलें आहे.

**९३९ ]** पोथी–पत्रें ५८ [१०७

रत्नाकर कृत उपदेशरत्नाकर–ओ. सं. २३१
प्रतीचा लेखनकाल–१७४१ ज्येष्ठ व. ७ भृगुवासर

**९४० ]** बाड–पृ. सं. ३१ × ४ = १२४
दोन्ही बाजूंचीं कांहीं नष्ट [१५०

(१) अमदास विठ्ठल कृत द्वापारीं हनुमंतभेट–प्रसंग दोन, ओवीसंख्या ११५ + ११० = २२५

(२) एकनाथ कृत दानाव्रत–ओ. १४८, भावार्थरामायणांतील रामपार्वतीसंवाद–ओ. ११९ व अनुसयाख्यान–ओ. ६०

(३) विठ्ठलसुत शामा रामदासी कृत शिबिचक्रवर्तीची कथा–ओ. १४०

(४) कृष्णदासमुद्गल कृत युद्धकांडापैकीं रामबिभीषणभेट–ओ. १०७

(५) रावणमृत्यसमयीं रावणबिभीषणभेट–अपूर्ण

**९४१ ]** पोथी–पत्रें २४ + १० = ३४
कांहीं नष्ट [१००

या पोथींत दोन प्रकरणें आहेत, पण आम्हांस तीं बरोबर उमगलीं नाहींत. एकाचें नांव काळीदासआदि दिसतें व दुसऱ्याचें नंदनचरित्र असें दिसतें. काळीदासआदीचे दोन अध्याय दिसतात, दुसरा अपूर्ण आहे. पहिल्या अध्यायाची शेवटची ओवी :

इति श्री काळीदास आदिचें आख्यान । श्रोतीं श्रवणावें सावधान ।
येका जनार्दनी नारायेण । विप्र जाणा कवी वदे ॥ ६५

नंदनचरित्र हि अपूर्ण आहे. त्याची पहिली ओवी :

नंदनपुरिं नंदननृप । विरोचनमंत्री दिव्ये स्वरूप ।
उभये राजी स्वस्तरूप । विनोद भूपें योजिला ॥ १

**९४२ ]** बाड–पृ. सं. ४४ × २ = ८८
आरंभींचीं ४ पानें नष्ट [१५०

( १ ) तुकाराम कृत दामाजीपंतावर अभंग–कडवीं १४, अपूर्ण, अभंगाचा आरंभींचा भाग गेला आहे.

( २ ) अनंत कृत अहिमहिआख्यान–श्लोक १७

( ३ ) अनंत कृत गरुडआख्यान–श्लोक ६०

**९४३ ]** बाड–पृ. सं. ७४ × ४ = २९६ महत्त्वाचें, सुंदर अक्षराचें [ २५०

( १ ) हें बाड बहुधा डोमगांवाहून येथें आलें असावें. तें कल्याणस्वामींच्या शाळेंतील दिसतें. कागद जीर्ण झाल्यामुळें आरंभींचीं आणि शेवटचीं कांहीं पृष्ठें सुटलीं आहेत व कांहीं नष्ट हि झालीं आहेत.

( २ ) या बाडांत प्रथम चौदा शतकें असून नंतर स्फुट ओव्या आहेत. स्फुट ओव्या म्हणजे अभंग च. हीं शतकें व ओव्या श्रीरामदासी ग्रन्थमालेंतील तिसऱ्या भागांत छापलीं आहेत, तरी या बाडाचें महत्त्व आहे च. तिसऱ्या भागांत ज्या स्फुट ओव्या छापल्या आहेत त्यांचा क्रम अभंगांच्या चरणाच्या संख्येप्रमाणें लावलेला दिसतो. पण या बाडांत ते अभंग त्या क्रमानें लिहिलेले नसून विषयानुरोधानें लिहिलेले दिसतात. उदाहरणार्थ, तिसऱ्या भागांतील १४०, २८५, ५५, १४१ व ५६ हे अभंग या क्रमानें वाचून पहा, किंवा १०६ च्या नंतर ७६ वा वाचा, किंवा १४४ ते १४९ या अभंगांच्या पूर्वी २७ वा अभंग वाचा, म्हणजे या बाडाची उपयुक्तता पटेल. या क्रमानें हे अभंग या बाडांत लिहिलेले आहेत व हें च धोरण सर्व अभंग लिहिण्यांत सांभाळिलें आहे.

**९४४ ]** पोथी–पत्रें ४ श्रीराममनसंध्या [ १००

**९४५ ]** बाड–पृ. सं. ३५ × २ = ७० कांहीं पृष्ठें नष्ट–जीर्ण बाड [ २५०

( १ ) आरंभीं पठनसंकेत–प्रसंग तिसरा–याच्या ५१ ते ११७ ओव्या आहेत. कोण कृत न कळे. प्रकरण ऐकण्यांत नाहीं. पुत्रकामेष्टि करून दशरथानें मिळविलेल्या पायसाचा कथाभाग या प्रकरणांत आहे.

( २ ) विठ्ठलदास कृत शंकरकृत रुक्मिणीस्वयंवर–प्रसंग १–४

(३) श्रीसमर्थ, गोपाळनंदन, ज्ञानेश्वर, कोन्हेरनंदन गंगाधर, केशव, राघवचिद्घन यांचीं पदपदांतरें

(४) या बाडाचें महत्त्व असें कीं, त्यांत उद्धव कृत तीन गोपीगीतें आहेत. हा केजचा संग्रह असल्यामुळें हे उद्धव केजचे च असावेत. अर्थात् ही माहिती नवीन आहे. गीतें लहान, पण गोड आहेत. त्याचीं अनुक्रमें ३५, २३ व ९ कडवीं आहेत. प्रत्येक गीताचा आरंभ आणि शेवट देतों. गीतें प्रकाशित व्हावीं.

## पहिलें गीत

आरंभ—अक्रुरा सवें नीघतां हरी । गोपी गोवळ सर्व घाबिरी ॥ १
कृष्णजीविणे काये हो जिणें । व्यर्थ हे भुमीस भार जाणणें ॥ २
कृष्ण आमुचा प्राण जातसे । सदनीं सुख या कोण पां असे ॥ ३

शेवट—गोपीगीत हें आवडी मनें । वदविलें खरें श्रीजनार्दनें ॥ ३३
कृष्ण गाइजे कृष्ण ध्याइजे । कृष्ण कृष्ण कृष्णरूपें कृष्ण पाहिजे ॥ ३४
कृष्णजी वळी रामदास हो ॥ दीन उधव शरण त्यासी हो ॥ ३५

## दुसरें गीत

आरंभ—अक्रुरा मनीं क्रूरता वसे । कृष्ण आमुचा जीव नेतसे ॥ १
व्रजवधु जनीं विव्हळा मनीं । शरीर कंपिती पडती आवनीं ॥ २
उठती त्या बळें धांवती सळें । अक्रुरावरी शब्द आगळे ॥ ३
निर्दया दया ये चि ना कसी । कठिण अंतरीं कणव नेणसी ॥ ४
नाम हें तुझें साच तूं करी । कृष्ण देउनी सौख्य हें मारी ॥ ५

शेवट—दीन जनासी तो रंजवी हरी । भक्तपाळ तो कौतुकें करी ॥ २१
गोपीगीत हें आवडी मनें । वदविलें खरें श्रीजनार्दनें ॥ २२
कृष्ण श्रेष्ठजी रामदास हो । दीन उधव शरण त्यासी हो ॥ २३

## तिसरें गीत

आरंभ—चालवी रथा सारथी पुढें । गोपिका मनांत होत साकडे ॥ १
विविध यातीच्या वदती गोपिका । प्रथम कानडी मुख्येनायेका ॥ २

पुढचीं चरणें कानडींत आहेत. कानडी समजत नाहीं. नुसते शब्द उतरतों.

शेवट—गोपीगीत ये दोड प्रीतीना । याई आनती श्रीनी जनार्दना ॥ ८
रामदासदा दास दीनवा । नीनकाळ तां बीदे उधवा ॥ ९

यावरून पण आपणांस इतर भाषा बोलणाऱ्या गोपींचीं हि गीतें उद्धृत असलीं पाहिजेत, असें होतें.

**९४६ ]** उसवलेलें बाड–पृ. सं. ४२ × २ = ८४ [ १००

श्रीधरानंदांचे सदानंद सरस्वती किंवा मुनि कृत जयदेवकृत अष्टपदी वर टीका

**९४७ ]** वखरवजा वंद ५ ते २४ मोडी लिपींत [ १००

अमृतराय कृत कटावबद्ध शुकरंभाआख्यान

**९४८ ]** दुर्दशा पावलेलें बाड–पृष्ठें २० [ २००

उमें, आडवें फाटून, पृष्ठें नष्ट होऊन, दुर्दशा झालेलें एक जीर्ण बाड. त्यांत एक महत्त्वाचें प्रकरण होतें. मला ठाऊक नाहीं, पण तें अन्यत्र हि कोठें उपलब्ध नसल्यास दुर्दैव म्हटलें पाहिजे.

त्यांत शिवानंदयोगेश्वर कृत द्वान्द्वास्टवंशावळी नांवाचें, २१४ ओव्यांचें, एक महत्त्वाचें प्रकरण होतें. त्याचा लेखनकाल–" श्री शके १६५७ प्रभव नाम संवत्सर कार्तिक मोल सप्तमि शुक्रवारि ॥ कथिली द्वान्द्वास्ट-वंशावळी ॥ " ' मोळ ' हा बहुल शब्दाचा अपभ्रंश दिसतो. पण १६५७ ला प्रभव संवत्सर नव्हता व कार्तिक वद्य ७ ला शुक्रवार हि नव्हता. प्रभव संवत्सर १६६९ ला होता व त्याच्या कार्तिक वद्य ७ ला शुक्रवार हि होता.

**९४९ ]** थोडा गळाठा त्यांत एक पृष्ठ पंचसमासीचें [ १००–२००

या दोन्हांतील शेवटचा मुक्काम अंबा जोगाई येथें वैशाख वद्य ५ स झाला. अनेक दृष्टींनी हें ठिकाण महत्त्वाचें आहे. तेथें एक दोन श्रीसांप्रदायिक मठ आहेत व, पण

## थोरले देवघर व धाकटे देवघर

या दासोपंतांच्या दोन संस्था प्रेक्षणीय होत. दासोपंतांइतका मराठींत प्रचंड वाङ्मय निर्माण करणारा दुसरा ग्रंथकार झाला नाहीं, हें म्हणणें

निवार सत्य होय.. ती त्यांची सारी ग्रन्थसंपत्ति या दोन देवघरात व या गावीं इतरत्र पहावयास मिळते. या अपार संपत्तीपैकीं फार च थोडी आतांपर्यंत उजेडात आली आहे. ती सर्व संपत्ती प्रकाशित करण्यासाठीं एक स्वतंत्र संस्था च निर्माण झाली पाहिजे. तशी वेळ येईल तेव्हा खरी.

कल्याणस्वामींचे शिष्य तद्वल्लेमठपति जगन्नाथमहाराज, त्या जगन्नाथाचे शिष्य गदाधर, त्या गदाधराचे दोघे पुत्र नारायण व शिवराम यांचे या गावीं दोन निरनिराळे मठ परंपरेनें चालत आले आहेत. पैकीं शिवरामाचा मठ आमच्या पाहण्यात आला.

घोडदरा, मुकुंदराजांची समाधी, दासोपंताची समाधी, रेणुका देवी इत्यादिकांचें येथें दर्शन घडतें. कोणी काळजी न केल्यामुळें इतस्ततः पडलेले शिलालेख कैक दिसतात.

## अंबा जोगाई येथील संग्रह

**९५० ]** पोथी-पत्रें ३९९ [ ९८

हनुमंतस्वामी कृत श्रीसमर्थांची बखर

सुंदर, संपूर्ण, बाळबोध लिपींत लिहिलेली प्रत. तिचीं तेरा प्रकरणें आहेत. घाडाक २५ त, तेरावे प्रकरणाच्या शेवटीं असलेला जो मजकूर दिला आहे, तो च या हि प्रतींत आहे. प्रत १७५८ त झालेली असून हस्ताक्षर " गोविंदबावा रामदासी क्षेत्र आंबे जोगाईकर " याचें आहे.

**९५१ ]** पोथी-पत्रें १ ते १४७ [ ३५०

श्रीदिगंबरानुचर दासोपंत कृत गीतार्णव ग्रन्थापैकीं नवव्या अध्यायाच्या पहिल्या चवदा श्लोकांवरील टीकात्मक २६७९ ओव्या.

प्रचंड आकाराची, सुंदर टपोऱ्या अक्षरांची, प्रेक्षणीय प्रत. प्रत बहुधा खुद्द दासोपंताच्या हातची असावी. तिचा आकार १२३/४" × ६३/४" आहे.

**९५२ ]** पोथी-पत्रें १ ते १५१ [ २३९

दासोपंत कृत गीतार्णवापैकीं नववा अध्याय-संपूर्ण, ओवीसंख्या ४०६५. एक पहिलें पत्र मागाहून कोणी लिहिलेलें आहे.

लेखनकाल वगैरे : " शके १६ सोळासें १७ सतरा वर्षे शालीवाहन नाम ( यु ) वा नाम संवछरे दक्षिणायने श्रावणमासे कृष्णपक्षे ११ येकादश्यां रविवासरे चद्रपुरस्योत्तरदेशे मामल नाम ग्रामे माधव पुत्र ( पोत्तमे ) ण स्वपरोपकारार्थं लिखितं "

९५३ ] पोथी-पत्रें १० ईशावास्यार्थप्रकाशः [२००

" श्रीमदादिगुरुदत्तात्रेयदिगंबरानुचरविरचिते ज्ञानकांडे ईशावास्यार्थप्रकाशः समाप्तः ॥ वाल्मीकपुरवासिना गोविंदकार्तांतिकेन लिखितम् ॥"

कार्तान्तिक = ज्योतिषी

९५४ ] पोथी-पत्रें १० केनोपनिषदर्थप्रकाशः [२००

"श्रीमदादिगुरुदत्तात्रेयदिगंबरानुचरविरचितः केनोपनिषदर्थप्रकाशः"

९५५ ] पोथी-पत्रें ४८ कठोपनिषदर्थप्रकाशः [२००

" श्रीमदादिगुरुदत्तात्रेयदिगंबरानुचरविरचिते ज्ञानकांडे कठवल्ल्युपनिषदर्थप्रकाशः "

९५६ ] पोथी-पत्रसंख्या २३९ [२००

श्रीदिगंबरानुचर किंवा श्रीदिगंबरदूत कृत अवधूतराज ग्रन्थ-प्रकरणें १ ते २१. ग्रन्थ महत्त्वाचा आहे.

९५७ ] पोथी-पत्रें १ ते १०५ त्यांतील पत्र ७७/७८ नाहींत [१००

श्रीदिगंबरानुचर दासोपंत कृत ग्रन्थराज

९५८ ] पोथी–पत्रें ७५ [२००

दासोपंत कृत मन्थराज ग्रन्थाची दुसरी प्रत. या प्रतीवरून हा ग्रन्थ शके १८३६ त पुणें येथील भारतेतिहासंशोधक मंडळामार्फत प्रसिद्ध झालेला आहे.

९५९ ] पोथी–दोन महत्त्वाचीं पत्रें व एक किरकोळ कागद [२५०

पत्रें संस्कृतांत असून त्यांत स्वपक्षपालसंज्ञो गुरुः म्हणून दासोपंतांचा गौरवपूर्वक उल्लेख करून त्यांच्या जयंतीचा आणि पुण्यतिथीचा असे दोन्ही दिवस नमूद केलेले आहेत, ते असे :

" अग्निमुनिवेदेंदुगणिते " " परिधाविनि संवत्सरे भाद्रपदे मासि कृष्णाष्टम्यामारद्रानक्षत्रे चंद्रोदयवेलायां चंद्रवासरे मातुरुदरादाविर्भूव ॥ " असें म्हणून १४७३ शक दिला आहे. परिधावी संवत्सर १४७४ ला असावा, तेंव्हां नक्षत्र व वार कोणत्या शकाशीं जुळतात तें पाहिलें पाहिजे.

" १५३७ दृगग्निबाणभूयुक्ते शके राक्षससंवत्सरे । माघकृष्णतिथौ षष्ठ्यामाग्नेयवासरे दिवा ॥ "

शके १८३१ च्या आश्विन वद्य १४ स डोमगांवीं होतों. दिवस परम भाग्याचा वाटला. श्री. दत्तात्रयबुवांकडे श्रीकल्याणस्वामींच्या जपाची माळ होती, तिचें दर्शन घडलें व त्यांच्या च कडे मुद्गलस्वामींच्या हातची बहुधान्य संवत्सरांतील मन्थराज दासबोधाची प्रत पहावयास मिळाली. दासबोधाच्या तिसऱ्या आवृत्तीचे वेळीं या प्रतीचा उपयोग करण्यांत आला होता. दत्तात्रयबुवांकडील कागदपत्रें वगैरे या खेपेस च मिळालीं.

शके १८३२ चा वैशाख म्हणजे मे महिना वाया गेला. एक लहानसी वावटळ आली होती व किंचित् स्पर्श करून गेली, पण तिच्या पायीं चार महिने वाया गेले. मार्गशीर्षपौषांत पुन्हां डोमगांव, परंडा, शहापुर, चाफळ वगैरे भागांत संशोधन घडलें. माहिती मिळाली होती ती अशी कीं, श्रीसमर्थ-शिष्य शिराळे मठपति जयराम यांचे वंशज मारुति गोविंद व रघुनाथ गोविंद हे बार्शी स्टेशनपासून अडीच कोस असलेल्या परंडे गांवीं राहतात,

नीलंगे येथें जाण्यास मार्गांत कोळ, घानोरे, गोद्री, चिंचोली ( आम्रवृक्षाच्या छायेंत दुपारचें भोजन ), तुपडी, शिवणी व हडगे हीं गांवें लागलीं. चिंचोलीस एक अपूर्व अनुभव आला. भोजनाचें सामान गांवांतून आणविलें व जातांना पैसे चुकते करण्यास गेलों. एका मराठ्याच्या बाईकडून गायीचें दूध आणलें होतें. पैसे देण्यास गेलों तर बाई व तिचा मुलगा पैसे घेईनात. बाई म्हणाली, " ब्राह्मणाला दिलेल्या गायीच्या दुधाचे आम्ही पैसे घेत नाहीं ! " पुष्कळ आग्रह केला, पण त्यांनीं पैसे घेतले च नाहींत. हा अनुभव अपूर्व नाहीं, असें कोण म्हणेल ! त्या च वेळीं सातारा जिल्ह्यांत ब्राह्मणांची काय संभावना होत होती, तिचें स्मरण होऊन त्या थोर मायलेकरांचें कौतुक करीत आम्ही मार्गस्थ झालों. नीलंगे येथें श्रीसमर्थ-शिष्य आण्णाप्पा यांचा मठ आहे. त्यांना च आनंदस्वामी म्हणत. ते मूळचे बत्तिस शिराळें येथील, श्रीसमर्थांच्या आज्ञेनें येथें रहावयास आले होते. आण्णाप्पा ब्रह्मचारी होते. ते आणि त्याचे शिष्य जयराम यांच्या समाधी येथें गांवाबाहेर गावाच्या उत्तरेस पूर्वाभिमुख आहेत. उभयतांच्या पुण्यतिथी अनुक्रमें मार्गशीर्ष व. ३ व फाल्गुन व. १४ ला होत असतात. मठाला सरकारांतून ३७५ ची नक्त नेमणूक असून कांहीं जमीन इनाम हि आहे. विद्यमान मठपति परगांवीं गेले होते, त्यांच्या मातुःश्री भेटल्या. विपुल संग्रह असावा, पण मठपति घरीं नसल्यामुळें पहावयास मिळाला नाहीं. मातुःश्रींनीं भक्तिरत्नावली, त्रयोदशविरचन, शिवकवच असे तीन संस्कृत ग्रन्थ व मराठी दासबोध दाखविला. दासबोधाची प्रत सुंदर आहे, प्रतींत कल्याणस्वामींच्या हातच्या मूळ प्रतीच्या आकाराची आहे. मिळालेल्या वेळांत प्रतींतील कांहीं स्थळें पाहिलीं : १-६-३ अर्धामृताचे, १-७-१७ पदन्यासकर्ते, २-१-२८ तोंड ( आपल्या प्रतींत ही २७ वी ओवी आहे ), २-२-२२ आदरायेपण, ३-१०-४१ पाहिली, ४-५-२१ मध्या, ६-८-४९ ची ओवी नाहीं, ७-१-५८ अविळ आहे, ७-४-४१ रिघोनि, ७-६-११ विर्थी, ७-८-५० मेथाए, ११-२-११ मकार, १३-१-२१ साधक अधीन, २०-६-३ नंतरचा श्लोक नाहीं. फोटो घेण्याची माहि पूर्ण इतरेशीं आहेत. दोघटचें पान व ११ × १० चें पान, असा दोन पानांचे फोटो घेतले. मठाचेशार्जीं च घंडाचें एक प्राचीन [illegible] आहे.

येथून कल्याणीस जातांना शिंदखेड, गुंजरग, एलपुर, चांदुरी, बोरगुरी ( रात्रींचा मुक्काम ), तादपुगली व मालेगांव अशीं गांवें लागलीं. कल्याणीस वैशाख शु. ४ स पोंचलों, विठ्ठलमंदिरांत उतरलों. मंदिराचे मालक दिगंबर, यशवंत व अनंत पाठक असे त्रिवर्ग बंधु फार उपयोगीं पडले. कल्याणी हें फार पुरातन ठिकाण आहे. अनेक संस्कृतींचीं अवशिष्टें येथें पहावयास मिळतात. सदानंद आणि पूर्णानंदाचे शिवरामस्वामी यांचें वास्तव्य या गांवीं होतें. शिवरामस्वामी हे श्रीसमर्थ-कालीन होत. सदानंदापासून त्यांची पांचवी पिढी येईल. आम्ही पोंचलों त्याच्या आदल्या दिवशीं शिवरामस्वामींची पुण्यतिथी झाली होती व दुसऱ्या च दिवशीं सदानंदांची पुण्यतिथी होती. सदानंदांचें समाधिस्थान गांवाबाहेर आहे. स्थान रम्य आहे. समाधी भुयारांत आहे. पुण्यतिथीच्या प्रसादाचा योग अनायासें आला. समाधिमंदिराच्या जवळ एक पांच मजली प्रचंड विहीर आहे. विहिरींत गणपति, नंदीवरील शंकरपार्वती, बुद्ध यांच्या शिलेच्या मूर्ति आहेत. मोटेच्या थाळण्याखालीं ध्यानस्थ बुद्धाची फार च सुबक मूर्ति आहे. मूर्तीच्या वर नागाच्या पांच फणा आहेत. शिवरामस्वामींच्या कवितेचा भरणा एकाद्या संशोधकाला जन्मभर पुरेल इतका माणिकबावा यांच्याकडे या गांवीं आहे. पण अजून त्याकडे कोणाचें लक्ष गेलें नाहीं ! श्रीधर ब्रह्मानंद हे या गांवचे राहणारे, असें पाठकबंधु म्हणतात. असतील हि; कारण श्रीधरांच्या ग्रंथांच्या येथें पुष्कळ प्रती पाहण्यांत येतात. बहुधान्य-संवत्सरांतील ( बहुधा १६८० ) सुभराव हरसुर मुडबी परगणे प्रतापपूर येथें लिहिलेली रामविजयाची प्रत पाहण्यांत आली. हें प्रतापपुर येथून कोसभर आहे. तेथें दोन शिलालेख असल्याचें हि सांगतात. येथून मंठाळें तीन कोस आहे. तेथें उद्धवचिद्घनांचा मठ व मठांत संग्रह असल्याचें कळलें. या प्रांतीं जुनीं देवालयें ' मोप ' ( अमूप ) आहेत व चित्रें आणि मूर्ति ' बखळ ' ( बहुल ) आहेत, असें लोक सांगत. कांहीं संग्रह मिळाला.

येथून माणिकनगरास जावयास निघालों, तों एका कोसावर नारायणपुर म्हणून गांव लागलें. तेथें शंकराचें एक पुरातन देवालय आहे. मोडकळीस आलेलें आहे. चित्रें व नकशी फोटो घेण्यासारखीं आहेत. माणिकनगर अति स्वच्छ आणि रम्य ठिकाण भासलें. श्रीमाणिकप्रभूंच्या समाधीचें व विद्यमान महाराजांचें दर्शन घेऊन बेदरच्या मार्गास

लागलों. –घाटांत चाळकापुर लागलें. चाळकापुरचा –मारुति प्रसिद्ध आहे. कोणी आत्मारामसहाराज म्हणून होऊन गेले त्यांनीं येथें मठ स्थापन केलेला आहे. ' तापविश्राम ' नांवाचा त्याचा सात अध्यायांचा –चरित्रग्रन्थ आहे, म्हणून कोणी तोंडी माहिती सांगितली. आत्मारामसहाराजापासून विद्यमान मठपतींची पाचवी पिढी होय. चाळकापुरच्या पुढें दोन चार कोस वाट अति अवघड लागली आणि नंतर मैलार म्हणून एक भयाण आणि ओसाड गांव लागलें. तेथें खंडोबाचें प्रचंड आणि भव्य देवालय आहे. मल्लारीवरून च गावाचें नांव मैलार पडलें असावें. या भागांत हें स्थान प्रसिद्ध आहे. चाळकेश्वराचा मारुती, मैलारचा खंडेराव व बालेघाटची अंबा जोगाई हीं तिन्हीं स्थानें या भागात सारखीं प्रसिद्ध आहेत. मैलारचें पाणी दूषित आहे. त्यायोगें पोट मोठें होऊन हातापायाच्या काड्या होतात. त्यामुळें वस्ती कमी कमी होत आता दहा बारा वर्षांपासून गाव पूर्ण ओसाड पडलें आहे, असें कळलें, राहण्याला योग्य नसलें, तरी स्थान रम्य आणि प्रेक्षणीय आहे. देवस्थान आहे, झाडी गर्द आहे, मोटमोठालीं पाण्याचीं टाकीं आहेत, लहानसा ओढा वहात आहे व कोणी माणूस भेटण्याचा संभव नाहीं. एकाद्या स्थानाला रमणीयत्व येण्याला आणखी काय असावें लागतें ! दुपारचा मुक्काम करून तेथून निघालों आणि चार कोस बेदर राहिलें होतें तेथें वैशाख शु. १ ( २५-४-१२ ) ला पोचलों.

बेदर येथें उद्धवचिद्घनाचा व रामाचा असे दोन मठ आहेत. फार च थोडा संग्रह मिळाला, पुष्कळ मिळवावयाचा राहिला.

राम नामा सामर्थ्यमूर्ति । श्रीरामनौमि उत्कट कीर्ति ।
ज्याचेनि कैवारें म्हैंत संव्हारी मारुति । बेदरीं पाहीं मदळसा ॥

असें जें श्रीसमर्थप्रतापांत ( १० × ७२ ) वर्णन आहे तें हें ठिकाण. मदळसा म्हणजे मद्रासा आणि मद्रासा म्हणजे शाळा. तो पडलेला भाग अजून येथें पाहण्यांत येतो. येथून जवळ च झरणीनरसिंह नांवाचें दर्शनीय क्षेत्र आहे. डोंगरांत तोंडाशीं बांधून काढल्यामुळें आंत चार साडे चार फूट खोल पाणी भरलेलें, सात आठ फूट उंच व तितकें च रुंद असें लांबलचक एक भुयार आहे. पादकाश म्हणत गेल्यास थोडा वेळा नवोदशाक्षरी मंत्र उच्चारून होतो, इतकी त्या भुयाराची लांबी आहे. शेवटीं नरसिंहाची पाटमोरी मूर्ति आहे. मूर्ति

पाठमोरी कां म्हणून विचारतां मूर्ख लोक दंतकथा सांगत कीं, मूर्ति प्रथम बाहेर च होती, पण अलमगीर मूर्ति फोडावयास आला, तेव्हां मूर्ति पाठमोरी होऊन आंत आंत चालली, हें सामर्थ्य पाहून अलमगीर यक्त झाला व सुताराच्या तोंडाशीं त्यानें मरजीद बांधली! आहे खरी तोंडाशीं मरजीद. जसे भक्त तसे त्यांचे देव हें च खरें! श्रीसमर्थांचें ब्रह्मज्ञान निराळें होतें.

ठकारार्चे ठाण करीं चापबाण। मार्से ब्रह्मज्ञान ऐसें आहे॥

येदर सोडून कोसभर गेलों, इतका सपाटून पाऊस लागला कीं, सर्वत्र जलमय सृष्टि झाली. होसाळी येथें रात्रीचा मुकाम केला. लोकांच्या अज्ञानाची कल्पना व्हावी म्हणून सांगतों, आमच्या मेणबत्तीला रॉकेल तेलावांचून कशा जळतो, हें पाहण्यास गांवचे लोक गोळा झाले! पहाटेस उठून गंगवार, मिरसापुर, मलकापुर वगैरे खेड्यांवरून

दोड्डू एकेहळ्ळी येथें वैशाख शुद्ध ११ स पोंचलों. दुसरें एक लहान एकेहळ्ळी आहे, म्हणून याला दोड्डु एकेहळ्ळी म्हणतात. दोड्डु म्हणजे, मला वाटतें, मोठें, एके म्हणजे एक व हळ्ळी म्हणजे खेडें. येथें दासविश्रामधामकर्ते आत्माराम महाराज यांचा मठ आहे. तेथून आमच्या श्रीधरपंतांनीं दासविश्रामधामाची प्रत करून पूर्वीं च आणली होती. 'कोण हो ते शुक्रवारचे श्रीधरपंत होते, मठांत कोणत्या हि कारणानें गर्दी होवो, श्रीरामाचे डावे बाजूस बसून त्यांचें लेखन सारखें एकाग्रपणें चालें, केव्हां केव्हां दिवसरात्र ते लिहित-च बसत ' असें मठपति व त्यांच्या मातुःश्री यांनीं विचारलें! तुमच्या विचारण्यांत च तुम्ही उत्तर सुचविलें आहे, ते च ते होते, असें समजा असें मी म्हटलें. श्रीधरपंतांचें स्मरण केव्हां हि गहिंवराला कारण होतें. ते पुन्हां भेट देतील काय? आत्मारामसहाराज गृहस्थाश्रमी होते, पण संतती नव्हती. काळाप्पा त्यांचे शिष्य होते. काळाप्पा वृद्ध होऊन गेले. विद्यमान मठपति आत्मारामबुवा हे काळाप्पांचे दत्तक पुत्र होत. आत्मारामसहाराजांची पुण्यतिथी चैत्र व. ७ स होते व काळाप्पांची माघ शु. १ स होते. आत्मारामसहाराज, काळाप्पा व काळाप्पाचे शिष्य पाडप्पा (पांडुरंगबुवा) अशा तिघांच्या समाधी येथें आहेत. आत्मारामसहाराजांची अनुष्ठानाची जागा रामाच्या उजव्या बाजूस आहे, तेथें त्यांच्या खडावा आहेत, पण त्या पाण्यानें कुजून चालल्या आहेत. वास्तविक हा तेलंगण प्रांत, पण त्या प्रांतीं राहून आत्मारामसहाराजांनीं संप्रदायाची जी सेवा केली ती अप्रतिम होय. त्यांच्या

वेळीं तिसगांवप्रमाणें च हें एक प्रचंड विद्यापीठ असलें पाहिजे. चिंरकपल्ली, भंगुर, मरकुंदी, लहान एकेहळी, मंगलगी ( रात्रींचा मुक्काम ) ताडमळगी इत्यादि खेड्यांवरून हुमणाबादेस जाऊन पुनरपि मोजनाचे वेळीं माणिकनगर गांठलें. तेथून हलिखेड, किनगी, कमलापुर, कुरकुटी वरून

महागांवीं गेलों. वडवाळसिद्धनागेश याच्या शिष्याचा येथें मठ आहे. वडवाळसिद्ध नागेश म्हणजे वडवाळ येथें होऊन गेलेले सिद्धनागेश. हें वडवाळ गांव सोलापुराजवळील मोहोळ स्टेशनपासून दोन कोस आहे. महागांवच्या मठांत ग्रन्थसंग्रह आहे, पण तो आम्हांस पहावयास मिळाला नाहीं.

महागांवपासून आपचंद दीड कोस आहे. वैराग्याचा राजा । रामदास स्वामी माझा ॥ त्याचे चरणीं भाव धरा थोडा । रे गडियानो ॥ या पदाचे कर्ते शिवराम, 'कल्याणांचे शिष्य, यांचा येथें मठ आहे. कल्याण–शिवराम–रामचंद्र–दासविश्रामधामकर्ते आत्माराम, अशी ही शिष्यपरंपरा आहे. शिवराम आणि रामचंद्र यांच्या समाधी येथें आहेत. थोडा संग्रह मिळाला.

वैशाख शु. १५ ला गुलबुर्ग्यास गेलों आणि बैलगाडी सुटली. संशोधनदौरा संपला. आतां दौऱ्यांत मिळालेल्या ग्रन्थसंपत्तीची नोंद करूं.

## माजलगांवचा संग्रह

९६० ] पोथी– पत्रसंख्या ४४५
संपूर्ण, सुंदर प्रत [ १८०

सुकेश्वर कृत आदिपर्व

प्रतीचा लेखनकाल—शके १६७६ भावनाम संवत्सरे भाद्रपद मासे शुक्लपक्षे त्रयोदशी भृगुवासरे

९६१ ] पोथी–प. सं. ११०
मुकुंदराज कृत विवेकसिंधु [ १५०

९६२ ] पोथी–प. सं. १४
श्रीसमर्थ कृत मानसपूजा [ १५०

९६३ ] पोथी–पत्रें ५
श्रीसमर्थ कृत जुनाटपुरुष [ १५०

९६४ ] पोथी–त्रुटित पत्रें ३ [ २५०
पंचीकरण

## परळी येथील संग्रह

९६५ ] पोथी–पत्रें ७ [ १५०
चतुर्दशराममंत्राः

९६६ ] पोथी–पत्रें ८ [ १००
गुरुगीता प्राकृत, अपूर्ण

९६७ ] पोथी–पत्रें ११ [ १००
श्रीरामदास कृत पूर्वारंभ

९६८ ] पोथी–पत्रें ३५ [ १००
श्रीसमर्थ कृत आत्माराम

( १ ) लेखक–वैद्यनाथ कृष्ण मोल्हे परळीकर

( २ ) शेवटीं आत्मारामाची आरती दिलेली आहे :

काय करूं माय आतां कवणा ओवाळूं ।
जिकडे पाहे तिकडे राजाराम कृपाळु ॥ ध्रु०
ओवाळूं गेलिया सद्गुरु रामा ।
क्षमारूप निजपण न दिसे आम्हा ॥ १ ॥ काय०
सुर नर वानर राम केवळ ।
खेचर निशाचर ते हि राम केवळ ॥ २ ॥ काय०
त्रैलोकीं रामरूप साचार येक ।
सद्गुरुकृपें केशवराज आनंददीप ॥ ३ ॥ काय०

९६९ ] पोथी–पत्रें २१ [ १००
श्रीरामदास कृत अतर्भाव

( १ ) हस्ताक्षर वैद्यनाथ कृष्ण मोल्हे

( २ ) शेवटीं श्रीगुरुरामदासस्वामींची आरती आहे :

दीनानाथ दीनबंधु दयाळा । पतितोद्धारकमीदा भक्तवत्सला ।
शरण येती त्याला आनंदवेळा । परमब्रह्मसुख देसी प्रेमळा ॥ १

जय देव जय देव स्वामी समर्था ।
आरती ओंवाळूं तव चरणीं ठेविला माथा ॥ ध्रु०
तुजवांचुनि कोणी नाहीं आम्हांसी । माता पिता बंधु मित्र तूं होसी ।
उर्वशीचे तिरीं सज्जनगडवासी । भावें स्तवूं जाता भवपार करिसी ॥ २

९७० ] पोथी–पत्रें २४ [१००
श्रीरामदास कृत पंचसमासी

९७१ ] पोथी–पत्रें ७१ [१५०
पंचीकरण येकादशसमासी

(१) पंचीकरण येकादशसमासी असें नांव मुखपृष्ठावर आहे, पण आंत अन्वयव्यतिरेक म्हणून जें प्रकरण प्रसिद्ध आहे, तें आहे. अन्वयाचे तीन समास व व्यतिरेकाचे आठ समास, मिळून अकरा समास. हें प्रकरण श्रीसमर्थकृत नसता हि बहुतेक सर्व प्रकाशक तें श्रीसमर्थांच्या समग्र ग्रंथात देत आले आहेत. सीताराम म्हणून श्रीसमर्थशिष्य होते, त्यांचें हें प्रकरण आहे.

(२) हस्ताक्षर वैद्यनाथ कृष्ण मोरहे यांचें आहे.

९७२ ] पोथी–पत्रें ७६ [१२५
पंचीकरण येकादशसमासी

त्या च अन्वयव्यतिरेकाची दुसरी प्रत, जरा जुनी.

९७३ ] पोथी–त्रुटित पत्रें ५ [१५०
३०, ३१, ३५, ३६, ४४

(१) सुरेश्वर कृत कचु आख्यान–अपूर्ण
(२) किरकोळ इतर पत्रें ४

नीलगे येथील संग्रह

९७४ ] मचह बाड–पृ. सं. १२५ × ४ = ५०० [११४
सिवाय दान्ही बाजूंनी कांहीं नष्ट

(१) या बाडात वामन कृत आदिपर्व आणि सभापर्व यांतील दहा बारा प्रकरण आहेत, त्यांत द्रौपदीस्वयंवर, कचोपाख्यान, कणिकनीति, शकुंतलाख्यान इत्यादि भाग आला आहे.

( २ ) शिवाय वामन कृत रामजन्म– श्लोक ५०, लोपामुद्राख्यान– श्लो. १२, भरतभाव– श्लो. ९२, सीतास्वयंवर– श्लो. ११४, इत्यादि श्लोकबद्ध प्रकरणें आहेत.

( ३ ) एकनाथ कृत रामजन्म– ओवीसंख्या ५६

( ४ ) अनंत कृत लहुअंकुश ( लवकुश ) आख्यान–श्लो. १७३

( ५ ) कृष्णदासमुद्गल कृत युद्धकांडांतर्गत बिभीषणभेट–ओ. १०९

( ६ ) मीनसेळ–ओ. ४२, ब्राह्मणाचें आख्यान–ओ. ३३, घाशुसी विद्या–ओ. ४१, रामछळणार्थ पार्वती गेली–श्लो. २२, इत्यादि प्रकरणें

( ७ ) श्रीसमर्थ कृत सुंदरकांड–श्लो. १०१

( ८ ) मध्वमुनेश्वर कृत पार्वतीस्वयंवर–लहान प्रकरण

( ९ ) वेणाबाई कृत रामगुहकसंवाद–श्लोक ४४

( १० ) वेणाबाई कृत सीतास्वयंवर–याचे १ ते ५ समास पूर्ण दिलेले आहेत, पुढें ६ व्याचा आणि ७ व्याचा संक्षेप केला आहे, ८ वा व ९ वा गाळले च आहेत व १० व्याचा आणि ११ व्याचा संक्षेप करून ते ८ वा व ९ वा म्हणून दिले आहेत व पुढें १२ वा व १३ वा गाळून १४ व्याचा संक्षेप करून तो दहावा समास म्हणून दिला आहे. शेवटीं "वोव्यासंख्या ६२० साहासेवीस" अशी एकुण ओवीसंख्या देऊन लेखनकाल दिला आहे तो : "शके १६६२ रौद्री नाम संवत्सरे । फाल्गुण मास कृष्ण पक्षे पंचमी इंदुवासरे ॥" ही संक्षेप करण्याची तऱ्हा प्रथम च माझ्या नजरेस पडत आहे.

**९७५ ]** बाड–पृ. सं. २० × २ = ४० शिवाय दोन्ही बाजूचीं काहीं नष्ट [१५०

( १ ) श्रीसमर्थ, दास मुद्गल, सुरदास, विठ्ठलनाथ, बाळकृष्ण, काशीनाथपंत, अमृत यांचीं पदपदातरें ( २ ) उद्योगपर्वांतील कांहीं आर्या ( ३ ) जयदेव कृत अष्टपदी

**९७६ ]** उसवलेलें, अति दुर्दशा पावलेलें बाड–पृष्ठें १२ ते ९० [१५१

रा. सं. २६

(१) पहिल्या अकरा पृष्ठांत १ ते १५९ संस्कृत सुभाषित श्लोक झाले. १२ ते ५५ पृष्ठांत १६३ ते ५६५ व पुन्हा १ ते १०१ असे संस्कृत सुभाषित श्लोक आहेत.

(२) ५६ ते ६८ पृष्ठें विठ्ठल कृत बिल्हणचरित्र आहे. त्याच्या शेवटीं बाहाच्या लेखनाचा शक १७०५ दिलेला आहे. हस्ताक्षर "बालाजी-राम ... वास्तव्य खटाव" असें दिलेलें आहे.

(३) ६८-६९ पृष्ठें पुरंधरविठ्ठलांची कानडी पदें

(४) ७०-७१ पृष्ठांवर अवधूतारमजाचें राधाकृष्णावर सुंदर पद आहे:

> हरिविना किमपि भावेना धीर चि धरवेना काय करूं सजणी।
> अति गुरुतर जाली सजणा न गमे रजनी ॥ ध्रु० ॥

(५) नंतर ७२ ते ९० पृष्ठें कानडी भाषेंतील कांहीं प्रकरण आहे.

## १७७ ]

बाड-पृष्ठांक दिलेलीं पृष्ठें ५५
आरंभीं पृष्ठांकावांचून ६ पृष्ठें [ ११६

(१) श्रीसमर्थ, कबिर, निमलसुत, माली, हरिकवि, तुका, रंगनाथ, गंगाजि कोनेर (याचें पृ. ३६ वर एक नृत्यात्मक पद), सज्जनरंजन, जानतसुत, जीवन्मुक्त, सुरदास, शंकर, जयराम, मीराके प्रभु गिरिधर, अमृत, तानसेन इत्यादिकांचीं पदपदावरें, त्यांत त्रिमलसुताचा भरणा विशेष.

(२) वेणाबाई कृत कौलाचे श्लोक २६

(३) प्रबोधसुधाकर ग्रन्थ-संपूर्ण अकरा प्रकरणें. आरंभीं आर्या, मग शिवराम पूर्णानंदाचें पद आणि मग श्लोक, अशी एकंदर रचना आहे. पृष्ठें १ ते ३५

(४) दशावतार आर्या दश-पृष्ठ ३९ वें-पहिली आणि शेवटची:

> करुणाब्दप्रत्यंगीं सदया उदकांत मीन हो जागा।
> परि मद्विषयीं च कदा दैवें बहु दीन मी न हो जागा ॥ १
> ज्या तुजला या कविचा मानसरूपी वसूं न दे याजी।
> त्या तूंतें यवनक्षय दुर्घट कैसा घडेल देवा जी ॥ १०

(५) मेरु कृत परंधाम चिद्रूप-श्लोक ११, पृ. ४१

(६) निरनिराळ्या रागांवर व तालांवर पदें-पृ. ४२ ते ५५

( ७ ) आरंभींच्या पृष्ठांक न घातलेल्या २ ऱ्या पृष्ठावर नोंद आहे ती : "श्रीहनुमंतस्वामीयाचा पूर्ण दिवस फाल्गुण शुद्ध सप्तमी बुधवारी समाप्त॥"

# ९७८ ]

बाड–पृ. स. २७ × ४ = १०८ [ १५०

( १ ) या बाडात मुख्यतः मोरोपंत कृत आर्याभारतांतील काही भाग, आर्यासुदामचरित्र व केकावलीपैकीं कांहीं श्लोक आहेत.

( २ ) पुरंदरविठ्ठलांचें ' कनड पद ' आहे.

# ९७९ ]

बाड–पृ. स. ५४ × ४ = २१६
दोन्ही बाजूंनी व मधलीं कांहीं नष्ट [ २७५

( १ ) श्रीसमर्थ, जयवंत, पुरंदरविठ्ठल, श्रीधर, मच्छमुनेश्वर, गोविंद, बाळकृष्ण, नामदेव, कल्याणस्वामी, उद्धव, पांडुरंग, शिवरामपूर्णानंद, कबिर, केशव, एकनाथ, तुकाराम, गुसाईनंदन, मेघश्याम, निंबराज, पंडित किंवा जन पंडित, बहिरा, जनमैत्रनागा, नागेशात्मज विठ्ठल, जगज्जीवन, कृष्णदास इत्यादिकांचीं पदपदांतरें. श्रीसमर्थांचीं कदाचित् कांहीं नवीन असावींत, ताडून पाहणें आहेत. पुरंदरविठ्ठलांचीं कानडी पदपदांतरें आहेत.

( २ ) जयवंतांचीं जीं पदपदांतरें आहेत आणि तीं पुष्कळ च आहेत, तीं विचार करण्यासारखीं आहेत. त्यांत कांहीं कानडी हि आहेत. जयवंत हें श्रीसमर्थांचें हि एक नाव होतें. जयवंत नांवाचे कोणी श्रीसमर्थशिष्य हि दिसतात. एका पदांत रामदास जयवंत असें नांव योजिलें आहे. तेव्हां या सर्व पदपदांतरांचें बारकाईनें निरीक्षण केलें पाहिजे. आधीं आणि नंतर श्रीसमर्थांचीं पदें असून मध्यें च जयवंतांचीं आहेत, तीं तर मला श्रीसमर्थांचीं च वाटतात. पदें सरस आहेत.

[ १ ]

करी आटण ऐकोनि पट्टण । आलों श्रीरंगधामा ।
भोंवती कावेरी अवधारी । स्नान तारी बहु महिमा ॥ ३
किती काळचे पाट जाती । नाना चीजें बहु विकती ।
जन जयवंता भुक्ति मुक्ति । देवराज नांदती ॥ ४

[ २ ]

रामनामें आनंदरूप व्हावें रे । सावधानें भजन तें करावें रे ।
भावबळें देवाशीं घोळावें रे । ध्यानीं मनीं अखंड रूप ध्यावें रे ॥ध्रु.

लोकामध्यें शोधावा इहलोक रे । लोकामध्यें भेदावा संतलोक रे ।
लोकामध्यें छेदावा दुःखशोक रे । लोकामध्यें साधावा परलोक रे ॥ १
काळ जातो आलया घडीघडी रे । अंतकाळीं होईल तडातडी रे ।
येम जाची करील शोडाशोडी रे । राघवाची करावी सीघ्र जोडी रे ॥ २
सोडविता संतांचा राम सखा रे । वैभवानें स्वहित चुकों नका रे ।
माय्यमदें पावाल पुढें धका रे । नित्यानित्यविवेक बरा तुका रे ॥ ३
देवभक्त शोधितां मूळतंत रे । ठाईं पडे विचारें तो अनंत रे ।
कल्पनेसी होतसे अंतवंत रे । संतसंगें निवाले जयवंत रे ॥ ४

अशीं जयवंतांचीं पुष्कळ च पदें आहेत.

( ३ ) तसें च बाळकृष्ण यांचीं हि पुष्कळ पदपदांतरें आहेत, शिवाय त्याचें सीताविलाप म्हणून एक प्रकरण आहे.

( ४ ) नाहीं संशय पाहातां रामदासाच्या दासां ।
कृपाळु कल्याणस्वामी भावें कींवसा ।
येश कीर्ति पूर्ण प्रताप ज्याचा ऐसा ।
पूर्ण वर दिधला रामें दासाच्या दासा ॥ ९

( ५ ) मेघशाम यांचीं हि पदपदांतरें विपुल आहेत. ते अनंतमौनींचे शिष्य दिसतात. त्यांचीं बरीं च पदें अनंतमौनींच्या स्तवनपर आहेत.

( ६ ) श्रीसमर्थांचें षड्रिपु प्रकरण आहे, तें प्रसिद्ध आहे. पण श्रीसमर्थ कृत काकड आरती आहे व गजेंद्रमोक्षाचे ७९ श्लोक आहेत, ते नवीन वाटले.

( ७ ) जयदेव कृत अष्टपदी आहे. द्रौपदीचा धांवा, शिल्हे महिमान, कृष्णजन्म, राम-कृष्ण-भक्तांचा संवाद अशीं प्रकरणें आहे तीं कोण कृत आहेत, तें कळलें नाहीं.

९८० ] सुटे वंद ७
जयदेव कृत गीतगोविंद [ १५०

९८१ ] किरकोळ बाड-पृ. सं. ३२ [ १००

( १ ) नामयाचीं दासी, बाळात्मज, जयरामजयसुतअंकित, विठ्ठल कवि, सदानंदतनय यांचीं पदपदांतरें, कांहीं सुभाषितें.

( २ ) मयूर पंडित विरचित वशिष्ठाख्यान-श्लोक २३

( ३ ) " इदं वहि व्यंकटराव बलवंत कुलकर्णि मौजे पळशि वगैरे प्रगणे वरदापुर " अशी नोंद आहे.

**१८२** ] बाड-पृ. सं. ३४ × २ = ६८ निरनिराळ्या रागाचीं पदें [१००

**१८३** ] बाड-पृष्ठें ८ ते १८८ मधलीं ५१ ते ५६ पृष्ठें कोणी कापलेलीं दिसतात [१५८

( १ ) श्रीमन्महामुद्गलसूरिणा विरचिता आर्याः— शिवराम कृत टीकेसह — आर्या ३६ ते १११. लेखनकाल—

" शके १६९८ दुर्मुखीनामसंवत्सरे वैशाख शुद्ध अष्टमी भृगुवारे प्रथम प्रहरीं समाप्त लेखन जाहलें ॥ "

( २ ) आनंदनंदन कृत ( १ ) सुदामचरित्र-श्लोक १९, ( २ ) साटिकावध श्लोक १२, ( ३ ) एक चूर्णिका, ( ४ ) यज्ञरक्षण – श्लोक १७.

( ३ ) माधव कृत गजगौरी-श्लोक ४८.

( ४ ) माधवनंदन कृत अनसूयाचरित्र-श्लोक ३४

( ५ ) सदाशिव कृत भस्मासुरवध-श्लोक ३८

( ६ ) शिवराम कृत शिवपूजामहिमा-ओ. ७-४१

( ७ ) आनंदस्वामी कृत ( १ ) हनुमंतजन्म-कडवीं २८, ( २ ) स्वप्नमंदोदरी-ओ. १२

( ८ ) मुक्तेश्वर कृत सभापर्व, वनपर्व यांतील कांहीं भाग, थाळीपाक, विराटपर्वांतील उत्तरगोग्रहण, वगैरे

( ९ ) त्रिमलनंदन कृत रागमालिका-३०

( १० ) श्रीधर कृत सेतुबंधन-ओ. ५३

( ११ ) एकनाथ कृत भावार्थरामायणांतील कांहीं भाग मधून मधून

( १२ ) गोविंद चिंतामणी कृत सुलोचनागहिवर-श्लो. ७८

श्रोता प्रश्न करी सुधास मज हा संदेह जाला मनीं ।
नाहीं श्रुत सुलोचना सति असें हें वाक्य रामायणीं ।

वेदव्यासमुनींद्र का न वदती त्या सप्तकांडीं असे ।
कोठें साक्ष असे कथा श्रुत करा संदेह हा नीरसे ॥ ७
वक्ता उत्तर दे सविस्तर कथा हे वाहिली शंकरें ।
अभ्रेवीण प्रजन्य येउनि पडे हें वाक्य केवें खरें ।
मिथ्या वाक्य वदे कवीश्वर तया लिंपे महा दोष हा ।
त्याची साक्ष असे प्रस्तुत तुम्ही अग्निपुराणीं पहा ॥ ५
श्रोते हो परिसा भयाब्धि उत्तरी रामायणी हे कथा ।
प्रथासी कवि कृष्णदास वदला त्याचा असे उलथा ।
पूर्वी वाल्मिक हे चरित्रकथनीं विस्तारिली मेदिनी ।
ते हे रामकथा निवेदन करी गोविंद चिंतामणी ॥ ७८

( १३ ) वामन कृत भामाविलास–श्लो. १२

( १४ ) सखारामसुत कृत आर्या रुक्मिणीस्वयंवर

( १५ ) मयूर पंडित कृत मुरली वगैरे

( १६ ) शुकरंभासंवाद–शेवटचीं ६ पृष्ठें मेलीं असल्यामुळें अपुरा आहे.

( १७ ) ब्राह्मणतेज, शुकजन्म ( कडके, चूर्णिका, श्लोक ) द्रौपदी-स्वयंवर, दीर्घतमाजन्मकथा, आर्या रामचरित्र, शिबीआख्यान, खंडेरायाची आदि, सुप्रसिद्ध नलोपाख्यान

## ९८४ ] पाठ–पृष्ठें ३५ × २ = ७० [ ७१

फसली सन १२६४ ते १२६८ म्हणजे शक १७७६–८० या चार सालांची जमाखर्चाची वही. मधून मधून कोठें औषधें व सुभाषितें आहेत. सन १२५९ तील एक जन्मनोंद हि आहे.

## ९८५ ] पाठ–पृ. स. ३१ × २ = ६२ [ १५०

( १ ) पुरंदरविठ्ठल ( कानडी पदें ), गिरिधरप्रभु, कबिर, सुरदास, तुकाराम, वामन, दास वीरा, अनंत, अमृत—

होता सद्गुरुप्रसाद प्राप्त जालें ब्रह्मज्ञान ।
येथें संसाराचें भान आहे आहे नाहीं नाहीं ॥ १

जाचा अंतरीं निष्काम याचे आलें रामनाम।
तेथें मृदांगाचें काम आहे आहे नाहीं नाहीं ॥ ६
साचा अमृत परमार्थ न करी कोणासी वादार्थ।
घरा लागला पदार्थ आहे आहे नाहीं नाहीं ॥ ७

मत्स्यमुनेश्वर, आनंदनंदन, नाथभुजंग, एकनाथ, शिवरामपूर्ण, गणेशनाथ इत्यादिकांचीं पदपदांतरें.

(२) जयदेव कृत अष्टपदी-गीतगोविंद

(३) शंकराचार्य विरचित कालभैरवाष्टक व शिवाष्टक स्तोत्रं

(४) सुदामचरित्र-ब्राह्मण महानिष्ठ बहु मोठा त्याचा प्रपंच हीन करंटा मुलें भुकेलीं करिती तंटा घरांत वाजे मकारघंटा ॥

(५) गोसावीनंदन कृत त्र्यंबकेश्वराची आरती

(६) वामन कृत रामजन्म-श्लो. ४४ व कृष्णजन्म-श्लो. २६

(७) गरुडपुराणे विष्णुषोडशनामावळी व स्कंदपुराणे हरिअष्टक

(८) एकादशी कथा, भागीरथीस्तोत्र, बालक्रीडा-गोपिकागान्हाणें

९८६ ] बाड-पृष्ठें १०१ × २ = २०२
शिवाय आ. व शे. १५।२० नष्ट [२००

(१) श्रीसमर्थ कृत मनाचे श्लोक—५९ ते २००

(२) नंतर या बाडांत गुरुभक्ति, ज्ञानबोध, मोक्षधर्म यांनीं ओतप्रोत भरलेले असे १ ते ५९९ श्लोक आहेत. त्यापुढच्या फाटलेल्या पानाची जी कडा आहे तीवरून असें दिसतें कीं, पुढें आणखी दोन च श्लोक—म्हणजे ६०० आणि ६०१—असावेत. हें कोणतें प्रकरण, कोणी केलेलें आहे, हें मला निश्चित सांगतां येत नाहीं. पुष्कळ श्लोकांत ग्रन्थकारानें आपला उल्लेख मोघम कवि असा केला आहे. एका श्लोकात केशवराव नांव आलें आहे. हे श्लोक पूर्वी कोठें प्रकाशित झालेले आहेत किंवा नाहींत, माझ्या अल्प वाचनामुळें मला ठाऊक नाहीं. श्री. पांगारकरांसारखा बहुश्रुत अधिकारी पटकन सांगेल. प्रत्येक श्लोकात गोडी भरलेली आहे. सर्व श्लोक छापले गेले पाहिजेत. कांहीं :

आरूढला प्रेमपदावरी रे। दुर्घटकर्जी संतपदें धरी रे।
सचित्सुखें राज्य सदा करी रे। त्या मानवातें म्हणिजे हरी रे ॥ १

हृदयकमळकोशीं सेवितां रामचंद्रा ।
म्हणउनि मज भेटे नित्य विश्रांतिभद्रा ।
सुरतम निजसुखा चाणडी इंद्रियांसी ।
अभिनव गति माझी जा पुसा योगियांसी ॥ २०

पतितपावन सद्गुरु जोडला । भय भयानक मदप मोडला ।
परम मंगळ वैभव साधिलें । सुख रमापतिचें मज लाधलें ॥ १०
निर्मत्सराच्या चरणासि लागा । वेदांतशास्त्रीं च अखंड जागा ।
स्वानंदरासी निज रामराणा । भेटेल वेगीं तरि पूर्ण जाणा ॥ ११
गुरुदया फळली मजलागुनी । म्हणउनी न दिसे भव लोचनीं ।
तनि मनीं धन माधव कोंदला । निजसुखें मनमारुत रोधला ॥ १४०
यथार्थ जे आत्मपदासि गेले । ते संत त्या प्राणसखे चि केले ।
पाळावि मी केवळ भक्त जाणों । क्षणक्षणा तं गुज काय बोलों ॥ १५०
अखंड जो रामपदीं विराला । साधूकुळीं मंडण तो चि जाला ।
दया क्षमा शांति पाय त्याचे । तयापुढें येउनि मोक्ष नाचे ॥ ४४०

९८७ ] बाड–पृ. ५. १८
किरकोळ, काहीं हिंदुस्थानी पदें [१५०

९८८ ] पोथी–पत्रें १६५
मधलीं काहीं पत्रें नष्ट [१००

एकनाथ कृत रुक्मिणीस्वयंवर

९८९ ] दुर्दशा पावलेलें बाड
पृष्ठें २ ते ७७ [२००

वामन कृत निगमसार

अति सुंदर अक्षर आहे, एकटाकीं आहे. प्रत महत्त्वाची आहे. पण दुर्दैवानें तिचे अति हाल झालेले दिसतात, मधलीं पानें हि काहीं गेलेलीं आहेत.

९९० ] बाड–पृ. ५. ३३ × २ = ६६
श्री श्लोक मनाचे [१००

१८५६ माघ शु. ८

९९१ ] बाड–पृ. स. ५६ × २ = ११२
शिवाय काहीं नष्ट [१००

( १ ) श्रीसमर्थ, उद्धवचिद्घन, रंगनाथ, केशव, श्रीधर, अमृत, तुकाराम, विष्णुदास नामा, एकनाथ, ज्ञानदेव, मध्वमुनेश्वर, नामदेव, गिरिधरप्रभु, शिवदिनकेसरी, दत्तात्मज, त्रिंबक, गोसावीनंदन, जयरामात्मज इत्यादिकांचीं पदपदावरें

( २ ) आनंदतनय कृत सीतास्वयंवर

( ३ ) जिव्हे ते पहिले तुला दधि मधु त्यां पाजिलें आदरें ।
देहांतीं स्मरसील राम रसने या कारणाचे भरें ।
ते तू विस्मरलीस भूक पडली जन्मासि आलों पुन्हां ।
अतां मी तुज नित्य पाजित असे तू घ्याइ नारायणा ॥ १

९९२ ] दासबोधाच्या जीर्ण प्रतींचीं पत्रें
११ पूर्ण व १५।२० तुकडे [२५०

तत्कालीन एका अति सुंदर प्रतीचीं पानें. बहुतेक चवथ्या दशकांतील, न जाणों, हीं आण्णाप्पाच्या हातचीं असतील.

९९३ ] पोथी–पृ स. सुमारें ४०० [१६९

( १ ) मुक्तेश्वर कृत आदिपर्व व सभापर्वाचा कांहीं भाग

( २ ) आदिपर्वाच्या शेवटीं प्रतीचा लेखनकाल दिला आहे : " हें पुस्तकाची समाप्ती । पार्थीव नाम संवत्सराचे आर्ति । सके सोळासेहे सत्यासैसी जाणीजेति १६८७ । मास तो मार्ग वदी । प्रतिपदा शनीवासरें ॥ "

९९४ ] उसवलेलें महत्त्वाचें बाड
मूळची पृष्ठसंख्या ३९ × ४ = १५६ [२५०

( १ ) हें बाड तत्कालीन असून त्यांत फक्त श्रीसमर्थांचीं कांहीं लघु प्रकरणें आहेत श्री रामदासी मालेंतील श्री समर्थांच्या लघुकाव्याचा जो अकरावा भाग काढावयाचा आहे, त्याला या बाडाचा उपयोग होईल., दुर्दैवानें या बाडाचीं १८×२=३६ पृष्ठें नष्ट झालेलीं आहेत.

( २ ) हें बाड नं लोमठपति श्रीसमर्थशिष्य आण्णारया , यांच्या दासचें अक्षराचा संभव फार आहे.

( ३ ) या बाडात श्रीसमर्थांचीं प्रकरणें आहेत तीं : अंतर्भाव, आत्माराम, पंचसमासी, निर्गुणध्यान, सगुणध्यान, मानसपूजा, क्षात्रधर्म, अखंड सावधान ( श्रीसंभाजीमहाराजाना श्रीसमर्थांचें पत्र ), अनित्य अविवेकी अन्याइ ( जनस्वभावगोसावी ), मद्या सफळाहुनी विशेष। ( प्रकाशनिरूपण समास ), पांचाचे पचवीस औश । परून परस्परानुप्रवेश ॥

# ९९५ ]

पोथी-प. सं. २२

देवतार्चनपद्धति [ १५०

ज्या दिवशीं ही पद्धति सांगितली तो दिवस क्रोधीनाम संवत्सराचा माघ शु. १५ भौमवासरचा होता. म्हणजे बहुधा १७०६ शक असावा.

# ९९६ ]

पोथी-प. सं. ६

व्यंकटेशवज्रकवचस्तोत्रम् [ १५०

# ९९७ ]

गठाठा

[ १००-२५०

( १ ) श्रीसमर्थ, अमृतेश्वर, केशव, आनंदमूर्ति, सुरदास, तुकाराम, शिवराम, आनंदतनय, नाथात्मज, जीवन्मुक्त, वरदलिंग, रंगनाथ, शिवदिन-केसरी, रमावल्लभदास, गोविंदात्मज, जयरामसुत, जयरामजयसुतांकित, मानपुरी, मध्वनाथ, सज्जनरंजन, माधवदास, बाळकृष्ण, गोसावीनंदन, कबीर, मोरोपंत, उध्दवचिद्घन, सदानंद, विष्णुदास, गिरिधर, महामुद्गलभट्ट, इत्यादिकाच्या पदपदातराचे सुत्रीकरण.

( २ ) प्रश्न पाहणें, गोपीगीत, औषधें, प्रबोधसुधाकर, श्रीरामदास-चरित्राचा भाग, रत्नमंजरीचीं पानें, पंडितराम खिरसाळकर कृत शिवरात्रीकथा, अष्टपदी, मनाचे श्लोक, इत्यादिकाचे त्रुटित भाग.

( ३ ) श्रीनंक जोशी यांचें पत्र, वामन कृत बळीचें आख्यान, तुकारामस्तवनाच्या १७ आर्या, रंगनाथ कृत रामदास चतुराक्षरी मंत्र, लोकनाथरसायनविधि:, कल्याण कृत श्रीसमर्थांची आरती, पुरुषोत्तम कृत कल्याणांची आरती.

## कल्याणी येथील संग्रह

## ९९८ ]

पोथी–पत्रसंख्या २२१ [१४८

श्रीधर कृत शिवलीलामृत– मुखपृष्ठावर प्रश्नोत्तरखंड असें नांव दिलेलें आहे.

दुसरा आणि तिसरा असे दोन अध्याय गहाळ. प्रतीचा लेखनकाल– " शके १७०८ प्रवर्तमाने पराभवनामसंवत्सरे उत्तरायणे माघमासे शुक्लपक्षे रथसप्तमी भृगुवासरे तद्दिने प्रथमयामे ग्रंथ समाप्त "

## ९९९ ]

पोथी–प. स ७६ [२००

येकनाथी भागवताचा अकरावा अध्याय

छापलेल्या प्रतींत या अध्यायाच्या १५८१ ओव्या आहेत. प्रस्तुतच्या प्रतींत १५४५ आहेत.

## १००० ]

पोथी–प. सं. १२२
फक्त १२२ वें पृष्ठ गेलेलें [१६६

विश्वनाथ कृत उपदेशरहस्य

( १ ) कागद ठिसूळ झाला आहे. हात लावण्याची फारशी सोय नाहीं. सुदैवानें प्रत संपूर्ण असून अक्षरें कोठें गेलीं नाहींत. या ग्रन्थाची काळजीनें एकवार प्रत झाली पाहिजे. प्रकाशना योग्य आहे त्याच्या आणखी एक दोन प्रती समेच्या संग्रहीं आहेत, असें वाटतें.

( २ ) मुखपृष्ठावर च " ग्रंथसंख्या १२८२ पत्रें १२२ " अशी नोंद आहे. १२२ वें पृष्ठ जरी नाहीं, तरी त्यावर फारसा महत्त्वाचा मजकूर नसावा, असें वाटतें. १२१ वे पत्रावर च लेखनकाल वगैरेची नोंद आहे ती अशी: " शके १६९० सर्वजिद्वर्षे उत्तरायणे पौषकृष्णसप्तम्यां आदित्यहस्तामृतसिद्धियोगे तद्दिने ग्रंथः संपूर्णमागमत् ॥ लिखितं चेदं श्रीमहादेवपाठकानुग्रही वाळिंबेरघुपनामकसखारामेण ॥ ग्रंथसंख्या द्वादशप्रकरण मिळुन येकंदर ओंविया १२८२ "

( ३ ) ग्रन्थकाराची परपरा श्रीमत् शंकराचार्यांपासून चालत आलेली आहे. पुढें वासुदेवानंदसरस्वती ( कुरुक्षेत्रीं असत, देह ठेविला भागीरथीतीरीं )

परमानंद–वैकुंठानंद ( आनंदवनीं बरा च वास होऊन पश्चात् बद्रिकाश्रमीं होते ) – कृष्णानंद – रंगनाथ – ( कपिलगोत्रोत्पन्न, नाशिकास असत ) – पुत्र काशिराज ( त्याचें विजापुरास आगमन होऊन तेथें त्यांनीं बहुतांचा उद्धार केला, त्यांत ) – भगवंत आणि ग्रन्थकार विश्वनाथ.

( ४ ) प्रस्तुतचा ग्रन्थ विद्यारण्यस्वामींच्या जीवन्मुक्त प्रकरणाच्या आधारें लिहिला गेला आहे.

**१००१ ]** पोथी–पत्रें सुमारें ८०० श्रीधर कृत रामविजय [११७

एकूण अध्याय चाळीस. कांहीं अध्याय नाहींसे झाले होते, यांच्या जागीं नंतर लिहून घातलेले दिसतात. बहुतेक अध्यायांच्या शेवटीं लेखनकाल व लेखकाचें नांव हीं दिलेलीं आहेत. ईश्वर आणि बहुधान्य या दोन संवत्सरांत लेखन झालें आहे. अध्याय क्रमशः न लिहितां मागें पुढें लिहिलेले दिसतात. सुबराव द्रसुर यांनीं हुविनहळी गांवीं किंवा मुडवी परगणे प्रतापपूर येथें लेखन केलेलें आहे.

**१००२ ]** पोथी–प. सं. ३४ गोपीनाथ कृत आत्मविवेकग्रन्थः [१५०

**१००३ ]** पोथी–प. सं. १०१ [१५०

सदाशिव कृत आत्मानात्मविवेक ग्रन्थ

( १ ) ग्रन्थ अपूर्ण आहे. ५ ते ११ च अध्याय आहेत. ग्रन्थ पूर्वी कोठें उपलब्ध झाल्याचें ऐकिवांत नाहीं.

( २ ) सदाशिव हे आपणांस तुकोद्भवदास, तुकोद्भवार्भक, तुकोद्भवचेला असें म्हणवितात.

**१००४ ]** पोथी–प. सं. ६ मृत्युंजय कृत अमृतसार [१५०

अमृतसाराला च ज्ञानामृत म्हटलें आहे.

**१००५** ] पोथी–प. स. १०
निवृत्तिअवधूत कृत परमहंसपद्धति [१५०

प्रकरण अप्रकाशित आहे, असें वाटतें.

**१००६** ] पोथी–प. स. २७ × २ = ५४
पैकीं २ रें व ३ रें नाहीं [१५०

कोणता ग्रन्थ आहे, याचा मला पटकन बोध झाला नाहीं ग्रवढचें एखाद दुसरें च पत्र नाहीं.

यैका जनार्दनाची बोवी । महासुखातें सहज गोवी ।
सहजभावार्थी जो सद्भावी । महासुख तो चि अनुभवी ॥ ३०६

अज्ञानाचें अज्ञान फिटे । ज्ञानियाच ज्ञानाभिमान तुटे ।
जनी जनार्दनु भेटे । सर्वत्र असे ॥ ४५४

ये ग्रथींचें निरोपण । वरिवरि पाहातां दिसे कठिण ।
परि अभ्यतरीची गोडी जाण । अमृता ऐसी ॥ ४६८

**१००७** ] वाह–पृ. स. १६ × २ = ३२
शिवाय काहीं नष्ट [२००

श्रीसमर्थ, तुकाराम, कोकिल, अनंतसुत ( आधीं मन आवरि हें अनिवार । ), आवृतराय ( म्हणजे उघड आहे, अमृतराय ), कबीर, मध्वनाथ, कोनेरीनंदन, गोपाळ, रंग कवि ( यानीं एका पदात मराठी शब्दाचे कानडी पर्याय गोंविले आहेत ), शिवानंद, गंगात्मज, निवृत्ती निजानंद, जीवन्मुक्त ( ज्ञानदेव वेदाक्षर मंत्र ज्ञान होय प्राप्त । ज्ञानराजकृत येता टीका ग्रन्थ जीवन्मुक्त ॥ ध्रु० ), गोसावीनंदन, बालकृष्ण, शेख महमद, केशव ( ज्या साधुचा लाग वरा चि केला । तेणें चि हा द्वैतविकार गेला । जालों घनानंद मुकुंद वेगीं । बोले कवी केशवराज योगी ॥ ), श्रीधर

सो नर नव्हे नारायण चि साच रे ॥ ध्रु०

परदारा येकोतीं । येउनिया स्वयें प्रार्थी ।
विकार नव्हे ज्याचे चित्तीं रे ॥ १

राजा येउनि पूजा करी । दुष्ट तोंडावरी मारी ।
दोघे हि समान अंतरीं रे ॥ २

निरंजनी घनी पाहे । सांपडे सुवर्ण कोहे ।
पायें ठकलोनि जाये रे ॥ ३
परावयाचे दोषगुण । न उच्चारी गेल्या प्राण ।
सद्गुणाची पूर्ण खूण रे ॥ ४
आपणासहित आनंद । ( सद्गुरुकृपें महानंद )
श्रीधरस्वामी तो चि शुद्ध रे ॥ ५

शालीगावन शाहिर, आनंदतनय, रंगनाथ, वामन, शिवदिनकेसरी, एकनाथ, शिवराम, उद्धवचिद्घन इत्यादिकांचीं पदपदांतरें

१००८ ] फिरकोळ बाड-पृ. सं. २८ × २ = ५६ [१५०
कांहीं गळांठा

( १ ) माधवदास ( कृत आरती नृसिंहाची ), तुकाराम, उद्धवचिद्घन ( धरा जिवीं राजिवनेत्र हरी । ......उद्धवचिद्घन चिमरुपाणेंवीं येक जसी कहरी ॥ ), केशव, गणेशनाथ

देव देव म्हणतां आपण देव व्हावें । हें भाग्य मागावें देवापासीं ॥
करितां तीर्थाटण आपण तीर्थ व्हावें । हें भाग्य मागावें देवापासीं ॥
करितां संतसेवा आपण संत व्हावें । हें भाग्य मागावें देवापासीं ॥

( २ ) कांहीं गळांठा, १ ते ४

१००९ ] पोथी-पत्रें ६०१ [१५०

महिपति कृत भक्तविजय ग्रन्थ-ओवीसंख्या ९९९० संपूर्ण, तत्कालीन प्रत. येथवरीं केवळ ताक होता, पण तेथील कागद झडला आहे.

१०१० ] पोथी-पत्रें ७५१ [२००

श्रीधर कृत भारतसार पांडवप्रताप-संपूर्ण प्रत, मधून मधून ओबड-धोबड चित्रें काढलेलीं आहेत.

१०११ ] पोथी-पत्रें २४४ [२००

श्रीधर कृत हरिविजयांपैकीं अध्याय १ ते ४, ८, ११ ते १५, १७, २०-२१, २५, २७ ते ३१ आणि ३६. मधले मधले अध्याय अर्थात् हरवले आहेत. प्रत तत्कालीन असून संपूर्ण प्रतीची पत्रसंख्या ६३७ होती.

१०१२ ] पोथी-पत्रें ४३ [२००

हरिविजयाचे ३ रा आणि २४ वा, असे दोन अध्याय. निराळी प्रत.

१०१३ ] पोथी-पत्रें ३९ [१५०

भक्तविजयाचे २१ वा व २२ वा, असे दोन अध्याय. निराळी प्रत.

## वेदर येथील संग्रह

१०१४ ] पोथी-पत्रें ९४ + ६२ [३५०

येकनाथी भागवत—अध्याय २ रा व १४ वा

दुसऱ्या अध्यायाचीं शेवटचीं दोन पत्रें नाहींत व चवदाव्याचें आरंभीचें पहिलें पत्र नाहीं. छापलेल्या प्रतींशीं ताडून पाहतां ओवीसंख्येंत फरक आहे व पाठभेद भरपूर आहेत.

१०१५ ] पोथी-पत्रें २७ शेवटचें च पत्र नाहीं [२५०

येकनाथी भागवत-आठवा अध्याय, निराळी प्रत

१०१६ ] पोथी-पत्रें ३३ [३५०

येकनाथी भावार्थरामायणांतील सुंदरकांडापैकीं मध्यलिखिताचे कांहीं प्रसंग

१०१७ ] पोथी-पत्रें १२ [२००

हरिविजय-अध्याय २५ वा

१०१८ ] पोथी-पत्रें ४९ जीर्ण प्रत [२००

श्रीधर कृत पांडुरंगमाहात्म्य- संपूर्ण

**१०१९ ]** पोथी–पत्रें ९
शांतिसंकल्पः [११२

(१) आठव्या पत्रावर लेखनकाल वगैरे आहे : " शके १६१३ सरनामाब्दे आषाढ वदि तृतीयायां। स्वहस्त सुजंगभट चिदरी ॥ "

(२) व पुन्हा नवव्या पत्राच्या शेवटीं " शके १६३४ वैशाख वदि द्वितीया भानुवासरे " इत्यादि लेखनकाल आहे.

**१०२० ]** पोथी–पत्रें १२
नवग्रहविधि. [२२२

शेवटीं लेखनकाल आहे : " शके १६३४ नंदननामाब्दे वैशाख वदि प्रतिपद् मंदवारे "

**१०२१ ]** पोथी–पत्रें २०
नवग्रहपुस्तकम् [२००

निराळी प्रत. शेवटीं लेखकाचें नांव आहे : " स्वहस्त अनंत कोनेरि भट रोजिन्दार मोकाम येदर "

**१०२२ ]** पोथी–पत्रें २८ [२००

महामुद्गल कृत रामार्यावर शिवराम कृत टीका

**१०२३ ]** पोथी–पत्रें २२ [११६

ब्रह्माण्डपुराणे वसिष्ठनारदसंवादे व्यंकटेशसहस्रनामस्तोत्रम् ।

लेखनकाल वगैरे : " विरोधि नाम संवत्सरे आषाढ वदि त्रयोदश्या-मिंदुवासरे समाप्त । स्वहस्त कोनेरी अच्युत नेत्राळिखितं । शके १६४० ॥ "

**१०२४ ]** बाड–पृ. सं. २८ × २ = ५६
शिवाय १०।२० नष्ट [१५४

(१) श्रीसमर्थ, केशव, परमानंद, कोनेर ( कृत मंगळमूर्तीची आरती ) तुका, माणो, बसलिंग, माधवदास, शिवराम पूर्णानंद ( कृत रामाष्टक–

संस्कृत दहा श्लोक ) यांचीं पदपदांतरें. त्यांत केशव आणि तुकाराम यांचा भरणा थोडा जास्त.

( २ ) कांहीं मंत्र, चक्रें, सुभाषितें वगैरे

( ३ ) शके १७०२ तील गहाणाचा जमाखर्च

१०२५ ] बाड–पृ. सं. ११ × २ = २१ [१५०

श्रीसमर्थ, तुकाराम, कृष्णानंद, एकनाथ, गोसावीनंदन, उद्धवचिद्‌घन ( ज्याचे वंशीं कुलधर्म रामसेवा ), जनी, विठ्ठलनाथ, नामा, गुंडा केसरी इत्यादिकांचीं पदपदांतरें

१०२६ ] गळांठा [१००–२००

( १ ) विप्र प्रेमदास कृत अंबाबाईचें नवरात्र–पद

( २ ) श्रीसमर्थ, जीवन्मुक्त, अमृतकवी, ज्ञानदेव यांचें एक एक पद

( ३ ) देवाचीं निरनिराळीं नांवें घेऊन केलेला धांवा

( ४ ) चार तत्कालीन लिपीचीं पत्रें, विशेष महत्त्व नाहीं

( ५ ) पांच किरकोळ कागद

## श्रीदासविश्रामधामकारांचा संग्रह

१०२७ ] १
पोथी–पत्रसंख्या ३६२ [२००

पूर्णानंदानुचर शिवराम कृत अध्यात्मरामायण

( १ ) शिवराम कल्याणीचे. त्यांची अफाट ग्रन्थसंपत्ति कल्याणीस आहे. हा ग्रन्थ छापला गेला पाहिजे, असें मला वाटतें.

( २ ) सात हि कांडाचे क्रमशः ७, ९, १०, ९, ५, १६, ९ मिळून ६५ अध्याय आहेत. उत्तर कांडाच्या शेवटच्या अध्यायातील कांहीं ओव्या :

अध्यात्मरामायण संस्कृत । चतुसहस्र श्लोक ग्रथित ।
कांहीं उणें उणपूर परिमित । त्याचा गर्भार्थ मी वदलों ॥ ८

मातेपेक्षां हि निंदकाची योग्यता मोठी, तो कां ?

माता धोर कीं पाहतां जनीं । ते मळ काढी पृथक भाजनीं ।
धन्य माझी निंदक जननी । जिव्हाकरूनि क्षाळिजे ॥ ९६

ग्रंथसमाप्ती १६०७ विजयादशमी रविवार रोजीं झाली :

रविवंशींचा सुरपावतार । म्हणोनि दिन हि रविवार ।
विजयी जाहला रघुवीर । तिथी मनोहर विजया दशमी ॥ १००
आसुरी संपद संव्हारी । ऐसिया क्रोधी संवत्सरीं ।
गुरुदक्षिणांची च धारी । म्हणोनि निर्धारीं दक्षिणायन ॥ १०१

ग्रन्थकाराला रामकथेचा लागलेला ध्यास :

नवल रामाचें विंदाण । ग्रंथवक्ता स्वयें नारायण ।
लेखक लेखणी लेखन । जाला आपण मसी कांहीं ॥ १०५
जागृतीसी विहरतां । दृष्टी देखे रामकथा ।
ग्रास नाकळतां जेवितां । जिव्हेसी कथारुचि लागे ॥ १०६
अवचट पडतां स्वप्न । तेथ हि देखे नारायण ।
कांहीं निजलो संवे चि येऊन । राम आपण काय करी ॥ १०७
हाती धरूनिया काठी । उठीं म्हणे लिहावयासाठीं ।
येथवरी रामाज्ञा मोटी । रामें पाठी वर पुरविली ॥ १०८

लेखक व लेखनकाळ :

संतनामामध्यें बहुत । त्यांत हि चित्तासी जे आवडत ।
ते ज्ञानदेव नामदेव येकनाथ । रंगी रंगनाथ निजानंदी ॥ ११०
वास्तव ज्ञानेश्वर समर्थ । स्वयें चि होउनि कोनेरीनाथ ।
श्रीरामायण अस्तव्यस्त । रूपा येथें आणिलें ॥ १११
शके १६०७ सोळाशहे सातोत्तर । ते टीका केली शिवरामेश्वर ।
कोनेरी दावा स्वादेंर । जाला विचारलेखकु ॥ ११२ ॥

ग्रन्थसंख्या व ग्रन्थारम्भसमाप्तीचें स्थळ :

पांच सहस्र पाच शत ५५०० । इतुकी ग्रथपंक्ती गणित ।
श्लोका पवस्या सुरस अद्भुत । जाली समाप्त कल्याणीं ॥ ११६ ॥
प्रारंभी हि कल्याणी । समाप्तस्थळ हि कल्याण ।
ग्रंथसमर्गें हि कल्याण । राम कल्याण पासाठीं ॥ ११५ ॥

१०२८] २
पोथी-पत्रें ४४२ [२००

रंगनाथ कृत योगवासिष्ठसार

( १ ) प्रकरणें ६ ते १० च फक्त आहेत व या पांच प्रकरणांची ओवीसंख्या ३५२५ भरते.

( २ ) या ग्रन्थानें महाराष्ट्रवाङ्मयांत एक मोठें विचित्र कोडें घातलें आहे. ग्रन्थ एक च, पण त्याच्या कर्तृत्वावर दोघा निरनिराळ्या रंगनाथांच्या तर्फे हक्क सांगण्यांत येत आहे. रंगनाथ दोन होऊन गेले. दोघांची परंपरा भिन्न आहे. एक निजानंदगुरूचे श्रीरामदासपंचायतनांतील निगडीकर रंगनाथ, व दुसरे कृष्णानंदगुरूचे मोगरेकर रंगनाथ. जेथें जेथें गुरूचें नाव आलें आहे, तेथें तेथें आपआपल्या परंपरेला अनुसरून फरक केलेल्या दोन्ही तऱ्हेच्या या ग्रन्थाच्या प्रति मिळतात, इतकें च नव्हे, तर दोघांच्या हयातीचा काळ हि भिन्न असल्यामुळें दोघांचा मूळ ग्रन्थलेखनाचा काळ निरनिराळा नमूद आहे. मोगरेकर रंगनाथांनीं १५३० आश्विन शु.८ गुरुवारीं ग्रन्थ संपविला आहे व निगडीकर रंगनाथांचा ग्रन्थ १५८४ च्या माघ शु. १० स पूर्ण झाला, असें म्हटलें आहे.

( ३ ) तेव्हां हा ग्रन्थ कोणाचा मानावा ? प्रस्तुतची प्रत मोगरेकर रंगनाथांची आहे. निगडीकर रंगनाथाच्या प्रतीवरून शके १८२७ त छापलेली प्रत आमच्या संग्रहीं आहे. त्या प्रतीचे संपादक प्रस्तावनेंत मात्र म्हणतात कीं, ग्रन्थाचें कर्तृत्व मोगरेकर रंगनाथांचें असावें. आम्हास हि तसें च वाटतें. मोगरेकर रंगनाथांच्या कांहीं खुणा निगडीकर रंगनाथांच्या प्रतीवरून छापलेल्या प्रतींत आम्हांस आढळतात. उभय रंगनाथांच्या पश्चात् ज्या कोणी हें चौर्यकर्म केलें असावें त्याच्या कडून त्या खुणा बुजविल्या गेल्या नाहींत.

( ४ ) जुने ग्रन्थ अशुद्ध व गबाळपणानें छापण्याचें पाप मधल्या काळांत फार घडलें ! असला निष्काळजीपणा महाराष्ट्राला शोभत नाहीं. या च छापलेल्या प्रतींत मोगरेकर रंगनाथांच्या कांहीं ओव्या दिल्या आहेत, त्यांतील कांहीं हास्यास्पद अशुद्धें :

| छापलेली प्रत | प्रस्तुतची प्रत |
|---|---|
| कोणी सिद्धानंद ऐसें म्हणती । | कोण्ही सिद्धानंद ऐसें म्हणती । |
| किती वर्षें करूं क्षेत्रीं वस्ती ॥ | कितीयेक वर्षें कुरुक्षेत्रीं वस्ती ॥ |

| | |
|---|---|
| अनेक शिष्य बोलिले । | अनेक शिष्य प्रबोधिले । |
| महानंदसुखें निवाले ॥ | महानंदसुखें निवाले ॥ |
| धारा नाम महानगरी । | धारूर नाम महानगरी । |
| गोदावरीच्या दक्षिणतीरीं ॥ | गोदावरीच्या दक्षिणतीरीं ॥ |
| प्रकाशक शिरीं ठेविला ॥ | पद्मकर शिरीं ठेवियला ॥ |
| कलिकालाभिधान संवत्सराचे ॥ | कीलक अभिधान संवत्सराचे ॥ |

यापुढें महाराष्ट्रानें हें सारें पाप धुऊन टाकलें पाहिजे !

(५) मोगरेकर रंगनाथानीं हा ग्रन्थ १५३० त नाशिक हे लिहिला. १५१० त श्रीसमर्थांचा जन्म व १५४१ ते १५५४ त्यांचे नाशकाजवळ टाकळीस व पंचवटींत वस्ती. या काळांत व त्या सुमारा नाशकास कोण कोण होते व कोणते ग्रन्थ निर्माण झाले, त्याचा शोध श्रीसमर्थचरित्रकारानें केला पाहिजे.

१०२९]

६३

पोथी–पत्रें २२१ [१५०

रंगनाथ कृत योगवासिष्ठसार

दुसरी प्रत. प्रकरणें ६, ७, ८ व ९. नवव्या प्रकरणाचीं शेवटचीं दोन चार पत्रें कमी. ही हि प्रत मोगरेकर रंगनाथांची च आहे.

१०३०]

६४

पोथी–पत्रें ३१५ [७५

रंगनाथ कृत योगवासिष्ठसार

प्रकरणें १ ते ५, ओवीसंख्या २७५६. हीं पहिलीं पाच प्रकरणें व १०२८ वीत पुढचीं पाच प्रकरणें, मिळून पूर्ण ग्रन्थ होतो. सबंध ग्रन्थाची ओवीसंख्या ६२८१ होते हीं हि प्रकरणें मोगरेकर रंगनाथाचीं च म्हणून आहेत.

१०३१]

१०१

पोथी–पत्रें ७ [१००

शिवराम कृत श्लोकबद्ध वाशिष्ठसारवैराग्यनिरूपण नाम प्रथमप्रकरणम्

पूर्णानंदांचे च हे शिवराम दिसतात. प्रकरणाचे तीस श्लोक आहेत. शेवटचा ३१ वा :

> वासिष्ठसारार्थ धरूनि ऐसा । श्लोकाप्रती श्लोक चि देशभाषा ।
> तेथील वैराग्यनिरूपणातें । दाऊनि दिल्हें शिवरामनाथें ॥

१०३२ ] २ पोथी-पत्रें ५३७ [ १५०

जीवन्मुक्त कृत गीताप्रभाकर ऊर्फ जीवन्मुक्ती

( १ ) ही गीतेवर टीका आहे. प्रथम मूळ संस्कृत श्लोक, मग मराठी समानार्थी श्लोक व नंतर त्या च अर्थाचें पद, अशी या टीकेची पद्धति आहे. ग्रन्थ अप्रकाशित आहे.

( २ ) ग्रन्थारंभीं परंपरेचा जो श्लोक आहे, त्यावरून असें दिसतें कीं, प्रत्यक्ष श्रीज्ञानेश्वरांची जीवन्मुक्तावर कृपा होती. त्यांच्या ग्रन्थांवरून त्यांच्या विषयीं यापुन जास्त कांहीं माहिती होऊं शकत नाहीं. आमच्या श्रीधरपंतांनीं मला सांगितलें होतें कीं, एकेहाळीजवळ च अनवार म्हणून गांव आहे, तेथील हे जीवन्मुक्त राहणारे होत. अनवार येथें माझें जाणें झालें नव्हतें. कोणी शोध करावा.

( ३ ) टीकेची कल्पना व्हावी म्हणून, ग्रन्थकारानें आरंभीं केलेल्या नमनांतील पदासह एक श्लोक व टीकेचा शेवटचा श्लोक असे येथें देतों :

> मोहार्णवीं जीव बुडोनि गेले । शोकानळें भस्म जळोनि जाले ।
> त्यालागुनी अमृतरूप गीता । वंदीन मी तारक दिव्यमाता ॥

पद

सुखदायक माता गीता । वंदिन सुरसरिता गीता ॥ ध्रु०
कृष्णमुखाब्जापासुनि जाली । त्रैलोक्यातें व्यापुनि ठेली ॥ १
पतितपावन हे चिद्गंगा । स्मरणें वारितसे भवसंगा ॥ २
शोकमोहो अनळातें शमवी । जीवन्मुक्तपदीं जन ठेवी ॥ ३

> श्रीकृष्ण योगेश्वर जेथ आहे । धनुर्धरु अर्जुन जेथ पाहे ।
> तेथें चि लक्ष्मी विजयाभिवृद्धि । सद्बुद्धिचा निश्चय हा त्रिशुद्धी ॥

पद

महाराजा सांगतों तुजपासी । माझी मती हे जाण निश्चयेंसी ॥ ध्रु०

योगेश्वर श्रीकृष्ण जेथ असे । धनुर्धारी हा पार्थ जेथें वसे ॥ १

राज्य लक्ष्मी तेथें चि विजय सिद्धी । कुशलता तेथें चि अभिवृद्धी ॥ २

स्वर्ग मोक्ष हे तयाचिये हातीं । जीवन्मुक्त हे वर्म वोळखती ॥ ३

१०३३ ] १० [१५०

पोथी–पत्रें ८२

जीवन्मुक्तीवाक्य

हा एक वेदांतप्रक्रियेचा गद्यात्मक सुंदर ग्रन्थ आहे. क्षराक्षर, पद, मोक्ष, द्वन्द्व, त्रिताप, ज्ञान, भक्ति, वैराग्य, वर्ण, चतुरावस्था, साधक, संसार-निवृत्ति, अखंडवाक्यार्थ, द्वैताद्वैतातीत, त्रिपुटी, प्रकृतिपुरुष, सर्वसाक्षित्व, अन्वयव्यतिरेक, निराभिमानदशा इत्यादि पाच पचवीस विषयाचें स्वतंत्र विवेचन केलेलें आहे. ग्रन्थात ग्रन्थकाराचें कोठें नाव नाहीं. मुखपृष्ठावर ग्रन्थाचें नाव दिलेलें आहे, त्यावरून हा हि ग्रन्थ जीवनमुक्ताचा च असावा असें वाटतें. ग्रन्थाच्या शेवटचा काही मासला :

कोणी येक जीव गीतापारायण करितो । कोणी विष्णुसहस्रनामपारायण करितो । कोण्ही मंत्रजप करितो । कोण्ही भगव चिरकुट करितो । कोण्ही जटाधारी सन्यासी होतो । कोण्ही काळीं चिरकुट करून मानभाव होतो । कोण्ही लिंग बांधुन जंगम होतो । कोणी वैरागी होतो । कोणी जोगी होतो । पृथ्वीवर नानाविध मत आहेत । कोणी लोक संसार करिताहेत । कोणी लोक निरासिवंत आहेत । कोणी तुफवावा करिताहेत । कोणी सिपाहिगिरी करितो । ऐसे सकळ ही जग आपुलया आपुलया अभिमानकरून आहेत । सकळ ही जग ब्रह्मस्वरूप आहे । ज्यास आपुलें स्वरूप ब्रह्म च आहे म्हणुन कळत नाही । ज्यास भगवत्कृपा होती त्यास ब्रह्मास्मैक्य ज्ञान होईल । आणि ज्यास ब्रह्मात्मैक्य ज्ञान जालें ते सकळ जग ब्रह्म च पाह-ताहेत । हा विषय निराभिमानदशा प्रकर्ण समाप्त ॥

१०३४ ] ४ [१५०

पोथी–पत्रें ४७

चांगदेवपासष्टीचें गद्यात्मक विवरण — वीरेश्वर रत्न कृत

(१) श्रीज्ञानेश्वरांनीं चांगदेवास ६५ ओव्यांचें पत्र लिहिलें होतें, तें चांगदेवपासष्टी म्हणून प्रसिद्ध आहे. त्यास च श्रीज्ञानेश्वर कृत लेखनग्रंथ म्हणतात. त्या पत्रावर ही सुंदर गद्यात्मक टीका आहे, ती प्रकाशनाला सर्वथैव योग्य आहे.

(२) परंब्रह्म परंधाम सच्चिदानंदविग्रहम् ।
ज्ञानेश्वर इति ख्यातं प्रणमामि गुरुं परम् ॥ १ ॥

असें नमन करून वीरेश्वर टीकेला आरंभ करितांना म्हणतात : " श्रीज्ञानेश्वर योगिवर्य चांगदेवयोगेश्वरासि पत्रलेखनमिषें बोधीप्रबंध निर्मूनि समस्तसाधकजनांचि अनायासें ब्रह्मात्मैक्यबोध व्हावया योगवेदांतसिद्धांत तत्त्वानुभवसिद्धांत प्रगटिते जाले । त्या बोधियाचा अर्थ श्रीगुरुज्ञानेश्वरब्रह्मविद्यैप्रसादें यथामती सांगिजेतो ॥ "

(३) आणि टीकेचा शेवट करितांना म्हणतात : " श्री ज्ञानदेवस्वामी ते साक्षाद्विष्णुपरमात्मा त्याचें या ग्रंथाचें विवर्ण कोण करूं सकेल । तथापि तो हृदयस्थ त्याच्या चि प्रसादें यथामति बोधियाचा अर्थ कथिला तो संतों पाहुनि न्यूनाधिक्य असलियां क्षमा करावी हे वीरेश्वर वल्लभ दीक्षिताची विज्ञापना ।

## १०३५ ] ५ पोथी–पत्रें ८९ [ १२५

आत्माराम कृत क्रमसार ग्रंथ–ओ. ५४८. हा लहान पण महत्त्वाचा श्रीसांप्रदायिक ग्रन्थ सभेनें श्रीरामदासी ग्रन्थमालेंत तेरावा भाग म्हणून वीस वर्षांमागें छापला होता. त्याची आवृत्ति निघाली पाहिजे.

## १०३६ ] ६ पोथी–पत्रें ८९ [ १०५

खड्गमाला, ब्रह्मांडोत्तरे ललितोपाख्याने हयग्रीवागस्त्यसंवादे ललितासहस्रनामस्तोत्रम्, महचरयोगिनीविद्याया महावने शिवशक्तिसंवादे आद्यन्तगुप्तसारे आद्यन्तविद्योत्तमे उत्तरभागे प्रथमपादमूलमंत्रात्मकं ललिताहृदयस्तोत्रम्, स्कंदपुराणे हयग्रीवागस्त्यसंवादे ललितास्तवराजः, ललितात्रिशति (अपूर्ण), त्रैलोक्यमोहनं नाम कवचं, अशीं प्रकरणें

स्तवराजाच्या शेवटीं प्रतीचा लेखनकाल दिला आहे : " शके १७५२ विकृतिनामसंवत्सरे "

१०३७ ] ७ पोथी–पत्रें १२५ [ १२५

रंक कृत आत्मलीळा ग्रन्थ

दासविश्रामधामकर्ते एकेहाळीमठपति आत्मारामहाराज यांचें हें चरित्र आहे. पोथीचीं मधलीं मधलीं पानें गेलेलीं आहेत. आहेत तीं सर्व जुळवून त्यांचा करतां आला तेवढा उपयोग दासविश्रामधाच्या प्रस्तावनेंत केला आहे.

१०३८ ] ८ पोथी–पत्रें ११५ + १३ [ १५८

पंचदशीवर रामकृष्ण कृत गद्यात्मक मराठी टीका. पहिलें आणि पांचवें, अशीं दोन च प्रकरणें. पांचव्या प्रकरणाचीं पृष्ठें १ व २ नाहींत.

पहिल्या प्रकरणाचे शेवटीं लेखनकाल वगैरे आहे तो : " हेविळंबि संवत्सर मार्गशीर्ष शुध्द पौर्णिमा ... । नारायण लेखक चंदाडकर । "

पांचव्याच्या शेवटीं " नारायणेन लिखितम् । हेविळंबि संवत्सर माघ शुध्द पंचमी सोमवारी ... । " येथें वार दिलेला असल्यामुळें लेखनशक १६११ ठरवितां येतो.

१०३९ ] ६२ पोथी–पत्रें २८६ [ २००

पंचदशीवर रामकृष्ण कृत गद्यात्मक मराठी टीका

दुसरी प्रत. ( १ ) चित्रदीप, ( २ ) तृप्तिदीप, ( ३ ) कूटस्थदीप, ( ४ ) ध्यानदीप, ( ५ ) नाटकदीप, ( ६ ) तत्त्वविवेक, ( ७ ) द्वैतविवेक, ( ८ ) भूतविवेक, ( ९ ) पंचकोशविवेक, ( १० ) महावाक्यविवेक, ( ११ ) ब्रह्मानंदे योगानंद, ( १२ ) आत्मानंद, ( १३ ) वें प्रकरण मधलें च तेवढें या प्रतींत नाहीं, ( १४ ) विद्यानंद आणि ( १५ ) विषयानंद अशीं प्रकरणें आहेत.

चवथ्या दीपाच्या अंतीं " स्वहस्त महीपति लिखितं " असें लेखकाचें नांव आलें आहे. अनेक प्रकरणांच्या शेवटीं लेखकानें " श्रीगुरुशिवरामार्पणमस्तु "

असें म्हटलें आहे. यावरून लेखक महीपति हे श्रीकल्याणशिष्य आपचंद-गडपति शिवराम यांचे शिष्य असावेत, असें वाटतें.

१०४० ] ९ पोथी-पत्रें ३८ [ १५१

श्रीमत् भगवद्गीतेची महेंद्रयति कृत प्रबोधचंद्रिका नामक पदपदार्थप्रबोधिनी अशी भाषाबद्ध टीका

भाषाबद्ध म्हणजे प्राकृत मराठी भाषेंतील. टीका सुंदर आणि उपयुक्त आहे, दुर्दैव एवढें च कीं, फक्त तीन च अध्याय उपलब्ध आहेत.

१०४१ ] ११ पोथी-पत्रें ४२२ [ १४०

ज्ञानेश्वरकृत अनुभवामृताचें वीरेश्वर कृत व्याख्यान

( १ ) हें प्रचंड, सुंदर, सुलभ व्याख्यान प्रकाशनाला योग्य आहे. शेवट :

" इति श्रीनरसिंहदीक्षितनंदनवीरेश्वरवल्लभकृते अनुभवामृतव्याख्याने। दशमप्रकरणं संपूर्णम् ॥ १० ॥ शालीवाहनशके ॥ १७१७ ॥ आनंदनाम संवछरी वैशाख शुद्ध द्वितीया गुरुवारी श्रीज्ञानेश्वरप्रसादें श्रीशंकरनाथश्रीदेशिकेंद्रानुग्रहें । चक्रापट्टणास दक्षिणभागी वृंदारण्यक्षेत्री श्रीयोगानंदलक्ष्मीनृसिंहाचे संनिधी अनुभवामृतग्रंथाचे व्याख्यान यथामती वीरेश्वरें केलें तें संतीं परिसोनि अर्थ अधीक उणा असलियां क्षमा करावी हे वीरेश्वराची विनयप्रार्थना ॥ ......श्रीज्ञानेश्वरार्पणमस्तु ॥ श्रीआत्मार्पणमस्तु ॥ ... "

( २ ) संवत्सराचें नाव, महिना, मिति, वार विचारांत घेतां शक १७१६ येतो. अंकांत नेहमीं पुढचा शक दिलेला असतो कीं काय, न कळे.

( ३ ) आत्मार्पण म्हणजे आत्मारामहाराजाना अर्पण

१०४२ ] २४ पोथी-पत्रें १८+५२+५+१० [ १४०

वीरेश्वर कृत अनुभवामृतावरील व्याख्यान ( )

दुसरी प्रत, पण अपूर्ण. प्रकरणें २, ७, ८ व १० एवढीं च आहेत. शिवाय प्रतीची एक कडा बरीच कुरतडली गेली आहे. या हि प्रतीच्या

शेवटीं वरील प्रतीप्रमाणें च बहुतेक मजकूर असून लेखनकाळ मितीसह तंतोतंत तो च आहे. त्यानंतर या प्रतींत आणखी जो थोडा आहे तो : " श्रीगुरुवीरेश्वराय म्हणे नमः ॥ इदं पुस्तकं शाहगडस्थ चिंतामणिभट्टस्य पुत्रः थापूभट्टस्य ॥ शांडिल्यगोत्रोत्पन्नस्य ॥

" ताताभिधा नृहरि माय रमा जयाची । पाणी हि पेकुनि सदैव रमा च याची । वीरेश्वर प्रभु म्हणोनि जयासि नाम ।

च्यया चरण सुरतहलेख्या भागात गेला, तो आपण " त्यांच्या पदा करित मी शतशः प्रणाम ॥ " असा पुरा करूं.

१०४३ ] १२ पोथी–पत्रें १४७ [ २२१

## मुकुंदराज कृत विवेकसिंधु

( १ ) प्रतीचे हाल झालेले होते, त्यामुळें जीर्णत्व आलें आहे. पत्रें अस्ताव्यस्त होतीं तीं जुळविलीं आहेत. क्वचित् एकाद दुसरें पत्र मघलें नाहीं. प्रत महत्त्वाची आहे.

( २ ) सोळाव्या प्रकरणाचे शेवटीं एक श्लोक आहे तो :

अजय शाह जंग दंग झाले मस्त भगी ।
गगम्मोमगम् क्या सु शाहरंगी ।
परकदम् दुन्यासे ति दावा भडंगी ।
पोहि प्राण मन् लोक गावे भुजंगी ॥ १

( ३ ) सतराव्याच्या शेवटीं आहे तो :

नसे ध्यान त्या लक्ष सोहं स्मरेना ।
अरूपासि हे नाम कैसें असेना ।
न ये सांगतां पार याचा कुडेना ।
गुरुगम्य माणेश्वरा बोलवेना ॥

( ४ ) शेवटीं लेखनकाल वगैर आहे :

" शके १६३५ संवत्सर नंदन नाम । फाल्गुण मासे असीत पक्षे । द्वितीयायां इंदुवासरे तद्दिने घडर ग्रामे । रामेश्वरसंनिधौ परोपकारार्थं । लिखितमिदं । ... हस्ताक्षर नागेश + + "

# १०४४ ]

११०
पोथी-१८ + ६ + १ + १ [१३१-१५०

विवेकसिंधूच्या चार निरनिराळ्या प्रतींचीं त्रुटित पत्रें ( १ ) प्रकरणें १६, १७, १८. मागील प्रतीपेक्षां हि हीं प्रत जुनी दिसते, ( २ ) १७ वें प्रकरण, ( ३ ) एक फाटकें पान, ( ४ ) एका प्रतींचें अगदीं शेवटचें पत्र. त्यावर लेखनकाळ वगैरे आहे : " शके १७ सेहें २८ नेया प्रवर्तमाने क्षय नाम संवत्सरे कार्तिक मासे शुक्ल पक्षे पंचम्यायां रियरवासरे तृतीय प्रहरे ग्रंथ लिखितं... ॥ इदं पुस्तकं काळिगी गोविंद भट्टस्य सुत नीलकंठेन लिखितं नान्यथा ॥... ॥ "

# १०४५ ]

१११
पोथी-पत्रें १७ + २ [३००

## विवेकसिंधूची परिभाषा

जशी ज्ञानेश्वरीची परिभाषा उपलब्ध आहे, तशी ही विवेकसिंधूची परिभाषा होय. माझ्या पाहण्यांत किंवा ऐकण्यांत ती पूर्वी नव्हती. महत्त्वाची आहे. प्रकाशित झाली पाहिजे, विवेकसिंधूच्या व सामान्यपणें जुन्या मराठी ग्रन्थांच्या वाचकांस मार्गदर्शक होईल. दोन प्रती आहेत : एक पूर्ण आहे, तिचीं १७ पृष्ठें आहेत व दुसऱ्या प्रतीचीं २ च पृष्ठें आहेत.

# १०४६ ]

११२
पोथी-पत्रें सुमारें ३०० + १० [२००

## राघवरंक कृत संदेहरण

दोन प्रती. दोन्ही अपूर्ण, एका प्रतीचीं सुमारें ३०० अस्ताव्यस्त पत्रें व दुसरीचीं अवघीं १०. या ग्रन्थाची एक पूर्ण प्रत केज येथें पाहण्यांत आली होती, तिच्यावरून केलेली प्रत सभेच्या संग्रहीं आहे. तिची नोंद पुढें करूं.

# १०४७ ]

११४
वाडाचीं तीन पृष्ठें दिसतात [१५०

## वेणी कृत कौल- श्लोक ३६

१०४८ ] १५ पोथी-पत्रें ८३ [ १५०

एकनाथ कृत सटीक हस्तामलक-ओ. ६७१. शेवटीं " श्रीगुरु-सहजानंदार्पणमस्तु " आहे. आरंभीं हि " श्रीगुरुसहजानंदाय नम. " आहे.

१०४९ ] २१ पोथी-पत्रें ४८ [ २००

एकनाथ कृत सटीक हस्तामलक-ओ. ६७२. शेवटीं " श्रीगुरु-येकनाथार्पणमस्तु " आहे. या प्रतीचें पहिलें पत्र नाहीं.

१०५० ] १६ पोथी-पत्रें १२५ [ २५०

रामानंद कृत प्रश्नोत्तरखंड

ओवीबद्ध, सुंदर, संपूर्ण ग्रंथ. याचे एकंदर २२ अध्याय आहेत, प्रकाशनाला योग्य आहे.

या च ग्रंथाच्या दुसऱ्या एका प्रतीच्या पृष्ठाचे पाच तुकडे, या च बासनाच्या पोटीं ठेवले आहेत

१०५१ ] १७ पोथी-पत्रें ९१ [ १२१

श्रीसमर्थ कृत रामायण

पद्य सुंदर आणि शुद्धपाठ, संपूर्ण, सुंदर प्रत. प्रतीचा लेखनकाळ : " इदं पुस्तक भाव नाम संवत्सर श्रावण वद्य सप्तमी तिथी ११ प्रथम पानें लेखन समाप्त ॥ श्रीरामसमर्थ रघुवीर ॥ शके १७३६ ॥ सन १२२४ "

१०५२ ] १८ पोथी-पत्रें ६ [ १२५

शिवराम पूर्णानंद कृत रामतुळसी

अभंग एकंदर ११० अप्रकाशित प्रकाशना योग्य.

१०५३ ] १९ [१५०
पोथी-पत्रें ९

शिवराम पूर्णानंद कृत निःसंदेहदिवाकर-ओ. ९०

१०५४ ] २५ [२००
पोथी पत्रें-९

शिवराम पूर्णानंद कृत नि.संदेहदिनकर-ओ. ९०. हा व मागील १०५३ वा ग्रन्थ एक च. पण नावात थोडा फरक. प्रकरण अप्रकाशित. प्रकाशना योग्य.

१०५५ ] २० [१५०
पोथी-पत्रें २

शुकाचार्य विरचिता प्रश्नोत्तरमाला-संस्कृत श्लोकसंख्या ३२

१०५६ ] २१ [१२५
पोथी-पत्रें १२

आत्माराम कृत अक्षरमालिका

ओव्या ८०, श्लोक १०, अष्टाक्षरी ९, पद १, अभग १.

१०५७ ] २२ [१२५
पोथी-पत्रें १८

आत्माराम कृत आत्महित-ओवीसंख्या १५०

१०५८ ] २३ [१५०
पोथी-पत्रें ९ पैकीं ६ वें नाहीं

शिवराम कृत बोधामृत-श्लोकसंख्या ५३

प्रकाशित होईल तेव्हा होवो, पाच श्लोक पठनार्थ देतों.

हिरोनिया माइक हा पसारा । दिल्हा निजानंदपदीं च थारा ।
वारा न लागे मज या भवाचा । याळागि मी दास तया गुरूचा ॥४४

त्या सद्गुरूवीण कसें असावें । त्यावेगळा जीव कसा थरावें ।
दावा मला तो गुरु राजयोगी । पाजा तयाचे पदतीर्थ वेगीं ॥ ४८

तत्पादतीर्थीं मज आजि न्हाणा । भेटेल कैं तो गुरु रामराणा ।
पाहीन त्याचा मुखचंद्र डोळा । भोगीन तें मी सुख वेळवेळा ॥ ४९
गुरु ईश्वरू भेद मातें दिसेना । गुरु ब्रह्म हे भावना सत्य जाणा ।
जर्‍हीं अन्यथा बोल बोलेन जेव्हां । क्षणामाजि मी भस्म होईन तेव्हां ॥५०

भजन निजगुरूचें सर्व भूतीं करावें ।
गुरुचरण पहाया सर्वकाळीं झुरावें ।
गुरुमुखनिजबोधें चित्त आधीं भरावें ।
गुरुवर शिवरामें बोलिलें आचरावें ॥ ५२

१०५९ ]

२६

पोथी–पत्रें ६ [१५०

( १ ) निवृत्तिनाथांनीं ऐक बा ज्ञानेश्वरा । म्हणून ज्ञानेश्वरांना केलेला समाधीबोध–ओवीसंख्या ३०

( २ ) चत्वारदेह पंचीकरण–कोण कृत न कळे

१०६० ]

२७

दोन पोथ्या–पत्रें ३० व २१ [१५०

सीतारामबावा कृत अन्वयव्यतिरेक–दोन प्रती

हें प्रकरण श्रीसमर्थांचें नसून कोंकणप्रांतांत श्रीसमर्थांचे सीतारामबावा म्हणून शिष्य होते त्यांचें आहे, ही गोष्ट श्रीरामदासी मासिकानें मागें च सिद्ध केली आहे, पण "समग्रग्रन्थाचे" प्रकाशक कांहीं आपला हट्ट सोडीत नाहींत. एकदां कोणाला तरी हें प्रकरण श्रीसमर्थांचें म्हणून वाटलें व कोणी तरी तें त्यांचें म्हणून छापलें आणि तो च क्रम गतानुगतिकन्यायानें प्रकाशकांनीं आजवर चालविला आहे ।

या प्रकरणाच्या या दोन प्रती आहेत. एकीवरून च दुसरी केलेली दिसते. दोन्ही प्रतींवर स्पष्ट लिहिलें आहे : "अन्वयव्यतिरेक ग्रंथ । समर्थांचा शिष्य सीतारामबावा कृत समास अका ॥ ११ ॥ ओवीसं ० ॥ २५८ ॥" पहावें प्रकाशकांचें असून तरी इकडे लक्ष जातें किंवा नाहीं.

१०६१ ]

२८

पोथी–पत्रें १० [२५०

रामानंद कृत स्थालीपाक–पदें, श्लोक, वगैरे

१०६२ ] २९ पोथी–पत्रें ५ [२००

रामानंद कृत मुचुकुंदचरित्र–श्लोकबद्ध

१०६३ ] ३० पोथी–पत्रें ६ [२५०

रामानंद कृत राधामाधवविलास–श्लोकबद्ध

१०६४ ] ७३ पोथी–पत्रें सुमारें ४०० [२५०

रामानंद कृत भारत, भागवत, रामायण, पुराणें यांतील अनेक श्लोकबद्ध प्रकरणें.

हीं सारीं पत्रें अस्ताव्यस्त आहेत तीं सावकाश लाविलीं पाहिजेत.

दोन ठिकाणीं मध्यें च लेखकाचें नाव आढळलें : (१) सदाशिवनगर वेंकटेश। स्वहस्त ॥" (२) "सदाशिवकर। वेंकटेश ॥"

१०६५ ] १०७ पोथी–पत्र ५३ [२५०

रामानंद कृत कार्तिकमाहात्म्य–ओवीबद्ध

१०६६ ] ३२ पोथी–पत्रें ३७ [२००

विठो कृत गुरुगीता–मूळ श्लोक १३१ व टीकाओव्या ७३४. अप्रकाशित ग्रन्थ, प्रकाशनाला योग्य हे विठो राहणारे कल्याणीचे दिसतात. त्यांची परंपरा अशी : निवृत्ति–ज्ञानदेव–सोपान–माळो–नरहरि–माधव–विठो.

गरुडगंगेचिये तटीं। श्रीगुरुभक्ताचिये निकटीं।
पूर्ण जाली टीका म्हराटी। गुरुगीता घनवृष्टी सुखाची ॥ ७१८ ॥

गुरुगीता मंगळस्नान। हे जेथ वसे तेथ कल्याण।
कल्याणरूप शिव आपण। बोलिला निजखूण गुरुगीता ॥ ७२३ ॥

माळो सखा नरहरिस्वामी। माधव श्रीगुरु अंतर्यामी।
विठोसी नांदवी कल्याणधामीं। गुरुगीता आरामीं रमविता ॥ ७३१ ॥

**१०६७]** ३३ पोथी–पत्रें १२ पैकीं ९।१० नाहींत [२००

श्रीसमर्थ कृत पंचीकरण

स्पष्ट निर्देश करून ग्रन्थराजांतील १७–२–१५ ही ओवी आधराश घेतली आहे. शेवटीं " रामदास कृत " असें म्हटलेलें आहे.

**१०६८]** ३४ पोथी–पत्रें ६ [१५०

शिवराम कृत बोधषष्टी

**१०६९]** ५५ पोथी–पत्रें ९ [१५०

शिवराम कृत बोधषष्टी

दुसरी प्रत. मागील हि ४४७, ४८० वाढांक पहावे. अति अति गोड बोध आहे. प्रकाशित झाला च पाहिजे.

मानधि तनुला आळासी । विषयसुखें सेऊं जासी ।
अझुनी नाहीं धाळासी । आहा रे वाया गेळासी ॥ १९
आवडीविण गुरुचे पायीं । वरिवरि भजनें हे काई ।
मनिहुनि प्रेमा जंव नाहीं । तंव घरा न ये हरि भजतां हि ॥ २२
निरूपणसमर्था चटु रचती । लटिकचा माना हालविती ।
घरांत झगडा कालविती । विवेकदीप मालविती ॥ १३
गुरु करुणाघन वळला रे । तेणें हरि मज फळला रे ।
मोक्षतरुवर फळला रे । भवगिरि सगळा ढळला रे ॥ ५६

**१०७०]** ३५ पोथी–पत्रें ६ [१००

श्रीसमर्थ कृत पूर्वारंभ

**१०७१]** ३६ पोथी–पत्रें १२ [१००

अमृत कृत स्वरूपनिर्णय– श्लो. ९५. ग्रन्थ अप्रकाशित आहे. अमृतांनीं दिलेली आपली गुरुपरंपरा नमूद करण्याजोगी आहे : उमापति–

विष्णु–प्रजापति–वसिष्ठ–पराशर–व्यास–शुकदेव–गौडपाद–शंकराचार्य–विद्याचार्य–बोधघनाचार्य–ज्ञानघन–ज्ञानोत्तम–ज्ञानगिरि–सिंहगिरि–ईश्वरतीर्थ–नृसिंहतीर्थ–विद्यातीर्थसरस्वती–विद्यारण्य–विद्यातीर्थसरस्वती–मलयानंदसरस्वती–देवसरस्वती–कृष्णसरस्वती–नृसिंहसरस्वती–माधवेंद्र–अमृतानंद–गगनेंद्र माधवसरस्वती (गोदातीर नामतीर्थीं वस्ती)–विठ्ठलसरस्वती–अंबिकासरस्वती–अमृत

१०७२] ६८ [१५०
पोथी-पत्रें १२ पैकीं ७-१० नाहींत

अमृत कृत स्वरूपनिर्णय–दुसरी प्रत पण अपूर्ण

१०७३] ३७ [१५०
पोथी-पत्रें ९८

श्रीसमर्थ कृत एकवीससमासी

मुखपृष्ठावर "श्रीरामदासकृत येकवीससमासी नाम जुना दासबोध" अशीं दोन्हीं नांवें असून समासासमासाचे शेवटीं कोठें नुसतें "येकवीससमासी" म्हटलें आहे तर पुष्कळदां "जुना दासबोध" म्हटलें आहे. या ग्रन्थाचें मूळचें नांव काय व त्यास "जुना दासबोध" हें नामाभिधान केव्हां आणि कां प्राप्त झालें, हा प्रश्न विचार करण्यासारखा आहे.

मुखपृष्ठावर ओवीसंख्या १२४० दिली आहे, पण पाहिजे होती '१३४०' आणि तितकी च भरते.

१०७४] ३८ [२००
सुटीं पत्रें ८

अज्ञानसिद्धनागेश कृत पंचीकरणप्रमेय–अविंधभाषा

दोन रकाने करून डावे व उजवे संस्कृत किंवा मराठी पंचीकरण व उजवे बाजूस त्याचें अविंध भाषेंत रूपांतर. शेवट :

| | |
|---|---|
| इति मृत्युंजय अज्ञान | इति मृत्युंजयकु अज्ञान |
| सिद्ध नागेश पुरुषा निश्चय ॥ | सिद्ध नागेश पुछा या हक ॥ |

१०७५] ७० [५०
वही-पृष्ठें १०

वरील १०७४ ची ही कोणी तरी अलिकडे करून ठेवलेली प्रत

१०७६ ]

३९

पोथी–पत्रें ९ [१००

श्रीसमर्थ कृत अंतर्भाव

१०७७ ]

४०

पोथी–पत्रें १२ [१००

श्रीसमर्थ कृत अंतर्भाव

१०७८ ]

४१

पोथी–पत्रें ८ [१५०

श्रीसमर्थ कृत अंतर्भाव

१०७९ ]

४२

पोथी–पत्रें ५ [१२५

श्रीसमर्थ कृत पूर्वारंभ

१०८० ]

४३

पोथी–पत्रें ३० [१२६

पूर्णानंदानुचर शिवराम कृत अपरोक्षानुभूतिदीपिका

( १ ) मूळ श्लोक १४४ व तितके च प्राकृत समश्लोक. नंतर सहा श्लोक अपूर्व गुरुभक्तीचे आणि नंतर

कथिली शंकराचार्यें । अपरोक्षानुभूति हे ।
वद्रमं दीपिका दावी । शिवराम महाकवी ॥ १५१
पूर्णानंदप्रसादें हे । दीपिका दाविली सवे ।
विचारी यासि विश्वासें । शिवराम चि तो मेत्र ॥ १५२

( २ ) प्रतीचा लेखनकाळ वगैरे : " शके १७३० विभवनाम संवत्सर दक्षिणायने वर्षऋतौ श्रावण मासे शुक्लपक्षे सप्तम्यां भृगुवासरे लिखितं। कोठरुजखणमहात्मज कृष्णपाने लिखितं स्वहस्तं ॥ "

१०८१ ]

४४

पोथी–पत्रें ६ [१२७

शिवराम कृत अपराधस्तोत्रटीका

श्रीमत् शंकराचार्यांच्या अपराधस्तोत्राचा समश्लोकी उलथा. लेखनकाल वगैरे :
" शके १७३० विभवनाम संवत्सर दक्षिणायन वर्षरुतौ श्रावणमासे शुक्लपक्षे दशम्या इंदुवासरे लिखितं । कोधुरुजलक्षणभट्टात्मज कृष्णया स्वहस्तालिखित ॥ "

१०८२ ] ४५ पोथी–पत्रें २८ [ ११७

श्रीशंकराचार्यविरचितं प्रबोधसुधाकराख्यं प्रकरणम्

" शके १७३० वर्तमान व्यवहारीक चांद्रमान विभव नाम संवत्सरे दक्षिणायने वर्षरुतौ श्रावणमासे कृष्णपक्षे अद्यादद्दु पंचम्यां गुरुवासरे लिखितं कोधुरुजलक्षणभट्टात्मज लिखित स्वहस्त ॥ "

१०८३ ] ४६ पोथी–पत्रें २८ [ १२५

मुकुंदराज विरचित परमामृत

१०८४ ] ४७ पोथी–पत्रें १३ [ ११५

श्रीसमर्थ कृत निर्गुणध्यान

१०८५ ] ४८ पोथी–पत्रें ६ [ १००

श्रीज्ञानेश्वर कृत लिखित ऊर्फ पंचपदी

१०८६ ] ४९ पोथ्या–पत्रें ३ व ५ [ १५०

श्रीज्ञानेश्वर कृत लेखणी ऊर्फ लेखन ऊर्फ कल्याणपत्रिका– दोन प्रती. यातील ५१ वी ओवी :

गर्जोनि निवृत्तिज्ञाननाथ । ऐसें अबोळणें वाचित ।
हें पत्र पैठणीं येकनाथ । धाचील यो माय ॥ ५१

प्रकरण जर श्रीज्ञानेश्वराचें तर त्यात एकनाथांचा उल्लेख कसा यावा ?

१०८७ ]

५०

पोथी पत्रें-१० [१५०

श्रीसमर्थ कृत पचमान

१०८८ ]

५१

पोथा-पत्रें ७ [१५०

श्रीसमर्थ कृत अष्टाक्षरी पंचीकरणयोग

मालेतील तिसऱ्या भागात हें प्रकरण छापलें आहे.

१०८९ ]

५२

पोथी-पत्रें ९ [२००

श्रीसमर्थ कृत अक्षरपदमुद्रा-घाटी वळणाण. हें प्रकरण आपणास अजून छापणें आहे.

१०९० ]

५३

पोथी-पत्रें १९ [१५०

श्रीसमर्थ कृत आत्माराम

हें प्रकरण इतरत्र अशुद्ध छापलें गेलें आहे, सबब अजून तें शुद्ध छापणें आहे.

१०९१ ]

५४

पोथी-पत्रें २१ [१५०

श्रीरामीरामदास कृत कृतनिर्वाह-ओ. ९८१

हा ग्रन्थ श्रीसमर्थांचा कीं श्रेठाचा, हें ठरवावयाचें आहे.

१०९२ ]

५६

पोथी-पत्रें सुमारें ३०० [२५०

पूर्णानंदानुचर शिवराम कृत भागवत-येकादशस्कंध, समश्लोक. पत्रें अस्ताव्यस्त झालेलीं आहेत, तीं लावलीं पाहिजेत. शेवटचें कांहीं चरित्र-पर श्लोक देतों, कारण त्यांतील माहिती अगदीं नवीन आहे.

एकादशी मराठी भागवत मवाळें । मी अर्थहीन म्हणतां पण न मळावें ।
कांहीं च अर्थ न कळे अभिमानियांसी । श्रीएकनाथ दिसद त्रिमार्गी उद्धेश ॥ १९

येकादशाचा निज दाउनी दिवा । नेला स्वधामासि त्रिलोक जाणता ।
तो नाथिरचा थाक्र भगत मानुनी । श्लोकोक्ति बोले शिवराम होउनी ॥ ४०

मायेचा जो पाहतां आदि आजा । तो हा येका लाहला बाप माझा ।
आणि येथें पावटी नावरूपा । श्लोकीं श्लोकें दाखवी अर्थदीपा ॥ ४१

कोण्ही म्हणे तो शिवराम टोणपा । पाहा अनुष्ठान घडे चि ना जपा ।
उगें चि तुरते मिळऊनि पोरटीं । नाचे उडे गाय करीत चावटी ॥ ४५

कितेक येऊनि समीप वंदिती । भला जिवन्मुक्त म्हणोनि वानिती ।
निंदूनियां जा रिति वंदिती स्तुती । दोघे मला सद्गुरुरूप निश्चिती ॥ ४६

त्याग करुनि विकल्पा भद्र गोठा विळशी । त्यजुनि सकळ धंदा लागतां कृष्णपक्षी ।
अति अमळ दिनी हो पूर्ण येकादशीचें । निरवाण मग जालें जाण यकादशाचें ॥ ५२

कल्याणधामी शिवराम योगी । हे संपवी भागवत प्रसंगीं ।
घरेआ सनाला श्रवणार्थ याला । कल्याण हो सर्व हि भाविकाला ॥ ५३

१०९३ ] ५७ पोथी-पत्रें ५ [१५०

निवृत्तिप्रसादें ज्ञानदेव विरचित शुकाष्टकटीका
मूळ श्लोक ९ व टीकेचे श्लोक ३९, एकूण ४८

१०९४ ] ५८ पोथी-पत्रें ४ [१५०

( १ ) परमहंसानां समाधिव्याख्या व ( २ ) महावाक्यार्थप्रबोध-प्रकारव्याख्या, अशीं दोन संस्कृत प्रकरणें

१०९५ ] ५९ पोथी-पत्रें ६ [१५०

स्कान्दपुराणे क्षेत्रखंडे मल्लारिमाहात्म्ये मल्लारिकवचम् ।

१०९६ ] ६० पोथी-पत्रें २९ [१५०

विष्णुसहस्रनामस्तोत्रम्
"हे पुस्तक रामचंद्र भट बवा उपाध्ये तळेनकर याचें असे"

१०९७ ] ६१ पोथी-पत्रें ९१, पैकीं ११२ नाहींत । [१५०

विश्वनाथ कृत उपदेशरहस्य

कल्याणींच्या संप्रदातील १००० वा ग्रन्थ नोंदला गेला, त्या च ग्रन्थाची ही निराळी प्रत येथेदाळी येथील होय. हा ग्रन्थ वाचून आणखी एक गोष्ट लक्षात येते ती अशी कीं, विश्वनाथाचे आजेगुरु जे रंगनाथ, ते च १०२८ तील योगवासिष्ठकारकर्ते होत. त्या सारातील पर्वतेच्या कांहीं ओव्या या रहस्यात जशाच्या तशा आढळतात. ग्रन्थ छापला जावा, हें खरें.

१०९८ ] ६५ कागदाचें वेढाळें—अपूर्ण [१२५

पात मच्छमुनेश्वर, गोसावीनंदन, किंकर, कृष्णानंद, बाळ, नरहरि, दास तुका, जनपंडित, ज्ञानचैतन्य, मुक्तेश्वर (कृत ज्ञानेश्वराची आरती), एकनाथ, विप्र रामदास, कोकिळ, महीपति, अनाथ, उद्धवसुत, चिदानंद, दास शिवाचा, उद्धवचिद्घन, आनंदतनय, आदिनारायण, इत्यादिकांच्या आरत्या, पदें वगैरे

१०९९ ] ६६ एक जीर्ण कागद [१५०

शिवदिनकेसरी कृत परमार्थाचा अद्वय महानंद खरा। हे श्रीसमर्थांवर पद

११०० ] ६७ दोन पोथ्या-पत्रें सुमारें १५०।१५० [२००

एकनाथ कृत रुक्मिणीस्वयंवराच्या अस्ताव्यस्त दोन प्रती

११०१ ] ६९ पोथी-पत्रें सुमारें १५० [२००

एकनाथी भागवताची व इतर अस्ताव्यस्त पत्रें

# ११०२ ]

७१ व ७९ मिळून
पोथी-पत्रें २२ [१२५

ज्ञानदेव कृत तत्त्वमसि-ओवीबद्ध

प्रतीचें अक्षर एक तऱ्हेचें, परंतु शेवटीं निराळ्या अक्षरात लेखनकाळ वगैरे आहे तो : "शके १७२२ रौद्रनाम संवत्सरे श्रावण शुक्ल चतुर्दश्यां भानुवासरे तद्दिने ... । तुकोबारमज भीवरावेन लिखितं ... ... ॥ "

प्रकरण अप्रकाशित वाटतें, प्रकाशित व्हावें.

# ११०३ ]

७२
पोथी-पत्रें ९१ अपूर्ण [२५६

पद्मबोधिनी

ही गीतेवरील टीका महत्त्वाची दिसते ती कोण कृत आहे, कळत नाहीं. मागील १०४० पासून ही भिन्न आहे. पण दुर्दैव असें, फक्त अध्याय ८, १२, १४ एवढे च आणि ते हि अस्ताव्यस्त असे उपलब्ध आहेत.

आठव्या अध्यायाचे शेवटीं लेखनकाल आहे तो · "श्रावण शुद्ध प्रतिपदा चद्रवारीं समाप्त । वेंकोबा काशीनाथ । सदाशिवपंट वरित । मोकांव । पर्गणे कदरगुरु ॥ " आणि बाराव्याच्या शेवटीं :

" सिध्दार्तिनामसंवत्सर कार्तिक शुध्द दशमी " आहे, यावरून शक १६०१ येतो.

# ११०४ ]

७४
पोथी-पत्रें २ [२५०

अष्टादश जातीची उत्पत्ती

# ११०५ ]

७६
पोथी-पत्रें ४, अपूर्ण [१५०

शुद्ध ब्रह्मज्ञानाचा धडा-अपूर्ण

ऐशा ओविया पचवीस । शुद्ध ब्रह्मज्ञानाचा रस ।
निवृत्तिनाथगुरुदास । समरसे परब्रह्मीं ॥ २५

११०६ ]

७७

पोथी-पत्रें ११ [१५०

पंचीकरण

११०७ ]

७८

उसवलेल्या बाडाचीं ४४ पानें [१५०

यांत केशवस्वामी, उद्धवचिद्घन, आनंदसुत, मध्वमुनेश्वर, शिवदिन-केसरी, एकनाथ, मुकुंदराज, निवृत्ति, शिवराम पूर्णानंद, कबीर, तुकाराम, ज्ञानदेव, मुक्तेश्वर, अमृतेश्वर, रंगनाथ, इत्यादिकांचीं पदपदांवरें आहेत, त्यांत केशवस्वामींच्या पदांचा, श्लोकांचा वगैरे भरणा विशेष आहे.

११०८ ]

८३

तीन कागद [१५०

हे तिन्ही कागद उपयुक्त आहेत. दासविश्रामधामांत कोणत्या अध्यायांत कोणतें पद आलें आहे तें एका कागदावर दर्शविलें आहे. पदांचीं आद्याक्षरें दिलीं असून त्यांच्या मागें अध्यायांचे अंक घातले आहेत. दुसऱ्या दोन कागदांत सात रकाने पाडून निरनिराळ्या गावांतील पदें नोंदली आहेत.

११०९ ]

८४

आत्मारामांच्या परंपरेचा कागद [१५०

जय जया परंपरा नारायणा श्रीवरा ।
आरती ओंवाळीन । हृदयसिंधुविहारा ॥ धु०
विष्णु वैकुंठवासा हंस देव सर्वेशा ।
बोध वेष पूर्ण ब्रह्मा । सत्यलोकनिवासा ॥ १
वसिष्ठ ज्ञानराया । जय श्रीरामराया ।
दुःखपरलोकहर्ता । जय अंजनीतनया ॥ २
रामदास दासतोषका जय कल्याण ब्रह्मा ।
बाबा शिवराम स्वामी । रामचंद्र देशिका ॥ ३
देवी हे शिष्य नामें नित्य जपे जो प्रेमें ।
भेदभाव निरसोनिया स्वयें होय आत्माराम ॥ ४

१८५७ चैत्र व. ११

**१११०]** ८५ एक कागद [१५०

यांत दोन तीन सुभाषितें असून श्रीसमर्थसमाधीचा श्लोक आहे :

सोळासेत्र्य शालिवाहन शके संवछरे दुमंती ।
वारे ते शनि माघ वद्य नवमी साधूंचिया संगती ।
भक्ति ज्ञान विरक्त बोधित जना संतर्पणा सारुनी ।
श्रीमद्दास समर्थ सज्जनगडीं ठेले तनु त्यागुनी ॥ १

**११११]** ८६ पोथी–पत्रें ३ [१५०

विष्णुपुराणे कृष्णशतनामस्तोत्रम्

**१११२]** ८७ पोथी–पत्रें १४, उणें ५ वें [१५०

वाक्यसुधेची गद्यात्मक टीका–अपूर्ण

**१११३]** १०२ पोथी–पत्रें १०० [१५०

वाक्यसुधेची ओवीबद्ध टीका–अपूर्ण

**१११४]** ८८ पोथी–पत्रें १२७, कांहीं नष्ट [१००

एकनाथ कृत रुक्मिणीस्वयंवर

**१११५]** ८९ पोथी–पत्रें शिलक १२१ [१११

ज्ञानदेवी उर्फ ज्ञानेश्वरी–सुंदर अक्षर

नमो ज्ञानेश्वरा निष्कळंका । जयाचे गीतेची वाचितो टीका ।
गीताज्ञान होय लोकां । अतिभाविकां ग्रंथार्थियां ॥

" श्रीशालिवाहन शकें ॥ १७२४ ॥ दुंदुभि नाम संवत्सरे वैशाख वद्य ॥ ४ ॥ शुक्रवारीं कानुनगोरेणुरायवनूजेन शंकरेण लिखितं ॥ श्रीगुरुचरणे–अर्पणमस्तु ॥ श्री ॥ "

ए. सं. ३१

१११६ ] १० पोथी–पत्रें १८, पैकीं ९, १० व १७, १८ नष्ट. [१००

" पंचीकर्णरामदास " असें मथळ्यावर प्रकरणाचें नांव दिलेलें आहे.

१११७ ] १२ पोथी–त्रुटित पत्रें १४५ [२५०

गीता – अर्थ

अपूर्ण ग्रन्थ आहे. हा कोणी उद्योग केला सांगतां येत नाहीं. " जगदीश्वरें व्यासावतार घेऊन महाभारत निर्माण केलें त्यामध्यें हि, भीष्मपर्वी गीताशास्त्रसार काढिलें जें त्रैलोक्याच्या उद्धारास्तव परम दया करून आरंभ श्रीकृष्णार्जुनसंवादरूप पृथ्वीवरी प्रकट केलें ते सर्वांस उपेगा अधिकारपरत्वें यथायोग्यास कौरवपांडवांचे युद्ध होत, असतां धृतराष्ट्र संजयाप्रति पुसता जाला " असा आरंभ करून डावे बाजूस चरणाखालीं चरण असे मूळ संस्कृत श्लोक देऊन उजवे बाजूस प्रत्येक चरणापुढें त्या त्या चरणाचा मराठींत अर्थ दिला आहे. उदाहरणार्थ ग्रन्थारंभ च देतों :

| | |
|---|---|
| धृतराष्ट्र उवाच ॥ | ॥ धृतराष्ट्र बोलता जाला |
| धर्मक्षेत्रे कुरुक्षेत्रे ॥ | धर्मक्षेत्र जे कुरुक्षेत्राचे ठाईं |
| समवेता युयुत्सवः ॥ | मिळाले आहेत युद्धाचे इछेनें |
| मामकाः पांडवाश्चैव ॥ | आमचे आणि पांडव जे |
| किमकुर्वत संजय ॥ १ ॥ | काय करिते जाले संजया ॥ १ ॥ |

१११८ ] १३ एक चित्राचा कागद [१५०

' सद्गुरु बसलेले आहेत व भक्त हात जोडून उभा आहे,' असें हें एक चित्र आहे. दुर्दैवानें चित्राचा खालचा अर्धा भाग फाटून नाहींसा झालेला आहे. चित्र [illegible] तरी एखादा पुरुष असावें, कारण त्यास गंध लाविलेलें आहे. हे दासविश्रामधामकर्ते आत्मारामसहाराजांचें म्हणून असावें, असें मला वाटतें.

१११९ ] १४ पोथी–त्रुटित पत्रें सुमारें २०० [१००

श्रीधर कृत हरिविजय–अपूर्ण

1120 ] ९५ पोथी-मुद्रित पत्रें सुमारें २०० [२००

एकनाथ कृत भावार्थरामायण-अपूर्ण

1121 ] ९८ पोथी-पत्रें ६२ [१५०

भावार्थरामायणांतील सुंदरकांडाचे पहिले पांच प्रसंग

1122 ] ९७ पोथी-पत्रें ४३ [११२

मांडुक्य उपनिषद्-मूळ व गद्यात्मक प्राकृत टीका

"हस्ताक्षर भैराळ रामचंद्र गोसावि मायंधी नारायणखेडकर ॥ सर्वतीर्थसंगम रत्नगर्भ समुद्र पश्चमतटाके सोमाईश्वरपट्टणे द्वितीय प्रहरे माघमासे शुक्लपक्षे वसंतपंचमी गुरुवासरे शके सतरासेहे पंचेचाळीस १७४५ मांडुक्योपनिषद्गारपटीका प्राकृत संपूर्ण ॥"

1123 ] ९९ पोथी-पत्रें ८ पैकी ३, ४ नष्ट [१००

दक्षिणामूर्तिस्तोत्र-शिवरामपूर्णानंदकृत समश्लोक

1124 ] १०० पोथी-पत्रें ६ [७५

पंचमुखी हनुमत्कवचं

1125 ] १०१ पोथी-पत्रें १० [१००

देवदास कृत संतमालिका-अपुरी सोडली आहे.

1126 ] १०४ पोथी-पत्रें ३४, अपूर्ण [२००

महाबोध-श्लोकबद्ध. बहुधा शिवराम पूर्णानंद कृत. पहिला अध्याय पूर्ण, श्लोक १४८ व दुसरा अपूर्ण, श्लोक ३१. ग्रंथ महत्त्वाचा आहे, तो संपूर्ण मिळविला पाहिजे आणि त्या प्रांतात मिळेल हि.

**११२७]** १०५
पोथीचें एकच जोड पत्र [ १२५

पण महत्त्वाचें आहे. गजेंद्रमोक्षाचे सुमारे ७२ श्लोक दिसतात व या शेवटच्या पत्रावर ६७ ते ७२ श्लोक आहेत. श्लोकांचे अंक चुकले आहेत. या प्रकरणाचें महत्त्व असें कीं, तें श्रीसमर्थांचें म्हणून दिलेलें आहे. शेवटचा श्लोक असा :

गजेंद्रासि तो पावला देव जैसा । त्रिवीनें म्हणे त्यासि पावेल तैसा ।
म्हणे रामदास यदर्थी विकल्प । धरी तो पहा जाणिजे पापरूप ॥

**११२८]** १०६, ११५
पोथ्या तीन–पत्रें ५८,११,२२ [ १००-२००

रत्नाकर कृत उपदेशरत्नाकर किंवा रत्नाकर, ओवीसंख्या २४२. या ग्रन्थाच्या तीन प्रती, पैकीं एक पूर्ण व दुसऱ्या दोन अपूर्ण

**११२९]** १०८
पांच उभे कागद [ १५०

तुकाई यांचा एक, तुकारामांचे दोन व श्रीधरांचे दोन, मिळून पांच कूटात्मक अभंग – अर्थासह

**११३०]** १०९
पोथी–पत्रें ३ [ १००

कोणी गोविंदा कृत मुसलमानी भाषेंत नामदेवचरित्र–ओवीसंख्या ५०. ज्यास ही भाषा समजते, अशा कोणी हें चरित्र लिहून काढून प्रकाशित केलें पाहिजे.

**११३१]** ११२
पोथ्या दोन–पत्रें १०६, ८५ [ २००

दासोपंत कृत ग्रन्थराज ग्रन्थाच्या दोन प्रती. मधलीं मधलीं पत्रें गहाळ आहेत. एका प्रतीचें अक्षर सुंदर आहे.

**११३२]** ११३
पोथी–पत्रसंख्या १८ [ १५०

ज्ञानेश्वर कृत दशरगीता टीका–अपूर्ण

**११३३ ]** ११४
पोथी–पत्रें ११४, फक्त १ लें नाहीं [२४

अवधूत कृत कपिलगीता–मूळ श्लोक २४०, टीकेच्या ओंव्या १४१०. ग्रन्थ अप्रकाशित आहे. केव्हां तरी प्रकाशित व्हावा.

अवधूतांनीं आपल्या पूर्वजांची हकिकत शेवटीं दिली आहे, ती मनोरंजक आहे.

प्रतिष्ठान ग्राम नगरीं । परम पावन गोदातीरीं ।
दुर्गाभवानीचिया क्षेत्रीं । पूर्वजा निर्धारीं वास्तव्य ॥ १२६९
आमुचिया पूर्वजाचे मूळ पुरुष । आवडी हरिभक्ति विशेष ।
दैवत पंढरी विठ्ठलेश । करिती सेवेस निरंतर ॥ १२७०

त्या मूळ पुरुषास वैराग्य उत्पन्न होऊन सर्वस्वाचें दान करून नवरावायको प्रयागास जाऊन राहिले. पोटीं संतान नव्हतें, म्हणून स्त्री कष्टी होती. देव पावला, गर्भ राहिला, नवमास भरले, पण पतीस निधन आलें. गर्भवती स्त्री सती गेली ! चितेंतून गंधर्वांनीं बालक सुखरूप काढलें

चितेपासुनि जाली उत्पत्ती । म्हणोनि बोलती चितोत्पत्ती

त्या चितोत्पत्तीपासून सिद्धेश्वर–विश्वेश्वर–श्रीधर–रामराज–ग्रन्थकार अवधूत, अशी वंशपरंपरा होय. ते चितोत्पत्ती–चितोपंत नांव असेल काय ? — पैठणास येऊन राहिले होते. त्यांचें गोत्र अत्रि.

अवधूतांचे गुरु कोणी गोविंद होते.

ग्रन्थरचनेचें स्थळ व काळ

चैत्र शुक्ल पौर्णिमेसी । सर्वधारी संवत्सरासी ।
पूर्ण केलें हो आज्ञेसी । मूळ पीठासी संतसंगें ॥ १२७८
शालिवाहन शके महिमा । सोळासे तीस वरुष नामा ।
सर्वधारी संवत्सर प्रेमा । वसंतसंभ्रमा चैत्र मासु ॥ १२८५
पर्वतामाजी देवगिरी । खडकीग्राम बाईजीपुरी ।
केदाराचिया मंदिरीं । ग्रंथ निर्धारीं संपविला ॥ १२८८

ग्रन्थकार नाथसंप्रदायी दिसतात. एकनाथांच्या ग्रन्थांचा त्यांना फार व्यास होता. ग्रन्थ प्रासादिक आहे, प्रकाशित झाला पाहिजे.

११३४ ]

११६

पोथी-पत्रें ३ [१५०

कल्पवल्लीचे गुण अनुपानासह–ओवीसंख्या ४०

ही जगदंबा मूळपीठिनी । अखंड योगियाचे ध्यानीं ।
ज्ञानेश्वराचे आंगणी । खेळत असे ॥ ३५
हें प्रकट न करावें सजनी । गुप्त आचेरोनि दृढ राखावें मनीं ।
जो प्रगट करील तया आण । श्रीसद्गुरूची ॥ ३६
श्रीनिवृत्ती दाता समर्थ । त्याचे कृपे बोलिलो कल्पाक्षांत ।
ज्ञानेश्वराचें मनोगत । संत समर्थ जाणती ॥ ३७

११३५ ]

११७

पोथी-पत्रें ५० [१५०

आचार्य-उपास्ति

ग्रन्थ अप्रतिम आहे, अप्रकाशित आहे, प्रकाशना योग्य आहे. त्याचा शेवट :
" श्रीगुरभक्तिचे ठाईं तत्तद्तात्म्याचा सानुराग सप्रेम आहे याकारणें तेणें चि कीं कारणें हे आचार्योपास्तिचे स्थळ पद ठाव पोसणें वर्धमान करणे मज पढिले म्हणौनि ज्ञानदेवो म्हणे ऐसे ग्रंथकारें श्री ज्ञानदेवनामें गोरेनि परमर्वो बोलिलें आहे आतां गीताशास्त्रवक्ता श्री भगवंत तो चि ज्ञानेश्वररूपें अवतरूनि स्वा ( स्वो ? ) क गीताभाव स्वयें ज्ञानेश्वरीग्रंथराजरूपें बोलिला तेथिल आचार्योपास्तिचें बोव्याचें विवरण मी प्राकृत मूढमति कायि करीन परि सद्गुरु श्री ज्ञानेश्वरस्वामीनीं मज मूढाचिये अधिकारानुरूपें जैसें प्रेरिलें तदनुसारें विवरण केलें आहे म्हणौनि संती उणें पुरें क्षमा किजे ॥ ॐ तत्सदिति श्री ज्ञानेश्वर्यां आचार्योपासनं संपूर्ण ॥ श्रीज्ञानेश्वरार्पणमस्तु ॥ "

११३६ ]

११८

एका बाडाचीं सुटीं १७ पत्रें [१५०

करुणाशतक

म्हणून कोणी कौतुकानें निवडक शंभर अभंग सुंदर लिहिलेले होते. त्या बाडाचीं दुर्दशा पावलेलीं हीं १७ पत्रें आहेत. त्यांत अभंग १५ ते २० व ९४ ते १०० चीं पत्रें नाहींत. करुणाशतक हें नांव लेखकानें च पहिल्या पृष्ठाच्या मथळ्यावर लिहिलें आहे. फक्त ४ था आणि ५ वा असे दोन अभंग निवृत्तींचे दिसतात, बाकी सर्व तुकारामांचे आहेत.

मथळ्याच्या पृष्ठावर " श्रीराम भीम रामदास कल्याण शिवराम रामचंद्र सद्गुरु आत्माराम गुरवे नमः " अशी परंपरा आहे. शक १७४० पर्यंत साधुसाधूंत फरक करण्याची बुद्धि कोणात होती काय ! असला संकुचितपणा हा अलिकडच्या काळांतला आहे.

११९

**११३७]** पोथी–पत्रें २२४, फक्त १, २ नाहीं. [३५०

### गीतेचा पंधरावा अध्याय–सटीक

पहिलें जोडपत्र नाहीं व शेवटचीं काहीं पत्रें नाहींत, त्यामुळें ही टीका कोणाची हें कळण्याला मार्ग नाहीं. पंधराव्या अध्यायाचे २० श्लोकांपैकीं १८ व्या श्लोकापर्यंतचा भाग २२४ व्या पत्रावर आला आहे, तों च ४७९२ टीकेच्या ओव्या आहेत. प्रत श्रीएकनाथकालीन आहे. दासोपंताच्या गीतार्णवापैकीं हा पंधरावा अध्याय असावा, असें मला वाटतें. एवढा प्रचंड ग्रन्थकार दुसरा कोण होऊन गेला ! पंधराव्या अध्यायावर श्रीज्ञानेश्वरांच्या ओव्या राजवाडेप्रतींत ५६५ आहेत, तर ह्या प्रस्तुतच्या ५००० तरी आहेत.

१२०

**११३८]** पोथी–फक्त ४ पत्रें, एक अगदीं आरंभींचें ८ ते ११ श्लोकांचें आणि तीन अगदीं शेवटचीं १६६,१६७ व १६८ वें [२३५

### श्रीमत् भगवद्गीतेवर समश्लोकी टीका

( १ ) ह्या ओव्या कोणी केलेल्या असाव्या, हें मला उमगलें नाहीं. इतरास उमगाव्या आणि अप्रकाशित असल्यास संपूर्ण प्रत मिळविण्याचा प्रयत्न व्हावा, म्हणून शेवटच्या ७८ व्या श्लोकानंतर आणखी ६ ओव्या आहेत, त्या येथें देतों :

अगाध परमार्थयाची करणी । सकळ शास्त्रें मथन करूनि ।
गीता नवनीत काढुनि । धनंजयासी दिधलें ॥ ७९

तेणें किरीटीस बोध जाला । परब्रह्मीं मिळणीसी मिळाला ।
आणी सकळ लोकां ... । ... धयाचा ॥ ८०
अर्जुना जालें समाधान । भगवंतकृपेकरून ।
गेलें अंधपण । दिव्य प्रकाश जाहाला ॥ ८१

पाछापि मानभाव महाकवि । तत्पर गीता अभ्यासी ।
तेणें पावले नेमेसीं । अविनाशपद ॥ ८२
ऐसा कृपाळु देवादिदेव । जड जीव तरावया केला उपाव ।
कळल्या गीतेचा मर्मभाव । पुनरावृत्ती नाहीं तयाला ॥ ८३
शुद्धाशुद्ध तर्‍ही वाणी । करावी गीतेची घोकणी ।
तेणें संतुष्ट चक्रपाणी । कर्मबंधन तोडिल ॥ ८४
हरि : ॐ इत्यादि

( २ ) प्रतीचा लेखनकाळ वगैरे :

" शके ॥ १६२२ ॥ विक्रमनाम संवत्सरे अश्विन वद्य १० ॥ मंदवासरे तद्दिने पुस्तकलिखितं माधव फोनेरी ... "

११३९ ]

## १२१

नऊ फुटकळ पानें [१५०

( १ ) पण महत्त्वाचीं. पहिल्या पत्रावर " क्रमसारसंज्ञा " असा मथळा देऊन पुष्कळशीं आत्मारामांचीं व श्रीसमर्थांचीं वचनें उद्धृत केलेलीं आहेत; थोडीं इतरांचीं हि आहेत. त्यांत " वंशावळी तारकप्रशांश " म्हणून पंधरा कडव्यांचा एक अभंग आहे. ती निःसंशय आत्मारामांचा आहे. प्रशांश म्हणजे प्रशंसा.

( २ ) " श्रीसमर्थांचे समग्र ग्रंथ " म्हणून जो एक ग्रन्थ निरनिराळे प्रकाशक प्रसिद्ध करीत आहेत, त्यातील प्रासंगिक कवितेत ' नमो अधिष्ठाता विष्णु मुख्य साधु ' हा २७ कडव्यांचा अभंग " स्वामींनीं एकवार आपलें चरित्र तुकोबास सांगितलें " म्हणून दिलेला असतो. तो अभंग श्रीसमर्थांच्या मुखांतून निघाला असेल, असें मी कधीं मानलें नाहीं. कां, तें त्या अभंगावरून च ध्यानीं येईल. श्री. आण्णासाहेब आळतेकरांनीं मात्र भोळेपणानें तो अभंग श्रीसमर्थांचा मानून आपल्या श्रीसमर्थचरित्राची उभारणी त्या अभंगावर केली आहे.

( ३ ) या नऊ पानांतील " वंशावळी तारकप्रशांश " हा आत्मारामांचा अभंग पाहून आतां मला असें वाटतें कीं, " नमो अधिष्ठाता० " हा अभंग हि आत्मारामकृत असावा. दोन्ही अभंग चांगले आहेत. तो वंशावळीचा अभंग येथें देतो :

वंशावळी तारकमंत्रांश

आदिनारायण सद्गुरु आमुचा । शिष्य हो तयाचा महाविष्णु ॥ १
तयाचा हो शिष्य ( जाहाला ) तो हंस । तेणें महादास उपदेशिले ॥ २
महादेवें केला उपदेश वसिष्ठा । तेथ धरिली निष्ठा शुद्ध भाव ॥ ३
वसिष्ठ उपदेशी श्रीरामरायासी । श्रीरामें दासासी उपदेशिलें ॥ ४
उपदेश देउनी मजला मारुती । स्वयें रघुपती निरविला ॥ ५
निरवितां तेणे जाला रामदास । संसारीं उदास जीवभावें ॥ ६
म्हणोनि आमुचे कुळीं कुळदैवत । राम हनुमंत आत्मरूपी ॥ ७
आत्मरूपी जाला रामी रामदास । केला उपदेश दीनोद्धारा ॥ ८
भाविकभजना गुरुपरंपरा । सदा जप करा राममंत्र ॥ ९
राममंत्र जाणा त्रयोदश मात्र । सकळ वेदशास्त्र प्रगटे चि ॥ १०
प्रगटे चि राम मंत्र हा प्रसिध्द । तारितसे बध्द जड जीवा ॥ ११
जड जीवा तारी या भवसागरीं । देहे कासीपुरी धन्य जेणें ॥ १२
मंत्र हा तारक ॐ कार स्वरूप । देत विश्वरूप मुमुक्षासी ॥ १३
येणें मंत्रें जाणा मुमुक्ष सावध । साधक प्रसिध्द सिध्द होय ॥ १४
सिध्द होय राम तारक जपतां । मुक्ति सायोज्यता रामदासीं ॥ १५

**११४० ]** १२२ पोथी–पत्रें २ [ १५०

पंचीकरण-जीवतनुचतुष्टयलक्षण

**११४१ ]** १२३ पोथी–पत्रें ४ [ १०३

आसन-उपविश्यमंत्रः

लेखनकाल–" स १८८८ पुष्यमासे शुक्लपक्षे ॥ ४ ॥ "

**११४२ ]** १२४ एक कागदाचा तुकडा [ १५०

त्यावर पुढील प्रमाणें नोंद आहे :

| | | |
|---|---|---|
| ॥ ( स्वात्म ) सुख ॥ | ॥ प्रकाशदीप ॥ | ॥ परमामृत ॥ |
| ( पोथी ) ५०८ | पोथी ३९७ | पोथी ३२५ |
| अध्य १ | अध्य ५ | अध्य १७ |
| पत्र १३ | पत्र १२ | पत्र २९ |

सदराखालीं सविस्तर सामानाची यादी केलेली आहे आणि प्रथसाहित्य म्हणून यादी अपुरी सोडली आहे.

( ३ ) वर्गणीच्या ६ याद्या " आसवर्गोत्सिष्यप्रभू, सतसाधुयोगेश्वर वैदिक, जमिदार, साहुकारफडदिमदार, राजगारीव्यापारी, गावगाना " अशा सहा प्रकारच्या असून प्रत्येक यादीच्या मथळ्यावर " स्वस्ति श्री बहुधान्यनाम संवत्सर चैत्र प्रतिपदा गुरुवार ॥ रामदासी संस्थान नवनीतनंदितटी मठ अपचंद येथील उपासना चालायास धर्मवंत सहकारीसमह ॥ प्रतिवर्षी भिक्षा पोहचावी ॥ तेथिल सेवक आत्माराम गोसावी विनवणी ॥ " असा मजकूर आहे. प्रत्येक यादीचा वरचा अर्धा भाग तेवढा आहे, खालचा अर्धा भाग गेलेला आहे.

( ४ ) चैत्र वद्य ५ शनिवार व चैत्र प्रतिपदा गुरुवार या मित्या व वार बहुधान्यसंवत्सर १७४० ची जमत नाहींत इतकेंच नव्हे तर १६८०, १६२० व १८०० या शकांशीं हि जमत नाहींत संवत्सराचें नाव चुकलें कीं काय न कळे. मी या याद्या १७४० च्या सुमाराच्या मानीत आहे.

११४५ ] १२८ [१५०

एक कागदाचा कपटा

( १ ) ग्रंथ आहेत कोणते व लिहावयाचे आहेत कोणते याची नोंद या कागदावर आहे, ती अशी :

ग्रंथ आहेत : पंचसमास, पंचीकरण, आत्माराम, बहुधा गो।, कृत-निर्वाह, सगुणध्यान, निर्गुणध्यान, अक्षरमालिका, जुनाट पुरुष, अष्टाक्षरी, एकूण १०

लिहावयाचे आहेत पूर्वारंभ, अंतर्भाव, पंचमान, चतुर्थमान, मानस-पूजा, सप्तसमास, मानपंचक, अन्वये वे०, सहउर्मी, एकूण ९

श्रीसमर्थांच्या ग्रंथाची यादी करण्याचा लेखकाचा हेतु उघड आहे. यावरून कृतनिर्वाह व अन्वय व्यतिरेक हीं प्रकरणें श्रीसमर्थांचीं होत, असें लेखकाचें मत दिसतें.

( २ ) गुंडा याचीं तीन पदें

११४६ ] १३० [१५०

पोथी-पत्रें १२

( १ ) श्रीसमर्थ, अमृतेश्वर, आनंदसुत, केशव, तुकाराम, जनजसवंत यांचीं पदपदांतरें

म्हणजे १५४२ चैत्र वद्य ७ बुधवार हा श्रीदासविश्रामधाम्कर्ते आत्मारामसहाराज यांच्या निर्याणाचा काळ होय.

(२) तुकाराम कृत दामाजीपंतांचें चारित्र-दोन तुकडे-२९ कडव्यांचा अभंग

**११४९ ]** १३२
चिमुकलें बाड-पृष्ठें २१ [१५०

(१) श्रीसमर्थ, रंगनाथ, अमृत यांचीं पदपदांतरें

(२) वामन कृत रुक्मिणीपत्रिका-मूळ संस्कृत श्लोक ७ व वामनांचे समश्लोक ९

(३) व्यंकटेशकवि कृत श्रीकृष्णपत्रिका-श्लो. २०

श्रीमत् विष्णुपुराणअर्थ हृदई आणोनियां नेटका ।
हे नारायणपंडितीं करविली श्रीकृष्णसत्पत्रिका ।
जेव्हां श्रीशिवभक्त राघवसुत मस्यात आज्ञा करी ।
तेव्हां हे कवि व्यंकटेशरचिता घाले असी वैखरी ॥ २०

(४) मोरोपंती संस्कृत आर्या

**११५० ]** १३३
चिमुकलें बाड-पृष्ठें ३१ [१२५
आ. ऐ. कांहीं नाहीं

आत्माराम महाराजांचे रंक म्हणून शिष्य होते, त्यांचीं पदपदांतरें

**११५१ ]** १३४
बाड-पृष्ठें १८ [१२५

माधवदास, गोपावीनंदन, रामानंद, नामामुक्तेश्वर, शिवरामपूर्णानंद, साम्राज्य, विष्णुदासनामा, दास दिगांबर, बाळकृष्णाचा वेडा दास, पुरंदरविठ्ठल यांचीं पदपदांतरें, त्यांत कांहीं कानडी

**११५२ ]** १३५
दुर्दशा झालेलें बाड-पृष्ठें २३ [१२५

श्रीसमर्थ, माधवस्वामी, तुकाराम, आत्माराम, शिवरामपूर्णानंद, उद्धवचिद्धन, गोपावीनंदन, जीवन्मुक्त, आलंखान नागेश, इत्यादिकांचीं पदपदांतरें, त्यांत कांहीं कानडी

११५३ ] १३६ [१२५
बाड–पृष्ठें ३२, बरीच नष्ट

रंक कृत (१) सुदामचरित्र, (२) लक्ष्मणप्राणदान व (३) गणपतिजन्म

११५४ ] १३७ [१२५
बाड–पृष्ठें ६८, कांहीं नष्ट

(१) रंक यांचीं मराठी, कानडी, हिंदुस्थानी पदें
(२) रंक कृत लंकाप्राप्ति व दशरथलग्न
(३) शिवराम कृत बोधपाठशी
(४) रंकाचें एक आत्मारामम्हाराजावर पद आहेः

धन्य दासावतार

धन्य दासावतार । आत्माराम । मान्य प्रियकर रघुवीर ॥ ध्रु०
शोभे जरसाळा भजन । नाममुद्रादि भूषण ॥ १
कीर्ति उरली जगांत । माने सतादि समस्त ॥ २
सदा स्वरूपीं निमग्न । बोधी प्रलयें जो ज्ञान ॥ ३
मूर्ति साजिरी सुहास्य । सम पाहणें नैराश्य ॥ ४
प्रकट प्रतापी सुदरु । रंक जनाचा आधारु ॥ ५

११५५ ] १३८ [१२५
बाड–पृष्ठें २७ × ४ = १०८

अत्यंत महत्त्वाच्या बाडापैकीं हें एक बाड होय. सुदैवानें तें साद्यंत आहे. क्वचित् कडा गेल्या आहेत, त्यांत काहीं शब्द गेले आहेत, पण ते लावता येतील.

(१) अगदीं आरंभीं आत्मारामम्हाराजांचीं १ ते १२३ पदें आहेत. १२२ पदात त्यानीं परोपरीनें देवाची करुणा भाकली आहे आणि शेवटच्या पदात आपल्या परंपरेला नमन केलें आहे. नमुन्यासाठीं पहिलें च एक पद व शेवटचें पद देतों :

देवा वोपी धैर्य कांहीं । बुद्धी स्थिरवी निश्चई ॥ ध्रु०
ठसो दृढ गुरुवाक्य । सोहं वस्तु निष्कलंक ॥ १

देहेममता न उठो । अंश कहीं च न पडो ॥ २
राहु चंद्रा ग्रासी च । पाणी आटेना निश्चीच ॥
हिम रवीसी बाधीना । तैसें स्वस्थ वाटो मना ॥
आत्मारामा धैर्याचळीं । ठाण घाली सर्व काळीं ॥

नमो आदिनारायणा । विष्णु हंसा चतुरानना ॥ ध्रु.
नमो वसिष्ठ श्रीरामा । भीमराय दासोत्तमा ॥ १
नमो कल्याण गुरुवर्या । शिवरामस्वामीराया ॥ २
नमो रामचंद्रस्वामी । वस्ती करा हृदयधामीं ॥ ३
कैसा तरी तुमचा रंक । मान राखा या सरसौख्य ॥
करा कृपेचिया चळ । स्वात्मानंदाचा सकाळ ॥ ५

११५७ ] १४० [१५०
बाड-पृष्ठें ३९ × २ = ७८

(१) श्रीसमर्थ, आनंदतनय, गोसावीनंदन, केशव यांचीं पदपदांतरें.

(२) मरीं च कानडी व हिंदुस्थानी पदें, कोण कृत उमगलीं नाहींत. त्यांत एक नरसिंहविठ्ठल याचें कानडी पद आहे.

(३) सीतास्वयंवर-श्लोकवद्ध अपूर्ण

११५८ ] १४१ [२००
बाड-पृष्ठें ६० × २ = १२०
शिवाय १०।५ नष्ट

(१) शिवरामपूर्णानंद, हरिकवि, गोसावीनंदन, रंगनाथ, कबिर, रंक, शिवदिन केसरी, कान्होजी देशमुख, नरहरि, उद्धवचिद्घन, अनंतसुत, सहजानंद कोनेरी, अमृतेश्वर, ब्रह्मानंदगोविंदराजचिन्मयानंद, माधवनंदन इत्यादिकांचीं पदपदांतरें, मराठी व हिंदुस्थानी

(२) माधवनंदन कृत नारदलीला-श्लोक ५२१

(३) गोविंदचिन्मयानंद कृत श्रीकृष्णजन्मकथा-श्लोक, पदें वगैरे. यांनीं केलेल्या आरत्या बऱ्या च आहेत.

(४) शिवरामपूर्णानंद कृत गोपाळकाला

(५) अमृतेश्वराची गीतेवरील आरती देतों :

गीतेची आरती

जय देवी जय देवी । जय आत्मविद्ये । जय ब्रह्मविद्ये ।
आदिजननी माये असती प्रतिपाद्ये ॥ ध्रु०

द्वैतामृतवर्षिणी जय भगवद्गीते । ज्ञानेश्वरमुनिवाणी सुरगणसंगीते ।
ते तूं ज्ञानदेवी कलरवसंगीते । तुझें आवर्तन तें भवभयभगिते ॥ १

नारायण परमेश्वर पार्था उपदेशी । असह होऊनि भेटे अनुभवसुख देसी ।
व्यासें पंचम वेदीं गुंफिली वैसी । अष्टादशभुजध्यानी तूं अंबा वैसी ॥ २

आदौ श्रीमच्छंकरभाष्याकारें । श्रीधर मधुसूदन हरि अनंत अवतारें ।
जड जन तारायया भाष्यां विस्तारें । अमृतेश्वर तुज विनवि जय सर्वाधारें ॥ ३

## ११५९ ]

१४२
जीर्ण बाड–पृ. १७ × २ = ३४ [१५०

( १ ) तुका, नामा, नागनाथांचा गुरुदास, होनाजी बाळ, ज्ञानदेव, सोपान यांचीं पदपदांतरें

( २ ) कांहीं सुभाषितें, कांहीं कानडी पदें. सप्त ऋषि, चौदा रत्नें, चौदा विद्या, अठरा पुराणें यांचीं नांवें. कांहीं हिशेब, कांहीं औषधें.

( ३ ) लिंबगांवचे भवानीभट जोशी कृत गंगास्तोत्र, यांत थोडा इतिहास सांपडेल.

## ११६० ]

१४३
बाड–पृष्ठें ३१ × २ = ६२ [१५०

( १ ) श्रीसमर्थ, तुका, केशव, आनंदतनय, आत्माराम, कबीर, माधवदास, गोसावीनंदन यांचीं पदपदांतरें

( २ ) राधाविलासाचे २६ श्लोक–अपूर्ण

कराेनि नमन देवा बाळरूपा हरीतें ।
सुरस चरित ज्याचें तें कलीला हरीते ।
कथिन चरित राधाकृष्णलीला प्रबंध ।
तुटति श्रवणमात्रें सर्व मायीक बंध ॥ १

( ३ ) केशवाचा नामा यांनीं श्रीसमर्थांची एक ओवी प्रथम घेऊन पुढें पांच सहा ओव्यांचा एक अभंग केला आहे. तो अभंग जसाचा तसा देतों :

राजा हो मृत्यु आला । लक्ष कोटि कवूल जाहला ।
तरी सोडीना तयाला । मृत्यु काही ॥ १
नव्याणौ सहस्र वर्षे राया दशरथा । चौदा चौकड्या लंकानाथा ।
ते ही गेले सिद्धपंथा । मग सर्वथा तुरेची ॥ २
येक आर्बुद कोटी साटी मापा । तीस लक्ष नव्याणौ सहस्र लेखा ।
सात शत नव मास मापा । तया हिरण्यकस्यपा काये जाले ॥ ३
चौदा कल्प मार्कंडेये पडे । तो येक लोमहर्षणाचा लोम झडे ।
बकदाल्भ्याचा निमीष्य मोडे । गेले येवढे भले ते ...

यकदालभ्याचा सरळ आयुष्य । तै येक वट हंसाच उपडिल पिस ।
तया होये मृत्युप्रवेश । परि येक श्वास भृशंडीचा ॥ ५
मरणा तो होये भृशंडीचा । तरी येक दिवस कूर्माचा ।
नामा विनवी केशवाचा । वेगीं पंथ धरा देवाचा ॥ ६

१४४

११६१ ] बाड–पृष्ठें १४ × २ = २८ [ १५०
आ. शे. कांहीं नष्ट

श्रीसमर्थ, शिवरामपूर्णानंद, चिद्धन, ज्ञानदेव, जीवन्मुक्त ( यांचे पांडुरंगावर पद ) यांचीं पदपदांतरें व वामनांचे कांहीं श्लोक.

१४५

११६२ ] बाड–पृष्ठें २७ × २ = ५४ [ १५०
इतकीं च आ. व इतकीं च शे. नष्ट

( १ ) श्रीसमर्थ, पंडित, चिद्धन, मानुदास, शिवरामपूर्णा०

( २ ) " श्रीसद्गुरु अनंताय नमः " असें नमन करून मनाचे श्लोक १ ते १४८, पुढें पृष्ठें फाटलीं. हे अनंत कोण ?

( ३ ) पुढें १३ ते ४४ बारा मासाचे श्लोक, कृष्णलीलापर

( ४ ) कचेश्वर कृत सुदामचरित्र, संपूर्ण

( ५ ) शके १७१८ व १७३३ तील दोन जन्मतिथी

१४६

११६३ ] बाड–पृष्ठें २० × २ = ४० [ १५०
शिवाय बरीं च नष्ट

( १ ) श्रीसमर्थ, तुकाराम, गुंडा, शिवराम, कबीर, जनी, उद्धवचिद्धन, जमालशा, केशव इत्यादिकांचीं पदपदांतरें, त्यांत एकादहुसरें कानडी

( २ ) शिवराम कृत रामतुळशी किंवा रामशतक–ओवी ४६ ते ११०–मोडी लिपींत

( ३ ) जयराम कृष्णदास कृत गोपाळकाला–११ श्लोक

( ४ ) उद्धवचिद्धनाचें एक पद, अप्रकाशित आहे असें वाटून देतों :

सद्गुरु सुखदाता । सुखदाता । निर्भय यर कर माथा ॥ १
म्हणउनि तरलों मी । भवउदधी । निश्चय निज समाधी ॥ ध्रु०

आनंदपद्‌दानी । पदृदानी । दिधली नाम निशाणी ॥ २

निःसीम निवळीले । निवळीले । उद्धवचिद्घन बोले ॥ ३

**११६४ ]** १४७ घाट–पृष्ठें ११ ते ८० [ १५०
पहिलीं १०, मधलें ४१ वें व शे. कांहीं नष्ट

( १ ) स्कंदपुराणे शिवसहस्रनामावळी – ५६९ ते १००९

( २ ) " जुनाट दासबोध–समास येकेवीस ॥ २१ ॥ ". ताडून पाहण्यास योग्य. पृष्ठ १६ वर सुरू, मधल्या ४१ व्या पानावर स. ९ ओ. ५८ ते स. १० ओ. २० पर्यंतचा भाग गेला, पृ. ७५ वर ग्रंथ समाप्त. त्या पृष्ठावर समासासमासाची ओवीसंख्या देऊन ' येकुन १३३० ', म्हटलें आहे, पण पाहिजे होतें १३४०.

( ३ ) ओव्याशतकांपैकीं ९ वें शतक व शेवटच्या पृष्ठावर संतविजयांतील कांहीं ओव्या.

**११६५ ]** १४८ उसवलेलें विस्खलित घाट–पृ. ४९ × २ = ९८ [ १५०

( १ ) हरिहर कृत रामनामावळी, ( २ ) मदमाभळचरित्र–अष्टाक्षरी–श्रीसमर्थ कृत, ( ३ ) आनंदनंदन कृत कुंटणीचरित्र–श्लोक ११, ( ४ ) वामन कृत लोपामुद्रा, ( ५ ) कौसल्याळंभ, ( ६ ) गजेंद्रमोक्ष, ( ७ ) उद्धवचिद्घन कृत ज्ञानेश्वरचरित्र कडवीं २१ व ( ८ ) चिल्लाळचरित्र–कडवीं २२, व ( ९ ) गोराकुंभारचरित्र, ( १० ) आत्माराम कृत रामजन्मकथा, ( ११ ) मुक्तेश्वर कृत कौतुहलरामायण व ( १२ ) राजसूयज्ञ–ओवी ७७, ( १३ ) श्रीधर ब्रह्मानंद कृत जांबुवाख्यान, ( १४ ) चिंतामणी कृत ध्रुवाख्यान, ( १५ ) वस्तुलिंग कृत ग्रामोद्धार, कडवीं २१, ( १६ ) राघव कृत मारुतीअर्जुनसंवाद, ( १७ ) दशावतार–जन्म आणि प्रयोजन–श्लोक आणि ओवी, ( १८ ) बळीचरित्र, ( १९ ) श्रीकृष्णगोकुळप्रवेशचरित्र, ( २० ) शुदकचारित्र, ( २१ ) सुदामचरित्र इत्यादि प्रकरणें अधून श्रीसमर्थ, आत्माराम आणि गुंडा यांचीं पदपदांतरें व कांहीं श्रीसांप्रदायिक भजनें आहेत. भजनांचा नमुना :

( श्री ) रामदास माउली । अंतर्यामीं साहिली ॥

(रा) गुरु कल्याण माउली। निशिदिनिं यदनीं गाइली॥

(म) गुरु दत्तात्रय माउली। करी कृपेची साउली॥

(दा) येईं गा तूं येईं गा दीनदयाळा रामा रामा॥
करुणासिंधु रामा रामा। दीनबंधु रामा रामा॥
पतीतपावन रामा रामा। अंतरसाक्षी रामा रामा॥
विश्वव्यापका रामा रामा। सत्यस्वरूपा रामा रामा॥
स्वयंप्रकाशा रामा रामा। निजबोधा तूं रामा रामा॥
दर्शन देईं रामा रामा। अनुभव देईं रामा रामा॥
त्वकर येईं रामा रामा। पूर्ण ब्रह्म रामा रामा॥

(स) दशमुखभंजन। मुनिजनरक्षक। जानकीजीवन।
तुजवीण सीण रे वाटे॥
क्षीण जाहली काया। अयोध्येच्या राया।
शरयूतीरच्या राया। चित्रकूटच्या राया।
पंचवटीच्या राया। श्रीगुरुसज्जनगडच्या राया।
कृष्ण द्वारकेच्या राया। विठोबा पंढरिच्या राया।
दीनबंधु दीनानाथ। नाम तुम्हाला साजे।
पतीतपावन नाम। ऐसी ब्रीदावळी गाजे॥

**११६६ ]** १४९ महत्त्वाचें बाड–पृष्ठें १९ × २ × २ = ७६ [१५०

(१) श्रीसमर्थ, कल्याण, आत्माराम, जगज्जीवन, आनंदतनय, रंगनाथ, आलमखान सिद्ध नागेश्वर, शिवराम पूर्णानंद, केशव, कबीर, उद्धवचिद्घन, जनजसवंत, धोंडीराजप्रभुआत्मज, अमृतेश्वर, तुळशीदास, वेणी, ज्ञानदेव, माधवस्वामी, विठ्ठलनाथ, शिवदिन केसरी, आदिनारायण, तुकाराम, जयरामजयसुतअंकित, यांचीं पदपदातरें

(२) त्यात काहीं कानडी पदें आहेत. त्यांत काहीं पदात पुरंधरविठ्ठल व भद्राचलरामदास हीं नावें उमगतात.

(३) आत्माराम कृत प्रल्हादचरित्र–पदें २, श्लोक ५, अभंग ४ व ओवी ११–व ध्यानोद्धार अशीं दोन प्रकरणें आहेत.

(४) आत्माराम कृत श्रीसमर्थविषयक पांच पदें सादर करितों:

(१)

सज्जनगड पाहा गड पाहा । सुखदायक ते महा ॥ ध्रु ०
सप्तावीच उदक । जेथिल भ्रमभयतमहारक ॥ १
श्रुतिमत गुह्यागुह्य । जेथिल समाधि सेज होय ॥ २
मानसपूजापीठ । पैसे वदती भूवैकुंठ ॥ ३
जेथिल महिमा कळता । सुलभ प्राप्ती सायोज्यता ॥ ४
दासप्रियोत्तमधाम । क्षेत्रनिवासी आत्माराम ॥ ५

(२)

रामदास माउली अनाथाची । चिंता सर्वांची वाहिली ॥ ध्रु ०
योग योगातीत वोधुनि खेळणी । करी कृपेची साउली ॥ १
ज्ञानमिठाया चारित अनुदिनीं । अंतर्बाह्य सांभाळी ॥ २
मसडम स्वात्मानंदपदावरी । मौजा क्रियेच्या दाविली ॥ ३

(३)

रामदासा येईं येईं महाराजा दर्शन देईं ॥ ध्रु.
भवसंकटापासुनी तारी । दुर्घट हे विघ्न निवारी ॥ १
परिणाम कांहीं कळेना । अहंकारशत्रु गळेना ॥ २
पुरवनिया मनीचें आर्त । दीनालागीं करी सनाथ ॥ ३
काय प्रार्थूं मी सर्वज्ञा । + + + + ॥ ४
निज सखया आत्मारामा । ब्रीद राखी पूर्णकामा ॥ ५

(४)

भीक योगी हे श्रीरामा । हेतु पुरवी पूर्णकामा ॥ १
तैसी मूर्ति दृष्टि पडो । तैशा पाईं वृत्ती जडो ॥ १
ब्रह्मचारी सूत्र शिखा । पाईं शोभती पादुका ॥ २
कटीं आडबंद कौपीन । कंठीं तुळसीमणिभूषण ॥ ३
हातीं धरिलीसे छडी । येथुरूप मोक्षगुढी ॥ ५
गौर वर्ण ऊर्ध्व बाहु । श्रीमुखाआशोभा बहु ॥ ६
दिव्य सुख दिव्य भेश । भाळीं शावाळु सुंदर ॥ ७
रामदास दिव्य नाम । सखा ज्याचा आत्माराम ॥ ८

(५)

रामदास माउली दया कर रामदास माउली ।
रामदास माउली परात्पर रामदास माउली ॥ ध्रु०
सज्जनगिरिवरि वसति करुनिया । भक्ति पाहात राहिली ।
जनीं या सद्वाट दाविली ॥ १

सत्पुरुषाचा मेळा मिळउनि । आस्था ते पुरविली ।
आवचट लीळा त्यात केली ॥ २
आत्मारामीं होउनि तन्मय । कीर्तिध्वजा लाविली ।
स्मरतां सनयासी पावली ॥ ३

११६७ ] १५०
बाड-पृष्ठे ९५ × ४ = ३८० [१७५

श्रीसमर्थांच्या पदपदांतरांचें बाड

महत्त्वाचें बाड. ९५ पृष्ठें एका बाजूचीं व तितकीं च दुसऱ्या बाजूचीं आहेत. तें दोन्ही बाजूंनीं लिहिलेलें आहे. त्यात श्रीसमर्थांचीं पदपदांतरें आहेत. एका बाजूचीं ४०४ व दुसऱ्या बाजूचीं ६१८ मिळून १०२२ पदपदांतरें आहेत. आरंभीं अनुक्रमणिका दिलेली असून तींत पदाचीं आद्याक्षरें दिलीं आहेत व निरनिराळ्या रागाचीं पदें एकत्र केलेलीं आहेत.

यांपैकीं पुष्कळ पदें अजून अप्रकाशित आहेत. हीं सर्व वाहून पहावयाचीं आहेत व अप्रकाशित असतील तीं उतरून काढावयाचीं आहेत. मजकडून हें काम न घडलें तर कोणी तरी तें जरूर केलें पाहिजे.

ज्या बाजूला ६१८ पदें आहेत, त्या बाजूच्या ६१८ पैकीं शेवटचीं फक्त पाच पदें श्रीसमर्थांचीं नाहींत. गोसावी केशव, सोन गुंडा सोमा, खाळी होना, गोसावी वामन व भानभटु या पाचांचें एक एक, अशीं तीं पांच पदें आहेत.

ज्या बाजूला ४०४ पदें आहेत, त्या बाजूचें पहिलें पान हरवलेलें आहे. जें एक सुटें पान आहे, तें तें नव्हे. त्या सुट्या पानावर कल्याण कृत दासबोधाची आरती व श्रीसमर्थांची आरती, शिवराम कृत कल्याणांची आरती व आत्माराम कृत शिवरामाची आरती व अपूर्ण अशी रामचंद्रांची आरती, अशा आरत्या आहेत. श्रीसमर्थ–कल्याण–शिवराम–रामचंद्र–आत्माराम दासविश्रामधामकर्ते, अशी परंपरा वाचकांस ठाऊक झाली च आहे.

११६८ ] १५१
बाड-पृष्ठे ५६ × ४ = २२४ [१७५

श्रीसमर्थांच्या अभंगाचें बाड

मागीलप्रमाणें च महत्त्वाचें बाड. हें व मागील दोन बाडें यांचीं तऱ्हा

पाहिलीं कीं, तीं दोन्ही बाजूंनीं लिहिलेलीं आहेत. या बाडांत चौदा शतकांहून श्रीसमर्थांचे अभंग आहेत.

दोन्ही बाजूंला अनुक्रमणिका आहेत. घाटी, चाली, ताळ इत्यादि धोरणानें अभंग एकत्रित केलेले आहेत. एका अनुक्रमणिकेच्या शेवटीं तपशीलवार एकूणात दिलेली आहे. त्या तपशीलाचा शेवट असा :

अभंग ४१५, कडवीं ४२८५, पानें ५६

अभंगांपैकीं पान फाटल्यानें काढिले अभंग ५६ बाकी अभंग ३५९

कांहीं अभंग तरी, अर्थात्, अप्रकाशित असणार. मागील बाडाप्रमाणें च, मला सवड न झाल्यास कोणी तरी ताडून पाहण्याचें व अप्रकाशित अभंग प्रकाशनार्थ उतरून काढण्याचें काम केलें पाहिजे.

येथें आत्माराममहाराजांचा संग्रह संपला. त्यांच्या वेळीं एवढा च संग्रह असेल, असें मात्र नव्हे. जास्त असला पाहिजे. आज इतका च उरला आहे, एवढें च. तथापि जो उरला आहे तो हा संग्रह व श्रीदासविश्रामधाम हा त्यांचा प्रचंड श्रीसमर्थचरित्रग्रन्थ, आत्मारामहाराज किती व्यासंगी, निष्ठावंत श्रीसमर्थभक्त होऊन गेले याची उत्कृष्ट साक्ष पटवीत आहे.

या दौऱ्यांतील शेवटचें ठिकाण आपचंद. तेथील कांहीं संग्रह मिळाला व कांहीं संग्रहाच्या नकला करून घेण्याची संधी मिळाली. जो मिळाला त्याची नोंद येथें करूं व इतर ठिकाणच्या नकलांबरोबर या हि ठिकाणच्या नकलांची नोंद शेवटीं करूं.

## आपचंद येथील संग्रह

४

**११६९]** महत्त्वाचें बाड–पृष्ठें ६१ × ४ = २४४ [२००
७१८ पृष्ठें दोन्ही बाजूंनी ८८

श्री रामदासी मालिकेंतील तिसऱ्या भागांत श्रीसमर्थांचे जे स्फुट श्लोक आहेत ते या बाडांत आरंभीं आहेत. त्यांत कांहीं नवीन हि आढळले. नंतर कांहीं सवाया व कांहीं करुणाष्टकें आहेत.

७

**११७०]** बाड–पृष्ठें ६६ × ४ = २६४ [१५०
आ. व पे. ७१७ पानें गेलेलीं

(१) एकनाथी रामायणांतील रामजन्माचे प्रसंग

(२) तुकारामांचा अभंग-रविवशा दीप उदेला अयोध्य ।

(३) विठ्ठलकवि कृत सीतास्वयंवर-सर्ग १ ते ७

८

**११७१]** बाड-पृष्ठें ६७ × २ = १३४ [१५०

आ. व ये. ४।४ गळेली

(१) श्रीसमर्थ कृत पदें, एकूण संख्या १६५, नंतर भूपाळ्या, भजन वगैरे. १६५ वें पद-भोवंडा डोंगराचा फेर

(२) येरटी गोसावीनंदनाचीं २१४ पदें

१०

**११७२]** बाड-पृष्ठें ३८ × ४ = १५२ [१५०

शिवाय वरीं च नष्ट

(१) श्रीसमर्थ कृत करुणाष्टकें वगैरे श्लोक, (२) नरहरि कृत शिवमूर्ति (कल्याणाचे शिष्य आपचंदमठपति शिवराम) याची आरती, (३) कवि सूर्य कृत सद्गुरुअष्टक-अपूर्ण, (४) बारा ज्योतिर्लिंगांचे श्लोक, (५) वेणीस्वामी कृत कौलाचे श्लोक २६, (६) अनंतकवि-कृत श्रीसमर्थांचे 'ज्याची पूर्ण समाधि॰' हें अष्टक, (७) काहीं सुभाषितें, उदाहरणार्थ

गुरु थोर कीं देव मोठा म्हणावा । नमस्कार कवणास आधीं करावा ।
मला येक तो सद्गुरु थोर वाटे । जयाच्या प्रसादें रघूराज भेटे ॥ १
ज्याच्या रूपाची प्रति सापडेना । ज्याच्या गुणाची गणना गणेना ।
दातृत्व ज्याचें सरता सरेना । तो सत्य जाणा प्रभु रामराणा ॥ १

२०

**११७३]** सुंदर बाड-पृष्ठसंख्या ६५ × २ = १३० [२००

(१) पहिल्या पृष्ठावर श्रीसमर्थ कृत एक हिंदुस्थानी पद

(२) नंतर कानडी भाषेंतील रामायण सुरू झालें आहे. कानडी भाषा आहे का तेलंगणप्रांतांतली आहे, आम्हास समजत नाहीं. निरनिराळ्या रागांतील पदें दिसतात कोणा तरी तत्प्रांतीय मित्रानें पाहून ठरविलें पाहिजे. अध्यात्मरामायण आहे कीं काय, न कळे खुणेसाठीं शेवटचीं अक्षरें देतों :—

इदिजेलयोंदुनिलेंदकुरपुरसीतेशाधिराजीवस ।
मदलेळकमरायमाणमविदैमाचलेंश्रीरामना ।

मदधाप्रेरकगुंभनाचतुरिमंवध्यारमरामायणं ।
सुदयास्ताचकसेतुसीतनगमध्योर्विनूपवार्तिसुचुन् ॥
इतीश्रीरापाकरामनामाख्यविरचितं इलेंदकुंटरामायण उत्तरभागं सर्व संपूर्ण

( ३ ) शेवटच्या साडेतीन पृष्ठांवर भारत कनड म्हणून एकवीस कानडी श्लोक देऊन बाड संपविलें आहे.

११७४ ] २२ १०" × ७½" बाड–पृष्ठें ५७ × २ = ११४ [१००

अति दुर्दशा पावलेलें बाड. आहेत त्याच्या पेक्षां तिप्पट पृष्ठें–खालचीं, वरचीं आणि मधलीं–गेलीं आहेत.

( १ ) श्रीसमर्थ कृत सुंदरकांड व अंतर्भाव व वरी च करुणाष्टकें, पदें वगैरे. शिवाय वामन, नामा, केशव, तुका, कल्याण, वेणाबाई, विष्णुदास नामा, गोसावीनंदन, शिवराम पूर्णानंद, आनंदस्वामी, राघवचैतन्य, या हुसेन फकिर, मध्वमुनेश्वर इत्यादिकांचीं पदपदावरें

( २ ) रामचंद्र वदना जरि आला । हा चवथा चरण असलेले ९ श्लोक

( ३ ) श्री रेणुके भगवती वर दे भवानी । हा चवथा चरण असलेले २ श्लोक

( ४ ) वेणाबाई कृत रामगुहसंवाद

( ५ ) विष्णुदास नामा कृत गरुड आख्यान–ओ. ६६ ते १९५

( ६ ) एकनाथ कृत प्रल्हादचरित्र

( ७ ) श्रीसमर्थस्तवनपर संस्कृत, प्राकृत स्तोत्रें

ज्याच्या बोलें राम डोले स्वभावें ।
वंदूं रामीरामदासांसि भावें ॥ १

११७५ ] २३ बाड–पृष्ठें १५ + २२ = ३७ × २ = ७४ [१०
शिवाय दुर्दैवानें आरंभींचीं ३ × २ = ६ नष्ट

सर्व बाड हिंदुस्थानी भाषेंतील आहे. एका दृष्टीनें तें महत्त्वाचें आहे. त्यांतील प्रकरणें हिंदुस्थानी भाषेंतील असल्यामुळें तीं या संपादकास चांगलीशीं अवगत हि नाहींत व प्रकाशित आहेत का नाहींत हें हि ठाऊक नाहीं. तीं अप्रकाशित असल्यास बाडाचें महत्त्व विशेष च म्हणावें लागेल,

संमत सोलहसे वरस वीते अव्यासीत । (?)
कातक ( कार्तिक ) सुध्ध षष्टी गुरु मर्थ रचों करा प्रसिधी ॥
संवत १६८८ कार्तिक शुद्ध ६ गुरुवार म्हणजे शके १५५३ मधील कार्तिक शुद्ध ६ येते.

( ३ ) शेवटच्या साडेतीन पानांत काहीं सवैया, दोहरे, भीटांगण व कविराचे दोहरे आहेत.

११७६ ] महत्वाचें बाड-पृष्ठें ३१×२=६२ ) [१२५

आत्मारामहाराज कृत स्तवन अभंग येकसेहे येकेचाळीस

मागील ११५५ बाडांकांत ज्या पदाचा उल्लेख केला आहे ती पदें आणि हे अभंग एक च. मधल्या च ४ ते ११ अभंगांचीं पानें गेलेलीं आहेत. हे अभंग प्रकाशित झाले पाहिजेत.

११७७ ] बाड-पृष्ठें ६१+६१=१२२×२=२४४ [ १२
एका बाजूचीं पहिलीं दोन पानें गेलेलीं

आत्माराम कृत पदें, अभंग वगैरे

( १ ) दोन्ही बाजूकडून लिहिलेलें आहे. सबंध बाडांत आत्माराम महाराजांचीं पदें, अभंग वगैरे आहेत. ११५५ व ११७६ यातील पदाहून हीं निराळीं आहेत. त्यात काहीं कानडी भाषेंतील हि आहेत. न समजणारी भाषा, तिला आम्ही कानडी समजतों. कानडें = न समजणारें, कठीण, दुर्बोध. आत्मारामहाराजांची स्फुट कविता म्हणून एखादा भाग श्रीरामदासी मालेंत कोणी तरी प्रसिद्ध केला पाहिजे. पदाची गोडी पहा :

[ १ ] श्रीराम जी

श्रीराम जी जयराम जी जयजयराम जी राम ॥ ध्रु०
तारक तुजविण न दिसे दुसरा । पूर्ण करी मनकाम जी राम ॥ १
रूप हरी हा माझें वारण । ऐकुनियां सुखधाम जी राम ॥ २
रघुरामीं राहुनि देई थारा । नाम सदाचा प्रेम जी राम ॥ ३

[ २ ] मग काय आतां

श्रीराम समर्थ भगतां मग काय आतां । न घडे कदाची हे चिंता ॥१

गुरुधर्म हृदई बिंबतां । स्वरूपीं अखंड रमतां ॥ १ भय०
मायामोहादि निरसतां । छाया प्रारब्धीं टाकितां ॥ २ भय०
मानादि तुच्छ वाटतां । विष (य) भोगीं मन विटतां ॥ ३ भय०
भजनपंथेसी चालतां । कोण्ही वंदितां निंदितां ॥ ४ भय०
त्रिपुटी ग्रासुनि डोलतां । आत्मा आत्मत्वीं खेळतां ॥ ५ भय०

(२) एका बाजूच्या शेवटीं कांहीं भजनाचीं पदें दिलेलीं आहेत. त्यांतील दोन देतों :

[१]

मोठा अभिमानी भक्ताचा श्रीरामदास ॥ ध्रु०
पाहुनि सद्गुरु भावो येक । धावतो समयास त्यास ॥ १
भक्तजनाचा वाहतो भार । न धरी नाहीं आस त्रास ॥ २
धरठन आत्मारामीं ध्यास । वाहनि टाकिती क्लेशपाश ॥ ३

[२]

रामदास गुरु माझे आई । मला ठाव द्यावा पाईं ॥ ध्रु०
मनींची आवड येवढी च पुरतां । आणिक आतां न मगूं कांईं ॥ १
दिव्य निधान जवळि च असता । कां धुंडावें दाहि साही ॥ २
जें पद पाहतां द्वैत हरपुनी । आत्माराम नाचे हृदईं ॥ ३

(३) श्रीसमर्थचरित्र लिहिण्याची आत्मारामहाराजांना कोण तळमळ लागली होती !

स्वामी रामराया आतां विज्ञापना । माझी तव करुणा सत्ता नाहीं ॥ १
देहपात होतां न वाटे चि दु:ख । परी आस्था येक उरली असे ॥ ४
करिशील तूं आतां पूर्ण मनोरथ । भक्तवेळायीत मीदासार्थी ॥ ५
दोष न पाहतां नवा च प्रारब्ध । निर्मुनी सावध करी देवा ॥ ६
दासलीळा गाऊं देईं शक्ति मती । जपाची समाप्ती होऊं देईं ॥ ७
संतसाधुशिष्यवर्गासी भेटवी । बोलवी चालवी हितगुज ॥ ८
कांहीं गुरुसेवा करवी दीनानाथा । वारी मोहचिंता धैर्य देईं ॥ ९
मग आत्मारामा पदीं देईं ठाव । जडउनि अक्षैय भाव पूर्ण ॥ १०

याला अंत नाहीं, मोह आवरावा, पुढें चलावें !

**[११७८]**

२७
पोथी–पत्रें ७२ [१७०
चंद्रात्मजकवि कृत उद्योगपर्व

( १ ) बारा अध्यायांपैकी २, ३, ८, ९ असे चार अध्याय नाहींत व शेवटच्या अध्यायाचें शेवटचें एकादुसरें पत्र गेलेलें आहे.

( २ ) कवीनें आरंभीं सद्गुरु व्यंकटेश यांना नमन करून मग गणपति, सरस्वती, कुलदैवत संगमनाथ शंकर, वेदव्यास, निवृत्ति, ज्ञानदेव, सोपान, मुकुंदमुनि, जनपंडित, एकनाथ, मुक्तेश्वर कवि आणि श्रोते यांना नमन केलें आहे.

( ३ ) आमच्या हातांशीं अहर्निश असलेल्या महाराष्ट्रकविकाव्यसूची या अत्यन्त उपयुक्त संदर्भग्रंथांत आमचे परम उदार मित्र कै. गोविंद काशीनाथ चांदोरकर यांनीं टिपलें आहे कीं, "चंद्रात्मजकवीनें उद्योगपर्वांत आपल्या पित्याचें नांव दुंदुभी दिलें आहे."

समाचा पिता आनकदुंदुभी । म्हणोनि गर्गें वेददुंदुभी ।
त्याचा कृपानुग्रह ग्रंथारंभीं । होतां आरंभी कविता ॥ ९३२४

या ओवीवरून त्यांनीं तसा समज करून घेतला, असें दिसतें. आनकदुंदुभि म्हणजे वसुदेव. वसुदेव ज्याचा पिता त्या श्रीकृष्णाच्या कृपेनें आपण ग्रन्थ आरंभिला, असें कवि सांगत आहेत. चंद्रात्मज या त्यांच्या नांवांत च त्याच्या वडिलांचें नांव आलें आहे.

( ४ ) या च शेवटच्या अध्यायांत कवीनें आपली गुरुपरंपरा दिलेली आहे. ती अशी : दत्तात्रय-अद्वैतानंद-परमात्मानंद-योगेश्वरानंद-द्वैतानंद-अमृतानंद-ब्रह्मानंद-विमलानंद-चिदानंद-प्रसन्नानंद-रामानंद-व्यंकटेश, त्या

व्यंकटेशगुरुपदाचा रंक । चंद्रात्मज रुद्र नामक ।
माता वाराणसी देख । पवित्र आणि पतिव्रता ॥ ९३९६
वर्णांमाजी ब्रह्मवर्ण । ऋग्वेद शाखा अश्वलायन ।
वसीष्ट कौंडिन्य मैत्रावरुण । त्रिप्रवर गोत्र वसिष्ट ॥ १७७

( ५ ) प्रतीचा लेखनकाल-१६८७ पार्थिव नाम संवत्सरे कार्तिक शुद्ध १० दशमी सौम्यवार

[ ११७९ ] २१ [ १२५

पोथी-पत्रें ८७

शिवराम पूर्णानंद कृत प्रबोधसुधाकर

मूळ आचार्यांचा श्लोक, नंतर मराठी समश्लोक आणि समपद, अशी ग्रन्थाची रचना आहे.

**११८० ]** ३० [१२५

पोथी–पत्रें ९०

आत्माराममहाराज कृत क्रमसार ग्रंथ

ग्रंथ सुंदर, महत्त्वाचा, मार्गदर्शक आहे. श्रीरामदासपंथक्रमसार म्हणून तो आपण श्री रामदासी मासिकांत छापला होता. आताचि कधीं च संपली. दुसरी नियाली पाहिजे. मागील बाडक्रमांक १०३५ पाहणें.

**११८१ ]** ३१ [८०

पोथी–पत्रें १०९

मुकुंदराज कृत श्रीमत् विवेकसिंधु

**११८२ ]** ३२ [१५०

पोथी–पत्रें ७६

चित्रदीप

मूळ संस्कृत श्लोक व त्यांवर गद्यात्मक टीका

श्रीमत्परमहंसपरिव्राजकाचार्यश्रीभारतीतीर्थविद्यारण्यश्रीचरणशिष्येण रामकृष्णाख्यविदुषा विरचितं तात्पर्यबोधिनिनामकं चित्रदीपव्याख्यानं ॥

**११८३ ]** ३३ [१००

पोथी–पत्रें ४०

शिवाय ३. वीं २ पत्रें गेलीं असावींत

श्रीसमर्थ कृत ओव्याशतकें १४

**११८४ ]** ३४ [१५०

पोथी–पत्रें १११

श्रीसमर्थ कृत लघु काव्यें

जुनाट पुरुष, पंचीकरण अष्टाक्षरी (पंचीकरणयोग), पंचीकरण, बहुधा गोसावी, पंचसमासी, पूर्वारंभ, मानसपूजा, अंतर्भाव, कृत-निर्वाह व आत्माराम अशीं दहा प्रकरणें. मालेंतील अठरावा भाग काढताना ताडून पाहण्यास योग्य.

कृतनिर्वाह हें प्रकरण श्रीसमर्थांचें च मानावें काय ? संबंध सावकाश वाचून पाहिलें. अति गोड आणि महत्त्वाचें आहे. श्रीसमर्थांच्या इतर प्रकरणांबरोबर च लेखकानें तें श्रीसमर्थांचें म्हणून उतरलें आहे. त्याचे पाच समास आहेत. ओवी साडेचार चरणाची आहे. प्रत्येक समासाचे शेवटीं रामीरामदास कृत म्हटलेलें आहे. हें प्रकरण श्रीसमर्थांचें नसून शिष्यांचें असावें, असें फार वाटतें. तथापि हा प्रश्न अजून अनिर्णित समजून विचारविनिमयासाठीं खुला ठेवावा.

११८५ ] ३५
पोथी–पत्रें २ [१५०

एकनाथ कृत गीतामहिमा–अभंग, २२ कडवीं, अप्रकाशित आहे, असें वाटतें.

११८६ ] ३६
पोथी–त्रुटित पत्रें २१ [१५०

अष्टावक्र–समश्लोकी–अपूर्ण

११८७ ] ३७
पोथी–पत्रें १४ [२००

अ. सि. पत्रें २३ ते ३६

११८८ ] ३८
पोथी–त्रुटित पत्रें १० [८०

विश्वंभर कृत गोपीचंद आख्यान–अपूर्ण

११८९ ] ३९
पोथी–पत्रें ३० [११०
पैकीं १ ते ६,९ व २१–२२ नाहींत

मुकुंदराज कृत परमामृत

प्रतीचा लेखनकाल–१७४७ अधिक श्रावण वद्य १ मंदवासर. लेखक–बाळाजी नारायण कुळकर्णी मौजे घाटबोरवळ परगणे भालकी. लेखनस्थल–पदरी

११९० ] ४१
बाड–त्रुटी पत्रें ११ [१००

एका प्रचंड बाडाचीं हीं ५९ ते ६१, ६३ ते ६६ व ७२ ते ७५ मिळून अवघीं ११ पत्रें आहेत.

त्यांत श्रीसमर्थ कृत आत्माराम, सगुणध्यान व मानसपूजा या तीन प्रकरणांचा कांहीं भाग आला आहे.

**११९१ ]** ४२,४३ तीन बाडांचीं त्रुटित पत्रें ४ + ४ + ३ [१५०

यांत श्रीसमर्थ, निंबक, कल्याण, आत्माराम, अमृत, बाळकृष्ण, नाथ भुजंग, दास बाळ, यांचीं पदपदांतरें आहेत. त्यांत अमृत, बाळकृष्ण आणि नाथ भुजंग यांचीं पदें जगदंबेवर आहेत. त्यांत मध्यें च पुढील पद आहे, हें कोणाचें समजावें ?

तूं येक जगदंबा । जगदंबा । मज कुळदैवत अंबा ॥ ध्रु ०
भाव जयासी जैसा । देसी लाभ तयासी तैसा ॥ तूं ० १
मारुनि दुर्जन पापी । केली ( ख्याती ) गड प्रतापीं ॥ तूं ० २
शिवरायाचे भक्ति । पूर्ण प्रतापें केली वस्ती ॥ तूं ० ३

**११९२ ]** ४६ पोथी–एक पत्र [२००

अथ रसायनम्–संपूर्ण ९ श्लोक

**११९३ ]** ४७ एक कागद [१००

आत्मारामांचे शिष्य रंक कृत सिद्धेश्वराचीं स्तोत्रें, अष्टकें, पदें, अभंग.

**११९४ ]** ४८ एका जीर्ण बाडाचीं सुटीं ११ पानें [२००

( १ ) श्रीधर कृत अश्वमेध–पूर्ण, कडवीं २५
( २ ) शिवराम पूर्णानंदांचीं १५ पदें

**११९५ ]** ४९ पोथी–पत्रें १२ [८०

शिवराम कृत रामतुळशी

११९६ ]

५०

पोथी–पत्रें १४५ [२००

एकनाथ कृत रुक्मिणीस्वयंवर–संपूर्ण, सुंदर प्रत.

११९७ ]

५१

पोथी–पत्रें ३० [५०

संकटहरिणीशिवग्रंथ–ओवीसंख्या १४१. व्यंकटेशस्तोत्राप्रमाणें हें शिवस्तोत्र आहे. १४१ ओव्यांत ७ अध्याय केले आहेत.

हा ग्रन्थ वडवाळ सिद्ध नागनाथांचा कीं त्यांचे शिष्य अज्ञान सिद्ध नागनाथ यांचा असा मला प्रश्न पडला आहे. पूर्वी तो वडवाळ सिद्धांचा मानला होता, पण आतां तो अज्ञान सिद्धांचा वाटतो.

त्याचा रचनाकाल ग्रन्थांत च आला आहे तो १३१२ मार्गशीर्ष वद्य २ गुरुवार

या प्रतीचा लेखनकाल १८०७ कार्तिक शु. १३

११९८ ]

५२

कागदाचा एक तुकडा [१५

गुरुवेगळें नाम घेईन जेव्हां । गुरुवेगळें रूप पाहीन जेव्हां । गुरुवेगळे पाय वंदीन जेव्हां । क्षणामाजि मी भस्म होईन तेव्हां ॥ १ याप्रमाणें क्षणामाजि मी भस्म होईन तेव्हां । हा चवथा चरण असलेले १३ श्लोक. ते कोणाचे, हें दर्शविलेलें नाहीं, पण ते शिवराम पूर्णानंदांचे च असावेत, असें वाटतें.

११९९ ]

५३

उसवलेलें बाड–पृ. २६ [१००

( १ ) दत्तात्रय विरचित मूलस्तंभांतर्गत गर्भावळी–ओवी १५ ते ५१

( २ ) बाळकराम कृत रसद दामाजीपंत–कडवीं ११, पण त्यांतील २ ते ७ नाहींत.

१२०० ]

५४, ५५

गळांठा [१००–२००

( १ ) वेणाबाई कृत फौलाचे श्लोक, ( २ ) कांहीं कारण नसतां तुकारामाचा अभंग उतरून घेतों. पण त्यात हि शुद्ध पाठ आढळतील. मला वाटूं लागलें आहे कीं, तुकारामाचे शेकडा पन्नासावर अभंग अशुद्ध छापले आहेत. एकादा शब्द लागला नाहीं, तर प्रकाशक आहून बसत नाहींत! अनुमानधपक्यानें कांहीं तरी छापतील च. दासबोधातील ३ × ३ × ३७ तील " आरघें " शब्द लागला नाहीं, तर " आरघें " शब्दाला जवळ असणारा शब्द " अंधारें " योजून १८२७ च्या पूर्वीच्या प्रकाशकांनीं काम धकविलें च होतें कीं नाहीं? असो!

दिवाळखोर नारायण । त्यावरि बहुताचें रुण ॥ १
प्रात:काळीं उभे दारीं । जे ते म्हणती दे दे हरी ॥ ध्रु०
आपण लपे माजघरीं । माया वाटी आड करी ॥ २
विठो कां हो धरिलें मौन्य । युगायुगींचें हें रुण ॥ ३
रोखापत्र वाचुनि पाहीं । वेदशास्त्र देती ग्वाहीं ॥ ४
धनको नाम तुका वाणी । रिणको नाम विठल धणी ॥ ५

समर्थ, कबीराचे बारा दोहरे, वामनी श्लोक, कूट श्लोक, शृंगार श्लोक, पूतनावधातील श्लोक आरणीच्या विषयाचा, ( ३ ) शके १६८५ तील गजेंद्रमोक्षाची अपूर्ण प्रत, ( ४ ) दासबोधाचें पान, ( ५ ) देवनाथ ठक्कुर गोविंदनाथ यांच्या पदाचा कागद, ( ६ ) एका हरिकथानिरूपणाचीं ८ ते १२ पानें, ( ७ ) प्राकृत नारायणस्तोत्र–कडवीं ४६, प्रत्येक कडव्याच्या शेवटीं " नारायणा " असें आहे, ( ८ ) ३६८ ते ४१६ क्रमांकातील कांहीं पदें, अभंग इत्यादिकांचे क्रमांक असलेलीं मूळच्या एकाद्या प्रचंड बाडाचीं तीन पत्रें, पण तेवढ्यात माधवस्वामी, कृष्णदास, जनी, नामा, केसरी उद्धोष, मुक्ताबाई, नरहरि मालो, देवदास, केशव, श्रीसमर्थ, मानपुरी, उद्धवचिद्धन व तुकाराम अशा तेरा जणांचीं पदपदांतरें आलीं आहेत, ( ९ ) हरिविजय–अपूर्ण, ( १० ) विश्वंभर कृत गोपीचंद आख्यानाचीं पानें, ( ११ ) अपराधस्तोत्र–मूळ व कानडी समश्लोक, ( १२ ) रुद्र, ( १३ ) सुभाषितें, ( १४ ) मनाचे श्लोक–अपूर्ण, ( १५ ) कानडी पदें, ( १६ ) श्रीसमर्थ, आत्माराम, कबीर, तुकाराम, वामन, विष्णुदासनामा, जगज्जीवन, काशीनाथ जनार्दनपदरज, राघवदास, ज्ञानदेव, शिवराम पूर्णानंद, अमृत, रंगनाथ, उद्धवचिद्धन यांचीं पदपदांतरें, ( १७ ) किरकोळ पत्रें.

**याप्रमाणें** ग्रंथसंपत्ति मिळून संशोधनकार्यांतील या वर्षीचा बैल-गाडीचा खांदलचक दौरा संपला. शक १८३५ च्या वैशाखाचा शुद्ध पंधरवडा

## तंजावर प्रांतांतील श्री रामदासी मठ

पाहण्यांत खर्ची पडला. श्रीसमर्थ त्या प्रांतीं गेले च होते. त्यांनीं मुख्य तीन शिष्य त्या प्रांतीं पाठविले होते. एक **भीमस्वामी**, हे खुद्द तंजावरास च होते, दुसरे **राघवस्वामी** हे तंजावरपासून पूर्वेस पांच कोसांवर कोनूर म्हणून एक लहान खेडें आहे, तेथें होते व तिसरे **अनंत मौनी** हे मन्नारगुडी येथें मठ करून होते. 'महंतें महंत करावे' या शिकवणीप्रमाणें त्यांनीं तिकडे अनेक शिष्य केले. त्यांत भीमस्वामींचे **झोळीराम बावा**, **गोविंदबाळ** व **आण्णाजी बावा** असे तिघे शिष्य प्रख्यात होते, निदान या तिघांचे हि आज तंजावरास च मठ आहेत. राघवांचे **माधव** म्हणून प्रख्यात शिष्य होते, प्रख्यात अशासाठीं कीं, त्यांनीं वाल्मीकिरामायणाची सुंदर अशी मराठी प्रतिकृति निर्माण केली होती व अनंत मौनींचे **मेरुस्वामी** हे आज हि महाराष्ट्राच्या पूर्ण परिचयाचे झाले आहेत. या सर्वांच्या परंपरा आज हि चालू आहेत व त्या परंपरांत अनेक नामांकित ग्रन्थकार होऊन गेले. या सर्व मंडळींनीं आणखी कोणती कामगिरी बजावली असेल ती त्याची त्यांना माहित, पण त्या सर्वांनी त्या प्रांतांत मराठी भाषेचा अतोनात प्रसार केला होता, यांत शंका नाहीं. आश्चर्य वाटेल, पण आज हि त्या प्रांतांत मराठी भाषा जाणणारांची संख्या लाख पाऊण लाख भरेल.

तात्पर्य, खुद्द तंजावरास चार मठ आहेत. भीमस्वामींच्या मठांत श्रीमद् दासबोधाच्या तीन प्रती पाहिल्या. एक खुद्द भीमस्वामींच्या हातची, ती व्यवस्थित ठेवलेली आढळली. ती सचित्र आहे. तिला अनेक फडक्यांचीं वेष्टणें होतीं. शेवटीं लेखकाचें नांव किंवा लेखनकाळ वगैरे कांहीं नाहीं. अक्षर टपटशीत आहे. दुसऱ्या प्रतीच्या शेवटचा मजकूर :

> प्रजापती नाम संवत्सर चैत्रमासी । भृगुवासरी केले ग्रंथ आरंभासी । समास आले प्रवीण संद्दारेसी । श्रीसमर्थचरणेंकरूनी ॥ श्रीरामदासचरणी मन ठेवा । श्रीभीम ऐसे गुरु सर्व गाथा । बाबाजी दासी नमितो विरक्ते । त्याच्या कृपे पाठक नाम साजे ॥

तिसऱ्या प्रतीच्या शेवटचा मजकूर जेवढा लिहिला आहे तो :

श्रीशालीवाहन शके पींगळ नाम संवछर । वैशाख मास ++ भानुवारी समाप्त । चंद्रावरी सीध गंगाजळतेश्रीरघुवीर +++ । श्रीरामदाससंप्रदाई । शाहापुरकर बाई । तीचे नातु गुरु भीम ++ ++ +++ त्यांचे दासानुदास +++ सदा भीम अभयंकर +++++ तो निस्पृह आणाजी । गुरु भीम नवाजी । शहापुरकराचे नाम गाजी +++ स्वहस्ते ग्रंथ लेहून । श्रीरघुवीरार्पण । ठाउनि भीमचरणी तनमन निरंतर वर्ततसे ॥

कांहीं संग्रह कायमचा मिळाला. माधव कृत रामायणाचीं चार कांडें परत करण्याच्या बोलीनें मिळालीं. त्या काळीं तंजावरास श्रीमंत कृष्णमूर्ति नाईक म्हणून एक श्रीमान् वजनदार गृहस्थ होते. त्यांनीं एक खाजगी वाचनालय चालविलें होतें. त्यांच्या जवळ गोष्ट काढता त्यांच्या संग्रहीं माधव कृत सात हि कांडें होतीं. तीं त्यांनीं कांहीं दिवसांसाठीं दिलीं. तीं चार आणि हीं सात येथें आणून सबंध रामायणाची नकल करवून दोघांचीं कांडें परत केलीं. अरण्यकांड आणि युद्धकांड यांचा शेवट महत्त्वाचा वाटला म्हणून उतरून घेतला होता. तो आज हि महत्त्वाचा वाटतो, म्हणून सादर करितों :

अरण्यकांडाचा शेवट

इतुकेन अरण्यकांड समाप्त । रामें वासना केली सकळ तृप्त ।
आतां राघवा वांचूनि आप्त । नाहीं माधव म्हणे ॥ ४६
पावलों निजसुखाची नव्हाळी । दिदली संसारासी तिलांजुळी ।
जन्ममृत्यांची केली होळी । दाशरथीनें ॥ ४७
उगविली सकळ ही गुंती । हिरोनि नेली ममताबुद्धी ।
फिटली अज्ञानभ्रांती । जाहला जन्म सार्थक ॥ ४८
आहे नाहिं आवघें गेलें । मायेचें मूळ चि तुटलें ।
अनिर्वाच्य होउनि ठेलें । तद्रूप मन ॥ ४९
मनाची मनपणता गेली । म्हणिजे तद्रूपता प्राप्त जाली ।
हे ही पाहतां नाईक योली । प्रत्ययविवेकें ॥ ५०
मुळीं आपणास चि नाहिं ठाव । वास्तव आवघें चि वाव ।
अप्राप्त प्राप्त हा भाव । कल्पावा कोणाचे माथां ॥ ५१
शके पंधरा आगळीं सोळा शत । समाप्तीसि पावला ग्रंथ ।
कुंभकोण प्रसिद्ध काशीपर्यंत । तो प्रांत समीप श्वेतारण्य ॥ ५२
प्रख्यात जे कां गौरी मयोर । त्या समीप चि त्रिबिंदुर ।
उभय ग्रामामध्यें नीर । प्रवाह सुंदर कावेरीचे ॥ ५३

त्या कावेरीचे वामभागीं सुंदर । लघु देवालये मनोहर ।
माजि लक्ष्मणसीतेसी रघुवीर । वस्ती करी जगद्गुरू ॥ ५४
त्याचिये संक्षिप्त रामायण । सप्त कांड जालें संपूर्ण ।
प्रतिदिनी प्रसंग पूर्ण । होत आला सरळ ॥ ५५
धौमुख नाम संवत्सर । वैशाख कृष्ण द्वितीया गुरुवार ।
ते दिवसी ग्रंथ संपला प्रहर । दिवस जाला होता ॥ ५६
प्रथम केलें किष्किंधाकांड । त्या उपरी सुंदरकांड ।
त्या नंतरें उत्तरकांड । बाळकांड त्या पाठी ॥ ५७
उपरि केलें अयोध्याकांड । सकळा सेवटीं हें अरण्यकांड ।
मग कित्येकां दिवसां युद्धकांड । निर्मिलें काळ अंतरें ॥ ५८
रामदास प्रसिद्ध भूमी । त्याची परंपरा आम्ही ।
गुरु परम सत्कर्मी । राघवदास ॥ ५९

युद्धकांडाचा शेवट

जालें युध्दकांड संपूर्ण । श्रवणें नासती दोष दारुण ।
आणि विमळ होय अंतःकर्ण । परमार्थविषईं ॥ १२५
धनवृधी धान्यवृधी । यशवृध्दी कीर्तिवृधी ।
पुण्यवृध्दी प्रजावृधी । होय येणें ॥ १२६
नासे संकट अपाय विघ्न । होती रणांगणीं अरि भग्न ।
वास्तव क्षेत्रिंयें अखंड मग्न । असावें रामायेणीं ॥ १२७
असो हा महिमा अपार । जाणती अनुभवी नर ।
आतां समूळ ग्रंथविस्तार । प्रसंग किति ते ऐका ॥ १२८
सप्तकांड रामायण सांग । दोनिसें वीस प्रसंग ।
वाल पेकादशें देतां सांग । दिसतसे हाळ तुटे ॥ १२९

वगैरे. मागही गेलों तेव्हां मठपति रामनाथ गोसावी व त्यांचीं दोन मुलें सीताराम आणि आत्माराम अशी होती. रामनाथ गेले व मुलें हि आतां प्रौढ झालीं आहेत. मुलें सद्गुणी आणि आदरेयार्दक आहेत. मठांत श्रीसमर्थ आणि भीमस्वामी यांच्या जुन्या तसबिरी होत्या. त्यांचे फोटो घेतले. श्रीसमर्थांच्या त्या तसबिरीची एक प्रत पुण्याच्या भारत-इतिहाससंशोधक-मंडळाला दिली होती, ती मंडळात असेल व मला कौतुक वाटावें, अशी आनंदाची गोष्ट अशी कीं, आज ही श्रीसमर्थवाग्देवतामंदिरांत मदच्छेनें जेथें हा

वृत्तान्त लिहावयास बसलों आहे, तेथें समोर च भीमस्वामींची तसबीर टांगलेली आहे !

तंजावर प्रांतात मिळालेल्या संग्रहाचे अठावीस रुमाल बांधलेले आहेत. ते सर्व पुढें मांडून बसलों आहे. माझ्या हातून एक अपराध असा घडला आहे कीं, या संग्रहाचें सूक्ष्म अवलोकन करण्यास मला आजपर्यंत सवड च झाली नाहीं ! आतापर्यंत ज्या संग्रहाचें वर्णन संशोधनखंडात आलें व पुढें येईल, त्या सर्व संग्रहाचें त्या त्या वाळीं च मी स्थूलमानानें टाचण करून ठेवलेलें होतें व आहे. पण या तंजावरकडील संग्रहाचें तसें हि टाचण आजपर्यंत मजकडून झालें नाहीं. श्री भीमस्वामी समोर आहेत, हीं अठावीस दप्तरें त्याच्या पुढें आहेत, ते त्याच्याकडे पहात आहेत, माझें हृदय धडधडत आहे, श्रीसमर्थ आणि श्रीभीमस्वामी याना या दोनाची प्रार्थना की, या संग्रहात अमूल्य रत्नें हातीं लागावीं !

भीमस्वामींची पुण्यतिथि फाल्गुन शु. १. त्याची समाधि मठापासून दूर एका ठिकाणीं असून तिच्याकडे कोणाचें च कसें लक्ष नाहीं, हें पाहून अति दुःख झालें. समाधि कोणा तिऱ्हाइताच्या ताब्यात गेली आहे. आम्ही दर्शनास गेलों तेव्हा समाधीवर वारूळ वाढलें होतें व वाण्याच्या दुकानातील मालाचीं पोतीं समाधीला खेटून व प्रदक्षिणेच्या मार्गावर पडलीं होतीं ! आग्रहास का न वाईट दिवस यावेत ! त्याची कृपा कधी व्हावी ! क्षमा करा.

झोळीरामबावाच्या मठात विद्यमान मठपति म्हणून भीमराव नावाचा एक निर्मल अंत:करणाचा, निष्कपट मुलगा होता. त्यानंतर त्याची भेट नाहीं, पण ऐकतों कीं, हल्लीं त्या मुलास मद्रास येथें चागला हुद्दा प्राप्त झाला आहे. या मुलाचे मजवर फार उपकार आहेत. ते विती ते त्याला हि माहित नसतील. या हि मठात श्रीसमर्थांची तसबीर आहे. ती गडावरील तसबिरीप्रमाणें च आहे, फक्त या मूर्तीच्या डाव्या खाकेंत कुबडी आहे. 'चित्रकळा नाना नाटक । म्हणोनि नामें कर्नाटक ॥' हें श्रीसमर्थांनीं या प्रांताचें केलेलें वर्णन आज हि पटतें. प्रत्येक मठात भिंतीवर, कागदावर, फळ्यावर, पोथ्यावर चित्रें असावयाचीं. भक्तविजयातील प्रसगाचीं पन्नास चित्रें या मठात पाहिलीं. ६' उंच व ४' रुंद असा चवदा रागांचा एक चित्रपट आहे, तो निराळा च. विपुल संग्रह मिळाला. आरणीच्या शिपायाकडील ( आनंदतनय ) श्रीरामाच्या मूर्ति या च मठात आणून दिल्या आहेत, कारण आरणीस कोणी राहिले नाहीं.

गोविंद बाळ हें एक नांव नाहीं. बाळाजीपंतांचा मुलगा गोविंद, अशीं पितापुत्रांचीं हीं नावें आहेत. बाळाजीपंतांचे कुटुम्ब आणि भीमस्वामींचे कुटुम्ब या बहिणी बहिणी होत्या. या हि मठांत दाउबोधाची जुनी प्रत व चित्रपट आहेत. ग्रंथसंग्रह पहावयास सांपडला. त्यांतील ( १ ) माधवकुमार कृत दशम स्कंदावर १२०६४ ओवीटीका, १६५८ तील, शेवटचा भाग :

> शके सोळाशें आठावन्न । पिंगळ संवत्सर पावन ।
> तैं दशमस्कंधारंभण । केलें आपण इंद्रपुरीं ॥ ३
>
> कितेक दिवसानंतर । संपला ग्रंथ सुंदर ।
> विनवी माधवकुमार । जोडोनि कर श्रोतयांसि ॥ ४
>
> × × × × × ×
>
> जो प्रतापसिंह राजमणी । तन्मंत्री सागाजी अण्णा वीराग्रणी ।
> तत्सुत सुंदरराव गुणखाणी । तत्पुत्र सुगुणी शंकरराव ॥
> तयाचें हें भागवत दशम । श्रोत्यांस मंगलप्रद परम ।
> मन्मथ वर्षे मार्गेश्वर उत्तम । शुक्लपक्षीं सुगम पूर्ण लिहिलें ॥

म्हणजे ही प्रत १७५७ त झालेली असावी, ( २ ) माधव कृत उद्योगपर्वांतील सनत्सुजात, ( ३ ) माधव कृत कर्णपर्व, ( ४ ) माधव कृत श्लोकबद्ध रामायण, ( ५ ) माधव कृत दशम स्कंद, ( ६ ) माधव कृत अरण्यपर्वांतील नलोपाख्यान, ( ७ ) महिपति कृत भक्तविजय व ( ८ ) संतविजय, ( ९ ) शेष कृत स्कंदपुराणांतील पांडुरंगमाहात्म्य, त्याचा शेवट :

> मेदिनीकर कुलसंभव । रुक्मांगदपुत्र ज्ञानविभव ।
> गंगाधराख्य अभिनव । जया सद्भाव श्रीरामचंद्रीं ॥ ४१
>
> श्रीशिवरामेंद्र योगीवर । तदनुग्रही दयासागर ।
> रुक्मासुत म्हणती ज्यासि. थोर.।, लक्ष्मीनृसिंहस्य. म्हत्. ११, ४५.
>
> तयाचा श्री अभयहस्त । माझिया माथा सदा वर्तत ।
> तो जैसा बोलवीत । तैसा बोलतसे जाणा ॥ ४६
>
> येथें मीपणासी नाहीं ठावो । बोलविता सद्गुरुरावो ।
> सर्वसाक्षी रघुपुंगवो । जाणे भावो शेष म्हणे ॥ ४७

( १० ) शेष कृत अद्भुतकांड रामायण, ( ११ ) माधवात्मज कृत भागवत प्रथम स्कंध, ( १२ ) अद्वैतप्रकाश, शेवट :

महानिमंतोजी म्हणे मुनिजना । हे तुमची अनुज्ञा ।
तया अवरध सुवाध वचना । क्षमा कीजे ॥

( १३ ) आनंदसागर कृत रामचैतन्य, ( १४ ) वामन कृत समश्लोकी गीता व ( १५ ) निगमसार, ( १६ ) ज्ञानेश्वर कृत ज्ञानेश्वरी, ( १७ ) अनुभवामृत व ( १८ ) हस्तामलक, ( १९ ) ज्ञानदेव कृत गीता, ( २० ) व्यंकटेशस्तोत्र, ( २१ ) भोजराज विरचित चंपू अयोध्याकांड, ( २२ ) कुंभकोणमाहात्म्य, ( २३ ) विठ्ठलदास रुद्र कृत तुळशीमाहात्म्य ( २४ ) मयूरपंत कृत भागवतटीका; इत्यादि ग्रन्थांचें नुसतें टिपण करून घेतलें होतें. रामकृपाविलास ग्रन्थाचे कर्ते मुकुंद हे गोविंद बाळांचे पुतणे होत.

आण्णाजीबावांच्या मठात इतर कांहीं ग्रन्थसंग्रह नाहीं, असें तत्कालीन विद्यमान मठपति रघुपति यांनीं कळविलें. श्रीमत् ग्रन्थराजाची प्रत, श्रीसमर्थ व भीमस्वामी याच्या तसबिरी होत्या. या मठाला भीमस्वामींच्या पादुका मिळाल्या, झोळीरामबावांच्या मठाला झोळी मिळाली व गोविंद बाळांच्या मठाला कांठी मिळाली असें मठपतींनीं सांगितलें.

या प्रांतांत दासबोधाच्या जेवढ्या प्रती पाहण्यांत आल्या त्या सर्वांत 'देह पांचा भूतांचा ', ' आणि कवित्व मनुष्याचे ', ' ऐसा अप्रमाण बोलण्याचें। काय काम ' असे च पाठ आढळले. म्हणजे कल्याणस्वामींच्या प्रतींतील शो व तिकडच्या प्रतींत आढळले नाहींत.

सेतुरामबावांचा म्हणून तजावरास आणखी एक पांचवा मठ होता. हे सेतुराम मेरुस्वामींचे एकनिष्ठ शिष्य होते. राजगुरुत्व पुढें सेतुरामांच्या कडे आलें होतें. त्यांच्या मठाला पाच पन्नास हजारांवर उत्पन्न असल्याचें ऐकलें होतें. त्या मठांतील पुरुष राजवैभव भोगीत असल्यामुळें आम्हांस त्यांचें दर्शन घडलें नव्हतें. परभारें बाहेरून ऐकलें होतें कीं, त्यांच्या मठांत पोथ्या पुस्तकांचा बरा च संग्रह आहे. पण आमचा मठांत प्रवेश च न झाल्यामुळें प्रत्यक्ष कांहीं माहिती नाहीं. त्या वेळीं हायकोर्टांत त्या मठाचा कांहीं वाद चालू होता. कागदपत्रें कोर्टांत गुदरलीं गेलीं होतीं. त्या कागदपत्रांचें छापील पुस्तक मठाचे कारभारी राजाराम देवाजी एकवचनी यांच्या कडे पहावयास मिळालें होतें, त्यावरून कळलें कीं, " महाराज राजश्री प्रतापसिंहजी राजेसाहेब यांनीं जमदग्नी गोत्राचे बावा गोसावी याचा पणतु सेतु बावा " यांस उत्पन्न

करून दिलें हे सें. चार वर्षांमागें तंजावराकडे जाणें झालें असतां कानावर आलें होतें कीं, मठातील संग्रहाची वगैरे वाताहत झाली आहे.

गडावरील श्रीरामाच्या मूर्ति श्रीसमर्थांनीं तंजावराहून आणविल्या होत्या हें सर्वश्रुत च आहे. त्या मूर्ति ज्या ओतिगारानें म्हणजे सोनारानें घडल्या होत्या त्याचा हि मठ तंजावरास होता. पण आम्ही जाण्याच्या पूर्वी ५।६ वर्षांमागें च तो पड पडला होता.

वैशाख शु. १ स आम्ही तंजावरास पोचलों व दुसऱ्या च दिवशीं टांगा करून कोनुरास जाऊन आलों. मार्गांत दोन कोसावर मारगुडी म्हणून गाव लागलें. तेथें एक देवीचें व एक रामाचें अशीं दोन जुनीं प्रचंड देवळें आहेत. देवीच्या देवाल्याच्या पहिल्या सभामंडपाच्या खांबावर पुढील लेख कोरलेला आहे :

> श्री ॥ स्वस्ति श्री शालीवाहन शकब्दः १७५२ सत्राशे बाव्हन कल्यब्दा ॥ ४९३१ च्यारि हजार णौशे एकत्तीस ॥ ... संवत्सर पुष्य वद्य सप्तमी बुधवार भरणी नक्षत्र मार्गळी मास तेदी २३ या शुभदिनी राजेश्री शरफोजी महाराज कृत चिरंजी नर्तन मंटप धर्म ॥ छ ॥

कोनूर अगदीं लहान ३०।४० घराचें खेडें आहे. राघवस्वामींचा मठ म्हणजे एक जीर्ण छप्पर आहे. सूर्याच्या किरणाचे शेंकडो कवडसे आत पडले होते. मठात एक विधवा स्त्री व तिचा आठ नऊ वर्षांचा मुलगा अशीं माणसें होतीं. श्रीरामाच्या मूर्ति व श्रीमत्स्वामींच्या मठातील तसबिरीप्रमाणें श्रीसमर्थांची तसबीर होती. केर, कोळिष्टकें, कसरीचे किडे, नाकतोडे याचा सुळसुळाट होता. महदाश्चर्य वाटलें ! अशी का स्थिति होती कोण जाणे ! आज तरी तेथें काय स्थिति आहे, ती परमेश्वरास माहित ! श्रीसमर्थांची तसबीर मागून पाहिली पण मिळाली नाहीं ! आहे तेथें सुरक्षित असो ! संग्रहाचें नाव, अर्थात् च नको. चार भांड्याशिवाय मठात काहीं सामान नव्हतें.

मन्नारगुडी आगगाडीचें ठिकाण आहे. शु. ५ स मन्नारगुडीस गेलों. तेथें अनंतमौनी व त्याचे शिष्य मेरुस्वामी याचा मठ आहे. उभयतांच्या समाधी आहेत. अनंतमौनींची पुण्यतिथि भाद्रपद वद्य ९ व मेरुस्वामींच्या समाधीचा काळ शक १६५५ आषाढ शु. ११ सोमवार हा होय. दासबोधाची एनी मत, 'स्वस्ति न म धवाशर आष ढ शुद्ध पूर्णिमा अंगारकवार' या दिवशीं

संपूर्ण केलेली वाल्मीकिरामायणाची प्रत व देवदासकृत सप्तमालिका, असे ग्रन्थ पाहण्यात आले व दोन बाडें मिळालीं. मेरुस्वामींचे ग्रन्थ कुंभकोणाजवळ मध्यार्जुन ( हें हि आगगाडीचें ठिकाण आहे ) येथें सुंदरेश्वर शिंदे साहेब यांच्याकडे आहेत, असें कळलें. मठाला उत्पन्न दरमहा नक्त साडे बावीस रुपयांचें आहे.

मन्नारगुडी हें एक रम्य ठिकाण आहे. गावात प्रवेशद्वारीं च एक प्रचंड चौकोनी तळें आहे. त्यानें बत्तीस बिघे जमीन व्यापिली आहे मध्यभागीं श्रीकृष्णाचें देवालय आहे. होडींतून जावा येतें. येथें राजगोपाळाचें एक फार च प्रचंड देवालय आहे. त्याला पांच सात गोपुरें आहेत. मन्नार म्हणजे गोपाळ आणि गुडी म्हणजे देऊळ. या गावीं एक मात्र विचित्र गोष्ट नजरेस आली ती अशी कीं, येथें बाटून ख्रिस्ती झालेल्या लोहार, सुतार, सोनार जातींचीं ३००।४०० कुटुंबें आहेत !

दुसऱ्या दिवशीं परत तंजावरास गेलों. राजवाड्यातील प्रख्यात सरस्वती-महाल पहावयाचा होता. आपल्या देशात संस्कृत, प्राकृत, इंग्रजी भाषांतील प्राचीन ग्रन्थांचें एवढें मोठें संग्रहालय अन्यत्र कोठें क्वचित् च असेल. वैशाख शु. ९, १०, ११ सकाळ दुपार महालात काढिली. संग्रहालयात ८२५ ग्रन्थकाराचे मिळून १२३७६ संस्कृत ग्रन्थ आहेत. वेद, उपनिषदें, न्याय, व्याकरण, कोश, अलंकार, शिल्प, वैद्यक, ज्योतिष, मीमांसा, सांख्य, योग, धर्म, काव्य, पुराण, तंत्र, तर्क, नाटक, मंत्र, संगीत इत्यादि अनेक विषयांवर हे ग्रन्थ आहेत. केवढें ज्ञान-भाण्डार आहे ! शिवाय इतर हस्तलिखित ग्रन्थ सुमारें ६००० आहेत ! इ. स. १७६५ पासून तों १८५० पर्यंत प्रकाशित झालेल्या सुमारें २००० इंग्रजी ग्रन्थांचा हि यांत संग्रह केलेला आहे. हा एकंदर संग्रह करण्याचा उपक्रम मराठ्यांच्या पूर्वी जे नाईक राजे होते त्यांनीं च केला होता. मराठी राजांनीं तें कार्य पुढें चालविलें, स्वास्थ्य मिळालें म्हणजे काय न होईल ! पुणेंदरबाराला स्वास्थ्य लाभलें च कधीं ? मराठी ग्रन्थांचा संग्रह मराठी राजांनीं च केला असावा, त्यांत विशेषत सरफोजी राजांनीं केला असावा. मराठी संग्रहात ज्ञानेश्वरी व दासबोध अशीं दोन स्वतंत्र सदरें असून शिवाय रामायण, भारत, भागवत, पुराण, कथा, नाटक व वेदांत अशीं सात सदरें आहेत. या सर्व सदराखालील ग्रन्थ पाहण्यास आग्रहास सवड कोठें होती ? इतर सदराखालील ग्रन्थांचें कामापुरतें टाचण

करून एक वेदांत या सदरांतील ग्रंथाचें संपूर्ण टांचण करून घेतलें. या सदराचीं ३७ दप्तरें होतीं. दप्तरवार टांचण केलें, तें पुढच्या च महिन्यात पुण्याच्या भारतेतिहाससंशोधकमंडळास सादर केलें, तें मंडळाच्या १८३५ च्या वार्षिक इतिवृत्तांत प्रसिद्ध झालें आहे. कोल्हापुर, वडोदे, ग्वाल्हेर आणि इंदुर येथील महाराजांपैकीं कोणी, किंवा सांगली, मिरज, जमखिंडी, औंध, फलटण येथील श्रीमंत राजेसाहेबांपैकीं कोणी, संस्कृत आणि मराठी उत्तम जाणणारे असे दोन बी. ए. अगर एम्. ए. पदवीधर १००-दे-२०० अशा पगारावर नेमून व त्यांच्या हाताखालीं २५-३-६५ या पगारावर जरुरीप्रमाणें दोन चार उत्कृष्ट लेखक देऊन त्यांच्याकडून वीस वर्षे सरस्वतीमहालांत काम घ्यावें, अशी नम्र पण उत्कट सूचना करण्याचें मनांत येतें. या वीस वर्षांच्या श्रमाला पांच पन्नास गोड फळें लागून मराठी भाषेच्या वैभवात आणि ज्ञानात अपूर्व भर घातल्याचें पुण्य पदरांत पडणार आहे ! आम्ही महालात होतों तेव्हा अध्यारच्या आश्रमातर्फे दोन माणसाचें नकला करण्याचें काम चालू च होतें.

शुद्ध १२ ला आनंदतनयांच्या आरणीस गेलों. वाड्यात कोणी नव्हते. वाडा पाहिला आणि परतलों. कुंभकोण, मायावरं, त्रिवेंद्र ( येथें माधवाचा मठ होता ) वगैरे ठिकाणीं जावयास पाहिजे होतें. कोणी तरी गेले पाहिजे. संशोधनाला पुष्कळ वाव आहे. आमचें १८३५ चें संशोधन छपलें व आता बावीस वर्षांनी या अठ्ठावीस दप्तराकडे वळण्याची वेळ पावली आहे ! त्या दप्तरातील समग्र यापुढें दप्तरात न राहतां त्यांतील प्रत्येक बाडास, पोथीस व महत्त्वाच्या कागदास स्वतंत्र क्रमांक मिळून तो आता श्रीसमर्थवाग्देवतामंदिरांतील कपाटात विराजमान होणार ॥७॥

## तंजावर प्रांतांतील संग्रह

१२०१ ] बाड-पृष्ठसंख्या १८८ × २ = ३७६ [ १७५

( १ ) श्रीसमर्थ, उद्धवचिद्घन, तुकाराम, तिमेस, सुहृद ( गणपतीवर ), वत्साळसुत, निपटनिरंजन, गिरिधर, मध्वमुनेश्वर, त्र्यंबक, अमृतराय ऊर्फ रायजी, चिंतामणी, आनंदतनय, गोसावीनंदन, नरहरि माळी, माळो, बुक्काबंधु, कृष्णदयार्णव, वैद्यनाथ, मानकोजी बोधला, आदिनारायण,

मानुदास, गोपाळ, रंगनाथस्वामी, श्रीधरस्वामी, निजानंद, आदिनाथ, गणेशनाथ, निवृत्तिनाथ, कृष्णदास, माधवदास, विठ्ठलनाथ, शिवदिन केसरी, *शिवराम पूर्णानंद, येकाशिवराम,* केशव, *निर्मळ, आत्मस्वामी,* रजनरंजन, गोविंद, गोविंदसुत, शिवसुत, मानपुरी, निर्मल श्याम, जयरामसुत, उद्बोधनाथ, वामन, चिन्मयसुत, कोकीळ गंगाधर, जयराम, आत्माराम, शिवरामात्मज, राघव, उत्तमपुरुष, मीराबाई, दास गुलाब, तुळशीदास, नानक, चंदसखी, कबीर, सुरदास, अवधूत, नागेश, दिनकर, नामदेव, कविअनंत, उधोदास, उद्धव, शेखमहंमद, विमलनंदन, अमरदास, माधवकवि, रामकवि, कमाल, कविराय, श्रीपत, इत्यादि ७५ वर ज्ञाताज्ञात सत्पुरुषांचीं पदपदार्तें, श्लोक, कवित, दोहरे वगैरे

(२) दुर्योधनचरित्र-ओंवी, १२१, सेतुबंधहनुमतअर्जुन-श्लोक ६१, रावणगर्वपरिहार-श्लोक ६४, शेवटीं कवीनें आपलें नांव, गांव व काल कूटात्मक श्लोकांत दिलें आहे, ते श्लोक .

तिसाचे वरे अक्षरालागि ध्यावे । दहा अष्ट जोडोनि कान्यासि द्यावे ।
दहा त्रीगुणे त्यास वेदद्वाटियेला । नव्हा वीस जोडा कवीनाम बोला ॥ ६०
दंडकारण्य तो देश जाणा बरा । जबुद्वीपी असे ग्राम तो चि खरा ।
पुढती गुस तें नाम आहे बरे । वाचोनि पाहणें सज्जनीं आदरें ॥ ६१
प्रथम बिंदु सवा द्वय बारा । बाविसा लिहुन आठ विचारा ।
देउनी मग तयाप्रति कान्हा । तीस घेउनि कवीस्थळ जाणा ॥ ६२
ऐसे रावणगर्वहारण वरे आषाढमासांतरी ।
जाले ते दशमी च शुद्ध असती नाना मती कूसरी ।
जाणावा गुरुवार तो अति बरा तेची दिनीं सपला ।
ऐका कर्णपुटीं कवी नमितसे श्रोताजनीं पाउला ॥ ६३
धरणीवसुखगज जाणिजे । शक तुम्ही निज मानसिं मानिजे ।
खर सवछर नाम असे जया । पाहिजे बुधजनीं समजोनिया ॥ ६४

ध्रुवाख्यान-१६ कडके, चूर्णिका वगैरे, *महिपतिनाथ अष्टक-चवथा* चरण-नरहरीशिवकेसरी भेटि महिपति बाहतो ॥, *ध्रुवाख्यान-सूर्यवंशीं* उत्तानपाद राजा ।, प्रश्नोत्तरमाला-संस्कृत श्लोक ३७, पद्यावली-संस्कृत श्लोक २७, व्यंकटेश गुरूचे चंद्रात्मज कृत चंद्रावळी-श्लोक १०३, वामन कृत चित्सुधा-श्लोक ४३, चरमगुरुमंजरी-श्लोक २५, रामचंद्र-अष्टक-चवथा चरण-सीतापते तुज कसी करुणा न ये रे ॥, ज्ञानेश्वर कृत

शुकाष्टकटीका-मूळ श्लोक ९, टीका ओंवी ३९, पांडवगीता-संस्कृत श्लोक ७४, कृष्णकर्णामृत-संस्कृत श्लोक ११२, गीतागर्भ-श्लोक २३, अच्युताष्टक-श्लो. ९ अशीं १८ प्रकाशितअप्रकाशित प्रकरणें

( ३ ) आदिनाथाचें एक सबंध पद व अमृतेश्वरांच्या एका पदांतील एक च कडवें सहज उतरून घेतों :

[ १ ] देवाचें सांनिध्य

अहंकृति गेळि ज्या । निशिदिनिं संनिध देव तया ॥ ध्रु०
पिपीलिकादि सुरवर ब्रह्मा । येक चि भाव जया ॥ १
जननी-जनता-सद्‌गुरु-सेवा । मन-वाचा-काया ॥ २
जाणिव नेणिव परती सरली । न गणी काळभया ॥ ३
आविद्या काम्या कर्मीं अचेष्टित । नलगे काशिगया ॥ ४
सर्व मस्मेति श्रुतिवाक्यार्था । हे आदिनाथदया ॥ ५

[ २ ] येका रामपदासाठीं

भगवंतासाठीं । जिवलगांसी अवघ्या तुटी ॥ ध्रु०
भरतें त्यजियली माता । प्रल्हादें चिरविला पिता ।
विभीषणें त्यजियला भ्राता । येका रामपदासाठीं ॥ १

( ४ ) या बाडात संस्कृत, प्राकृत सुभाषितें असंख्य आहेत.

( ५ ) बाडाच्या शेवटून दुसऱ्या पानावर " स्मरणार्थ शुभकृत ना संवत्सर रोज गुरुवारीं हे वहि दस्तुर नारायेणराव येशवंतराव जाधवराव. पान १११ ॥ पद ३०० ॥ पान ४६ " अशी नोंद आहे. तिची शाई भि आहे. तिचें लिहिणें मागाहून च दिसतें. त्या च वेळीं, त्या च शाईनें अक्षरानें पृ. ६० वर, बाडांत आलेल्या विषयांची अनुक्रमणिका लिहिलेली आहे

१२०२ ] बाड-पृष्ठें १४७ × २ = २९४
पैकीं १-३ व १४६ अशीं ४ नष्ट [१०

( १ ) आरणीचे बावा आनंदतनय कृत पुढील प्रकरणें य बाडांत आहेत :

( १ ) सुदामचरित्र-श्लो. ४२, ( २ ) कंदुकचरित्र-श्लो. ३६, ( ३ ) राधाकृष्णविलास-श्लो. ४२, ( ४ ) एणीचें चरित्र-श्लो. १३, ( ५ ) गणिकाचरित्र-श्लो. १३, ( ६ ) वाटिकावध-श्लोक ३०, ( ७ )

यज्ञसंरक्षण-श्लो. ३४, (८) शिबिचरित्र-श्लो. ४१, (९) सासुसुनेचे नाटक-श्लो. ३२, (१०) मार्कंडचरित्र-श्लोक ४७, (११) सेतुबंधन-श्लो. ३७, (१२) सत्यभामाविलास-श्लो. ४९, (१३) सीतास्वयंवर-श्लो. ७४. हीं इतकीं सर्व आनंदतनय कृत आख्यानें दिसतात. मधून मधून स्वत चीं व गिरिधर, श्रीधर, उद्धवचिद्धन, एकनाथ, इत्यादिकांचीं पदें, चूर्णिका वगैरे योजून त्यानीं तीं सजाविलेलीं आहेत.

(२) वामनाचीं प्रकरणें : (१) गोपीवस्त्रहरण-श्लो. २३, (२) नरसिंहजयंती-श्लो. ६४, (३) यज्ञपत्नीचरित्र-श्लो. ४८, (४) वामनचरित्र-श्लो. ३६, (५) रुक्मिणीविलास-श्लो. ५२, (६) कृष्णचरित्र-श्लो. ९०

(३) मोरोपंतांचीं आर्यावृत्तांतील प्रकरणें : (१) गोपीवस्त्रहरण, आर्या १६, (२) तृणावर्तवध-आर्या १७

(४) एकनाथ कृत (१) कैकेयीवरदान-ओवी ४९, (२) दानाव्रतचरित्र-ओ. १४२

(५) मुक्तेश्वर कृत स्थालीपाक-ओ. १४७

(६) कोण कृत न दिलेलीं प्रकरणें (१) पूतनामोक्ष-श्लो. २०, (२) ओवीबद्ध सेतुबंध-ओ. ४३, त्याची शेवटची ओवी :

भक्ता व्यसन होतां प्राप्ति । घेउनि नाना वेषाकृती ।
सद्गुरनाथ भूपती । दिवा राती सरक्षी ॥ ४३

(३) गीतेच्या एक एक अध्यायावर एक एक सुंदर पद, (४) कृष्णजन्म-ग्रन्थसख्या २४ (५) नलचरित्र-श्लो. १३५

(७) ओवीबद्ध एकनाथचरित्र-ओ. ३८

पहिली ओवी . जनार्देनें आज्ञा दिधली एकनाथा ।
जाईं माता पिता । कष्टी होती ॥ १

शेवटची ओवी : येकोबाचे जिव्हेवरी रामनाम ।
लिहोनि मेघश्याम गुप्त जाला ॥ ३८

कदाचित् या प्रकरणाच्या कर्त्याचें नाव हि मेघश्याम असेल.

(८) शिवाय मधून मधून आनंदतनय, श्रीसमर्थ, ज्ञानदेव, एकनाथ यांचीं पदपदांतरें आहेत. दोन चार ठिकाणीं श्रीभैरवे गुरवे नमः आहे. बाडांत

सर्वत्र एकाचें च अक्षर नाहीं. पृ. ५७ आणि ६६ वर " महादेव पट्टण गोविंद आणाजी लिखितं " असें आहे. असें हें महत्त्वाचें बाड आहे.

१२०३ ] एका बाडाचीं अवशिष्ट पृष्ठें
१४ × २ = २८ [१००

मोरोपंत कृत कर्णपर्वांतील अध्याय ११, १२, १३, १४

१२०४ ] बाड-पृष्ठें ९२ × २ = १८४
शिवाय आ. व दो. वरीं च गेलीं [२५०

( १ ) श्रीसमर्थ, माळो, अनंतदास, केशव, सुरदास, नरहरि, विष्णुदास नामा, निजानंद, देवदास चैतन्य, एकनाथ, रामाजनार्दन ( यांची ज्ञानराजाची आरती ), रमावल्लभदास, मानुदास, नागेशात्मज विठ्ठल राहे । श्रीगुरु वामन पाहे रे ॥, शिवराम पूर्णानंद, गोसावीनंदन, मद्रा सुतोजी, नामा, बहिरा, केशवाचा नामा, लीलाविश्वंभर, नारायण माळो, रंगनाथ, ज्ञानदेव, गोरा कुंभार, मुक्ताई, निंबा निर्दोष, रामानंद, विठ्ठलतनयो बोलतसे । रामदासाचा स्वामी ॥, वामन, चिन्मयानंद स्वरूपानंद, अनंतदास, तुका, पंडित, माधव, दासविठ्ठल, माधो वासुदेव, कृष्णदास ( जिने आपकु जोया नही । तनमनकु खोया नही । मनमैलकु धोया नही । आगोल किया तो क्या हुवा ॥ ), विश्वनाथ, कबिर, विठ्ठलतनय, निर्मळ आनंदी, परमहंस, इत्यादिकांचीं पदपदांतरें.

( २ ) उद्धवचिद्धन कृत ( १ ) मृत्युंजयचरित्र-कडवीं २४ व ( २ ) नागनाथचरित्र-कडवीं ५३

( ३ ) मुक्तेश्वर कृत थालीपाक-ओवी ७०

( ४ ) एकनाथ कृत गजेंद्रमोक्ष

( ५ ) उद्धवचैतन्य कृत बोधकलिका-ओ. ४०

( ६ ) नामापाठकर्किकर कृत रत्नमाला-ओ. १०८

( ७ ) गोसावीसुतांचे भवानीअष्टक-श्लो. ९

( ८ ) मागील बाडाक ९८६ त ज्या कवि कृत ६०१ श्लोकांचा उल्लेख केला आहे, त्यापैकीं हे दोनशें श्लोक. हे श्लोक केशवस्वामींचे आहेत कीं काय, न कळे.

या बाडाच्या शेवटल्या पांच पन्नास पृष्ठांचा तळाचा एक कोपरा कसरीच्या मदतस्थानीं गेलेला आहे.

१८५७ आश्विन शु. १

१२०५] बाड-पृष्ठें ३२१ × २ = ६४२ [१३५
आरंभींचीं ४ नष्ट

( १ ) हें प्रचंड बाड विशेषत आनंदतनयाचें आहे, असें म्हटलें तरी चालेल. त्यात आनंदतनयाच्या खालोखाल कोणा पंडित कवींची कविता आहे. त्या खालीं इतरांची आहे. त्यात बरी च अप्रकाशित हि कविता आहे एकाद्या अभ्यासकाला सहज वर्ष सहा महिने काम पुरेल.

( २ ) श्रीसमर्थ, बाळदास, केशव, पंडित, आनंदसुत किंवा सुताच्या ऐवजीं नंदन आत्मज तनय, निरंजन, रत्नलिंग, दीन शिव, चिदानंद, एकनाथ, उद्धवचिद्धन, कृष्णदास, मरु, एका शिवराम, देवदासांकित, गुरुदास, ज्ञानदेव, घोंडाजीसुत, जयरामसुत, तुकाराम, वामन, मीराबाई, कबीर, अमृतराय, रंगनाथ, शिवार्य, शिवराम पूर्णानंद, बाळकराम, गाधावीनंदन, भीमराज स्वामी, मानपुरी, वटु किंवा बटु मल्लारि, सुरदास, विश्वंभर, मच्चमुनेश्वर, अमरनाथ, नाथा भज, गिरिधर, शिवदिनकेसरी, रघुनाथसुत, अवधूतात्मज बाळ, शेळगावकर जीवराम, इत्यादि ज्ञाताज्ञात संतकवींचीं पदपदांतरें.

( ३ ) कांहीं प्रकरणें कोणाचीं आहेत तीं मला उमगलीं नाहींत. ज्याचा बोध झाला अशीं आनंदतनयाचीं प्रकरणें-चेंडूफळी (पृ ३३ वर), श्रीकृष्णचरित्रपर श्लोक ( पृ ११२ ), नौकाचरित्र ( पृ ११७ ), राधाविलास ( पृ. १३० ), पूतनामोक्ष (पृ १३८), ताटिकावध (१५२), यज्ञसंरक्षण ( १५५ ), सीतास्वयंवर ( १५७ ), रामशबरी (१६९), सेतुबंधन (१७७), शिबिचक्रवर्ती (पृ १८१), मार्कंडेयचरित्र (१९८), शिवरात्रीकथा ( २०७ ), सुदामचरित्र ( पृ २४० ), श्रीकृष्णनाटक-तेलगी मार्फत पृ २४४ वर व मराठी मार्फत पृ. २४६ वर, इत्यादि. आनंदतनय व पंडित समकालीन दिसतात

( ४ ) पंडित कृत प्रकरणें-कृष्णजन्म किंवा सुभद्राकल्याणी ( पृ ८० ), *गजेंद्रमोक्ष* ( पृ १०५ ), *हरितालिकाव्रत* ( पृ २१३ ), वगैरे

( ५ ) इतरांचीं प्रकरणें-एकनाथ कृत प्रल्हादचरित्र ( पृ १४ ), बाळदास कृत पद्मनाभचरित्र ( पृ २२ ), अनंतव्रत ( पृ २९ ), एकनाथ कृत रुक्मिणीस्वयंवर (पृ ३८ त ८०), वामन कृत भामाविलास ( पृ १२४ ) व भीष्मप्रतिज्ञा ( पृ १९८ ), शिवार्य कृत पंचाक्षरी

चरित्र ( पृ. १४० ) व भद्रायुचरित्र ( पृ. २८६ ), बाळकराम कृत दामाजीपंताची कथा ( पृ. १४८ ), गुरुदास कृत सीताकल्याण ( पृ. १८९ ), नाथात्मज कृत शुकरंभासंवाद ( नाथात्मजप्रभूच्या सहवासें होइल अभ्युतरंग–पृ. ११३ ), जीवराम कृत कचोपाख्यान ( पृ. २७७ ) व भिल्लचरित्र ( पृ. ३०२ ). हे जीवराम कवि नव्यानें ऐकूं येत आहेत. त्यांची ओळख करून देण्यासाठीं कचोपाख्यानाचे पहिले तीन व शेवटचे तीन आणि भिल्लचरित्रांतील दुसरा व शेवटचे दोन असे श्लोक वाचकांस सादर करितों–

ज्या विघ्नौघमहाद्रिभेदविषईं वज्रोपमा देखिजे।
जो इंद्रादिसमस्तनिर्जरगणीं वंदोनियां सेविजे।
जो सिंदूरारुणगंडमंडित सदा विघ्नेश तो चांगलें।
राजेश्री शरभेंद्रभूपतिलका देवो सदा मंगळें ॥ १

संज नाम मगरीश सुधीर। गोत्र कौशिक जया मति फार।
राजराज शरभेंद्र तयाचा। जो निजाश्रित बहू दिवसांचा ॥ २

शेळगांवकर जीव कवी तो। वर्णुनी कचचरित्र वदे तो।
आदरें धरुनिया अभिमाना। ऐकुनी मग करा बहुमाना ॥ ३

तोवरी तुम्ही हा कवि वामनासीं। प्रबंध आणोनि नवा मनासीं।
मध्यस्त भावें यमकें पहा जी। श्री सांब तोषे यम कंप हा जी ॥ ४०

कचचरित्र मनोहर चांगलें। ऋषिवराप्रति सूत वदे भलें।
महिवरी शरभेश्वर भूपती। बुधजनासमवेत हि ऐकती ॥ ४१

काळीं वृष्टि पडो सदा पिकतसो धान्यें जना सौख्य हो।
साधूगोद्विजवृंदपालन घडो सत्संग ही लाभ हो।
क्षामक्षोभ नसो करोत द्विज हे सत्कर्म राज्यीं भलें।
पुत्रामात्यकलत्रबंधुसम हा राजा असो चांगलें ॥ ४२

ज्यानें बेहरदत्तमांसवलितें सेवोनियां स्वामनें।
तोषें स्वीय तनूसि दावुनि तया जो शोभवीं काननें।
तो श्रीकाळगजद्र देव शिव हा गौरीपती चांगलें।
राजेश्री शरभेंद्र भोसलकुलोत्तंसा करो मंगळें ॥ २

शेळगांवकर जीव कवीनें। वर्णिलें शिवचरित्र मतीनें।
राजराज शरभेश्वर राजा। ऐकुनी पुरविती बहु काजा ॥ ६०

काळीं वर्ष पडोनि धान्य पिकुनी राज्यीं जना सौख्य हो ।
गेहोगेहिं करोत शंकरकथा वाचोनि तद्भक्ति हो ।
राजेश्रीशरभेंद्रकीर्ति विलसो दिक्चक्र वाळांतरीं ।
श्रीशंभूपदपंकजा जिव सुखी वर्णीतसो अंतरीं ॥ ६१

तंजावरच्या राजघराण्यांत दोन सरफोजी राजे होऊन गेले. एकांची कारकीर्द इ. स. १७११ ते १७२८ व दुसऱ्यांची इ. स. १७९८ ते १८३२ होती. हे बहुधा दुसरे असावेत. विद्वानांचा परामर्श घेण्याविषयीं त्यांचा लौकिक हि होता.

( ६ ) योग्याशा प्रयत्नानें कोणास हि उमगतील, पण मला पटकन् कोण कृत अशीं न उमगलेलीं प्रकरणें– ( १ ) स्त्रीकृत दुष्टपुरुषलक्षणवर्णनपंचक, ( २ ) पुरुषकृत दुष्टस्त्रीलक्षणवर्णनपंचक, ( ३ ) श्रीरामशरसेतु-पृ. ९६, ( ४ ) ध्रुवचरित्र-पृ. १००, ( ५ ) कालियामर्दन-पृ. ११३, ( ६ ) व्याधचरित्र-पृ. १२१, ( ७ ) सुदामचरित्र-पृ. १३३, ( ८ ) रामजन्म-पृ. १५०, ( ९ ) भीष्मप्रतिज्ञा-पृ. १७२, ( १० ) चिमण्याची कथा-पृ. १९३, ( ११ ) शुकरंभासंवाद-पृ. १९५, ( १२ ) गोपीचंदकथा-पृ. २२२, ( १३ ) नळचरित्र-पृ.२३२, इत्यादि

( ७ ) या बाडांत पांच चित्रें आहेत तीं—नृसिंह-पृ. १३, मुरलीधर-पृ. ३७, सीता राम-पृ. १४६, शंकरपार्वती-पृ. १९८ व सरस्वती-पृ. २५०

( ८ ) पृष्ठ ३६ वर १८ प्रकरणांचीं नांवें दिलीं आहेत.

( ९ ) या बाडांतील लेखन दोघांचें आहे. बरेचसें एकाचें आहे व दुसऱ्याचें थोडें आहे. पृ. ८० वर पहिल्या लेखकानें नांव, गांव, लेखनकाल हीं दिलीं आहेत तीं :

" विश्वावसु नाम संवत्सर पुष्य बद्य दशमी बुधवार
श्री अनंतपद्मनाभाचे सन्निधानीं ग्रन्थ समाप्त ।
लिखितं शेषगिरी रघुनाथराव दळपत कुंभकोण "

या पद्मनाभाच्या प्रचंड मंदिराचें बाळदास यांनीं एका सुंदर पदांत वर्णन केलेलें असून तें पद पृ. ३१ वर आहे.

( १० ) चार पांच पदें विशेष आवडलीं तीं द्यावीं असें वाटतें. आरंभीं च पृ. ३१ वर एका अपूर्ण पदाचीं दोन चरणें आढळलीं. तीं पुढपुढस च सारें बाद चाळलें गेलें म्हणून तीं आधीं देऊन मग चार पदें देतों :

[ १ ] तारा अथवा मारा

तारा अथवा मारा तुमच्या मना ये तें करा ।
पतित मी अपराधी अंतीं दास तुमचा खरा ॥ १

[ २ ] मजला थापटुनी उठवीले ( पृ. २१ )

काय वानूं मी उपकारा । सद्गुरु माहेरा ॥ ध्रु० ॥
मोहमय निद्रा । लागतां । भवस्वप्नीं घोसणतां ।
मजला थापटुनी उठवीलें । जागृत स्वरूपीं केलें ॥ १
लक्ष चौऱ्यासी । भवफेरे । चुकवीले दातारें ॥ २
नामसंजीवनी । मम श्रवणीं । पाजुनिया निज वदनीं ॥ ३
अनंत मणि माळे । वोवीले । अभंग मेरूसी केलें ॥ ४

[ ३ ] परवा क्या किनकी ( पृ. १७२ )

परवा क्या किनकी क्या किनकी । मिट गई आशा जिनकी ॥ ध्रु०
... ... ... ... ... ...
कहे भीमराज गुलाम गुरूका । फल खावे कल्पतरूका ॥ ३

[ ४ ] तारक नौका नाम हरीचें ( पृ. १७६ )

तारक नौका नाम हरीचें ॥ ध्रु० ॥
भेदभवांबुधी उतरुनि नेते । वाजत गाजत परलोका नाम ॥ १
नामप्रताप निरखुनि रूपें । अनहत दुंदुभी ठोका नाम ॥ २
वदे भीमराज एकया भावें । अंतरिं संतत घोका नाम ॥ ३

[ ५ ] अहो मी धन्य जालों ( पृ. २६६ )

अहो मी धन्य जालों ॥ ध्रु० ॥
निरखुनि राम । जगदभिराम । अंतरिं फार निवालों ॥ १
सुदिन आम्हा जी । शुभ दिन आजी । स्वानंदाब्धि विरालों ॥ २
दास मुद्‌दे वदे । टाहुन तत्पद । गुरुकरुणेनें धालों ॥ ३
हें शेवटचें पद श्रीरामदासाचें नसून मुद्‌दासांचें असावें, असें वाटतें.

१२०६ ] बाड-पृ. ४० × २ = ८० [१००

( १ ) गोविंदकविकृत शरभमहीपतिस्तुतिः, ( २ ) गोविंद कृत उमारमासंवाद-आर्याबद्ध-शेवटची आर्या :

> श्रीमत्तंजानगरी न्यायें जो शरभभूप राज्य करी ।
> त्याचा आश्रित उटके गोविंदाभिध करी असे चुटके ॥ २९

( ३ ) किंकर कवि कृत सत्यार्थचरित्र-श्लोक २५, ( ४ ) रंग कृत गजमुखचरित्र-श्लोक ४०, ( ५ ) मयूर कृत विराटपर्व, उद्योगपर्व, वनपर्व इत्यादि पर्वांतील व रामायणांतील कांहीं भाग

१२०७ ] बाड-पृष्ठसंख्या ९६ × २ = १९२ शेवटचीं कांहीं पृष्ठें नष्ट [२१४

महत्त्वाचें बाड, पण, अरेरे ! कसरीनें त्याचे बरेच हाल केलेले आहेत, मधून मधून कांहीं अक्षरें तिच्या भक्ष्यस्थानीं पडलीं आहेत. अक्षर चांगलें, एका टाकानें लिहिलेलें आहे. त्यांत सहा प्रकरणें आहेत, पैकीं एकनाथ कृत आनंदलहरी शिवाय बाकीचीं पांच अप्रकाशित आहेत, असें वाटतें. सर्व प्रकाशनाला सर्वथैव योग्य आहेत. मात्र ताडून पाहण्यास आणखी प्रती मिळाल्या पाहिजेत, कारण यांतील अक्षरें कोठें कोठें गेलीं आहेत. हीं प्रकरणें अशीं :

( १ ) मृत्युंजय कृत रामजानकीसंवादे सिद्धसंकेतप्रबंध

( २ ) बक्षणी मुल्योजी म्हणजे ब्रह्मणि मृत्युंजय कृत प्रकाशदीप

( ३ ) श्रीपतिदास कृत प्रवृत्तिनिवृत्तिसंवादे मनाचें चरित्र-ओवी ७३२

( ४ ) दत्तात्रयसुतकेशवपरमानंदचैतन्य अवधूत कृत आत्मानुभव म्हणजे च तारकब्रह्म-ओवीसंख्या ३१०. शेवटीं लेखनकाल दिला आहे तो : " प्लव स ( वत्सर मा ) र्गशीर्ष कृष्ण प्रतिपत्तिथौ ". निश्चित सांगता येत नाहीं, पण शक १६४३ असावा.

( ५ ) येकनाथ कृत आनंदलहरी-ओ. १५३

( ६ ) मेरु कृत स्वानंदलहरी-अपूर्ण

१२०८ ] बाड-पृ. ४८ × २ = ९६ [ १६०
शेवटचीं पानें जाणें किती नष्ट

( १ ) पुष्कळ पदांचीं सुरुवाती आद्याक्षरें दिलेलीं आहेत, तीं पदें प्रत्यक्ष या बाडांत नाहींत.

( २ ) पृष्ठ १ वर पुढील अक्षरें आहेत. मध्य चांगलीं लागलीं नाहींत, अर्थ कांहीं च समजत नाहीं.

" धन्य तंजावार । रवी व गंगा भरतेश्वर । अवी कुठ त्रिकाळु र । कुच झाले त्रिवाळु र । सुपारीची झाड पार । तोडविले अपार । मान्दी - एक चमत्कार । गोळ्या फिरती चक्राकार । अंबाजी अपा वागावर । मानाजी अपा किल्यावर । त्या दिवसी शुक्रवार । साहा तास निरंतर । किल्ला फत्ते जाला ॥ ४ "

तंजावरच्या राज्यात प्रतापसिंह राजाच्या कारकीर्दींत मानाजीराव जगताप म्हणून एक कर्तृत्ववान् सरदार होऊन गेले त्यांचा च संबंध यांत दिसतो. कांहीं ऐतिहासिक महत्त्वाच्या प्रसंगाचा यांत उल्लेख दिसतो.

( ३ ) एकनाथ कृत म्हणून रामजन्माच्या ५६ ओव्या दिसतात, त्यांत मधून मधून दास ( श्रीसमर्थ नव्हत ), पंडितराम, मध्वमुनेश्वर, केशव, मेघ, गोसावीनंदन, कृष्णदास, उद्धवचिद्घन यांचीं पदें आहेत.

( ४ ) कृष्णजन्म—अपूर्ण

( ५ ) राघवात्मज कृत मारुतीजन्म. त्याच्या शेवटीं पृ. ४२ वर लेखनकाल दिला आहे तो :

" काळयुक्ति संवत्सर कार्तिक बहुळ चतुर्थी भौमवासरी दिवीं गोधूळ-लग्नि श्रीरामसंनिधानी मारुतिजन्मनिरोपण संपूर्ण लिहिलें असे ॥ "
म्हणजे बहुधा शक १७२० असावा.

१२०९ ] बाड-पृ. ९५ × २ = १९० [ १५०

( १ ) हें बाड अनेक कवि कृत पदपदांतरांचें आहे. त्यांत श्रीसमर्थ, ज्ञानदेव, केशव, उद्धवचिद्घन, एकनाथ, तुकाराम, माधो, नामदेव, खेचर, कृष्णदास जयराम, मुकुंद, भीमराज ( यांचीं अनेक पदें आहेत, त्यांत श्रीज्ञानेश्वरांनी एक आरती आहे ), शिवराम पूर्णानंद, गुरुदास, वस्वलिंग, निवृत्ति, कबीर, गंगाधरनंदन, श्रीधर, गोसावीनंदन, कोकिळ, नागेश, जनमेजनाना,

अमृतराय, रंगनाथ, आदिनाथ, कल्याण, जनी, गोणाबाई, हरिकवि, सुरदास, आनंदसुत, विठ्ठलदीक्षितसुत, नरहरिसुत, लोलिंबराज, सोपान, इत्यादिकांचीं पदपदांतरें आहेत. त्यांत पुष्कळ अप्रकाशित आहेत.

( २ ) ओळखीसाठीं एकाद दुसरें धावयाचें :

पहिली माझी वोवी सद्गुरूच्या पायां । चिद्घना सखया मायबापा ॥ १

विवेकाची पोहे[1] जगासी घातली । मुकुंद माउली अनाथाची ॥ २
टोणगिया हातीं बोलविला वेद । ज्ञानेश्वर सिद्ध आळंदीसी ॥ ३
माझें सर्व गोत सोयरा जीवाचा । सखा विठोबाचा नामदेव ॥ ४
योगियाची माता ज्ञानियाची कळा । गाईन वेळोवेळा मुक्ताबाई ॥ ५
माझा मनोधर्म आणिक नेणे काम । नित्य गाऊं नाम निवृत्तीचें ॥ ६
सोपान चांगया जीवाचा विसावा । गाईन भाईया आवडीनें ॥ ७
प्रत्यक्ष परब्रह्म अवतार पूर्ण । येकाजनार्दन प्रतिष्ठानीं ॥ ८
ऐसे संत माझे गोत अगणित । गातां होय चित्ता समाधान ॥ ९
गातां नारायण सरलें दळण । उद्धव चैतन्य परब्रह्म ॥ १०

---

मंत्र यंत्र दीक्षा सांगतील लक्ष । राम तो प्रत्यक्ष न करी कोणीं ॥ १
प्रत्यक्ष राम दावी धरिन त्याचे पाये । आणिकासीं काय चाड मज ॥ २
सर्वा कर्मी राम भेटवी जो गातें । जीवें भावें त्यातें वोवाळिन ॥ ३
सद्गुरुस्मरण गर्जत नाम छंदें । केशवीं निजबोधें भेटि केली ॥ ४

# १२१० ]

बाड-पृष्ठसंख्या १८८ × २ = ३७६
सरासरीं निमी पृष्ठें कोरीं [ १५०

( १ ) अनंतसुत कृत मार्कंडेयचरित्र-श्लो. ४२

( २ ) उद्धवचिद्घन कृत कृष्णजन्म-दिंडीगाणें

( ३ ) श्रीधर ब्रह्मानंद कृत मयूरध्वजचरित्र

( ४ ) मंगळवेढाचरित्र, ( ५ ) गोपिकावस्त्रहरण

( ६ ) एकनाथ कृत शिवरामायण-श्लो. ६५

( ७ ) श्रीनिवासविरचित [ १ ] रामकीर्तन, [ २ ] कृष्णलीला, [ ३ ] श्रीवेंकटेशनामवर्णन, [ ४ ] सुदामचरित्रं, व [ ५ ] गीर्वाण

---

1. पोहे = पोई.

पदें. हे श्रीनिवास पूर्वी श ात नव्हते. ते तंजावरकडील च असावेत. 'व्यंकटेश' ही त्यांची उपासना दिसते.

( ८ ) किरातार्जुनीय कथा–अपूर्ण

१२११ ] बाड–पृ. १२९ × २ = २५८ पहिलीं ११, मधलीं ६०–६७, शेवटचीं कांहीं नष्ट [ १६६

( १ ) बाड जीर्ण झालें आहे, कागद ठिसूळ झाला आहे, आरंभीं कांतणीनें घर करून दहा बारा पृष्ठांच्या बरोबर मध्यमागीं सारखें भोंक पाडलें आहे.

( २ ) या बाडात तेलगु, तामिल कां कानडी बरीं च पदपदांतरें आहेत. कांहीं सुभाषितें आहेत. मधून मधून शकुनाचीं चक्रें आहेत. पृ. ५८ वर श्रीशिवालिखित म्हणून शकुनाची कांहीं रीति दिली आहे, मला कांहीं समजली नाहीं, पण काय आहे हें समजण्याच्या दृष्टीनें कोणी तरी पहावी. पालीचा शकुन व शिंकेचा प्रश्न असीं आहेत. प्रयाण, प्रवेश, प्रस्थान यांचीं शुभनक्षत्रें, वार, नक्षत्र, मास यांचीं फळें वगैरे आहेत.

( ३ ) पिचाश औषध ( पृ. ५३ ), मुरड्याश ( पृ. ८३ ), दम्याश ( पृ. ९९ ) असीं औषधें आहेत.

( ४ ) पुरंदर विठ्ठल यांचीं पदपदांतरें पुष्कळ आहेत. ( पृ. ५५–५७, ७८–८३, १०८, १२२, १२६–१३५, १३९ वगैरे )

( ५ ) कावेरी देवी ( पृ. ११९ ), सीतादेवी ( पृ. १२३ ) यावर कानडी पदें आहेत. तीं पंडित कृत असावीं, असें वाटलें.

( ६ ) षड्ऋतु–श्लोक ६, मुद्रिका ( पृ. ७० ), अंगदशिष्टाई–श्लोक १७, अपूर्ण ( पृ. ९५ ), सुदामचरित्र–श्लोक ८३ ( पृ. १०९–११९ ) असीं प्रकरणें आहेत.

( ७ ) बसवलिंग कृत गजगौरीव्रत–श्लोक २० ( पृ. १३ )

( ८ ) नागेश जोशी भिंगारकर कृत चंद्रावळी–श्लोक ११८ ( पृ. १६ ते ५१ ). पृष्ठ ५१ च्या पाठीमागें लेखनकाल वगैरे आहे तो असा :

" चंद्रावची लीलीतार्थ श्रीनीवास गोरिमाजी पौरोधी संवछर
श्रावण सुध चतुर्दसी बुधवार दर जागा तंज्याऊर कोट ॥ "

म्हणजे शक १६९१ येतो.

( ९ ) देवदास कृत चोळमंडळी.

( १० ) गिरिधर, गोपाचीनंदन, त्रिंबकनंदन, आनंदाचा बाळ यांचीं पदपदांतरें व कांहीं सुभाषितें.

( ११ ) पृ. १०७ वर हैदराच्या स्तुतिपर चार श्लोक आहेत. पहिला संस्कृतांत आहे व बाकीचे मराठींत आहेत. तिसरा श्लोक देतों :

हैदर बाहदर धाक धरी कीं थरथर कांपति सर्व रिपू ।
धांवति मुखिं तृण घेउनि आणिक पाहति जाउनि कोठें लपूं ।
भूमिसि बोलति माय तुं आपुल पोटिसि सांठवि सत्वर आम्हा ।
सदुत्तर दे मही जा शरणांगत रक्षिल तो च कृपाळ तुम्हा ॥ ३

ही चेष्टा आहे, का तोंडपूजेपणा इतक्या थराला पोंचला होता, कांहीं सांगतां येत नाहीं !

१२१२ ] बाड–पृष्ठसंख्या १६ × २ = ३२ [१२५
आ. व ले. १०।२० नष्ट

( १ ) श्रीसमर्थ, मेरु, एकनाथ, मल्लिंग, तुकाराम, मध्वमुनेश्वर यांचीं पदपदांतरें. कांहीं तत्प्रातीय भाषेंत आहेत.

( २ ) सरफोजी राजे यांचे आश्रित दादा व्यास कृत सीतास्वयंवर– श्लोक १४ ते ३१

( ३ ) श्रीधर कृत जांबूळाख्यान

१२१३ ] बाड–पृ. ६८ × २ = १३६ [१२५

( १ ) श्रीसमर्थ, सदानंद, चिद्रामपूर्णानंद, ज्ञानदेव, निवृत्ति, मालो नरहरि, वामन, तुकाराम, चिदानंदकेसरी, एकनाथ, हरिकवि, उद्धवचिद्धन, निरंजन, नामदेव, अमृतराय, आनंदतनय, माधव, केशव, बापरखुमादेवीवर, भानुदास, उद्बोध, नरहरितनय, मध्वमुनेश्वर, श्रीधर, रंगनाथ, मुकुंद, जनी, जयरामसुत, लोलिंबराज, बाळकृष्ण, सोपान, निपटनिरंजन, आदिनारायण,

मी माझें हें धर्म जाणुनी परम सुखी जालों ॥ देही अ० ॥ ३
लिंगस्थिती जरी जीव म्हणुं तरी उपाधि मज नाहीं ।
हिरण्यगर्भस्थिती म्हणों तरी सोपाधिक तो हि ।
घटमठभेदें महदाकाशीं अभेदता पाही ।
तैसा मी परिपूर्ण सनातन भेदत्रय नाहीं ।
मी गुरुप्रसादें केवळ आत्माराम ।
महावाक्यधर्थ प्रत्यय निष्काम ।
उन्मनि घाट उघंधुनि निजसुखधाम ।
धर्मोत्थ शुधावस्था माझा ग्राम ।
बाळकृष्ण हें नाम विसर्जुनी तत्स्वरुपीं जडलों ॥ देही अ० ॥ ४

[ ३ ] अपार उपकार

त्याच्या उपकारा उपकारा । नाहीं पारावारा ॥ ध्रु०
देउनि आपुला डोळा । दाखविलें घननीळा ॥ १
जिकडे पाहूं तिकडे । अवघें मज चि भासे उघडें ॥ २
स्वरूप नयनीं लक्ष्लें । डोळस शिवरामातें केलें ॥ ३

( २ ) बाडाच्या शेवटच्या पृष्ठावर मोडींत मजकूर आहे तो " हे वही जयराम राा पोतार कासीस्थ केदारेश्वर पुराणीक याणी लक्षुमणराव भोसले यांस स्वसंतोषाण दिल्ही "

१२१४ ] किरकोळ बाड–पृ. १५ × २ = ३० [१२५

यांत कांहीं सुभाषितें असून मोरोपंत कृत आर्यामुक्तामाला, मनोरथराजी, पंढरीमाहात्म्य अशीं प्रकरणें आहेत.

१२१५ ] अगदीं किरकोळ बाड
पृ. ७३ × २ = १४६ पैकीं बरींच कोरीं [१००

( १ ) श्रीसमर्थ, नागतनय, श्रीधर, आनंदात्मज, तुका, विष्णुदास रामा, केशव, वटेश्वर चांगा, ज्ञानदेव, एकनाथ, विश्वनाथ, उद्धवचिद्घन, इ यांचीं पदपदांतरें

( २ ) कालियामर्दन, यज्ञपत्न्याभोजन, वाल्मीकिचरित्र हीं प्रकरणें

( ३ ) मेरु कृत पंचपदींतील एक पद आणि एक श्लोक देतों :

[ १ ] मेरु उरला नाहीं

गुरुनामस्मरण मोक्ष । गुरु ब्रह्म चि प्रत्यक्ष ॥ १
ऐसा भाव सिद्ध जया । मोक्ष लागे त्याच्या पाया ॥ २
गुरुसेवा ब्रह्मप्राप्ती । नयनीं सद्‌गुरुची मूर्ति ॥ ३
गुरुभजनीं जो वोळला । जीवन्मुक्त तो चि जाला ॥ ४
मेरु मौनीअनंतपाईं । समर्पिला उरला नाहीं ॥ ५

[ २ ] मुकेला मेरु

गुरूच्या रूपें ब्रह्मसायोज्य जालें । परंधामिचें राज्य हातासि आलें ।
सदोदीत सिंहासनारूढ जालों । सुमेरू अनंतप्रसादा मुकेलों ॥ १

# १२१६ ]

बाड–पृ. ७४ × २ = १४८
पैकीं बरीं च कोरीं [ ९१

( १ ) अभिमन्युविवाह–ग्रंथसंख्या ९१ व चंद्रहासचरित्र–ग्रंथसंख्या १६८ अशीं दोन प्रकरणें श्लोकबद्ध पूर्ण आहेत. त्यांत मधून मधून आर्या, पदें, दिंडी, ओवी आहेत. प्रकरणें कोणाचीं तें मला निश्चित करतां आलें नाहीं. प्रकरणें नवीन वाटतात. तीं कोणा रामचंद्रांचीं असावीत. चंद्रहासचरित्राच्या शेवटीं रचनाकाल आणि लेखकाचें नाव अशीं आहेत :

शक सत्रार्शे साठी वरि साहा श्रोधिवत्सरीं पूर्ण ।
अधिक श्रावण बहुळीं हरिदिवसीं वदविलें रमारमणें ॥ १६८
इति श्रीचंद्रहासचरितं रामगोपगोसामिना स्वहस्तेन लिखितं ॥ ५

( २ ) द्रौपदीचतुर्भुजनिरोपण–अपूर्ण, बहुधा त्यांचें च दिसतें

( ३ ) मयूरपंत कृत विनायकमाहात्म्य–अध्याय १–आर्या ३५, अ. २–आर्या २७, अध्याय ३–आर्या ४५, अध्याय ४ अपूर्ण

# १२१७ ]

बाड–पृ. ३२ × २ = ६४ [ १००

( १ ) गजगौरीव्रत, पांडवअज्ञातवास, ध्रुवचरित्र, भीष्मप्रतिज्ञा, श्यामाजीपंताची कथा व सुलोचना आख्यान, अशीं बहुधा तंजावर-प्रांतीय च कोणा कवीचीं प्रकरणें

( २ ) शेवटीं पांच पृष्ठें नंतर कोणी आर्याश्लोकबद्ध श्रीसमर्थचरित्र लिहिलें आहे.

१२१८ ] बाड–पृ. ५९ × २ = ११८
पहिलें १ पृष्ठ नाहीं. [२००

( १ ) या बाडांत आरंभीं पुढील प्रकरणें असून नंतर पदपदांतरें आहेत. हीं प्रकरणें बहुतेक अज्ञात आणि अप्रकाशित आहेत, असें वाटतें.

( अ ) कृष्णयाज्ञवल्की कृत येकादशी कथा–ओ. ९ ते १७०

( ब ) शिवरात्रीचें आख्यान–ओवीसंख्या १ ते १८७. तें ब्रह्मानंद कृत आहे काय ? शेवटच्या दोन ओव्या :

श्रीपुरुषोत्तम येकनाथ । दीनदयाळ समर्थ ।
सुखें देखौनी भावार्थ । वदवी ग्रंथ सद्गुरु ॥ १८६
तयासी भावार्थे शरण । काया वाचा आणी मन ।
चरणीं घातलें लोटांगण । सांडूनि मीपण ब्रह्मानंद ॥ १८७

शेवटीं लेखकाचें नांव आहे :

" दस्तखत केरोजी फाळमार यांचें... "

( क ) बीबा कृत पाळणा–कडवीं २२

जो जो जो जो रे मुकुंदा आनंद परमानंदा ॥ ध्रु०

हे कोण बीबा कां बिवा, कोण जाणे ! कां भीम !

( ड ) एकनाथ कृत महादेव–ओवीसंख्या २७

हिमवंताचे पोटीं जन्मली गोरटी
तपें त्या धूर्जटी । प्रणिपेणा ॥ १ वगैरे

( इ ) नामदेव कृत सासुसुनेचें भांडण–कडवीं ७

( ई ) भीम कृत पाळणा–कडवीं ५

जो जो जो जो रे गोपाळा । निद्रा लागों डोळा ॥

( २ ) श्रीसमर्थ, कल्याण, जगन्नाथ, उद्धवचिद्घन, नामदेव, तुकाराम, मल्ललिंग, गिरिधरप्रभु, आनंदसुत, मच्छमुनेश्वर, देवदासांकित, रामदेवदास, शयद महंमद, वढु मल्हारी ( कृत २५ श्लोक प्रार्थनेचे ) गोदापीनंदन, केशव, यांचीं पदपदांतरें

( ३ ) शेवटीं दोन पृष्ठें औषधें

**१२१९ ]** बाड-पृ. ६१ × २ = १२२ अति बारीक अक्षराचें [ ३०५

( १ ) श्रीसमर्थ, केशव, श्रीमन्मटानंदन, परमानंदन, आनंदात्मज, शिवराम, रामचंद्रसुत, तुकाराम, आदिनारायण, मध्वमुनेश्वर, उद्धवचिद्घन, कृष्णदास, अमृतेश्वर, शंकरसुत, निर्मलसुत, राघव, मेरु, गोपाळ, त्रिंबकसुत, दत्ताश्रयदास, नागरीदास, मारा, सुरदास, तुलसीदास, नागसुत, वामन, रगनाथ, एकनाथ, शिवशंकर, जगमैत्रनागा, रामात्मज, विठ्ठलनाथ यांचीं पदपदार्थे. त्यांत कांहीं तत्प्रांतीय भाषेंत आहेत.

( २ ) मध्यें च एका *ठिकाणीं*, शके १७५२ विकृती कार्तिक शु. ५ गुरुवार, असा लेखनकाळ दिला आहे.

**१२२० ]** महत्त्वाचें बाड-पृ ५९ × २ = ११८ पण कसरीनें बरा च नाश केला [ १८०

( १ ) हें सबंध बाड गायनी कलेचें आहे. त्यांत आरंभीं तेरा पृष्ठांत आदिताळ, आनंदभैरवी, जुंझोटी, मोहन, शंकराभरणी, दरबार, कल्याणी, परज इत्यादि रागांतील तत्प्रांतीय भाषेंतील पदें दिलीं आहेत. मग सरळी असा मथळा असून त्याचीं दहा पाच पृष्ठें आहेत. मग जयदेवकवि कृत अष्टपदी गोविंदगीत आहे व शेवटीं पुन्हा निरनिराळ्या रागांतील पदें आहेत.

( २ ) या बाडांतील कांहीं भाग बाळबोध लिपींत आहे, तर कांहीं मोडींत आहे. पण अक्षर सुवाच्य आहे.

( ३ ) गीतगोविंदाच्या शेवटीं लेखकानें आपलें नाव, गाव, स्थळ हीं दिलीं आहेत, तीं महत्त्वाचीं आहेत. तीं मोडींत आहेत. तीं लावण्यात आली सुरुची हि होईल. तीं अशीं :

" लिखित मध्यार्जुन क्षेत्रे तापी श्रीप्रतापराम राजगृहे आह्लादफूलरमध्ये ॥ लिखित हूंव नाम सवदर पुध्य शुध्य श्रीतीयास पुस्तक सपूर्ण • वैष्णव सालिग्रामदास्य पठनार्थी श्री विश्वेश्वरदास अकणपा ॥"

यांत ' श्रीप्रता ' हीं अक्षरें मागाहून लिहिलेलीं दिसतात. त्याच्या खालीं मूळ ' राजे तुकोजी ' अशीं अक्षरें होतीं कीं काय, असें शंका येते. शेवटच्या ' अकणपा ' शब्दाची खात्री वाटत नाहीं. " हूंव " म्हणजे युव, प्रतापसिंह

राजाची कारकीर्द शके १६६१ ते १६८५ होऊन गेली. त्या अवधींत शके १६७७ ला युव संवत्सर होता. त्या शकांतील हें लेखन होय.

# १२२१ ] बाड–पृ. १३१ × २ = २६२ [१००–२००

( १ ) या बाडात दोघांचें हस्ताक्षर आहे. एक २०० वर्षांमागचें व दुसरें १०० वर्षांमागचें आहे. त्यांत श्रीसमर्थ, एकनाथ, गोसावीनंदन, केशव, जनमित्रनागा, कबीर, देवदास, कृष्णदास, मुकुंद, गिरिधर, भानुदास, नामदेव, अनंतदास ऊर्फ गोपाळ अनंत, ज्ञानदेव इत्यादिकांचीं पदपदांतरें आहेत.

( २ ) निरनिराळीं पृष्ठें योजून श्रीस्वामींचें ( म्हणजे श्रीसमर्थांचें ) कवन, केशवाचें कवन, येकनाथकवन, सोपानकवन, निवृत्तिकवन, ज्ञानेश्वराचें कवन, तुकोबाचें कवन, नामदेवाचें कवन असें सगळे घातलं आहेत.

( ३ ) श्रीसमर्थांचा दिवटा आहे व काहीं पदें नवीन आहेत.

( ४ ) याती शूद्र वैश केला वेवसाय । हा तुकारामाचा अभंग आहे.

( ५ ) राघवात्मज कृत हनुमच्चरित्र

( ६ ) या बाडात २" × ½" असा एक लहान ताडपत्राचा तुकडा आहे. त्यावर तत्प्रांतीय मोर्डीत दोन ओळी आहेत. त्यामुळें तो तुकडा रक्षिला पाहिजे. तो श्रीसमर्थांच्या दिवट्यापाशीं ठेवला आहे.

# १२२२ ] महत्त्वाचें बाड–पृ. २६१ × २ = ५२२ [२००

( १ ) सबंध बाड श्रीसमर्थ कृत रामायणाचें आहे : सुंदरकांड आणि युद्धकांड. भीमस्वामींचे शिष्य आणणाजी बावा यांच्या हातचें तें आहे. रामायणाच्या शेवटीं लेखनाचा काळ व लेखकाचें नाव हीं दिलीं आहेत, तीं .

> " राक्षेस सवछर चैत्र शुध प्रतीपदा भृगुवार समाप्त ॥ निस्प्रह आणाजी गोसावी भीमाकीत शाहापुरकर स्वहस्तेन लीखीत्वा ॥ श्रीराम जयराम "

म्हणजे शके १६५७ चैत्र शु १ होय. भीमस्वामी शहापुरचे, त्याप्रमाणें आण्णाजी बावा सुद्धा शहापुरचे च होत.

(२) रामायणानंतर श्रीसमर्थ कृत मानसपूजा आहे. पण तें निराळें हस्ताक्षर आहे.

(३) याशिवाय पहिल्या दोन पृष्ठावर दोन तीन नोंदी आणि दोन पदें आहेत व शेवटच्या पृष्ठावर एकाद दुसरी नोंद आहे. अगदीं पहिली नोंद व पदें आप्पाजींच्या हातचीं आहेत. ती नोंद व एक पद देतों :

[ १ ] आनंदराव पेशवे यांचा निधनकाळ

" आनंद संवत्सर पुष्य वद्य स (स) मि राजेश्री आनंदराव पेशवे देवाज्ञा जाहले समस सलासैन सायान छ २१ चंद्र येकेविस तेरीख "

म्हणजे शके १६५६ पौष व. ७ स (ता. ४ जानेवारी १७३५) आनंदराव पेशवे निजधामास गेले.

[ २ ] रामा पतीतपावना

अष्टपदी उधारा रामा पतीतपावना ।
आत्माराम स्मरणें भावें वारी यातना ।
अखंड चित्तीं चिंतन जाल्या उन्मन या मना ।
आनंदाचे रंगीं ठाव नाहीं अनुमाना ॥ ध्रु०
नाहीं संशये पाहतां रामदासाच्या दासां ।
विजई कल्याणस्वामी भावें फोवसा ।
येश कीर्ति प्रताप पूर्ण प्रलयों ऐसा ।
पूर्ण वर दिघला स्वामी रामें हो दासां ॥ १

(४) इतर नोंदी आहेत त्या अशा :

(रा) " राक्षेस संवत्सर श्रावण शुध चतुर्थी शेनिवार तुळजा माहाराज कैलासवासी जाहले ॥ " म्हणजे १६५७ श्रावण शु. ४ = इ. स. १७३५ ता. १२ जुलै. तंजावरराजघराण्यांत तुळजाराजे जे होऊन गेले त्यांचा निधनकाल इ. स. १७८७ आहे व तुकोजी म्हणून जे म्हटले जातात त्याचा काळ इ. स. १७३५ आहे. मग तुकोजी म्हणून ज्यांना संबोधिलें जातें त्याचें नाव तुळजा तर नसेल ना ? इतिहासलेखकांनीं निवाडा करावा.

(स.) " काळयुक्त संवछर शेष्ट शुध दशमीस आर्णी मुरारी यांचें लग्न जाहलें ॥ आषाढ वदि दशमीस दारफजो रामाचा छेक वेंज्ञायरकोटांत आला त्यावातें ॥ त्यांचें लग्न राजश्रचें मार्गशीरस शुध पंचमीस जाहलें ॥ " म्हणजे शक १६६०. तात्पर्य, या नोंदींनी माहितींत कांहीं भर पडते कीं काय, याचा विचार करणें.

१२२३ ] वाड-पृ. २१७ × २ = ४३४ [ ११३

(१) दत्तात्रय अवधूत कृत मूळस्तंभ अध्याय सात. शेवटीं लेखनकाळ वगैरे :

" दुंदुभी नामा संवत्सर । फाल्गुन शुध पंचमी गुरुवार ।
ते दिनीं ग्रंथ समाप्त दोनी प्रहर । लेखन भीमोकिताचें ॥ १ ॥"

(२) श्रीसमर्थ कृत प्रकरणें (१) पंचसमासी, (२) आत्माराम, (३) अंतर्भाव, (४) पूर्वारंभ, (५) पंचीकरणयोग, (६) पंचमान, (७) पद्दिपु, (८) बहुधा गोसावी, (९) कुटयोग–याचे पांच समास आहेत, ते आपण प्रकाशित केलेल्या स्फुट प्रकरणांपैकीं क्रमशः २१, १, १९, २० आणि १८ अशीं प्रकरणें आहेत, (१०) चतुष्टयोग– पण त्यांत पांच प्रकरणें आहेत, तीं चतुर्थमानाचीं क्रमशः चार व पांचवें स्फुट प्रकरणांतील चवथें आहे, (११) माधवी ग्रंथ– असें या प्रकरणाला स्वतंत्र नांव च दिलेलें आहे. पण तो ग्रंथ म्हणजे येकवीस समासी म्हणजे च जुना दासबोध यांतील अकरावा समास होय. त्याच्या या ठिकाणीं ६२ च ओव्या असून इति श्री माधवी समास ॥ १ ॥ अशी समाप्ती केलेली आहे. प्रकाशितांत याच्या ८२ ओव्या आहेत. विचार करणें, ताडून पाहणें, (१२) जुनाट पुरुष

(३) नंतर भर्तृहरि कृत नीतिशतक महाराष्ट्रभाषेत – अपूर्ण

(४) नंतर वरीं च कोरीं पानें सोडून मदळसेचा पाळणा अपूर्ण आहे.

१२२४ ] किरकोळ वाड
पृष्ठसंख्या ६६ × २ = १३२ [ ११५

श्रीसमर्थ, माधवनंदन, नागसुत (कृत ध्रुवचरित्र), वामन, केशव, तुका, उद्धवचिद्घन, जनी, शिवराम पूर्णानंद, मोरोपंत यांचीं पदपदांतरें---

१२२५ ] किरकोळ बाड [ १३५
पृ. सं. ६१ × २ = १२२

( १ ) श्रीसमर्थ, मेरु अनंत, तुका, जनी, नामा, केशव यांचीं पदपदांतरें ( २ ) ब्रह्मानंद कृत पिंजरा, ( ३ ) पारमार्थिक दोन तीन लावण्या, ( ४ ) गोपीचंदाची कथा – श्लोक १ ते ७८ अपूर्ण. ओळखीसाठीं एक श्लोक देतों :

बहु देशीं हिंडले दक्षिणेसी । पुढें पाहूं चालिला उत्तरेसी ।
सिद्ध भेटे गोरक्ष भजयासी । तो हि चाले सद्गुरु पहावयासी ॥ २९

( ५ ) मनाचे श्लोक – अपूर्ण, ( ६ ) राम, मारुती, गणपती, बालकृष्ण, लक्ष्मी यांचीं सामान्य चित्रें.

१२२६ ] बाड-पृ. १०४ × २ = २०८ [ १५०

( १ ) बाड शिवलेलें आहे, पण केव्हां तरी पृष्ठें अस्ताव्यस्त होऊन बाड शिवलें गेलें आहे. एकादे तरी प्रकरण पूर्ण आहे कां नाहीं, सांगतां येत नाहीं. कामशास्त्राचा भाग बरा च आहे. मनाचे श्लोक, सीतास्वयंवर, चंद्रावळी, हनुमंतभेटी, कवि बिल्हणचरित्र, आनंदसुत कृत मार्कंडेयाख्यान, एकनाथ कृत कालियामर्दन, अशीं प्रकरणें आहेत. कालियामर्दनाचे शेवटीं " हे लिखित रंगो गोविंद " असें लेखकाचें नाव आहे.

( २ ) कवि वरदात्मज, अनंतदास, आनंदतनय, मेरु, गोदावीनंदन, उद्धवचिद्घन, मल्ल, केशव, नारायणात्मज इत्यादिकांचीं पदपदांतरें.

१२२७ ] बाड-पृ. सं. ३९ × २ = ७८ [ १२५

( १ ) तत्प्रांतीय भाषेंतील पदपदांतरें

( २ ) सुमारें अडीचशें मराठी पदांची सूचि, म्हणजे प्रत्येक पदाचे पहिले दोन तीन शब्द दिलेले आहेत.

( ३ ) एकनाथ कृत सीतास्वयंवराचा भाग

(४) शेवटच्या पृष्ठावर 'पचदशाक्षरी महामंत्र' मथळ्याखाली मजकूर आहे तो :

" श्रीराम जयराम जयजयरामराम ॥ हा मंत्र नित्यनियमेंकरून सहस्र आवर्तन करिजे तरि सर्वार्थकाममोक्षादि सकळ हि प्राप्त होयील यदर्थी संशय न कीजे ॥ मनोरथ पूर्णकाम श्रीरस्तु .."

१२२८ ] महत्त्वाचें बाड [ १७५
पृ. स ७१ × २ = १४२

(१) या बाडात श्रीसमर्थ, अमृतेश्वर, केशव, निजानंद, आनंदतनय, गोसावीनंदन, मेघ अनंत, माळो, शनेश्वर, तुकाराम (याचें एक पद ज्ञानदेव यांच्यावर आहे), माधवसुत, गिरिधर, नळिकठ इत्यादिकांचीं पदपदावरें आहेत

(२) पण हें बाड मुख्यतः चौंदड शंकर याच्या कवितेचें आहे. चौंदड गुरूचे हे शंकर नवीन प्रकाशात येत आहेत. याची मोठमोठाली स्फुट पदें, श्लोक वगैरे कविता प्रासादिक आहे. काहीं कडवीं पहा :

(श्री) जो जो जो जो रे । रघुराया ॥ सुरनर लागति पाया ।
धरणीधर शिणला गुण गाया । अनंत दुखिया माया ॥ धु॰ ॥

(गु) का हो राम म्हणाना ॥
प्रपंच हा बहु बाधक पाहाता । का हो॰
दारा धन सुत नये चि कामा । का हो॰
क्षणभगुर हे काया माया । का हो॰
मी मी म्हणता जाइल सेवीं । का हो॰
मृत्युपथ न चुके चि कदापी । का हो॰
यमपातीं अनु काहीं न म उरे । का हो॰
वृथा चि मृगजळडोहीं बुडता । का हो॰
बहुत पातकी तरले नामें । का हो॰
सांब सदाशिव हुलत घोषें । का हो॰
भगवें पटकुळ वेष्टुनि काय । का हो॰
जटाभार शिरिं वाढुनि काय । का हो॰
शास्त्र वेद श्रुति घोकुनि काय । का हो॰
चौंदड शंकर सांगत भावें । का हो राम म्हणाना ।

(६) पूर्ण ब्रह्म पूर्ण अवतार । दशीं अवतारला रघुवीर ।
त्यासी माझा नमस्कार । दुर्जनवाण ॥

(श) भक्ताचे साठीं देव । अवतरला मानवरूपी ॥ ध्रु०

(ष) राम हा देखिला हो आनंदकंद ॥ ध्रु०

(श) निर्गुण तूं सगुणात्मक होसी ।
चोंदड श्री रघुराया रे ।
शंकर निशिदिनीं स्मरणीं स्मरितो ।
हृदईं दृढ तव पाया रे ॥

(स) स्वरूपावांचुनि नयनीं दुसरें ।
कदापि आणुं नको ॥ ध्रु०

(१) पदपदांतरांशिवाय चोंदडशंकरांचीं चार प्रकरणें आहेत तीं अशीं :-

(अ) गोरखदत्तात्रयसंवाद-कडवीं २१

(ब) प्रती मनाचे श्लोक. हे १२८ आहेत. त्यांच्या शेवटीं रचनाकाल दिला आहे, तो असा: "इति श्री प्रती मनाचे श्लोक चोंदड बाळ शंकरनाथ विरचितें संपूर्णमस्तु ॥... ईव नाम संवछर मागमास सष्टीचे दीवसी समाप्त ॥" ईव नाम म्हणजे युव नाम. शक १६७७ होय. प्रकरणाच्या नांवांत प्रती शब्द कां घातला आहे, समजत नाहीं. श्रीसमर्थांच्या मनाच्या श्लोकांना अनुलक्षून कदाचित् तो असावा.

(क) पारधीची कथा-ही कथा सांगणारे पूर्वीचे कवी जे श्रीधर ब्रह्मानंद त्यांचा उल्लेख या प्रकरणांत चोंदडशंकरांनीं केला आहे.

(ड) स्वानंदसिंधु-ओवीसंख्या १४१ या प्रकरणात कवीनें शेवटीं आपली परंपरा दिली आहे. तशी च ती थोडक्यांत मनाच्या श्लोकांच्या हि शेवटीं आली आहे. त्यावरून मला जो बोध झाला तो असा: आदिनाथ-उमानाथ-ब्रह्मनाथ-विष्णुनाथ-चौरंगी-गणपति-नागनाथ-मच्छेंद्र-गोरख-अवघड-जालंदर-गुलाब-गरीब-चिद्रूप चोंदडनाथ चिदांबरी-विश्वनाथ-बाळनाथ शंकरानंद. अशी परंपरा देऊन परंपरा देण्याच्या पद्धतीचें दोन ओव्यांत समर्थन केलें आहे, त्या ओव्या:

जयाचे ग्रंथान्वईं । परंपरेची वार्ता नाहीं ।
तो पाषांडमती पाहीं । भेदमाही माहीक ॥ १३३
अम्हा तयासी काय कारण । आम्ही परंपराची रक्षण ।
परंपरेवांचुनीयां जीण । आम्हासी जाण असेना ॥ १३४

या हि प्रकरणाच्या शेवटीं रचनाकाल दिला आहे :

" इति श्री चोंदइपाळनाथकृत्य । स्वानंदसिंधु तो अगत्य ।
पाहे जो का शिष्य सत्य । सद्गुरुरूप ॥
ईश्वर नाम संवछर । मार्गमास कृष्ण पक्ष
येकादसी सोमवार ...... " म्हणजे शक १६७९

( ४ ) चोंदइ हें गाव नांव आहे, याचा मला बोध झाला नाहीं. हे बाळशंकरनाथ जरी नाथसंप्रदायी होते तरी त्यांनी आपल्या प्रकरणांत श्रीरामदासांचा उल्लेख अनेकदा केला आहे. त्यांच्या भाषेवर आणि ग्रंथरचनेवर श्रीसमर्थांच्या ग्रंथांची पूर्ण छाप पडलेली स्पष्ट दिसते. या शंकरनाथांची कविता स्वतंत्रपणें प्रसिद्ध करण्याच्या योग्यतेची आहे. कोणी तरी तें काम करावें.

( ५ ) शेवटच्या एक दोन पानावर ' विंचवाचा मंत्र ' आहे व ' देकूण नाहींसे होण्याचा उपाय ' सांगितला आहे.

**१२२९ ]** बाड–पृ. सं. १०७ × २ = २१४
शिवाय दोन्ही बाजूस १०।२० नष्ट [१५०

( १ ) श्रीसमर्थ, मुद्गल, दीन, नामदेव, केशवराज, एकनाथ, मुक्ताई, ज्ञानदेव, विष्णुदास नामा, माधवदास, केशवाचा नामा, पंडित, गिरिगिरींच्या स्वामी बाळकृष्णा रे । तुझेनि हरली भवतृष्णा रे ॥, वेणाबाई, मानुदास, गोसावीनंदन, अच्युत, रंगनाथ, सनतिदास, गोपाळ रघुनाथ, वटेश्वर चांगा, कृष्णदास, शिवराम, विठ्ठल कवि ( याचे कांहीं कूटात्मक श्लोक ) यांचीं पदपदांतरें. संत एकनाथ, केशव व श्रीसमर्थ यांच्या पदपदांतरांचा भरणा विशेष आहे.

( २ ) श्रीसमर्थ कृत ( क ) ' याना चांफळिचि ' – भयंगा डोंगराचा फेर, ( ख ) मन सर्वदा नावरे पिसाट जैसें । इचि प्रपंचीं यावरे करणें कैसें ॥ ध्रु०, ( ग ) ' सामळभट ' – श्लोक ३० – हरि जनक सजनी ।, ( घ ) ' श्रीरामायण ' – तनु विवंड चढळी ।, ( ङ ) डफगाणें – श्लोक ३४ – कळकळलें पाहिजे तें परब्रह्म येक ।, ( च ) ' जनकाच्या ओव्या ' – सभार करितां होय आयोज्यता ।, ( छ ) दुळें फराळ ध्याचें, वगैरे

( ३ ) 'श्रीरामरूप रावणास भासलें' – मनीं लोचनीं सावळा राम माझे ।

( ४ ) 'स्वरूपाष्टक'–विसरलों मन मी ममतागुणें ।

( ५ ) वेणाबाई कृत ( अ ) सेवकाचा साभिमानी राम कोदंडपाणी ॥ ( ब ) अनेक घात मात रे ॥ शिवाय

( ६ ) वेणाबाई कृत नावेचे श्लोक–ते चवेचाळीस असून चवेचाळिसाव्यांत वेणाबाईचें नाव आलें असून ४५ वा एक जास्त श्लोक आहे, तो :

मला पाहतां मी च तल्लीन जाहलों ।
सुखानंद आनंद सेऊन धालों ।
निवृत्तीसुखें वृत्ति संपूर्ण गेली ।
मना सेवटीं उन्मनी प्राप्ति जाली ॥ ४५

( ७ ) श्रीमत् शंकराचार्य कृत ( अ ) श्रीरामाष्टक, ( ब ) मंगलाष्टकस्तोत्रम्, ( क ) भज गोविंद भज गोविंद

( ८ ) या बाडांत हस्ताक्षर निरनिराळें आहे. कांहीं श्रीसमर्थकालीन आहे, तर *कांहीं नंतरचें हि आहे. दोन तीन ठिकाणीं ११८४, ११८७,* ११८८ अशा सनाचा उल्लेख आला आहे. एका ठिकाणीं 'मोकाम बादरपुर ऊर्फ तंजावर सन ११८४' अशी नोंद आहे. दुसरी एक नोंद आहे ती :

"हे वही सदाशिव याची हे कोणी घ्यावास गरज नाही हे वही तजाउरी छुठीमधे मिळाली कळले पाहिजे..."

**१२३० ]** बाड–पृ. सं. ४२ × २ = ८४
शेवटचें बहुधा एक च पान गेलें [ १५०

( १ ) श्रीसमर्थ, माधव ( कृत श्रीसमर्थांवर आरती ), मेरु अनंत, गोविंदसुत, प्रतापराम, देवदास, निंबक, माधवसुत, आनंदतनय, ज्ञानदेव, पंडितराम, केशव, कबीर, बाळकृष्णदास, मानपुरी, मानुदास, उद्धवचिद्घन *यांचीं पदपदांतरें. कांहीं तत्प्रांतीय मार्गांतील*

( २ ) श्रीधर कृत चिल्हाळचरित्र व अश्वमेध

( ३ ) उद्धवचिद्घन कृत येकादशीव्रत

( ४ ) *परचलिंग कृत मुरलीचरित्र*

(५) प्रतापराम कृत गोपिकावस्त्रहरण

(६) गिरिधर कृत पारिजातक पुष्प

(७) देवदास कृत भक्तमालिका ऊर्फ करुणामृतरस–१३५ च्या ओवीपर्यंत.

**१२३१ ]** बाड पृ. सं. १४५ × २ = २९० [१५०

श्रीसमर्थ कृत रामायणापैकीं युद्धकांड

दोवरी ' येकुन श्लोकसंख्या तेरासे आठि ' दिली आहे.

**१२३२ ]** बाड पृ. सं. ४० × २ = ८० [१२५

(१) सांब कृत रुद्राक्षमहिमा–आर्या २४, (२) दासानुदास कृत भीष्मप्रतिज्ञा–श्लो. ५१, (३) गणेशलग्न–श्लो. १२, आर्या १५, पदें २, दिंड्या ४, केकावळी १, मगळाष्टक २ येकुन ३६, (४) नागसुत कृत रमेशमहिमा–श्लोक ४३, (५) मोरोपंत कृत अभिमन्युविवाह–आर्या ४०, (६) रामचंद्र कृत सुब्रह्मण्यविवाह ऊर्फ स्कंदविवाह, (७) नळचरित्र–श्लो. ७१ अपूर्ण, (८) नळचरित्रपदनळी–अपूर्ण

**१२३३ ]** बाड पृ. सं. ६९ × २ = १३८ [१५०

(१) आनंदात्मज, पंडित याचीं पदपदार्थें, (२) प्रतापसिंहावदल २ श्लो (३) संस्कृत सुभाषितें–१२२, (४) आनंदनंदन कृत (श्री) माळलीला–श्लो. १५, (५) शर्वरीरामसंदर्शन, (म) गणिकामोक्ष, (५) सीतास्वयंवर दोन–अपूर्ण, (६) प्रताप कृत पद रामाई, (७) गोसावीनंदन कृत देवी अष्टक, (८) आरणीचा शिपाई कृत पूतनामोक्ष–श्लो. १८, (९) कृष्णदास कृत मंगळाष्टक.

१८५७ पौष वद्य ४ रविवार

१२३४ ] किरकोळ बाड
पृ. सं. २२ × २ = ४४ [ १२५

सुदामचरित्र-श्लोकपद-अपूर्ण, श्लोक ८८.

१२३५ ] बाड-पृ. सं. ५१ × २ = १०२ [ १५०

( १ ) श्रीसमर्थ, श्यामराज, तुका, गिरिधर, नामदेव, अनंत कवि, आनंदनंदन, कल्याण, मेरु, दास दिगंबर, विष्णुदास नामा, जनी, उद्धवचिद्घन, मध्यमुनेश्वर, बाल, केशव, अनुचर, इत्यादिकांचीं पदपदावरें

( २ ) श्रीसमर्थ कृत (श्री) येथें उभा कां श्रीरामा ।

(रा) मोंवता डोंगराचा फेर । (म) इत्यादि

( ३ ) श्यामराज कृत बरी च कविता आहे. आरत्या आहेत, संस्कृत प्राकृत श्लोक आहेत, अनेक चूर्णिका आहेत. श्लोकांत तुळजा राजे यांचा उल्लेख आलेला आहे.

( ४ ) बाळ कृत-भजा रे भजा रे माझ्या रामदासासी ।
अनन्य भावें नाम जपतां पद पावे अविनाशी ॥

( ५ ) अनुचर कृत संतांची आरती

( ६ ) मेरु कृत-अरे हा सद्गुरुराज भजा ॥ ध्रु०
भ्रांति त्यजा रे निज उमजा रे ।
लावू मोक्षध्वजा ॥ १

( ७ ) गोब्राह्मणा वंदन न करी । तुरका वंदी माथा ।
संतजनाचा मावद चित्तीं । आवडती खीलाथा ॥
रामदास निज मानस बोधी । धरी स्वहिताचा पंथु ।
नाहीं तरी नरदेहीं पापा । अवघी मरमर छी थु ॥

( ८ ) राघोराचा जन्म—वृष नाम ज्येष्ठ शु. १० शुक्रवार, चिमाबाईचा जन्म-तारण नाम पौष शु. ६ शुक्रवार, मल्हारीचा जन्म-विरोधी नाम माघ शु. १५ शुक्रवार व त्रिंबकरायाचा जन्म-नंदन नाम पौष शु. १३ बुधवार, अशा चार जन्माच्या नोंदी बाडाच्या पहिल्या च पानावर आहेत. हे बहुधा १६८३, १६८६, १६९१ व १६९४ असे शक असावेत.

**१२३६ ]** बाड–पृ. सं. २६ × २ = ५२ [ १३५

हें छपय बाड संस्कृत सुभाषित श्लोकांचें आहे. त्यात २५० + १६ + ४० = १२६ श्लोक आहेत.

**१२३७ ]** बाड–पृ. सं. २५ × २ = ५० [ १३५

श्लोक, आर्या, पदें, सवाया, दिंडी इत्यादि ११६ पद्यसंख्येनें गुंफिलेली पांडवांची कथा. रामचंद्रविभु किंवा रामचंद्रसुत किंवा रामचंद्रवरद या नावानें पदें चिह्नित आहेत. शेवटचा श्लोक.

श्रीरामदासपदवारिजषट्पदातें । श्रीमारुतीदेशिकवरा निजसौख्यदातें ।
पद्योनिया विरचिली घरसत्कथातें । जे ऐकल्याशि हाणि दुरित सत्पथातें ॥ ११६

**१२३८ ]** बाड–पृ. सं. ५३ × २ = १०६
पहिलें पृष्ठ नष्ट [ १३५

( १ ) सांप्रदायिक पंचपदी
( २ ) रंगनाथ कृत रामदास चतुराक्षरि मंत्र॰
( ३ ) रघुवीर कृत श्रीसमर्थांची आरती

आरती रामदासा । गोदातीरनिवासा ।
उत्तरे जन्म तुझा । मायाभ्रम परमहंसा ॥ ध्रु॰

सावधानी अर्थ केला । राहे विवाहाची कथा ।
पळोनी वनवासी । येकांतीं विचरता ।
ओंजीव सूक्ष्मसूर्ती । भेटी होतां हनुमंता ।
श्रीराम भेटवीले । तुजलागी समर्था ॥ १

अवतार मारुतीचा । कटीं कौपीन साजे ।
हृञ्जूंस दिव्य छाटी । ब्रह्मचर्य विराजे ।
येरीलें शिष्यकेणें । महा वैराग्य वीज ।
ससार उडवीला । दिल्हें वेदांत सहज ॥ २

मूढासी उपकार । दयासागरें केला ।
दासबोध ग्रथवर्य । विस्तारें वाढवीला ।

तत्त्वार्थ बोध पूर्ण । संशयो निरसीला ।
रघुवीर स्वामीराजा । त्यासी प्रसन्नो भाला ॥ १

( ४ ) कल्याण कृत दासबोधाची प्रसिद्ध आरती

( ५ ) शिवदिनकेसरी कृत ( श्री ) तेथें राम सखा राम सखा । रामदास गुरु बोळला ॥ ध्रु० ( रा ) रामीरामदास गुरुमंत्र पदाश्रीरे सोपा । ( म ) साधु रामदासस्वामी । ध्यावा निज अंतर्यामीं ॥

( ६ ) जाणावा रामदासांचा हा चि संप्रदाय ।

( ७ ) बाळसुत कृत भीमस्वामींवर पद

भीमराव चतुराक्षर म्हणतां सुख वारंवार ।
पावे म्हणउनि पाय त्याचे वंदा सत्वर ॥ ध्रु०

भीमरूप विशाळ भाळीं टिळा गुणनामी ।
भीता भय वारुनि दासातें म्हणे नाभि नाभि ।
भीम पराक्रम भक्तां कैसा देतो सुलभी ।
भीमतीर जे वासी येती वाजती दुंदुभी ॥ १

मंदहास वाचेन बोले अगणित श्रीराम ।
मंदवासर प्रियकर सकळां तारी सप्रेम ।
मनोभावें भजती त्याचे पुरताती काम ।
मननशील महाजनासि होतो मोठा संभ्रम ॥ २

राहणें ज्याचें पहिलें त्याचें नांव दाहापुरा ।
रामदासस्वामींचे वर लाधले पुरा ।
राक्षसवर्षी निघोनि आले तंजपुरा नगरा ।
रामनामें शोभत संत महंतपरंपरा ॥ ३

वरद महारुद्र मारुती हनुमंतराव ।
वडिल श्रेष्ठ अमुचा सकळां स्वामी भीमराव ।
वर्णिति वेद विधी ही भक्ती पाहुनि अपूर्व ।
वदिति बाळसुताचा प्रभु तो प्रेमें जन सर्व ॥ ४

भीमस्वामी मूळचे राहणारे मसूरच्या जवळच्या दाहापुरचे व ते तंजावराव राक्षसनामसंवत्सरीं म्हणजे शके १५९७ त, म्हणजे श्रीशिवरायांनीं करनाटकावर स्वारी केली त्या वर्षी गेले, या गोष्टी या पदावरून सिद्ध होत आहेत.

( ८ ) भागवतांतील कांहीं संस्कृत भाग सटीक

(६) नागनंदन कृत दैशिक रामाची आरती

**१२३९ ]** बाड-पृ. सं. २१ × २ = ४२ [१२५

(१) तत्प्रांतीय लिपींत दोन पृष्ठें

(२) शेरजीराव = सरफोजी राजे. त्यांनीं काशीक्षेत्रावर केलेलीं दोन पदें

(३) अवधूत कृत गोपीचंदाची कथा–ग्रन्थसंख्या १०४ + ४०= १४४. प्रकरण अप्रकाशित वाटतें.

(४) चार मंगळाष्टकें. सुन्दराव कचरे यांचें पुस्तक

**१२४० ]** बाड–पृ. सं. १६८ × २ = ३३६
आरंभींचीं ११२ पृष्ठें गेलीं [१५०

महत्त्वाचें एक बाड. त्यांत श्रीसमर्थांच्या शिवाय दुसऱ्या कोणाची कविता नाहीं. रामदासी मालेंतील अकरावा भाग काढतांना तें उपयोगीं पडणारें आहे. त्यांतील प्रकरणें :

(१) सप्तसमासी– प्रत्येक समासाचा शेवट 'इति श्री दासबोधे...' असा केला आहे, (२) जुनाट पुरुष, (३) बहुत गोसावी, पण शेवटीं 'इति श्री बहुधा गोसावी,' (४) पंचीकरणविवरण, ओवीसंख्या ३०, करितां पंचीकर्ण विवरण । ततुचतुष्टयनिर्शन । षडें आत्मनिवेदन । तत्त्वझाडा होतां ॥ १ ॥ अशी पहिली ओवी. शेवट— " इति श्री दासबोधे गुरुशिष्यसंवादे पंचीकर्णविवरण निरोपण नाम समास नवम ॥ ९ ॥ " (५) " जळस्थळकाष्टपाषाण । " इत्यादि अकरा ओव्या व त्यांच्या च पुढें बारावी ओवी म्हणून " कोण्हाचा भरवसा न धरावा । " इत्यादि अकरा ओव्या, एकूण बावीस ओव्या असून त्यांचा शेवट " इति श्री दासबोधे गुरुशिष्यसंवादे महंतलीळाशिकवण नाम समास दाहावा ॥ १० ॥ निर्विकल्पसमाधी संपूर्णमस्तु ॥ दशक येकेवीस " असा केलेला आहे. हें व मागचें च प्रकरण, अशीं दोन्हीं प्रकरणें विचार करण्यासारखीं आहेत, (६) येथील अभंग, (७) पूर्वारंभ–ओ. ६०, (८) ऐसें मागणें कें होईल सन्मुख ॥, दैतादैताची सीमा ॥, बोलवेना तें बोलावें ॥, फावली रे मज ॥ अशीं चार पदपदावरें, (९) संस्कृत ग्रन्थ–म्हणजे च

आरण त्याला दासगीता अथवा पंचाध्यायी म्हणतो तें प्रकरण, पण तें येथें अपुरें च सोडून, या च बाडांत पुढें तें घेतलें आहे, ( १० ) मानपंचक, ( ११ ) बुद्धिवाद- असंड सावधान असावें। इत्यादि, " संभाजीस सुर्वादाद लीहीला " असा शेवटीं उल्लेख आहे, ( १२ ) चतुःसमासी- म्हणजे मालेंतील विशन्या भागांत जीं स्फुट प्रकरणें दिलीं आहेत, त्यांपैकीं १ लें, १८ वें, १९ वें व २० वें अशीं चार प्रकरणें, ( १३ ) मीपण-म्हणजे येकवीससमासींतील १३ वा समास, (१४) आत्माराम, ( १५) पंचसमासी- गणेशः शारदाचेव।, ( १६ ) सगुणध्यान, ( १७ ) अंतर्भाव, ( १८ ) निर्गुणध्यान, ( १९ ) पंचीकर्णयोग, ( २० ) मानपंचक-असा मथळा आहे, पण तें खरोखर पंचमान आहे, ( २१ ) माधवी-म्हणजे येकवीससमासीपैकीं ११ वा समास, ( २२ ) मानसपूजा, ( २३ ) राजधर्म, ( २४ ) क्षात्रधर्म, ( २५ ) संस्कृत ग्रन्थ-म्हणजे दासगीता किंवा पंचाध्यायी-पण दुर्दैव असें कीं, येथें हि इतर सर्व ठिकाणांप्रमाणें चार च अध्याय आहेत, प्रत्येक अध्यायाचा शेवट " इति श्री अध्यात्मयोगे देवभक्तसंयोगे..." असा केलेला आहे, ( २६ ) षड्रिपु, ( २७ ) फुटयोग- म्हणजे आपल्या स्फुट प्रकरणांपैकीं २२ वें प्रकरण, ( २८ ) रामायण- म्हणजे ओव्याशतकांतील १३ वें शतक, ( २९ ) रामवरदायनी । कामनादायनी । त्रैलोक्यपाळणी । विश्वमाता ॥ इत्यादि, हें प्रकरण मागील बाडांक ५०७ त आपण दिलेलें आहे, ( ३० ) सर्वब्रह्मविमळब्रह्म-म्हणजे ओव्याशतकापैकीं ९ वें शतक, ( ३१ ) प्रेत्नप्रालब्धाच्या वोव्या-म्हणजे १२ वें शतक, ( ३२ ) कोपला रुद्र जे काळीं। म्हणजे स्फुट प्रकरणांतील ६१ वें प्रकरण

असें हें प्रचंड, उपयुक्त, श्रीसमर्थांच्या कवितेचें तत्कालीन बाड आहे.

१२४१ ] बाड-२३ × २ = ४६ [१००

( १ ) श्रीनिवासचंपू-स्तोत्रासह-एक संस्कृत प्रकरण, ( २ ) किरकोळ

१२४२ ] बाड-पृ. सं. ५६ × २ = ११२ पैकीं २५ × २ = ५० लिहिलेलीं [२००

या बाडांत मुख्यतः नाना तऱ्हेचीं औषधें व कांहीं मंत्र व तोडगे आहेत.

१२४३ ] बाड-पृ. स. ४४ × २ = ८८ किरकोळ बाड [१००

गोपीचंदाची कथा हिंदुस्थानी भाषेंत, विनायकस्तोत्रम्, देवीमानसपूजा, सुभाषितें, योगवासिष्ट, वगैरे सोटक भाग

१२४४ ] बाड-पृ. सं. १४३ × २ = २८६ [१५०

( १ ) "तुकाराम सिवाजीराजियांस पत्रिका पाठविली ॥ हे चरित्र ॥" असा मथळा देऊन पुढील सहा अभंग दिले आहेत, ते :

( रा ) विरंचीनें केलें । ब्रह्मांड सकळ ।
( मी ) ऐसी माझी वाणी । दीनरूप पाहें ।
( रा ) तुम्हांपासी आम्ही । येऊनियां काये ।
( म ) आतां येक योग । साधावा हा नीट ।
( दा ) आतां हे विनंती । प्रधान अष्टका ।
( स ) राया छत्रपति । ऐकावें वचन ।

नडतात म्हणून कोणी कोणी हे शाहीच्या साही अभंग क्षेपक मानतात, तर कोणी कमी नडतात ते घेतात व बाकीचे सोडतात. पण असें करण्याला आतां काहीं आधार उरला आहे, असें वाटत नाहीं.

( २ ) श्रीसमर्थकृत ऐक सज्जना मनमोहना । संपाचे पाहाता कोण्हाची । जाईल काया जाईल माया । उसणी आणिली पाचाची ॥ १ याचीं तेरा कडवीं आहेत, पण पूर्वप्रकाशकाच्या छापण्यात अवघीं सहा च आढळतात.

( ३ ) अनंतदेवगुरूचा बालक कृत विसोबाखाईकाचें चरित्र-अठरा अभंग आहेत.

( ४ ) सद्गवचिद्घन कृत गोऱ्या कुंभाराचें चरित्र

( ५ ) तुकोबाचें चरीत्र-४७ कडवीं

( ६ ) आनंदतनय कृत शिवरात्रीचरीत्र-दिंडीचाली, ग्रन्थसंख्या ४२

( ७ ) विष्णुदासनामा कृत उपमन्यचरित्र -ग्रन्थसंख्या ४१

( ८ ) मल्लिलिंग कृत गजगौरीव्रत पांडवचरित्र, ग्र. सं. २८

( ९ ) अथर्वण गंगाधर कृत शिवरात्रीकथा प्र. सं. ४५

( १० ) श्रीसमर्थ, तुकाराम, अनंत देव, चोखा मेळा, जनी, स्वामी, एकनाथ, नामदेव, नरहरि सोनार, कबीर, केशव, बोधला, जगजीवन ( रामाई माझी ), गोसावीनंदन यांचीं पदपदांतरें

( ११ ) मधून मधून कांहीं सुभाषितें.

तारावें तरी रामनामासि घेई । बुडावें तरी नाम सोडूनि देई ।
ममा प्रार्थना हे चि सांगूं किती रे । पढा वेदशास्त्रें पढोनी श्रुती रे ॥ १
मझा देव तो कोण कामासि आला । गुरूच्या मुखें देव तो वश्य झाला ।
गुरू तात माझा गुरू नाथ माझा । गुरू सोयरा देव देवाधिराजा ॥ २
मुखीं जयाचे हरिनाम लागे । गंगा तयाचें पदतीर्थ मागे ।
पायांगि टाकूनि समस्त काम । मुखीं जपा हो रघुनाथराम ॥ ३

( १२ ) दुर्दैवानें या बाडाचीं शेवटचीं १०।३५ पृष्ठें बहुतेक कसरीच्या मक्ष्यस्थानीं गेलेलीं आहेत.

**१२४५ ]** बाड–पृ. सं. ७९ × २ = १५८ पहिलीं कांहीं पानें नाहींत [ १२५

( १ ) श्रीसमर्थ, तुकाराम ( यांचे द्यमरावर अभंग ), केशव, आनंदतनय, कृष्णदास, भीमराज, हरिहरदास, मेरु, एकनाथ, रंगनाथ, मुक्ताई, जनी, गुरुदास, अवधूत गोविंद, शंकर चौंदह यांचीं पदपदांतरें

( २ ) भीम व गोविंदबाळ यांच्या आरत्या

**१२४६ ]** बाड–पृ. सं. ३८ × २ = ७६ [ १२५

संस्कृत सुभाषितें, कविरीस्तोत्र, गीतेच्या ७०० श्लोकांपैकीं कोणाचे किती श्लोक या अर्थी एक श्लोक.

**१२४७ ]** बाड–पृ. सं. ७२ × २ = १४४ [ १२५

( १ ) श्रीसमर्थ, दासबाळ, महिपति नरहरि, तुकाराम ( द्रौपदी-वस्त्रहरणाचे वगैरे अभंग ), आनंदात्मज, वीरेश्वर यांचीं पदपदांतरें

( २ ) घस्वालिंग कृत पांडवचरित्र–प्र. सं. १९

१२४८ ] बाड-पृ. सं. ११५ × २ = २३०
आ. व शे. २।२ गेलेली [१००

(१) " श्रीमन्महाभारते आदिपर्वे शेषशेतुर्मणो नाग प्रकरण "– ओवीसंख्या ४८, (२) सप्तसमासी, (३) फुटयोग–म्हणून पांच समासाचें हें प्रकरण आहे. ते समास म्हणजे क्रमशः स्फुट प्रकरणें २२, १, १९, २० व १८ हीं होत. प्रकरणें १, १८, १९, २० मिळून पाहाक १२४० ह चतु.समासी बनविली होती, हें आपण पाहिलें च आहे, (४) पंचयोग म्हणजे मालेंतील तिसऱ्या भागात जें चतुर्थमान प्रकरण आपण छापलें आहे, त्याचीं चार मानें व पाचवा योग म्हणजे स्फु. प्र. चवथें घेऊन हें पंचयोग प्रकरण बनविलें आहे. या ३ऱ्या व ४ थ्या प्रकरणात पाठातरें मात्र विचार करण्यासारखीं आहेत. (५) मानपंचक व (६) षड्रिपु

१२४९ ] बाड-पृ. सं. २३२ × २ = ४६४ [ १४०

या बाडात हीं सात आठ कीर्तनें च आहेत.

(१) कैकेयी, सुमित्रा व कौसल्या याचे डोहळे– मूळ, ओव्या एकनाथाच्या घेऊन मधून मधून उद्धवचिद्घन, मेघअनंत, गोसावीनंदन, तुका इत्यादिकाच्या पदपदातरानीं त्या सजविल्या आहेत, तद्वत् च

(२) रामजन्मकथा एकनाथाच्या ओव्याच्या आधारानें सागून श्रीसमर्थ, पंडितराम, मध्वमुनेश्वर, केशव, कृष्णदास, उ. चि., माधवसुत, गोविंद, अनत याचीं पदपदातरें मधून मधून शोभेला घेतलीं आहेत.

या नतर या निरूपणाचा काळ दिला आहे, तो असा : " राक्षस नाम संवत्सर । श्रावण शुध प्रतिपदा शुक्रवारीं । वास्तव्य तव्वनगरीं । निरोपण संपूर्णमस्तु ॥ " म्हणज शके १७३७ श्रावण शु. १ शुक्रवार होत.

(३) ताटिकावध } याना आधार आनंदतनय व गोसावीनंदन याचा घेतला आहे.
(४) यज्ञरक्षण }

(५) अहिल्या उद्धरण– हें एकनाथांचें असून मधून मधून गोसावीनंदन आले आहेत.

(६) सीतास्वयंवर– याला मूळ वामनाचे श्लोक घेतले असून आनंदतनय, गोसावीनंदन, गोविंदात्मज, उ. चि., गिरिधर याचीं पदें, चूर्णिका, सवाया मध्यें मध्यें गुंफिलीं आहेत.

(७) सीताकल्याण-हे वामनांचे ३० श्लोक अधून मधून उ. चि. सळकत आहे.

येथें पुन्हां या निरूपणाचा काल दिला आहे : " राक्षस नाम संवत्सर श्रावण बहुल पंचमी बुधवारीं निरोपण संपूर्णमस्तु " म्हणजे शके १७१७ श्रावण वद्य ५ बुधवार होय.

(८) ललितचरित्र-याला श्रीसमर्थांचे पांच श्लोक घेतले आहेत.

**१२५०** ] बाड–पृ. सं. १७१ × २ = ३४२ शिवाय आ. चौं १५।२० नष्ट [१५०

(१) श्रीसमर्थ, माधव, केशव, नामदेव, उद्धवचिद्धन, एकनाथ, मेघ, गिरिधर, जनी, प्रतापराम, भीमराज, श्रीधर, आनंदतनय, नाथात्मज, जगन्नाथ, शिवराम पूर्णानंद, माधवसुत, मत्स्यमुनेश्वर, गोसावीनंदन, कबीर, रामानंदतनय, चोखामेळा, ज्ञानदेव, अनंत, अमृतराय, बाळ, बाळसुत, ब्रह्मानंद, देवदासांकित, नागनाथअंकित, माळो, नागनंदन, मुक्तेश्वर इत्यादिकांचीं पदपदांतरें.

(२) भीमस्वामींचीं पदें उत्कृष्ट आहेत. पान १७ वरील त्यांचें एक व पान ३६ वरील बाळांचें एक, अशीं पदें देतों :

(भीम) ध्या रे वाचे नाम

ध्या रे वाचे नाम । माझ्या रामाचें ॥ ध्रु०
वेचत नाहीं पैका कांहीं । श्रम हि नाहीं । या वाचे ॥ १
करितां निशिदिनीं । नाम हें कीर्तन । पापविमोचन जन्माचें ॥ २
भवभयछेदक । कैवल्यदायक । अंतरीं व्यापक । भीमाचे ॥ ३

(बाळ) माझ्या समर्थस्वामीसी

भजा रे भजा रे माझ्या समर्थस्वामीसी । माझ्या रामदासासी ।
अनन्य भावें नाम जपतां । पद पावे अविनाशी ॥ ध्रु०
राजविद्या राजगुह्य प्रगट केलें ।
शिष्यालागी आश्वासुनी ब्रह्म दाविलें ॥ १
माझा म्हणुनी शिष्यावरी बहु प्रीति ज्याला ।
स्वानंदसाम्राज्यीं हो अभिषेक केला ॥ २

दावा पाहतां अपार देणें अक्षय ज्याचें ।
सद्भाविकाला लाभ झाला कैसा वर्णावा वाचे ॥ ३
सज्जनसंगीं बैसुनी आतां गुण वर्णावे ।
बाळभावें बोलीयेलों संतीं क्षमावें ॥ ४

पृष्ठ ६२ पर्यंत अनेकांचीं पदपदांतरें असून नंतर पुढील प्रकरणें आहेत. ( ३ ) वस्त्रलिंग कृत मुरलीचरित्र-प्र. सं. २४ पान ६३, ( ४ ) शरसेतुनिरोपण-पान ६९, ( ५ ) पारधीकथा-श्लोक २२, पृष्ठ ७१, ( ६ ) बभ्रुवाहनाची कथा-ओवीसंख्या ७८, पान ८७, (७) सूर्यवंशावळी-पान ९९, ( ८ ) श्रीसमर्थ कृत आरत्या

१२५१ ] बाड-पृ. सं. १२८ × २ = २५६ आरंभींचीं १० पानें नष्ट [ १५०

( १ ) त्या दप्तरलेल्या पृष्ठांत आरंभींच्या ४४ श्लोकांच्या एका प्रकरणाचे पहिले ४० श्लोक व ४१ व्या श्लोकाचें पहिलें चरण, अशीं गेलीं. प्रकरण कोणतें असावें, मला समजलें नाहीं. वाचकांस समजावें म्हणून उरलेले पावणेचार श्लोक येथें उतरून घेतों :

ओं । लाधी सदा ज्ञानविभूति माझी ।
तो सद्गुरु शंकर स्वामि माझा । आत्मा सखा सज्जनवृंद माझा ॥ ४१
ज्याचे मनीं ज्ञानसमुद्र दाटे । पदोपदीं ज्यासि समाधि भेटे ।
साधूकुळीं तो निजभानु पाहीं । त्यावेगळा जानकिनाथ नाहीं ॥ ४२
निष्कामता पूर्ण जयासि चोळे । ज्याच्या जिवीं बोध अखंड खेळे ।
साधूकुळीं तो निजभानु पाहीं । त्यावेगळा जानकिनाथ नाहीं ॥ ४३
अपार बोधामृत सेउनी जे । निजाक्षरीं मग्न सदा मुनी जे ।
विलासती तद्रुप होउनी ते । पाहीन केव्हा निज लोचनीं ते ॥४४

( २ ) सवाया-ग्रंथसंख्या १५-आनंद कृत

( ३ ) नंतर केशवाचीं दहा बारा पदें व नंतर त्याचें कांडण, दळण, सडा, सारवण, लकुडा, चांगभांग, पिंगा व फुगडी यांवर एक एक पद व पुन्हां सुमारें २०।२५ पदें. नंतर

( ४ ) श्रीसमर्थ, केशव, उ. चि., नानक, भीमराज ( यांचीं कांहीं हिंदुस्थानी हि पदें ), शिवराम पूर्ण, मेरु, अमृतराय, आनंदनंदन, एकनाथ,

तुकाराम, नामदेव, जगज्जीवन, गोसावीनंदन, चौदह शंकर, कवि कृष्ण (यांचे त्र्यंकटगिरिस्वामीवर) यांचीं पदपदावेरें

**१२५२ ]** बाड–पृ. स. २० × २ = ४० [१५०

(१) शिवकवचं, (२) शिवाशोत्तरशत, (३) तप्रांतीय भाषेतील एक पद व (४) बहुधा गोरखनाथांचा एक मंत्र

**१२५३ ]** बाड–पृ. स. १३७ × २ = २७४ आरंभींचीं ५१६ नष्ट [१५०

(१) आरंभींचीं ५० × २ = १०० पृष्ठें पुरंधर विठ्ठलांच्या कानडी पदांनीं व्यापिलीं आहेत. तीं मला, अर्थात्, काहीं समजलीं नाहींत; पण त्यांत भद्राचल आणि रामदास अशीं नावें मधून मधून अनेकदां आलीं आहेत. कानडी भाषा जाणणारांकडून हीं पदें समजावून घेतलीं पाहिजेत. नंतर

(२) श्रीसमर्थ, भीम, मेरु, आत्माराम, गो. न., वामन देवराय सुंदर हरि, रामकृष्ण, श्रीधर, प्रतापराम, मध्वमुनेश्वर, शिवराम, त्रिमलसुत, आदिनारायण, गिरिधर, जन जसवंत, कोकिल, वल्लभ, तुलसीदास, केशव, वीरेश्वर, कल्याणस्वामी, जगज्जीवन यांचीं पदपदावेरें

(३) प्राकृत गुरुगीता-संपूर्ण, ओ. स. २४२, कोण कृत म्हणावी? प्रथमी आणि शेवटची ओवी :

नमो जी वडवाळ सिद्ध नागदेवो। त्याहीं अंतीं फेडिला संदेहो।
ग्रंथ करावया भावो। जिव्हाग्रीं दिधला ॥ ४

यावरून वाटतें वडवाळसिद्धनागेशांच्या कोणा शिष्याचा हा ग्रंथ असावा, पण शेवटची ओवी :

मग विनवी सिद्ध नागदेवो। कृपाळु सद्गुरुरावो।
तेणें दाखविला भावो। गुरुगीतेचा ॥ २४२

**१२५४ ]** बाड–पृ. सं. ९४ × २ = १८८ उसवलेलें, काहीं पानें नष्ट [१५०

(१) श्रीसमर्थ, श्रीधर, मेरु, उ. चि., तुका, ज्ञानदेव, आत्माराम,

आदिनारायण, केशव, जनीजनार्दन, शिवराम पूर्णानंद, शि. के., उद्धवलिंग, बहिरा ( भैरा ), आत्मानंदशिष्य, मच्छिंद्रेश्वर, कबीर, अमृतराय, नाथात्मज, वल्लभ, मानपुरी, गिरिधर, आनंदघनय, रघुनायक पंडित, एकनाथ, दिनकर, मीराबाई, पंडितराम ( चिंतामणीसुपनंदन म्हणजे बहुधा पंडितराम ), रामात्मज ( म्हणजे बहुधा पंडितरामात्मज ), परमानंद, भीमराज, विठ्ठल इत्यादिकांचीं पदपदांतरें.

( २ ) फकु कृत नामदेवचरित्र- ओवी ८ ते ६४, ( ३ ) श्रीधर महानंद कृत चोळराजचरित्र-पांचचरणी ओव्या आहेत, ( ४ ) तुकाराम कृत कुंतीच्या उदरीं जन्मले पांडव । ओ. सं. ४८, ( ५ ) पद्मचिद्घन कृत परिसाभागवतचरित्र व ( ६ ) नागनाथचरित्र, ( ७ ) एकनाथ कृत शकुन, अर्जदास्त, दिवाण, जोहार-दिवाण प्रकरणाचे शेवटीं लेखनकालाचा सन ११९४ म्हणजे शक १७१५ दिला आहे, ( ८ ) मद्राचळ रामदास यांचीं वरगांतील मार्पत पदें, तीं समजावून घेतलीं पाहिजेत, ( ९ ) माणकोजीयोधलाचरित्र-ओ. सं. २४, ( १० ) जनस्थापकृवें माधववचनें चूर्णिका, ( ११ ) शुचि नाहीं बुद्धि नाहीं ।, ( १२ ) धरवेतुमंग-ओ. ४८, ( १३ ) भावार्थरामायणांतील दशरथ-कौसल्येचें लग्न-ओ. ७६, ( १४ ) कृष्णदासयाज्ञवल्की कृत रुक्मांगदाख्यान – ओ. १४१, ( १५ ) कथाकल्पतरूंतील कृष्णचरित्र-ओ. १७७, ( १६ ) जयरामसुत कृत द्रौपदीचा धांवा, ( १७ ) रामसुतात्मज कृत गोपीचंदाख्यान – बहुत सगें, काहीं मराठी मार्पत व काहीं हिंदुस्थानी, ( १८ ) अवधूत कृत गोपीचंदचरित्र-हिंदुस्थानी, ( १९ ) गोरक्षमच्छींद्रसंवाद-अपूर्ण, ( २० ) भीमराज कृत अवधूतसाधुसंवाद, ( २१ ) गोपीचंदाची कथा-मराठी श्लोक-संख्या १०१, ( २२ ) कृष्णाष्टक-गुरुकृपे वरद केशव शंकराला ।, ( २३ ) जानकीविरह-श्लोक २१ अपूर्ण, ( २४ ) बाळदास कृत श्रीपद्मनाभचरित्र-श्लो. ८१, ( २५ ) आनंदनंदन कृत नौकाचरित्र-श्लो. ४९, ( २६ ) अनंत देव कृत चिल्हाळचरित्र-श्लो. ४१, ( २७ ) शेळगांवकर जीव कवि कृत कचोपाख्यान-श्लो. ४३, मागील बाडाकें १२०५ पहावें, ( २८ ) आनंदनंदन कृत शिवरात्रीचरित्र-श्लो. ९८, ( २९ ) पंचाक्षरीचरित्र-श्लोक ४४, ( ३० ) भिल्लचरित्र-अपूर्ण.

महाराष्ट्र दोहरे

बाहाचीं पुढचीं पृष्ठें नष्ट. बाबाची आठ पृष्ठें ओलांडल्यावर कांहीं महाराष्ट्र दोहरे लागले, त्यांनीं माझा फार वेळ घेतला, तेव्हां वाचकांचा थोडा वेळ घेण्यास मला हरकत नसावी :

## महाराष्ट्र दोहरे

संतसज्जना सद्गुरु टाकुन होउं नको बेकाम ।
परत परत किति विषई रमसी भज भज आत्माराम ॥ १

प्रपंच अवघा विरहुनि पाहतां दिसतो या निस्सार ।
आत्तुनि परतुनि पाहतां वाटे राम नाम येक सार ॥ २

नको नको रे मृगजळडोहीं देउं नको बहु बुडी ।
मारी मारी छौकारि सखया रामरूपीं उडी ॥ ३

पोट भराया हरिनामाचा मांडुनिया बाजार ।
फटवीत फिरतो कें येक त्यावरी साराची पैजार ॥ ४

आत्मानंदश्रीगुरुचरणीं ठेउनिया माथा ।
शरण येठिया तरसिल बापा वरफड भवभय गाथा ॥ ५

थोर थोर पंडित करितो वेदांतीं चटपट ।
नामस्मरणावांचुनि सखया अवघी ते खटपट ॥ ६

आळ साय तो आयवट येउनि ग्वाहल तुझें शिर ।
काय पाहसी जनवन सोडुनि मोक्षमंदिरीं शीर ॥ ७

मार्गे नाम स्मरतां पापें होती दाणादाण ।
येथें संशय नाहीं नाहीं गुरुचरणाची आण ॥ ८

नाना जपतपसाधनरानीं जाउं नको छोवत ।
अखंड नाम स्मरतां घों घों वाजतसे नौबत ॥ ९

नामस्मरणीं चित्त वेधलें होतो भला थाट ।
बोलूं जातां सखया माझा कंठ दाटतो दाट ॥ १०

कसा तरूं मी म्हणउनि सखया लाउं नको कटकट ।
नाम स्मरतां बंध अवघे तुटती रे तटतट ॥ ११

नाम स्मरतां प्रपंच अवघा होतो पंढरपूर ।
मग तो पाहे जिकडे तिकडे चैतन्याचा पूर ॥ १२

सांडुनिया धान्याची रासी कोण भरी रे फोल ।
राम नाम सोडुनि सखया काय बोलसी बोल ॥ १३

घरिवरि दिसतो बरवा साधु अंतरिंचा खोटा ।
चोर आड पाहुनि त्याला तेथें नेउनि कोटा ॥ १४

मळती संगत धरोनि न करी येडे येडे चार ।
सज्जनसंगत धरोनि करी या सारासारविचार ॥ १५

येकमेका पाहुनि अवघे करिती नाना कर्म ।
सद्गुरुचरणीवांचुनि तयाचा ठाई न पडे धर्म ॥ १६

१२५५ ] बाड–पृ. सं. २१ × २ = ४२ [ १७५

( १ ) चंद्ररेखाचरित्र—श्लोक, आर्या, पदें मिळून ग्रंथसंख्या २४१, शेवट :

जयाच्या नामानें प्रतिभयकलीचीकळसरे ।
सरेनाहींज्याचें सकळ त्रिदशां जो कळस रे ।
सरेना जो माथें पशुपतिशरीं ध्यावा कळश रे ।
सरें युक्तीच्या या हरि चि करि ग्रंथा कळस रे ॥ २१०

श्रीमद्भोसलवंशमौक्तिकशिवशमरगजारीकुमाराभवानी ।
त्यालेतेंचीचपेउदानुचक्षमरगजारीकुमाराभवानी ।
नावें तो भोसलीयान्वयजलधिविधुश्रीप्रतापेंद्रभूप ।
गर्जे माडोनिपूर्णांकरिहरिकृति हे सुप्रतापेंद्रभूप ॥ २११

इति श्रीमद्भोसलीयान्वयसुधारत्नाकरानंदक पूर्णचंद्रायक श्रीप्रतापेंद्र-भूपालक । विरचित श्रीकृष्णचंद्ररेखाविलासनामक । ग्रंथ सटीक संपूर्ण

रामजिरामाजिद्दरतेन लिखितं

( २ ) तंजावरच्या प्रतापसिंह राजांची कारकीर्द. इ. स. १७३९ ते १७६३.

१२५६ ] बाड– ८ × २ = १६ [ ११५
किरकोळ

१२५७ ] बाड–पृ. सं. १२ × २ = २४ [ ११५
संस्कृत सुभाषितें

१२५८ ] बाड–पृ. सं. ६ × २ = १२ [ १०
रामसंत्राचे श्लोक

हरे राम हा मंत्र सोपा जपा रे।

१२५९ ] बाड-१० × २ = २० [ ११५
संस्कृत सुभाषितें

१२६० ] बाड-पृ. सं. ३० × २ = ६० [ १००

मुकुंदराज कृत परमामृत-चवदा हि प्रकरणें-ग्रं. स. ३२५

१२६१ ] बाड-पृ. सं. १० × २ = २० [ १००

वांछेश्वरसुधीविरचितं लुलायशतकं- श्लो. १०२

हें एक ऐतिहासिक प्रकरण संस्कृत भाषेंत आहे.

श्रीमत्कोसलवंशदुग्धजलधेः संपूर्णचंद्रोपमो
यः शास्ति क्षितिमक्षतिक्षितिपतिमूर्तः प्रतापः स्वयं।
दीर्घायुर्जितशत्रुरात्मजयुतो धर्मी प्रजारागवान्
लायोस्तुसनिस्तुलैर्निजसभास्तारैः क्रमादागतैः ॥ १०१
राजा धर्मपरः परस्परधृतस्नेहाश्रतन्मंत्रिणो
राजन्यस्यवनीवनीपकजना भजा भजंतु क्षितौ।
पुष्टांगाः पशवश्चरंतु भजतां दुर्भिक्षवार्ता क्षयं
वांछानाथकवेः कृतिश्च कुरुतां निर्मत्सराणां मुदं ॥ १०२

१२६२ ] बाड-पृ. सं. ११ × २ = २२ [ १२५.
किरकोळ बाड

( १ ) हिरण्याक्षहिरण्यकशपूस शाप, ( २ ) प्रल्हादचरित्र, ( ३ ) अक्रूरआगमनचरित्र, ( ४ ) राममंत्राचे चार संस्कृत श्लोक

१२६३ ] बाड-पृ. सं. १० × २ = २० [ १००

( १ ) नरहरिनाथपदीं लीन महिपति, त्या महिपतीचीं नऊ सुंदर पदें, एक ज्ञानदेवांचें, एक रामचंद्रसुतकृष्णसहोदर यांचें व एक बाळकृष्णाचें ' जित चि मी मेलों ' हें पद

१२६४ ] बाड-पृ. सं. २९ × २ = ५८ [ ११५

( १ ) श्रीसमर्थ, श्रीरेश्वर, तुका, एकनाथ, केशव, ज्ञानदेव, उ. चि., कृष्णदास जयराम, रामनाथ, कबीर, आनंदतनय, चोखा, मध्वमुनीश्वर, पंडितराम, परमानंदसुत यांचीं पदपदातें

( २ ) उद्धवचिद्घन कृत गोराकुंभाराचें व परिसाभागवताचें चरित्र

( ३ ) जयरामसुत कृत संतनामावळी

१२६५ ] किरकोळ वाड-८ × २ = १६ [१००

सीताकल्याण

१२६६ ] किरकोळ वाड-१२ × २ = २४ [१००

चर्पटपंजरिकास्तोत्र

१२६७ ] वाड-पृ. स. १४ × २ = २८ [१२५

गोपीगीता व कर्णामृत अशीं संस्कृत प्रकरणें

१२६८ ] वाड-२३ × २ = ४६ [१००

किरकोळ

श्रीसमजन्माचा काहीं भाग, शिवाय दोन मोठी पत्रें उतरलीं आहेत.

१२६९ ] वाड-२३ × २ = ४६ [१२५

कृष्णलीलापर, तुलसीदास, अमृत इत्यादि किरकोळ

१२७० ] वाड-१६ × २ = ३२ [१००

नामदेव, गुरुदास, प्रल्हादचरित्र, इत्यादि किरकोळ

१२७१ ] वाड-पृ. ८३ × २ = १६६ [२०

श्रीरामपाणमाना, रस, भस्म करण्याच्या क्रिया, औषधें, तोडगे विजयगुटिकाप्रयोग इत्यादि वैद्यशास्त्रातील विषय, दारूचें जीनस, प्रचारांत आहेत त्याहून अगदीं निराळीं सूर्यनमस्कारांचीं बारा नावें, इत्यादि

**१२७२]** बाड–१८ × २ = ३६ [155
करपीनें दुर्दशा केलेलें

श्रीसमर्थ, एकनाथ, उद्धवचिद्धन व महादेवात्मज यांचें एक एक पद

**१२७३]** बाड–१५५ × २ = ३१० [150
महत्त्वाचें

हें बहुतेक बाड अवधूतांकित सदाशिव यांच्या प्रकरणांचें व पदपदांतरांचें आहे. हीं बहुतेक प्रकरणें संस्कृत असून प्रत्येक संस्कृत श्लोकाचें मराठींत एक श्लोक व एक पद असें भाषांतर केलेलें आहे. कांहीं प्रकरणें मला समगली नाहींत. एकंदर प्रकरणें क्रमशः अशीं :

( १ ) तारावळी–श्लोक ४ ते २७, मराठी समश्लोक व समपद. (या प्रकरणांत गुणत्रयलक्षण, ज्ञानलक्षण, अज्ञानलक्षण, ईश्वरलक्षण, जीवेश्वरैक्यलक्षण, स्वरूपध्यानलक्षण, समाधीलक्षण, जीवन्मुक्तलक्षण इत्यादि विषय आले आहेत. शेवटचा श्लोक :

स्वयं मनोहराद्वैतं तारावल्युत्तमं ।
श्रद्धया धार्यते येन स ब्रह्मानंदमश्नुते ॥ २७

टीका–*श्रीमच्छंकरवर्यवाक्यमधुर हे अद्वैततारावळी ।*
*म्हाळी रम्य म्हणोनि स्पष्ट रचिली त्याची च टीकावळी ।*
*सद्भक्तीं नर भावकें पठण ही जो कां करी सर्वदा ।*
*त्याला ऐक्य घडे सदाशिव सदा ब्रह्मत्व भावी तदा ॥ २७*

पद— तारावळी रम्य हे अद्वैत । श्रद्धाभक्ती धारी जो नेमस्त ।
तो चि ब्रह्मपदीं राहे स्वस्त । सदाशिव आत्मत्वीं नांदत ॥ २७
ऐसा जो कां गुरुपदीं तल्लीन । सहजीं तो ब्रह्मीं होय लीन ॥ ध्रु०

( २ ) आचार्यस्वामी कृत देहनिंदा व प्रबोधसुधाकर–देहनिंदा. मूळ आर्या व श्लोक, समश्लोक आत्मारामांचे व पदें आनंदात्मज, उधोबावा ( म्हणजे उद्धवचिद्धन ), भीमराज, सहजनाथ, शिवदिन केसरी व अवधूतांकित सदाशिव यांचीं.

( ३ ) बाह्येंद्रियप्रकरण, पुत्रेषणा, द्रव्येषणा, मायानिंदा, कर्तृत्वभोक्तृत्व, स्वपरप्रकाश, नादानुसंधान, मनोलीन, प्रबोध, द्विविधाभक्ति, सगुणनिरोपण,

इत्यादि विषयक संस्कृत श्लोक व त्यांचे सदाशिव कृत समश्लोक, आणि समपदें. एका पदांत

कोनेरीनंदन सदाशिव रे । लाहुनि गुरुरद तरला भव रे ॥
असा उल्लेख आहे.

(४) सदाशिव कृत मनीपापंचक सटीक
(५) ज्ञानेश्वरीतील ओव्या व त्यांच्या आधारावर पदें
(६) राम जनार्दन कृत ज्ञानराजाची आरती
(७) अपरोक्षानुभूतीवर पदें
(८) शिवराम पूर्णानंद कृत प्रदोषकथा

१२७४ ] बाड–६ × २ = १२ [१००

(१) श्रीधर कृत विराटपर्वातील दुर्गास्तोत्राचें प्राकृत रूपांतर, (२) संस्कृत मीनाक्षी अष्टक, (३) हरिकवि कृत कनकपद्य.

१२७५ ] बाड–पृ. १८ × २ = ३६
वरीं च पृष्ठें नष्ट [२००

तत्वज्ञान, संवत्सरफळ, उदयास्त.

१२७६ ] बाड–पृ. सं. ९३ × २ = १८६
कसरीनें मधून मधून खाल्लेलें [२००

(१) श्रीसमर्थ, चौंडा शंकर, मेरु, श्रीधर, वापरखुमादेवीवर, केशव, भीमराज, उद्धवचिद्घन, गोपालनंदन, (रेणुकेश्वर), यांची पदपदांतरें

(२) यांत एकट्या मेरुस्वामींची च क्रमशः १ ते १२०, पदपदांतरें आहेत. त्यात दोन चार श्लोकबद्ध प्रकरणें आहेत. अशा एका प्रकरणाचा शेवटचा श्लोक :

गुरु राम सो आमचा आदि जाणा । मरोधी समर्थासि पैं योगिराणा ॥
समर्थें अनंतासि जो बोध केला । अनंतें सुमेरु सुखें बोधवीला ॥

(३) "मनाची श्लोक २०१ पान २७" असा, मथळा, पाहून

२७ पृष्ठें मनाचे २०१ च श्लोक आहेत. आपल्या प्रकाशित प्रतींतील ४९ वा, ८५ वा, ११४ वा व ११८ वा असे चार श्लोक यांत नाहींत. शेवटीं " श्रीसद्गुरु सेतुराज प्रणमस्तु " असें आहे.

( ४ ) शेवटीं " भारती संप्रदायक ॥ ११ सं १६ भोते " अर्था मयळ्याखालीं श्रीसमर्थ कृत गणेश, शारदा, वेंकटेश, पांडुरंग, रमारमण म्हणजे श्रीकृष्ण, पंकजनयन म्हणजे विष्णु, मल्हारी, शिवशक्ति, रघुनाथ, हनुमंत, सद्गुरु यांवर आरत्या आहेत.

( ५ ) आरंभींचीं आणि शेवटचीं कांहीं पृष्ठें गेलीं आहेत.

१२७७] घाट–पृ. सं. २४ × २ = ४८ तीन गड्डया [१००

तुकारामांचे अभंग, मध्यें च एक श्रीसमर्थांचा

१२७८] घाट–पृ. सं. ५७ × १ = ११४ कांहीं पृष्ठें नष्ट [१६६

( १ ) रामरक्षेवेंकीं कांहीं भाग व संस्कृत सुभाषितें

( २ ) श्रीसमर्थ कृत वरीं च प्रकरणें. यींत हनुमंतासी हुंबैर । इत्यादि प्रकरण पिंगळा म्हणून प्रकाशित आहे, त्यास या बाडांत स्वरयंदा म्हटलें आहे. चतुर्थमान म्हणून जें प्रकरण आपल्या तिसऱ्या भागांत आलें आहे, त्यास यांत चतुर्थयोग म्हटलें आहे. शिवाय

( ३ ) गोंवर्धनदन, मउका, पंडित, सुरदास, नरहरि, दासानुदास रंक यांचीं पदपदांतरें.

तुझी आवडी दे मज दीना

हरि तुझी आवडी दे मज दीना ।
संतसज्जन ध्याती निशिदिन तुजला ते मति दे मज दयाळा ॥ ध्रु०

तूं माझा माय बाप धन विद्या गण गोत सर्वस्व तूं मज आस ।
तुजवीण मजला कोणी च नाहीं याजलागीं तुज विनवीत ॥ १

थोर थोर तुझे दास अपार मी काय रे तेथें पामर ।
दीनदयानिधी म्हणविसी जरी तरी कां माझा विसर ॥ २

हीनदीनजनपतितपावन नाम तुझें ब्रीद गाजे ।
दासानुदास रंक अनन्य शरण दे मज भजन तुझें ॥ २

१२७९ ] बाड–पृ. सं. ३८ × २ = ७६ काहीं नष्ट [ १५

ज्योतिषाचें बाड. प्रश्न, फल, योग, मुहूर्त, वगैरे पाहावयाच्या रीति.

१२८० ] बाड– पृ. सं. ६६ × २ = १३२ विचित्र बाड [ १००

त्यांत ७०।७५ जारणमारणस्तंभनमोहनादि मंत्रयंत्रतंत्रांचे प्रयोग दिलेले आहेत. श्रीरामानंदगुरु, बेंगळूरईश्वरजी, खादरसाहेब, नागपट्टणनागलिंग पंडाराम, श्रीनिवास कवि, इत्यादिकांनीं हे मंत्रादि सांगितले आहेत, असें म्हटलें आहे. " ते अनुभवसिद्ध आहेत, संदेह नाहीं, सत्य " असें आश्वासन दिलें आहे. मराठी, गीर्वाण, हिंदुस्थानी, कानडी अशा चार भाषा उपयोजिल्या आहेत. हें बाड वाचून जिज्ञासूची करमणूक होईल व तत्कालीन लोकांच्या मनःस्थितीची त्यास कल्पना होईल.

१२८१ ] दोन बाडें–पृष्ठसंख्या ४६ + ३८ = ८४ × २ = १६८ [ १५०

हजारों संस्कृत शब्दांचे मराठी पर्याय. हे शब्द बहुधा पंचदशींतील असावेत. तत्कालीन अभ्यासकाच्या जबर व्यासंगाचा हा पुरावा होय.

१२८२ ] बाड–पृ. सं. ४८ × २ = ९६ मुळचीं पृष्ठें १२० × २ = २४० होतीं [ १११ मध्यभागांतील पृष्ठें गेलीं

मूळच्या ११२ व्या पृष्ठावर नामस्मरणाचा समास बाळबोध लिपींत उतरलेला आहे, बाकी सबंध बाड गुजराथी लिपींत लिहिलेलें आहे. पृ. १४ वर " संवत १८५८ वैशाख शु. २ " ही मित्ती दिलेली आहे.

१२८३ ] बाड–पृ. सं. ४८ × २ = ९६ [ १००

( १ ) श्रीसमर्थ, विसा खेचर, कान्होबा, तुकाराम, नाथ गोपाळ, केशव, शि. के., एकनाथ, जनी, मुकुंद ( मुनी, राज, राजयोगी ), ज्ञानदेव,

चांगदेव, निवृत्तिनाथ, मुक्ताबाई, महिपति, सोपानदेव, आत्माराम, देवदासांकित, उद्धोप, भीमराज, रामनाथ, मेरु, नामदेव, चोखा, इत्यादिकांचीं पदपदांतरें

( २ ) एकनाथ कृत दशांगुळप्रकरण-ओ. १६

( ३ ) महावाक्य-ओवी १५, ( ४ ) पंचीकरण,

( ५ ) केशव कृत गोपीगीत-श्लो. १७

**१२८४ ]** बाड-पृ. सं. ५८ × २ = ११६ [ १५०

( १ ) श्रीसमर्थ, नृहरिसुत वीरेश्वर, गोविंद बाळ

( २ ) आनंदनंदन कृत ताटिकावध-प्र. सं. ११

( ३ ) वंशावळी-दशरथाची, ओवी २५ व जनकाची, ओ. १४

( ४ ) हें बाड मुख्यतः वीरेश्वरांच्या कवितेचें आहे. त्यांच्या पदपदांतराचा विशेष भरणा असून शिवाय त्यांचीं प्रकरणें आहेत, तीं अशीं :

( दा ) श्रीरामाष्टक-आर्या, ( स ) गणपति, राम व भगवद्गीता यांच्या आरत्या, ( वि ) हळदुडणें, ( आ ) सीताकल्याण-श्लो. ४७, ( म ) पंचाक्षरीमाहात्म्य-आर्या ३६, ( घा ) श्रीवेंकटेशदशक-श्लो. १० व ( म ) कौसल्येचे डोहळे-श्लो, २१.

गीतेची आरती

जय जय श्रीभगवद्गीते । उपनिषदर्थभूते ।
परिहृतस्वभक्तदुरिते । सर्वलोकविख्याते ॥ ध्रु०
पार्थावें निमित्त करूनी । संस्कृत रूप धरूनी ।
पूर्वी कृष्णमुखापासुनी । प्रगटलीस या भवनीं ॥ १
या युगीं ज्ञानदेव । स्वयें होता वासुदेव ।
भाषारूपें आविर्भाव । तुझा जाला आमुच्या दैवें ॥ २
कांडत्रय आणि योग । प्रतिपादुनी सांग ।
ज्ञानदेवी नाम चांग । मिरविसी अव्यंग ॥ ३
संप्रदायें जे पढती । ते जन जीवन्मुक्त होती ।
वीरेश्वर म्हणे कीर्ति । तुझी वानूं मीं किती ॥ ४

(५) शेवटच्या पृष्ठावर मंत्र व यंत्र

# १२८५] पाठ-पृ. सं. ४४ × २ = ८८ {१०१

(१) निरनिराळ्या तालावरील ३०।३५ पदें गाण्यासाठीं म्हणून दिलेलीं आहेत.

(२) निरनिराळ्या कर्त्यांच्या प्रकरणांतील पदपदांतरांचीं ओवखरें दिलीं आहेत.

(३) या बाडाचा विशेष म्हणजे त्यांत आर्या, श्लोक, दिंडी, साकी मिळून ग्रन्थसंख्या ६६ यांत एक संपूर्ण श्रीसमर्थचरित्र आणलें आहे. त्याच्या कर्त्याचें नांव दिलेलें नाहीं. पण तें श्रीमत्स्वामींच्या परंपरेंतील कोणी तरी रचलें असावें. त्यांत आलेले उल्लेख संक्षेपानें असे :

सुर्याजीपंत × रेणुकाबाई, यजुर्वेदी, जमदग्नी गोत्र, सुर्याजीपंतास सूर्याचा वर, लग्नांतून पळाले, टाकळीस गेले, तेथें मारुतीची स्थापना, उद्धवास तेथें ठेवले, दत्तु नाविक जवळ असे, शिवरायास भेट व अनुग्रह लवकरच,

श्रीसमर्थ रामदास । होउनियां मनीं उदास ।
त्यजुनि विषयसुखमदास । विवाहासि उबगले ॥ ३२
इच्छुनि स्वात्मसुखपदास । भक्तचातकांबुदास ।
स्मरत रघुपतिसुपदास । द्वय मास विसावले ॥ ३३
इच्छुनि जननमृतिविनाशास । फिरति न गणुनि विपदास ।
उद्धरावया स्वदास । शाहपुरास पातले ॥ ३४
तेथें ते कमलाजिपंतमहिला श्रीसाजिपंतात्मजा ।
गंगाबाई असे

तिला अनुग्रह,

सत्सुख तोषा त्यांपि सुख नाना पिरतियरं इच्छाजी ।
त्या दिधली ते सुपदा रामभजनसंपदापमुद्रा ही ॥ ३७

कल्याणाची गोष्ट, अक्काबाई, वेणाबाई,

शिवनृपविरक्ति पाहुनि तद्बोधास्तव चि विरचिलें ग्रंथा ।
श्रीदासबोध नामक मुमुक्षुंसी मक्तिचा सुगम पंथा ॥ ४४
त्यावरि चाफळखोरीं सत्युत्तमस्थानकांसि पाहुनियां ।
मूर्ति स्वकमणसह रघुकुळवरमूर्ति प्रतिष्ठुनियां ॥ ४५

केला महदुत्सव तो राघव जनिचा न वर्णवे वाचा ।
दासें मग प्रतिष्ठा केल्या त्यारा स्थळीं हरि भवाच्या ॥ ७१

मलयागेघराचा उद्धार, शिवरायांनीं परळीस नेले, परळीस सज्जनगड नांव पडलें, १६०३ माघ वद्य ९, उत्तराभिमुख बसले, शिवार त्रयोदशाक्षरांचा उच्चार

ते श्रवनीं अंतरीं जाणा कोंदाटली । ज्योती ते मिळाली रामरूपीं ॥

दुसरे दिनिं मस्तिलातिरें दगडाच्या पादुका पिलोकुनियां ।
शिष्यीं त्या च समाधीवरि ठेविदल्या यथोक्त पूजुनियां ॥ ११

संपूर्ण ॥ असें हें त्रोटक चरित्र आहे. मस्तित = रात्र

यजुर्वेदी म्हटलें आहे तें निर्विवाद चुकीचें आहे.

## १२८६ ]

बाड–पृ. सं. १०५ × २ = २१० [१५०
कांहीं नष्ट

( १ ) श्रीसमर्थ, नामा, मेरु, तुका, जनी, उ. चि.

( २ ) दासबोधांतील २ × १ व २ × २

( ३ ) कांहीं करुणाष्टकें व अंतर्भाव

( ४ ) कृष्णदाससुद्गल कृत युद्धकांडांतील अंगदशिष्टाई–प्रसंग १ ला–ओवी १०९, प्रसंग २ रा – ओवी ९७, प्रसंग ३ रा – ओं. ११८

( ५ ) देवदास कृत व्यंकटेशस्तोत्र – ओं. १४४

शेवटच्या दोन ओंव्या :

देवदास विनवी पुढतो पुढती । ग्रंथ केवळ हा भागीरथी ।
श्रवणमार्गें उत्तम गति । प्राणीमात्रास पैं होय ॥ १४३
राक्षसनामसंवत्सर वैशाखमासीं । बुधवार बहुळ तृतीयेचे दिवसीं ।
पूर्णता आली ग्रंथासी । श्रोतीं सावकाश परिसीजे ॥ १४४

( ६ ) सीतापते तुज कसी करुणा न ये रे ॥ श्लो. १०

( ७ ) गोपाळदास कृत पाळणा

## १२८७ ]

बाड–पृ. ११२ × २ = २२४ [२००
कांहीं नष्ट

हें तत्कालीन सबंध बाड श्रीसमर्थांच्या कवितेचें आहे. त्यांत क्रमशः प्रकरणें आहेत तीं :

(१) अंतर्भाव (स. ५ व ६), (२) सगुणध्यान-येनट इति श्रीदासबोधे ..., (३) निर्गुणध्यान, (४) आत्माराम, (५) पंचसमासी, (६), पूर्वारंभ (७) जुनाट पुरुष, (८) ५१२५ पदपदांतरें, त्यात कांहीं नवीन

१२८८ ] बाड-पृ. १३९ × २ = २७८ [११०
आ. चीं ३ व शे. चीं कांहीं नष्ट

(१) श्रीसमर्थ, उ. चि., आ. त., जगजीवन (वाल्मीकाची आचर बोली), तुका, कबीर, माधव, माधवसुत, केशव, मेरु, नाथात्मज, भीमराज, सद्गुरुदासानंद, पंडितराम, दास फकिर, यांचीं पदपदांतरें

(२) आरणीचा शिपाई कृत पूतनावध-श्लो. ३८

(३) उ. चि. कृत गोरा कुंभाराचें चरित्र

(४) वस्त्रहरण, रामजन्म, कृष्णजन्म हीं आख्यानें, त्यांत उ. चि., मध्वमु., जनजसवंत, मेरु, प्रतापराम, आ. त., अमृतेश्वर, केशव इत्यादिकांच्या पदपदांतराचा उपयोग केला आहे.

(५) नळोपाख्यान-समग्र आहे, त्यानें च बाडाचीं पाठपोट ५१ पृष्ठें व्यापिलीं आहेत. शेवटीं 'अक्षय नाम संवत्सर ज्येष्ठ मासि लिखित' इतकें आहे. माझी समजूत शक १७१८ असावा.

(६) गुरुदास कृत कालियामर्दन-प्र. स. ४३

(७) आ. नं. कृत शबरीचें आख्यान-प्र. सं. २३

(८) भीष्मप्रतिज्ञा-अपूर्ण, (९) कांहीं संस्कृत स्तोत्रें

(१०) मेरुस्वामींची थोडीशी ओळख

रामा !

रामा करुणेच्या सागरा कां रे आटलासी । पतितपावन आणि श्रीमंतासी ।
अनाथाच्या नाथा बिरुद पायविसी ॥ ध्रु०

संसारीं गांजिलों तुज शरण आलों ।
अंगिकें तेणें थोर सुखी जालों ।
आइरितां मागुती दुखें आजापलों ॥ १

आपुलें म्हणवुनि त्यासी उपेक्षावें ।
बुडतेया काढवुनि पुन्हा बुडवावें ।
देवा हें कर्तव्य तुज बरें नोहे ॥ २

समर्थ म्हणउनि स्वधर्म विश्वासलों ।
प्रपंचाची भूली करुनी प्रस्तावलों ।
अतां ना परत्र मेरु उघावलों ॥ ३

हें खरें नव्हे, असें कधीं होत नाहीं, कधीं झालें नाहीं. एकदा दिलेला शब्द कोणी परत घेतलेला नाहीं व एकदा धरलेली कांस कधीं कोणी सोडली नाहीं. पूर्ण समाधान होण्यासाठीं आपली कांहीं पाहिजे असतें म्हणून हें प्रेमाचें बोलणें आहे, तें परमार्थतः ध्यावयाचें नसतें.

१२८९ ] बाड- ६३ × २ = १२६ [ ५१
किरकोळ

( १ ) श्रीसमर्थ, तुकाराम, अमृतेश्वर, केशव, प्रतापराम, रामचंद्रात्मज, आनंदसुत, मध्वमु०, श्रीधर, गो. नंदन, शिवराम यांचीं पदपदांतरें

( २ ) भीष्मप्रतिज्ञा-अपूर्ण

( ३ ) वीरेश्वर कृत त्रिपुरसंहार-प्र. सं. ११

१२९० ] बाड-पृ. १० × २ = २० [ १००

( १ ) वत्सापहरण, ( २ ) उषाहरण-अपूर्ण

१२९१ ] बाड-४७ × २ = ९४ [ १०
अलिकडचें

( १ ) एकनाथ, उद्धवलिंग, तुकाराम, बाळ, मेरु, गोविंद कवि, रामचंद्र, गिरिधर, मध्वनाथ, मोरोपंत इत्यादिकांचीं पदपदांतरें, ( २ ) कांहीं संस्कृत सुभाषितें व स्तोत्रें, ( ३ ) विठ्ठलकवीचे दोन कूटात्मक श्लोक, आपल्या पाठांतरांत आहेत त्याहून निराळे.

१२९२ ] बाड–१४ × २ = २८ [ १००

दोन आख्यानें–( १ ) कर्णयुद्ध, ( २ ) सुदामचरित्र

१२९३ ] बाड–पृ १२ × २ = ६४ [ १००

( १ ) पुजावरकडील श्रीसमर्थसांप्रदायिक दैनंदिन उपासनापद्धति, ( २ ) केकावली, ( ३ ) भामाविलास, ( ४ ) कृष्णलीला, इत्यादि

१२९४ ] बाड–४१ × २ = ८२
इतकीं च आणखीं नष्ट [ १००

( १ ) या बाडाचा सात अष्टमांश भाग देवनागरी लिपींत पण तर्मातीय भाषेंत आहे, ( २ ) उरलेल्या भागात श्रीसमर्थ, मध्वमुनीश्वर, कृष्णदास, अमृत, केशव यांचीं पदपदातरें, व ( ३ ) श्रीरामाचे तीन पाळणे, त्यांतील एक दास विठ्ठल कृत आणि ( ४ ) मुद्रिका आख्यान.

१२९५ ] बाड–पृ. स. ७१ × २ = १४२ [ १००

वाल्मीकिचरित्र, वराघवली, दशरथविवाह, दशरथप्रताप, ऋष्यशृंग, कैकेयीचे डोहळे, सुमित्रेचे डोहळे, कौसल्येचे डोहळे, रामजन्म ( चूर्णिका ), ताटिकावध, शिवपार्वतीसंवाद, अशीं हीं या बाडात आख्यानें आहेत. त्यांचा मुख्य आधार श्रीसमर्थ आणि एकनाथ यांचा घेतला असून इतरांचीं पदपदातरें मधून मधून योजिलीं आहेत.

१२९६ ] बाड–७९ × २ = १५८ [ १००

( १ ) वस्त्रहरण, ( २ ) आनंदनंदन कृत वाटिकावध–श्लोक. ११ व ( ३ ) यज्ञसरक्षण–श्लो. २२, ( ४ ) अहिल्योद्धरण, ( ५ ) रामजन्म, ( ६ ) वामन कृत राधाभुजंग–श्लो ५४, ( ७ ) रासक्रीडा–श्लो. २६, व ( ८ ) वर्णपद–श्लो २६, ( ९ ) गुरुदास कृत कृष्णजन्म, ( १० ) प्रल्हादचरित्र

## १२९७ ]

बाड-पृ. २२ × २ = ४४ [ १००

( १ ) शृंगारसारपद्यान्येव लिख्यते-प्र. सं. १२६, ( २ ) इतर सुभाषितें

## १२९८ ]

बाड-पृष्ठें ८ × २ = १६ [ १५०
आरंभाचीं आणि शे. चीं काहीं नष्ट

भीमस्वामींच्या चरित्राचा कांहीं भाग. महत्त्वाचा आहे. कांहीं प्रकाशित हि झालेला आहे. तथापि त्यांच्या संप्रदायिकाचीं चरित्रें लिहितांना एकवार यत्नपूर्वक पहावला पाहिजे.

## १२९९ ]

बाड-पृ. १५७ × २ = ३१४ [ ५६
सलिकडचें

( १ ) हें बाड दोन्ही बाजूंनी लिहिलेलें आहे. त्यांत श्रीसमर्थ, नामदेव, केशव, तुकाराम, रामाजनार्दन, अमृत यांचीं पदपद्यांतरें आलीं आहेत.

( २ ) एका बाजूच्या ४ थ्या पानावर बहुधान्य संवत्सराचा उल्लेख आहे व १८ व्या पानावर प्रमाथी संवत्सर आषाढ शु. १५ गुरुवासर अशी शकमिती दिलेली आहे. म्हणजे शक १८०० व १८०१ हे शक येतात. या दोन्ही शकांच्या चातुर्मासांत विष्णुबावा यांनीं ज्या कथा केल्या त्या कोणी उतरलेल्या आहेत.

( ३ ) दुसऱ्या बाजूला हि कांहीं पदपद्यावरें असून पृष्ठ २१ ते ७० गाण्याचे निरनिराळे राग आणि ताल हीं दिलेलीं आहेत.

( ४ ) एका बाजूच्या ३ ऱ्या पानावर ' होते वैकुंठींचे कोंनी ' हें पद दिलेलें आहे. त्या पदाचें शेवटचें कडवें आपल्या पाठांत आहे तें

> सर्वां भूतांचें हृदय । नाम त्याचें रामराय ।
> रामदास नित्य गाय । तें चि भूत गे माय ॥

असें, पण येथें त्या ऐवजीं कडवें आहे तें असें :

> शशिप्रानें शृंगारिलें । सिंहासनीं बैसविलें ।
> रामदासासी लागलें । तें चि भूत गे माय ॥

( ५ ) दुसऱ्या बाजूच्या शेवटीं उपासनेविषयीं ९ ते ११ ओंव्या आहेत, त्यांत मंत्राविषयीं आरंभींच्या दोन ओंव्या अशा :

मंत्रामाजी उत्तमोत्तम । जो शंकराचा जप निरसीम
सहस्रनामा तुल्य परम । श्रीराम ऐसें ॥ ९
ज्या मंत्रीं मकार तीनी । श्री अधिष्टान जाणिजे जनीं ।
नामत्रय जयत्रय मिळोनि । मंत्र हा पावन ॥ १०

## १३०० ]

गळांठा-त्रुटित पत्रें [१००-१५०

(१) दास कृत गणराज गजानन गावा हो ॥ ध्रु०, (२) चिपळोळा-सोमवारचरित्र-तीन पत्रें, (३) अनंतदेव कृत गोपाळकाला, (४) मोरोपंत कृत, (५) रामहिमकर कृत भारतातील एक कथाभाग, (६) गिरिधरकवि कृत पंढरीमाहात्म्य, (७) किरकोळ

## १३०१ ]

पोथी-पत्रें ७७ [१०९

### अनंतदेव कृत पांडुरंगमाहात्म्य

पांडुरंगमाहात्म्याचे पांच सात ग्रन्थ प्रसिद्ध आहेत, पण हा ग्रन्थ अप्रकाशित आहे, असें वाटतें. तो ओवीबद्ध असून त्याचे बारा अध्याय आहेत. प्रकाशना योग्य.

धातु नाम संवत्सरीं । आश्विन शुद्ध नवरात्रीं ।
मूळ ग्रंथाची ते वरी । टीका संपूर्ण जाहली ॥ १२-६२

## १३०२ ]

पोथी-पत्रें ८
पैकीं ५ वें नष्ट [१२५

### माधवी ग्रंथ

म्हणजे एकवीससमासींतील अकरावा समास. या एकट्या समासाच्या प्रती स्वतंत्रपणें माधवी ग्रन्थ म्हणून तंजावरकडे सांपडाव्या व त्या, सर्वांत शेवटची ओवी

स्तुति होतां आनंदेल । तो निंदा होतां रडेल ।
या दोहींमध्यें न सापडेल । तो चि धन्य जगीं ॥ ६३

ही असावी, या बाबी विचार करण्याजोग्या आहेत.

१३०३ ] पोथी-पत्रें २६ [ ११५

प्रतापसिंह कृत पंचभाषामणी-सटीक

( १ ) हे प्रतापसिंह तंजावरच्या अमरसिंह राजाचे पुत्र होत. पण त्यांना कांहीं अमरसिंहांची गादी मिळाली नव्हती. अमरसिंहांची कारकीर्द इ. स. १७८७ ते १७९८ झाली. १७९८ त अमरसिंह पदच्युत होऊन इंग्रजांचे लाडके सरफोजी राजे गादीवर आले. अमरसिंह इ. स. १८०२ त मृत्यु पावले व त्यांचे पुत्र प्रस्तुतच्या ग्रन्थाचे कर्ते – प्रतापसिंह–इ. स. १८४९ त निवर्तले. त्यांचा हा ग्रन्थ.

( २ ) ग्रन्थ अपूर्व आहे. श्लोक, आर्या मिळून ग्रंथसंख्या अजमी ४० आहे, पण तींत महाराष्ट्र, द्राविड, आंध्र, हिंदुस्थानी आणि गुजराथी अशा पांच भाषा उपयोगांत आणिल्या आहेत. बारा भाषा जाणणारे जयराम पिंड्ये यांच्या राधामाधवविलासचंपू या ग्रन्थाची आठवण होते. एक गोष्ट मनांत भरते, ती अशी कीं, तंजावरचें सर्व राजघराणें विद्येचे अति अभिमानी होतें. तो अभिमान सातारच्या राजघराण्याच्या वाट्याला तितकासा आलेला दिसत नाहीं. या दोन्ही घराण्यांचे आणि अभिमानाचें हि उगमस्थान एक च – शहाजी महाराज. मग ही विद्याभिरुचि बंगळूरच्या दक्षिणेस मात्र उतरली आणि उत्तरेस चढली नाहीं, ती कां, याचें कारण शोधलें पाहिजे.

( ३ ) ग्रन्थ प्रकाशित व्हावयाचा असेल तेव्हां होवो. तोंवर त्याची कल्पना व्हावी, म्हणून आरंभींचा भाग आणि शेवटचा श्लोक टीकेसह देतों :

" श्रीमान् अमरसिंह भूपालकात्मज श्री प्रतापसिंहमहाराजाख्यकवीश्वर॰ चिकीर्षित ग्रंथास निर्विघ्न परिसमाप्तिकारणें । शिष्टाचारेंकडून अनुमित श्रुतीनें अवश्य कर्तव्यते तें पावदया येता । श्रीगणेशादीष्टदेवताप्रार्थनादिरूप मंगळातें करून त्यासि शिष्यशिक्षार्थ स्वग्रंथमुखमार्गीं निबंधन करी ॥

श्लोक ॥ श्रीविघ्नेश्वर वंदिता शुभद ग्या कोण्ही जयावाणि ना ।
मोक्षुन् वासळरूपमै जगमुनन् सेविंतु आवाणिना ।
भक्तांद्द दुर्दश नोकि संतति महा संपत्ति गोपाळने ।
दाता ज्यो जनग्या उर्ले नमत मै ये ज्योंगकों पाळने ॥ १

# १३११ ]

बाड– पृ. ४२ × २ = ८४ — -[.७५

या संबंध बाडांत मेरु स्वामींचीं पदें, ओव्या, अभंग, दिंडी, सवाया, आरत्या वगैरे पदपदांतरें आहेत. फक्त पृ. ३३ वर एक पद गोसावीनंदनाचें व एक श्रीसमर्थांचें आहे. बाकी सर्व बाड मेरुस्वामींच्या पदपदांतरांचें आहे.

## [ १ ] स्वामी रामदास

स्वामी रामदास । त्याचा परमार्थवेश ।
वर्णितां न पुरे इत्यास । सीमा चि नाहीं ॥

वैराग्याचे कडके । ज्ञानबोधाचे धडके ।
जीर्णे मायेचें फडकें । फाटोनि गेलें ॥ २

नवमीचें साधन । आत्मनिवेदन ।
तेणें चि जालें निमग्न । आकळ गेला ॥ ३

राम आर्जविला । देव सकळांसी झाला ।
पाळिताहे भक्ताला । भक्तीच्या योगें ॥ ४

स्वामीपासुनी संत । झाले असंख्यात ।
त्या हि मध्यें अनंत । प्रसिद्ध माझा ॥ ५

स्वामी अनंत मौनी । मेरु लागतो चरणीं ।
केली जन्माची खंडणी । निजरूपीं ठेला ॥ ६

## [ २ ] समर्थ स्वामी

समर्थ स्वामी सद्गुरु रामदास ॥ ध्रु० ॥

परब्रह्म निर्विकार । प्रत्यक्ष रामाचा अवतार ।
रुद्रस्वरूप साक्षात्कार । योगें बोधिलें सकळांस ॥ १

रामनामें चि साचार । केला विश्वाचा उद्धार ।
भक्ति नवविधा विस्तार । स्वानंदाचा चिद्विलास ॥

समर्थस्वामीचे अंकित । मौनी अनंत सर्वगत ।
शिष्य अनुभवी शाश्वत । अनन्य सन्मेरु विश्वास ॥

१३१२ ] बाड-पृ. १८० × २ = ३६० शेवटचीं बाहीं गेलीं [ १५०

प्रचंड, सुंदर, प्रेक्षणीय बाड. त्यात पुढील एकंदर प्रेचाळीस प्रकरणें आहेत.

( १ ) आनंदनंदन कृत राधाकृष्णविलास-श्लो. ४२, पा. १, कंदुकचरित्र-श्लो. ३६, पा. ७, सासूसमेचें नाटक (श्रीकृष्ण गोपीचरित्र)-श्लो. ३२, पा. १२, बालचरित्र-श्लो. १३, पा. १६, सीतास्वयंवर-श्लो. ७३, पा. ७८, ताटिकावध-श्लो. ३१, पा. ९१, यज्ञसंरक्षण-श्लो. ३८, पा. १००, शबरीचरित्र-श्लो. २३, पा. १०४, गणिकाचरित्र-श्लो. ११, पा. १०६, नौकाचरित्र-श्लो. ५४, पा. १०७, शिबिचरित्र-श्लो. ४१, पा. ११२, पर्णीचरित्र-श्लो. १३, पा. ११६, मार्कंडेयचरित्र-श्लो. ४८, पा. १२३, सुदामचरित्र-श्लो. ४२, पा. १३१, सेतुबंध-श्लो. ३१, पा. १६६

( २ ) नरहरिसुत कृत परशुरामचरित्र-श्लो. ३३, पा. १८

( ३ ) मोरोपंत कृत कृष्णजन्मचरित्र-आर्या २४, पा. २०, पूतनामोक्ष-आ. २०, पा. २१, गोपीवस्त्राहरण-आ. १६, पा. २२

( ४ ) वामन कृत कृष्णजन्म-श्लो. २५, पा. २३, गोपीवस्त्राहरण-श्लो. २१, पा. २५, रुक्मिणीविलास-श्लो. ५२, पा. २७, यज्ञपत्नीचरित्र-श्लो ४८, पा. ३०, कृष्णचरित्र-श्लो. ९०, पा. ४१, सत्यभामाविलास-श्लो. ४१, पा. ११७, वामनचरित्र-श्लो. ३६, पा. १२८

( ५ ) मुक्तेश्वर कृत शुकरंभासंवाद-ओ. २८१, पा. ३४, कचोपाख्यान -ओ. १२८, पा. ५१, घोषयात्रा-ओ. १२५, पा. १३७, स्थालीपाक-ओ. १४७, पा. १५१

( ६ ) रघुनाथ पंडित कृत नळचरित्र-पानें ५१ ते ७८

( ७ ) एकनाथ कृत कौसल्येचे डोहळे-ओ. ८१, पा. ९५, श्रीरामजन्म-ओ. २७, पा. ९९, कैकेयीवरदान-ओ. ४९, पा. १४१, दानव्रतकथा-ओ. १४२, पा. १५१, दशरथलग्न-ओ. ५६, पा. १७४

( ८ ) कोण कृत न कळे शरसेतु-ओ. ४३, पा. ४७, येकनाथ-रा. स. ४४

चरित्र-श्लो. १८, पा. १४२, तृणावर्तवध-श्लो. १७, पा. १७०, गीता-अध्यायवार पदें, पा. १७१, प्रल्हादचरित्र-अपूर्ण, पा. १७९

(९) पदें ललिताचीं-केशव, शि. पु., चिद्घन, गोसावीनंदन यांचीं, पा. १४७

(१०) भीष्मप्रतिज्ञा-श्लो. २०, पा. १७८

तातामिधात् हरिपंडित साय सद्मी ।
जया सर्वदा सुगुणयुक्त उदार लक्ष्मी ।
शांडिल्य गोत्र कुलदेव नृसिंह ज्याचा ।
दासानुदास हरिचा सकळ द्विजाचा ॥ २०

१३१३ ] १४″ × ६″ आकाराची पोथी-पत्रें २७५ पैकीं कांहीं नष्ट [ २५०

महाभारतें अरण्यपर्व-मूळ संस्कृत

१३१४ ] १६″ × ७″ आकाराची पोथी-पत्रें ८७ पैकीं कांहीं नष्ट [ २५०

महाभारतें आश्वमेधिक पर्व-मूळ संस्कृत.
मुखपृष्ठावर मालकाचें नांव आहे.

१३१५ ] निरनिराळ्या आकाराच्या पांच पोथ्या [ २५०

भागवतांतील १, ३, ८, ९ व १२ स्कंध-मूळ संस्कृत, श्रीधरकृत भावार्थदीपिका टिकेसह

(१) प्रथम स्कंध-१२″ × ६½″-पत्रें ७०, पैकीं १, २, ६ नाहींत

(२) तृतीय स्कंध-१५″ × ६″-पत्रें ९२

(३) अष्टम स्कंध-१६½″ × ७½″ -पत्रें ३३-मुखपृष्ठावर : 'राजेश्री बावास्वामिचें पुस्तक जयवंतराव यांकारणें लिहिलें। गंगाधर भट्टांनें लिहिलें कळलें पाहिजे।' शेवटीं हि 'इदं पुस्तकं गंगाधरभट्टेन लिखितं' असें आहे

(४) नवम स्कंध-१६½″ × ७″-पत्रें ४०

(५) द्वादश स्कंध–१५" × ६½"–पत्रें ४१
यापैकीं अष्टम व नवम स्कंधाचें लेखन तितकें जुनें नाहीं.

१३१६ ] १४" × ५½" आकाराची पोथी–पत्रसंख्या ६३ [२५०

वाल्मीकीय रामायणापैकीं बालकांड

जीर्ण कागद झाला आहे. प्रत सुंदर आहे. श्रीसमर्थांनीं स्वहस्तें बालवयात लिहिलेल्या अपूर्व प्रतीवरून श्रीवाल्मीकीय रामायण प्रकाशित करण्याचा उद्योग सत्कार्योत्तेजक सभेनें किंवा दुसऱ्या कोणी कधीं काळीं आरंभिला तर त्या वेळीं पाठांतरें देण्याला दक्षिणेकडील या व इतर प्रतींचा फार उपयोग होईल.

१३१७ ] १२½" × ६½" आकाराची पोथी–पत्रें ७० [११६

वाल्मीकीय रामायणापैकीं बालकांड

अलिकडील प्रत. पाठांतराला उपयोगी. प्रतीच्या लेखकाचें नांव शामजी रामाजी व लेखनकाल १७४२ निजज्येष्ठ शु. ७ असीं शेवटीं दिलेलीं आहेत.

१३१८ ] १६" × ६½" आकाराची पोथी–पत्रें ४९ [२५०

वाल्मीकीय रामायणापैकीं आरण्यकांड

जीर्ण कागद, सुंदर प्रत, वाढून पढाण्यास उपयोगी

१३१९ ] १४" × ५½' आकाराची पोथी–पत्रें ७० [२५०

वाल्मीकिरामायणापैकीं किष्किंधाकांड

सुंदर प्रत. पहिल्या पत्राच्या मध्यभागीं पाऊण इंच त्रिज्येच्या वर्तुळात राम, लक्ष्मण आणि मारुती यांचें सुंदर रंगीत चित्र काढलेलें आहे.

१३२० ] १६" × ६" आकाराची पोथी–पत्रें ९१ ते ३०१ पैकीं दहा पाच नाहींत. [१५०

माधव कृत आनुशासनक पर्व–ओवीबद्ध, अपूर्ण

१३२१ ] १२॥" × ५॥" आकाराची [१५०
पोथी–पत्रें ३० ते १५९

(१) ३० ते ९० पृष्ठांत विद्यारण्यांच्या पंचदशींतील तत्त्वविवेक, पंचभूतविवेक, महाभूतविवेक, पंचकोशविवेक, द्वैतविवेक व महावाक्यविवेक या प्रकरणांवर " श्रीमत्परमहंसपरिव्राजकाचार्यश्रीभारतीतीर्थविद्यारण्यमुनिवर्यकिंकरेण श्रीरामकृष्णाख्यविदुषा विरचिता व्याख्या " आणि

(२) पुढच्या ९१ ते १५९ पृष्ठांत विद्यारण्य कृत ब्रह्मानंद ग्रन्थावर त्या च रामकृष्णांनीं केलेलें उपदेशग्रन्थ नांवाचें विवरण. शेवटीं लेखकानें एका श्लोकांत सज्जनांची प्रार्थना केली आहे व दुसऱ्या श्लोकांत गुरूला नमन केलें आहे, ते दोन्ही श्लोक मला अपूर्व वाटतात म्हणून देतों :

बिंदुदुर्लिपिविसर्गवीथिकाशृंगपंक्तिपदभेददूषणं ।
हस्तवेगजमबुद्धिपूर्वजं क्षंतुमर्हथ समीक्ष्य सज्जनाः ॥ १
यस्मिन् भाने स्वप्रकाशे जगदेतच्चराचरं ।
सृष्टिस्थितिलयं प्राप्नोति तं भजे गुरुरूपिणं ॥ २

१३२२ ] १३॥" × ५॥" आकाराची [२००
पोथी–पत्रें २६४–३१६ व ३१८–३३१

(१) पृ. २६४ ते ३१६ " स्कंदपुराणे सूतसंहितायां यज्ञवैभवखंडे अध्यायाः "। " श्रीमत्काशीविलासक्रियाशक्तिपरमभक्तिश्रीमत्र्यंबकपादाब्जसेवापरायणेन माधवाचार्येण विरचिता तात्पर्यदीपिका " टीकेसह

(२) पृष्ठें ३१८–३३१ हीं चालू पृष्ठें असलीं तरी त्यांना १ ते १४ अशीं स्वतंत्र पृष्ठें हि दिलेलीं आहेत. त्यांत ब्रह्मगीता आली आहे. ग्रन्थ अपुरा च सोडला आहे.

१३२३ ] १३॥" × ६॥" [२००
पोथी–पत्रसंख्या ९१

श्रीमत् भगवद्गीता—श्रीधरस्वामीकृत सुबोधिनी टीकेसह

१३२४ ] ९॥" × ४" [१८३
पोथी–पत्रें १०

धर्मसूरिविरचितो नरकध्वंसो नाम व्यायोग·

हें एक एक अंकी संस्कृत नाटक आहे. नरकासुराचा वध करण्यास सत्यभामेसह श्रीकृष्ण रथात बसून निघाले आहेत. स्त्रियांच्या तोंडीं बालभाषा आहे. पुरंदर, जयंत, नारद, प्रतिहारी, शची, कृष्ण, दारूक, सत्यभामा अशीं पात्रें आहेत. सूत्रधार आहेत च.

व्यायोगः = एकाकी वीररसात्मक रूपकाचा एक प्रकार.

शेवटीं लेखकाचें नाव व लेखनकाल हीं आहेत : " लिखितमिदं श्रीमुख-संवत्सरे आषाढमासे शुद्धपक्षे पौर्णिमास्या कविवासरे हनुमत्कुडहीरकेन यरसाजिपंडितसूनुना श्रीनारायणेन ॥ " म्हणजे बहुधा १६७५.

१३२५ ] १२½" × ६¾" पोथी–पत्रें १२६ [ ११६

श्रीमत् भगवद्गीता व्याख्यान

मूळ मराठी शब्दार्थासह.

लेखक व लेखनकाल : " लिखितं श्रीनिवास भगवंत चक्रावरकर ॥ विक्रमनामसंवत्सरे चैत्रमासे शुक्लपक्षे प्रतिपदा गुरुवासरे काश्यां सर्वेश्वरसंनिधौ " म्हणजे बहुधा शक १७४२. प्रत्येक अध्याया-च्या प्रथम पृष्ठावर " रामचंद्र गोसावियाचें पुस्तक " असें म्हटलें आहे.

१३२६ ] १२॥" × ६" पोथी–पत्रें ९ [ १३५

श्रीनिवास कृत गोपीगीततारकावळी

२९ गीतें आहेत. हें एक सुंदर, गोड, संस्कृत स्तोत्र आहे. प्रकाशित नसल्यास प्रकाशनाला योग्य आहे.

१३२७ ] १०" × ४" पोथी–पत्रें ११ [ १५०

ऋषिपंचमीव्रत

१३२८ ] पोथी–पत्रें ११ [ १५०

श्रीमन्महामुद्गलसूरिणा विरचिता मुद्गलार्या:
एकंदर आर्या १०९ आहेत, त्यांत श्रीरामाला परोपरीनें आळविलें आहे.

१३२९ ] पोथी–पत्रें १५
शेवटचें पत्र गेलेलें आहे [ ७५

मुद्गलार्यांचे मराठी समश्लोक

१३३० ] १०॥" x ४॥"
पोथी–पत्रें १९ [ १५०

वेंकट कृष्ण यज्वा कृतं औत्तरककांडमर्थम्

उत्तरकांडांतील कथांच्या आधारें व्यंकट कृष्ण यज्वा रचिलेला रामायणचम्पूसारखा हा ग्रन्थ दिसतो. आरंभीं चवथ्या आणि पांचव्या श्लोकांत व्यंकोजीराजांची पत्नी दीपाबाई व तिच्या पोटीं जन्मलेले तिघे पुत्र शहाजी, सरफोजी व तुकोजी यांचा उल्लेख आला आहे व सहाव्या श्लोकांत ग्रन्थकारानें आपला उल्लेख केला आहे, म्हणून ते तीन श्लोक येथें देतों :

> आसीत श्रीचोळधरणीजानिरद्भुतविक्रमः ।
> आज्ञाचीटीविभोर्यस्य राजमुत्तंसकेतकी ॥ ४
> यश्रीभोंसलवंशमौक्तिकमणिर्यंशाहराजं विदुः
> येनैकप्रभुनंदनेन विदिता दीपांबिकावीरसूः ।
> यस्मै श्री स्पृहयत्यरातिरयते यस्माद्भयं यस्य तौ
> सोदर्यौ शरभोजितुक्कजिनृपौ यस्मिंश्च धर्मस्थिरः ॥ ५
> सर्वज्ञचूडामणिनाविपश्चित्संदोहभाग्योपनतेन तेन ।
> संचोदितो वेंकटकृष्णयज्वा संदर्भयत्यौत्तरकांडमर्थं ॥ ६

१३३१ ] पोथी–पत्रें ९
वैयाकरणसिद्धांतकौमुदी–अपूर्ण [ १५०

१३३२ ] पोथी–पत्रें सुमारें १००
अमरकोशाचीं त्रुटित पत्रें [ १५०

१३३३ ] पोथी–पत्रें २ ते ३१
फक्त १ लें पत्र नाहीं [ १५०

### श्री एकनाथ कृत गीतासार

शेवट–" इति श्रीगीतासारे । श्रीकृष्णार्जुनसंवादे । प्रणवज्ञानाविज्ञान-सिद्धांतकथनं नाम गीतासारटीकायां वेकाजनार्दनकृतायां । गीतासारः समाप्तः ॥ श्लोक ६९ ॥ ग्रंथसंख्या ३७९ ॥ "

ग्रन्थ अजून अप्रकाशित च आहे कीं काय, न कळे. प्रकाशित झाला पाहिजे.

१३३४ ] पोथी–पत्रें २१० [ १५०

### सूतसंहिताव्याख्यान

शेवट–" इति श्रीसूतसंहितायां ब्रह्मगीतासूपनिषत्सु ब्रह्मविद्यायां द्वादशोऽध्यायः ॥ १२ ॥ श्रीब्रह्मगीता समाप्ता ॥ ५ ॥ ७ ॥ इति श्रीमत्काशी-विलासक्रियाशक्तिपरमभक्तश्रीमत्र्यंबकपादाब्जसेवापरायणेनोपनिषिन्मार्गप्रवर्त-केन माधवाचार्येण विरचितायां सूतसंहितातात्पर्यदीपिकायां यज्ञवैभवखंडस्यो-परिभागे ब्रह्मगीतासूपनिषत्सु ब्रह्मविद्यायां द्वादशोऽध्यायः ॥ १९ "

मागील ग्रंथांक १३२२ पाहणें.

१३३५ ] दोन पोथ्या पत्रें ८ व ८ [ १५० व ८१

### जन्माष्टमीव्रतकथा

( १ ) एक जुनी प्रत असून तिच्या शेवटीं ' इदं पुस्तकं महादेवभट्ट-महाशब्दस्य ' असें आहे.

( २ ) दुसरी अलिकडची असून तिच्या शेवटीं

' हरिभट्टेन लिखित । रा. आश्वी. व. न. भृ. संपूर्ण । '

असें आहे. संक्षेपाचा अर्थ ' राक्षस नाम संवत्सरे आश्विन वद्य नवमी भृगुवासरे ' असा असावा. कागदावरून व लिपीवरून हा संवत्सर १७७७ चा असावा, असें वाटतें. शंका इतकी च, मोडकांच्या जंत्रींत त्या दिवशीं शनिवार नमूद आहे.

१३३६ ] पोथी–पत्रें ७ [ १५०

माघमूलप्रथमः सर्गः
' लांडिगेनाम्नः पुस्तकमिदं '

**१३३७]** पोथी-पत्रें २०
पत्र १ लें जीर्ण व २ रें नष्ट [२००

विश्वनाथतनय नारायण कृत गजेंद्रमोक्ष
श्लोक आणि पदें यांनीं युक्त.

मी बाळ फार लडिवाळ तुझें दयाळा ।
अन्याय तूं न धरि रे हृदईं सुशीला ।
माता सुतावरि करी जरि पूर्ण कोपा ।
वांचेल काय मग बाळक मायबापा ॥ १८

**१३३८]** १२" × ६"
पोथी-पत्रें ६० [२००

माधव कृत सनत्सुजातीय-ओवीसंख्या १०११

सुंदर प्रत. स्वतंत्रपणें प्रकाशनाला योग्य. सनत्सुजातानें धृतराष्ट्रास केलेला धर्मोपदेश.

**१३३९]** १३" × ५॥"
पोथी-पत्रें २३ [१४५

ज्ञानेश्वरींतील दुसरा अध्याय

अध्याय संपल्यावर शेवटीं दोन ओव्या आहेत त्या:—

शकें बारा शतें बारोत्तरें । तैं पदपद्धति केली ज्ञानेश्वरें ।
सच्चिदानंदबाबा आदरें । लेखक जाला ॥ १
शकें सोळा शतें नेरोत्तरें । तैं पदपद्धति केली ज्ञानेश्वरें ।
गोविंद यरवा सुपांतरें । जगज्जीवन लेखक ॥ २

**१३४०]** १२" × ५॥"
पोथी-पत्रें २३ [१५०

मोरोपंत कृत एकादशस्कंधावरील आर्या

# १३४१ ]

११३" × ५॥"
पोथी-पत्रें २२५ [१५०

माधवनंदन कृत श्रीमत् भागवत दशम स्कंध पूर्वार्ध-ओवीबद्ध

श्रीसमर्थशिष्य माधव त्यांचे हे पुत्र. ग्रन्थाचे एकंदर ४२ अध्याय आहेत. ग्रन्थारंभीं भक्तिज्ञांना नमन करितांना माधवानीं केलेल्या ग्रन्थांचा उल्लेख आला आहे. त्या नमनाच्या ओव्या:—

कैवल्यफळदानीं कल्पतरु । जो उपशांतीचा केवळ मेरु ।
श्रीमाधव नामा जनक गुरु । प्रणाम करूं त्यासी भावें ॥ २६

सर्वलोकविलक्षण । ज्याची चर्या सुलक्षण ।
तें चि कांहीं सांगतों लक्षण । सावध विचक्षण परिसोत ॥ २७

परमार्थलुब्ध असोनि असी । जो निर्लोभ म्हणवी आपणाप्रती ।
सत्याभिमान धरोनि मागुती । वागवी निगुती अमानित्व ॥ २८

श्रीरामचंद्रभक्तिविषई । कामयुक्त असोनि हृदई ।
निष्काम म्हणवी आपुल्या ठाईं । काय नवलाई सांगावी त्या ॥ २९

उद्धरावया प्राकृत जन । कलियुगामाजी पावन ।
वाल्मीकि आणि द्वैपायन । ज्या रूपें कृपायन अवतरले ॥ ३०

महाभारत श्रीरामायण । योगवासिष्ठ विष्णुपुराण ।
मल्लारिमाहात्म्य गणेशपुराण । माहात्म्य जाण विनायकाचें ॥ ३१

दिव्य प्रबंध इत्यादिक । जेणें रचिले रसाधिक ।
तैसे चि निर्मिले असंख्य श्लोक । पुण्यश्लोक स्तविती जया ॥ ३२

उपास्य दैवत श्रीराम । अद्वैती ऐसें उपनाम ।
ज्याचिया योगें निभ्रम । यथार्थ परम ते जाले ॥ ३३

असे असे श्रीसमर्थांचे अनेक अधिकारी शिष्य आणि प्रशिष्य होऊन गेले!

# १३४२ ]

१७" × ११॥"
आकाराचे चार बंद [२००

पंचीकरण-तपशीलवार

सुलभतेनें समजुत करून देणारें आहे. बंद जीर्ण झाले आहेत. उमजून वाचून प्रकाशित केले पाहिजेत.

१३४३ ] ११॥" × ४॥"
पोथी–पत्रें ५ [१००

शिवसहस्रनामावलि–अपूर्ण

१३४४ ] पोथी–पत्रें २९
शेवटचें एकादें च गेलेलें [१००

नामदेव कृत तीर्थावळी
शुद्ध आवृत्ति काढण्याला फार उपयोगी.

१३४५ ] ११॥ " × ५॥। "
पोथी–पत्रें १८ [१५०

महिपति कृत भक्तविजय–अध्याय ५७ वा, ओवीसंख्या २२०
प्रेक्षणीय अक्षर.

१३४६ ] ९॥ " × ५ "
पोथी–पत्रें ३० [३०

ज्ञानेश्वरींतील दुसरा अध्याय
ओवीसंख्या ३७२. मागील आडांक १३३१ त ओवीसंख्या ३७६ आहे.

१३४७ ] पोथी–पत्रें ७४
मधलीं कांहीं नाहींत [१५०

एकनाथ कृत हस्तामलक

१३४८ ] पोथी- पत्रें २४ [१५०

सुक्तिसोपान–प्राकृत गद्य टीका. लिहिणें अपुरें च सोडलें आहे.

१३४९ ] ८ " × ४ " आकाराच्या
दोन पोथ्या–पत्रें ४२ व १६ [१५०

मूलस्तंभ–ओवीबद्ध
या ईश्वरपार्वतीसंवादाचा दत्तात्रयअवधूत यांनी अनुवाद केलेला आहे. दोन्ही
मती सारख्या आकाराच्या व एका च काळांतील आहेत, पण त्यांत हि पाठ-

भेद आहेत. दोन्ही प्रतींचें लिहिणें सुंदर आहे, त्यांत हि एका प्रतीचें अक्षर जास्त सुंदर आहे.

**१३५० ]** पोथी–पत्रें १५ पैकीं २ व ३ नाहींत [ १५०

माधवसुत कृत नीतिशतकाचे समश्लोक

प्रकाशना योग्य आहेत. शेवटीं कवीनें आपला एक श्लोक घातला आहे :

हे श्लोक एक शत नीतिसुधारसाचे ।
नाना सुशब्दनवमौक्तिकहार साचे ।
ठेवा मनीं सुपथ आदरुनी श्रुतीचा ।
बोले कवी गुरुरुपें सुत माधवाचा ॥ १

**१३५१ ]** ७॥" × ४" पोथी–पत्रें सुमारें २०० [ १५०

श्रीधर कृत हरिविजय

पत्रें विस्कलित झालेलीं आहेत, लावलीं पाहिजेत.

**१३५२ ]** पोथी–पत्रें ७ [ १३०

मोरोपंत कृत महद्विज्ञापना–आर्या १४५

" अक्षय नाम संवत्सर कार्तिक बहुल द्वितीया गुरुवारीं श्रीपंढरपुरीं बापुजि सिवराम स्वहस्तेन लिखितं ॥ "

**१३५३ ]** पोथी–पत्रें ३ १ लें, २ रें व शेवटचें १९ वें [ १५०

ज्ञानदेव कृत स्वात्मानुभव

**१३५४ ]** पोथी–पत्रें १ ते ९५ [ २००

वनपर्व–ओवीबद्ध

जीर्ण प्रत. कसरीनें खरी च खाल्लेली. धर्मराजानें मार्कंडेयास द्रौपदीसारिखा पूर्वी कोणाचा छळ झाला होता काय म्हणून विचारल्यावरून सीतेची कथा सांगितली आहे.

**१३५५ ]** पोथी-पत्रें १७५ पैकी २३, ११८, १४२-१४५, १७२-१७४ नाहींत [ १५॰

रंगनाथ ( मोगरे ) कृत पंचरत्नमालिका

ग्रंथ महत्त्वाचा. पहिल्या व शेवटच्या पृष्ठावर मजकूर आहे तो-" बिंबाबाई ॥ .. ग्रंथसंख्या २०२८ ॥ पाने १७५ ॥ " इत्यादि

**१३५६ ]** पोथी-त्रुटित पत्रें ८३ [ १५॰

येकनाथी भागवताचीं त्रुटित पत्रें. त्यांत तेरावा अध्याय मात्र पूर्ण आहे.

**१३५७ ]** पोथी-पत्रें १६ [ ७९

देवदासचैतन्य कृत श्रीवेंकटेशप्रार्थनाशतक

प्रभव नाम संवत्सर । वैशाख मास भृगुवासर ।
शुक्लपक्ष दशमी निर्धार । ग्रंथ संपूर्ण पैं जाला ॥ १०९

शालीवाहन शकें । १७७९ । काळयुक्ति संवत्सर । पुष्य शुध्द तृतीया । गुरुवार । धनुर्मास तेदि । २४ । दिवा अठरा घटिकेस । ळेखन संपूर्णांत पावळ । हा ग्रंथ राजेश्री । सयाजीतपुरे यांची कन्या । काशीबाई कारण । रामचंद्र दळवी । ळिहु दिळा असे ॥

**१३५८ ]** पोथी-पत्रें २७ पैकी १६ वें व २७ वें नाहीं [ ८०

झोळीरामशिष्य कृत श्रीगुरुगीता-श्लोकसंख्या २२५

जे गुरुगीता कैलासीं । शिव उपदेशी पार्वतीसी ।
तो चि अर्थ प्राकृत भाषेसीं । बोळवी श्रीसमर्थ ॥ ७

श्रीसमर्थशिष्यपरंपरा । श्रीरामभक्तितत्परा ।
तियेची आदि अवधारा । चित्त करा अचंचळ ॥ ८

आदिगुरु श्रीनारायण । तयांचा शिष्य कमळासन ।
तयाचा शिष्य सज्ञान । वसिष्ट यथार्थ बोळिजे ॥ ९

तयाचा शिष्य श्रीराम । जो निजानंद कैवल्यधाम ।
तयांचे शिष्य निष्काम । जयांचा उपरम प्रख्यात ॥ १०
ते चि श्रीसमर्थ रामदास । जे विषयसुखीं उदास ।
जयांच्या वंदितां पदास । ज्ञानजी निजरदास साधक ॥ ११
तयांचे शिष्य श्रीभीमराव । जे सम भाविती रंकराव ।
जयाचें उच्चारितां नांव । पाटे घाव दृश्य सारें ॥ १२
तयांचे शिष्य अनेक । त्यामाजी राम देशिक ।
तेणें चि आम्हां तारक । मंत्र सम्यक उपदेशिला ॥ १३
जो विवेकपदें घोळी काम । जो टाळघोळें घोळी राम ।
लोकीं प्रसिध जयाचें नाम । तो घोळीराम निजगुरु ॥ १४
जेणें गुरुदीक्षा जागविली । निरद्वयें ज्ञोळी वागविली ।
शिष्या हातीं त्यागविली । निजोपदेशें अविद्या ॥ १५
ऐशिया श्रीगुरूचीं पाउलें । चित्तीं स्थापोनियां निर्मळें ।
गुरुगीता कथावया वहिलें । चित्त उतावेळ होतसे ॥ १६

१३५९ ] पोथी-पत्रें ९ [ १००

ज्ञानदेव विरचित पंचमुद्रा

१३६० ] पोथी-पत्रें १३ [ १००

ज्ञानदेव कृत भगवद्गीता

इति श्री भगद्गीता । व्यासदेवों निरोपिता ।
प्राकृत जाण भातां । म्हणे ज्ञानदेवो ॥

१३६१ ] पोथी-पत्रें १५ [ १००

माधव कृत द्रोणपर्वांतर्गत मृत्युदेवीची कथा

अध्याय ३३ वा.

१३६२ ] पोथी-पत्रें ३३
पैकीं २१, २२, २३ नाहींत [ १००

नामरत्नमाला-ओव्या ११२

१३६३ ] पोथी-पत्रें १० [२००

कठवल्ली उपनिषद्

१३६४ ] तीन पोथ्या-पत्रें [२००

३ + २ + २०

ईशावास्य पूर्ण व केन आणि बृहदारण्य यांचीं मुद्रित पत्रें

१३६५ ] १०" × ४।" आकाराची [१५०

पोथी-पत्रें १८

अनंतभट्ट कृत भारतचंपू :

स्तबक-१, २, ५-८, १०-१२

१३६६ ] ९।" × ५।।।" आकाराची [१५०

पोथी-पत्रें ११

अनंतभट्ट कृत भारतचंपू: -स्तबक चवथा.

१३६७ ] ११।।" × ४।।" आकाराची [९७

पोथी-पत्रें १४

भर्तृहरि कृत नीतिशतकं

निरनिराळ्या विषयावर दहा दहा श्लोकांचें एक एक दशक, अशीं दहा दशकें

प्रतीचा लेखनकाल- " विकारी नाम संवत्सर अधिक ज्येष्ठ शुध सप्तमी भानुवासरे लिखितं " म्हणजे शक १७६१ येतो.

१३६८ ] ९।।" × ४।" आकाराची [१५०

पोथी-पत्रें १८ ते २७

भर्तृहरि कृत वैराग्यशतकं

पहिलीं १७ पत्रें नाहींत, त्यांत नीतिशतक होतें. त्याचे शेवटचे तीन श्लोक १८ व्या पत्रावर आले आहेत. पोथीचें शेवटचें एकादें पत्र गेलेलें असावें. २७ व्या पत्राच्या शेवटीं १०१ वा श्लोक आला आहे.

१३६९ ] १०। " × ४॥। " [२५०
पोथी–पर्णसंख्या ४८ व १

श्रीचंडिकासप्तशतीस्तोत्रम्

जीर्ण प्रत, जपून वापरली पाहिजे. शेवटीं एक पत्र आहे. त्यावर स्तोत्रपठनविधिः दिलेला आहे. मुखपृष्ठावर " सुकोरसमाजिन. पुस्तकमिदं ज्ञेयं। " लिहिलेलें आहे.

१३७० ] पोथी–पत्रें १९ [२००
हरिविलासः

" श्रीमत्सूर्यपंडितकुलालंकारश्रीहरिहरमहाराजोद्योतितलोलिंमराजविरचित । हरिविलासः "

१३७१ ] पोथी–पत्रें १७० [३००

श्रीमत् भागवते एकादशस्कंधः–श्रीधरकृत भावार्थप्रदीपिका टीकेसह. सुंदर, महत्त्वाची, जुनी प्रत, मधल्या च दहा पाच पानांना कसर लागलेली.

१३७२ ] पोथी–पत्रें ७७ [८८

शिवतत्त्वसुधानिधि

" कीलक नाम संवत्सर भाद्रपद शुद्ध अष्टमी भौमवारी ग्रंथ संपला असे। " म्हणजे बहुधा १७७०

१३७३ ] पोथी–पत्रें १८ [२५०

पंचीकरण

( १ ) अति महत्त्वाची पोथी. निरनिराळ्या सत्पुरुषांनीं लिहिलेल्या पंचीकरणांच्या पाच पन्नास प्रती या समग्रहात असतील, पण त्या सर्वांत ही प्रत आम्हास श्रेष्ठ वाटते. संपूर्ण कोष्टकें मांडून विषय सुलभ केला आहे. सुदैवानें प्रत हि साद्यन्त, कोठें टका न लागलेली आहे. ती जशीच्या तशी छापून निघाली पाहिजे. प्रत्यंतराला बाकीच्या हि प्रती पहाव्या.

( २ ) पहिल्या मुखपृष्ठावर प्रकरणाचें नांव दिलेलें आहे तें असें—

" श्रीमुकुंदमुनिराज कृत विवेकसिंधुतात्पर्य "

शेवटीं पंचीकर्ण संपूर्णमस्तु असें म्हटलें आहे.

( ३ ) विवेकसिंधूचें हें तात्पर्य स्वतः मुकुंदराजांनीं च काढलेलें दिसतें. प्रकरणाच्या शेवटीं ओवी आहे ती :

माझी अति मंद वाणी । पवित्र केली इहीं वचनीं ।
प्रीति पावो पिनाकपाणी । म्हणे मुकुंदराज ॥

( ४ ) प्रस्तुतची प्रत येकनाथमहाराजांच्या कोणा शिष्यानें केलेली असावी.

( ५ ) पारमार्थिक अद्वैतग्रन्थ वाचणारांनीं पंचीकरणाचा मनाशीं एकवार कायमचा स्पष्ट उलगडा करून घेतला पाहिजे. तेव्हां ही प्रत प्रकाशित होणें अति अगत्याचें आहे.

## १३७४ ]

पोथी–पत्रें
१ ते १२ व १५७ ते १७० [१५०

महिपति कृत संतविजय–अपूर्ण

( १ ) या प्रतीचें महत्त्व असें आहे कीं, तिच्या मुखपृष्ठावर मध्यमागीं ग्रन्थसंख्या दिली असून डावे बाजूस श्रीराम, लक्ष्मण व सीता व उजवे बाजूस मारुती व श्रीसमर्थ यांचीं चित्रें काढलेलीं आहेत. मारुती उभे आहेत व कांहीं सांगत आहेत व त्यांच्या पुढें श्रीसमर्थ उभे राहून हात जोडून येकत आहेत. प्रेक्षणीय.

( २ ) मध्यभागीं मजकूर आहे तो :

" महिपति स्वामीकृत संतविजय । अध्याय २७ । वोव्या ४८१० । श्लोक ८१ । अभंग ५१ । वोवी ८० । पदें १३ । चौकवी ३ । छंद १ । भूपाळी २ । पानें २१५ । येकून ग्रंथ ७१२५ ।।"

ही एकुणात कशी आली ?

## १३७५ ]

पोथी–पत्रें २४९ [१५०

श्रीधर कृत शिवलीलामृत

फक्त पहिला अध्याय नाहीं. प्रत्येक अध्यायाचे आरंभीं चित्र आहे.

१८५८ ज्येष्ठ शु. १

२४, ( ८ ) तुका कृत नामदेवचरित्र–क. ४०, ( ९ ) मच्छनाथ कृत सकूचें चरित्र–क. ५७, ( १० ) शिवराम पूर्णानंद कृत सुरळीचें चरित्र–अभंग ७, ( ११ ) वामन कृत अजामेळ आख्यान–श्लोक ५१, ( १२ ) कृष्णदासमुद्गल कृ० सुलोचनागाहिंवर, ( १३ ) चिंतामणी कृ० ध्रुवाख्यान, ( १४ ) तुका कृत रुक्मांगद, ( १५ ) उद्धवचिद्धन कृत चोखामेळा-चरित्र–क. १८, ( १६ ) रामदास ( कोण ? ) कृत कबीरचरित्र–कडवीं ९, ( १७ ) विष्णुदासनामा कृत कमळाकर संत–क. ७६, ( १८ ) एकनाथ कृत गजेंद्र आख्यान, ( १९ ) तुका कृत वस्त्रहरण–अभंग २९, ( २० ) तुका कृत सुदामचरित्र–अ. १४, ( २१ ) नामा कृत उद्धवबोध–अ. ८, ( २२ ) तुका कृत हरिपाळ सत–कडवीं ३९, ( २३ ) तुका कृ० दामाजीपंताची रसीद, ( २४ ) कबीरजन्म–आर्या २५, ( २५ ) दास ( कोण ? ) कृत दामाजीपंत–कडवीं ७५, ( २६ ) वामनचरित्र–श्लोक ३७, ( २७ ) तुकाराम, गुरुदास, अमृतराय यांचीं कांहीं पदपदातरें

किती महत्त्वाचें बाड आहे ? यांतील १६ आणि २५ हीं प्रकरणें कोणाचीं समजावीं ?

गुरुदासांचें पद उतरून घेतों, क्षमा करा.

सीताराम सीताराम भज रे मना भज रे मना ॥ ध्रु०

अमोलीक जातें वय । तुज कैसी नाहीं सोय ।
ऐसा कांहीं नरदेह । मिळेल पुन्हां मिळेल पुन्हां ॥ १

विषयाचें सुख गोड । वाटे तुज येथें घड ।
पुढें आहे अवघड । यमयातना यमयातना ॥ २

कामामध्यें काम । तुम्ही भजा रामनाम ।
तेणें होईल विराम । घडी आपना घडी आपना ॥ ३

म्हणे बापा गुरुदास । येऊनिया जन्मास ।
काय करितोसी नाश । लागे हरिभजना हरिभजना ॥ ४

१५१८ ] जमाखर्चाच्या आकाराचें
बाड–पृ. सं. ९५ × २ = १९० [ १५६

( १ ) श्रीसमर्थ, तुकाराम, राघव, ज्ञानदेव, केशव, शिवराम पूर्णानंद, गोसावीनंदन, उ. चि., विष्णुदास नामा, सुरदास, एकनाथ, जगमित्र नागा, माळी नरहरि, भानुदास, हरी, खुशालचंद, दीना, आदिनारायण, नामदेव, जनी, मुक्ताबाई, मध्वनाथ, कवि माणकेश्वर (कृत मारुतीस्तोत्र), त्रिंबक, गंगाधर कोकिळ, कबिर, रोकडाराम ( श्रीसमर्थावर ), माधव ( रोकडारामावर ), इत्यादिकांचीं पदपदांतरें

( २ ) भावें भजावें हनुमंतजीसी । हें अष्टक, ( ३ ) वस्त्रहरण, ( ४ ) श्रीखंड्याचें आख्यान-ओंवी ६९, कोण कृत न कळे, ( ५ ) देवदास कृत करुणामृत ग्रन्थ-शेवटची ओवी : पराभवनाम संवछरासी। मार्गेश्वर त्रयोदसी। पूर्णता आली ग्रंथासी। श्रोते सावकासी परिसावे ॥ या च प्रकरणाचे शेवटीं लेखनकाल दिला आहे तो : १७०२ शार्वरीनाम संवछरे। आश्विन शुक्लपक्षे नवमीस समाप्त ॥

१५१९ ] बाड-पृ. सं. ३८ × २ = ७६ किरकोळ [१००

(१) पाठकनामा, शिवदिनकेसरी, केशव, तुका, रोकडाराम, गोसावीसुत, त्रिंबक, अमृत, मध्वयादो, शाहा हुसेन फकीर, उद्धवचिद्घन, मंगलपुरी, अनंत कवि, श्यामसुंदर, एकनाथ, पुरुषोत्तम, शिवराम, बोधला, चक्रपाणी, लीळा विश्वंभर, नामा, मानपुरी यांचीं पदपदांतरें

( २ ) दारु करण्याची क्रिया

१५२० ] बाड-पृ. सं. ३५ × २ = ७० किरकोळ [१००

श्रीसमर्थ, गणेशनाथ, बालात्मज, चिन्मयनंदन, कृष्णानंदनिरंजन, त्रिंबक, माधवदास, रोकडाराम, ( श्री राम जय राम जय जय राम हा मंत्र। उत्तम भावें जपतां शुद्धि होये पवित्र ॥ ध्रु० ), जनी, कबीर, उ. चि., तुका यांचीं पदपदांतरें

( २ ) रामदास म्हणणें मग तेव्हां ॥, ( ३ ) नामदेवचरित्र, ( ४ ) नामदेव कृत चोख्याचें चरित्र-ओंवी ३६, ( ५ ) उद्धवचिद्घन कृत गोऱ्या कुंभाराचें चरित्र

**१५२१ ]** बाड-पृ. सं. ५४ × २ = १०८ [१००
किरकोळ

वामन, बाळकराम, मोरोपंत, आनंदनदन यांची थोडी कविता व चर्पटपंजरी, गजगौरीव्रत व घोड्याच्या औषधाची यादी

**१५२२ ]** बाड-पृ. सं. ५२ × २ = १०४ [१५०
आ. चीं १ व शे. चें १ नष्ट

( १ ) श्रीसमर्थ, अनंततनय, गोसावीनंदन, कोकिळ गगाधर, गिरिधर, कृष्णदास वगैरेंचीं पदपदार्तें

( २ ) बाळकांड-अहिल्योद्धार, सीतास्वयंवर वगैरे-श्लोकबद्ध-श्लोक ४३ + ६० + ३३३

( ३ ) दास ( ? ) कृत अहिरावणमहिरावण-श्लोक १००

( ४ ) तान्हाजी कृत अंगदशिष्टाई-श्लो. ५५

( ५ ) भीष्मपर्वाचा चौक-अपूर्ण

**१५२३ ]** बाड- पृ. सं. ११ × २ = २२ [१००
आ. व शे. बरींच गेलेलीं

ओवीबद्ध कर्ण, शल्य, गदा, या पर्वांचा कांहीं भाग

**१५२४ ]** बाड-पृ. सं. ३३ × २ = ६६ [१००

बल्लाळनंदन, देवनाथ, सुरदास, जयरामात्मज, विठ्ठलदीक्षित, सज्जनरंजन, लक्ष्मणात्मज, मध्वमुनेश्वर, गोसावीनंदन, केशव इत्यादिकांचीं पदपदार्तें

**१५२५ ]** बाड-पृ. सं. २२ × २ = ४४ [१५०
आ. व शे. बरीं च नष्ट

( १ ) श्रीसमर्थ, जनी, तुका, चोखामेळा, एकनाथ, नामा, माळो, श्रीधर, उद्धवचिद्घन, मानपुरी यांचीं पदपदार्तें

( २ ) त्रिंबक भानुदास कृत हरिलीला-श्लोक २९

श्रीमद् भारत पुण्यपावन कथा सौभाग्यदात्री सदा ।
श्रोत्यांते श्रवणें करोनि सुखदा दे संपदा सर्वदा ।

यकत्याते वरदा हरोनि विपदा गोविंदभक्ती सदा ।
वर्णी त्रिंबक भानुदास हरिची लीला सदा सर्वदा ॥ २९

हे कवि आणि त्याचें काव्य, हीं पूर्वी अज्ञात होतीं, असें दिसतें.

**१५२६ ]** किरकोळ बाड–पृ. सं. १७ × २ = ३४ [ १००
वरील पृष्ठें नष्ट

मोडींत लिहिलेला श्रीरामचरित्राचा कांहीं भाग

**१५२७ ]** बाड–पृ. सं. ११ × २ = २२ [ १००

रामीरामदास कृत पंचीकरण

रामीरामदास हें अभिधान । रामें योजिलें काय हें च साधून ।
तेणें तत् त्वं पदार्थ शोधून । प्रगटित केला ॥ ४३

या ओवींत दोन गोष्टी सिद्ध केल्या आहेत. रामीरामदास हें नांव रामानें ठेविलें व त्याचा अर्थ, रामात रामदास आले असा कल्पून त्यावरून तत् त्व ( हें ब्रह्म तू च ) या दोन पदाचा अर्थ ध्वनित केला आहे.

**१५२८ ]** बाड–पृ. सं. ४४ × २ = ८८ [ ११०

( १ ) श्रीसमर्थ, अमृतराय, नामदेव, तुकाराम, दिगंबर, चिन्मयनदन, राघवदास, काशीनाथ, रगनाथ, जनी, केशव, विष्णुदास नामा, हरि कवि, केसरी उद्धवनाथ, एकनाथ, श्याम, माधवदास, अनंतसुत कवि, किंकर इत्यादिकांचीं पदपदातरें

( २ ) सुदामचरित्रावर कटाव, ( ३ ) उद्धवचिद्घन कृत गोराकुंभारचरित्र, ( ४ ) कवि कोकिळ कृत रामनाममहिमा, ( ५ ) जयरामसुत कृत द्रौपदीचा धावा

( ६ ) बाडात तीन ठिकाणीं सन १२०४ व १२१६ म्हणजे बहुधा शक १७१६ व १७२८ हीं जमाखर्च आला आहे.

**१५२९ ]** बाड–पृ. सं. २६ × २ = ५२ . [१२५

( १ ) नामापाठक कृत नामरत्नमाळा—ओंवी ११०, अजून अप्रकाशित आहे, असें वाटतें. ( २ ) गीतगोविंद – अपूर्ण, ( ३ ) जयरामसुत कृत द्रौपदीचा धांवा

**१५३० ]** बाड–पृ. सं. १० × २ = २०
आ. शे. बरीं च गेलीं [२००

औषधें – ओवींबद्ध

**१५३१ ]** बाड – पृ. स. १४ × २ = २८
आ. व. शे. कांहीं गेलेलीं [३००

( १ ) श्रीसमर्थ, त्यांचे शिष्य बालकराम, त्यांचे शिष्य रोकडाराम, त्यांचे शिष्य माघव यांचे श्लोक, पदें, आरत्या वगैरे

बहू फीरतां पाहिले फार गाऊं । परे लोक ही पाहिले स्यां सदेऊं ।
सदा सर्वदा रोकडा राम गाऊं । वरी भीक घा देउळा काम लाऊं ॥

( २ ) याशिवाय अनंततनय, उद्धवचिद्घन, केशव, अमृतेश्वर, रंगनाथ यांचीं पदपदांतरें

( ३ ) तानाजी देशमुख कृत रेणुकादेवीवर पद, ( ४ ) एकनाथ कृत अर्जदास्त, ( ५ ) भव्य रूप अति सुंदर दीक्षा । श्लोक १०

**१५३२ ]** बाड–पृ. सं. ८ × २ = १६ [१२५

अशुद्ध, फाटलेलें, पृष्ठें गेलेलीं, असें बाड. त्यांत बालकराम, बिरबल-अकबर, सुदामचरित्र असा कांहीं किरकोळ भाग आहे. पण आरंभीं दोन पदें आहेत, तीं मात्र मला महत्त्वाचीं वाटतात, कारण तीं कोणाचीं याचा मला उलगडा होत नाहीं.

( १ ) जोगवा लिहिला होता । संचितीं माये माझे ॥ ध्रु०
असा आरंभ व शेवट :

रामदासें कृपा केली । येथून कथा पूर्ण जाली ।
येको गोविंद माउली । दास तुका तारिले ॥ १०

( २ ) संसारीं सुख नाहीं क्षणभरी ।
जैसा येल तेल्याचा बांधुनिया डोळा
क्षांपडी थोडी विसावा कैचा ॥ ध्रु०

शेवट आरंभ व शेवट :

येको गोविंद माये बाप ही जव त्याच्या माहेरा
दास तुका म्हणे स्वम हे रामस्मरण करा ॥ ७

## १५३३ ] बाड–पृ. सं. १४ × २ = २८ [ १२५

श्रीसमर्थ, शेकडाराम, अमृतराय, त्रिंबक यांचीं पदपदांतरें, शेकडारामांचें त्रयोदशाक्षरी मंत्रावरील पद.

## १५३४ ] बाड–पृ. सं. ३० × २ = ६० [ १२५

चक्रकारक राजे, दशविध विप्रलक्षणें, अष्टादश भूपतिलक्षणें, अष्टादश मंत्रिलक्षणें, अष्टादश याति, नव रत्न, अष्ट भोग, सप्त संतान, चतुर्दश विद्या, षडंग वेद, चवसष्ट कला, नवविधा भक्ति, प्रीतिलक्षणें, त्रिविध सभा, सप्त स्वर, द्विविध गायन, अष्टांग नृत्य, पंच महावाद्यें, सत्त गुण, त्रयोदश गुण, इत्यादिकांचें टिपण

## १५३५ ] बाड–पृ. सं. २७ × २ = ५४
याहून जास्त पृष्ठें भा. व शे. चीं गेलीं [ १५०

( १ ) सुदामचरित्र–श्लोक ९० ते १०४, ( २ ) अहिमहिरावण आख्यान–श्लो. १ ते ६४ अपूर्ण, ( ३ ) बालकराम कृत गजगौरीव्रत–पदें ३८ संपूर्ण

१८५८ पौष शु. ५

१५३६ ] बाड-पृ. सं. ३५ × २ = ७० [१५०
दोन्ही बाजूंची कांहीं नष्ट

(१) एकनाथ कृत भावार्थरामायणापैकीं रामजन्म-ओवी ४३ ते १३०

(२) गोविंदतनय कृत वेंकटेशाची आरती

१५३७ ] बाड-पृ. सं. ३९ × २ = ७८ [१५०

(१) दीनकृष्ण, नामदेव, तुका, राघा श्रीधर, केशव, जगज्जीवन, (वाल्मीकाची आचार पोथी), मच्छसिद्ध, गोरखनाथ, उद्धवचिद्घन, विप्र नागेश यांचीं पदपदांतरें

(२) ज्ञानदेव कृत सप्तपदी, (३) ज्ञानेश्वर कृत हरिपाठाचे अभंग, (४) तुकासुंदर कृत उपमन्युचरित्र-कडवीं ३१, (५) तुकोबा कृत करुणामृत अभंग-अभंग २२ (६) बाडाच्या शेवटीं चार पृष्ठें कृष्णचरित्रपर एक पद आहे. कर्त्याचें नांव नाहीं.

१५३८ ] बाड-पृ. सं. १४६ × २ = २९२ [१७४
आ. व शे. कांहीं गेलेलीं

(१) श्रीसमर्थ, अनंतनंदन, बालकराम, रोकडाराम, त्रिंबक, राघवदास, यांचीं पदपदांतरें

(२) एकनाथ कृत भावार्थरामायणांतील रामजन्म. शेवट : "चीत्रभानु नाम संवछरे । भाद्रपदमासे कृष्णपक्षे भद्रे तीथी अमवशायां पुन्यतीथौ भृगुवासरे तद्दीनि ग्रंथ समाप्तमस्तु ॥ हस्ताक्षर रामाजी गोविंद ॥ वस्ती सीधपुरी नगरी समाप्तमस्तु ॥ पुस्तक धर्मार्थ लीख्यते ॥ हे पुस्तक मुकुंद गोसावि रामदासी याचे होये ॥ कोन्ही अभीलास करील त्यासी चंद्रायेन प्रायश्चीत होये ॥"

(३) एकनाथ कृत भावार्थरामायणापैकीं डोहळे कौसल्येचे-शेवटीं "चीत्रभानु नाम संछरे आश्वीन सुध प्रतीपदा मंदवासरे तद्दीनि समाप्तमस्तु ॥ हस्ताक्षर रामाजी गोविंद वस्ती सीदपुरी धर्मार्थ लीख्यते ॥"

(४) मालकराम कृत धीरडे द्रौपदीचे दिवते-एकूण श्लोक १५

(५) चिंतामणी कृत ध्रुवाख्यान

(६) दासबोधांतील भिक्षेचा समास व ओव्याक्षरकांपैकीं अकरावें शतक

(७) रामसुतात्मज कृत गोपीचंद आख्यान-भाषा हिंदुस्थानी-
" साखी २६, छंद १, सवाई २ "

(८) दास निजानंद कृत सूर्यवंशीं भूपण कोणें मिरविलें।
इत्यादि पद

(९) विश्वंभर प्रभु नाथ निरंजन कृत गोपीचंद आख्यान-
भाषा हिंदुस्थानी-सर्ग ५

(१०) श्रीसमर्थ कृत सुंदरकांड-अपूर्ण-श्लोक ४६ त्या पर्यंत

१५३९ ] बाड-पृ. सं. ४६ × २ = ९२ [१५०

(१) रोकडाराम व रोकडांकित यांचीं पदपदांतरें

(२) विष्णुदास नामा कृत कमळाकरचरित्र-ओवीसंख्या ६८-
अप्रकाशित ! शेवटीं-" मल्हारदैवज्ञात्मजरघुनाथदैवज्ञ " तस्येदं पुस्तकम्

(३) मुक्तेश्वर कृत वनपर्वींची कथा-ओ. सं. ५६ व जयद्रथ-
विटंबना-ओ. सं. ८७

१५४० ] बाड-पृ. सं. ४१ × २ = ८२ [१२५
किरकोळ

(१) श्रीसमर्थ, मच्छमुनेश्वर, तुकाराम, ज्ञानदेव यांचीं पदपदांतरें,
(२) गीता, भागवत इत्यादि ग्रंथांतील सटीक उतारे, (३) सुभाषितें.

१५४१ ] बाड-पृ. सं. ४७ × २ = ९४ [१००

(१) मनाचे श्लोक, (२) श्रीधर कृत रामविजयाचा
बाविसावा अध्याय

१५४२ ] बाड-पृ. सं. ६४ × २ = १२८ [ १५०
पहिलें १ व शे. कांहीं नष्ट

( १ ) श्रीसमर्थ, नामा पाठक, पंडित स्वामी, रंगनाथ, यादव माणिक यांचीं पदपदांतरें

( २ ) जनीजनार्दन कृत बाळक्रीडा-ओवी ४ ते ५९

( ३ ) गायत्रीमंत्र-सटीक-श्लोक १२.

" प्रचोदयात् ॥ प्रार्थनेयं विधीयते ॥ "

निजात्मरूपीं रमतां अखंड । संसारदुःखें जळतीं मर्यंड ।
याकारणें प्रेरित सानुरागें । प्रवर्ततु ये च क्षणीं निजांगें ॥ १०
पूर्वाश्रमीं होम्रि पदार्थमीसें । प्रबोधिती सद्गुरु ज्ञान ऐसें ।
तें बाळबुद्धीस्तव ना कळेची । उच्चारमात्रे स्मृती उगेची ॥ ११
ब्रह्मस्थितीचा उपदेश केला । वाचाळज्ञानें तरि व्यर्थ गेला ।
ऐसी जनाची गति तेथ जाली । ज्ञानेश्वरी ब्रह्मसुखी निमाली ॥ १२

( ४ ) विठ्ठल कृत दत्तात्रयजन्म-श्लोक ५६

( ५ ) श्रीसमर्थ कृत तिसऱ्या भागांतील स्फुट श्लोकांपैकीं ५९ वें प्रकरण. त्यास तेथें भागवत म्हटलें आहे, या बाडांत त्याला श्लोक माभळभटाचे असा मथळा दिलेला आहे.

( ६ ) द्रौपदीचा धांवा-अपूर्ण

१५४३ ] बाड पृ. सं. ४१ × २ = ८२ [ १२५
कांहीं नष्ट

( १ ) बाळकराम, ( २ ) शंकरचरित्र-श्लो. ४५, ( ३ ) कृष्णचरित्र, ( ४ ) भावार्थरामायणापैकीं कौसल्येचे डोहळे, ( ५ ) धांवा हीं विषयासि जो नर भुले त्याला गती कोणती ॥

१५४४ ] बाड-पृ-सं. ४५ × २ = ९० [ १२५
कांहीं नष्ट

( १ ) श्रीसमर्थ, जयरामसुत ( द्रौपदीचा धांवा, वगैरे ) वत्साळपुत्र, अमृतेश्वर, केशव ब्रह्मानंद, मुकुंदराज, ज्ञानदेव, तुकाराम, शिवराम पूर्णानंद, वगैरेंचीं पदपदांतरें. कांहीं सुभाषितें.

( २ ) त्याचें पायवणी मज पाजा।

ज्याहीं राम पूजिला माझा ॥ ध्रु०

त्याचें नाम आदरें घ्यावें

ज्याहीं राम वंदिला भावें ॥ १

त्यासी व्हावि सर्वदा भेटी।

ज्यासी राम बोलिला गोष्टी ॥ २

ज्यासी सांपडला निजनामीं।

जयरामसुताचा स्वामी ॥ ३

**१५४५ ]** बाड-पृ. सं. ४२ × २ = ८४ [१५०

( १ ) गोसावीसुत, शिवराम पूर्णानंद, विश्वंभर ( यांचा भरणा विशेष ) सय्यद महमद, केशव, जयराम, एकनाथ, कृष्णदास यांचीं पदपदांतरें

( २ ) ओव्या शतकापैकीं तिसरें शतक

( ३ ) बाळनाथस्वामीचा दास लोहोगांव

**१५४६ ]** बाड-पृ. सं. १७ × २ = ३४ किरकोळ [ १२५

( १ ) श्रीसमर्थ, तुका, उ. चि., गो. नं., नामा, रोकडे, बिरबल-अकबर

( २ ) १३ ते २४ ओव्या-अपूर्ण

श्रोतीं न मानावा खेद। स्या आधुलिया मना केला बोध।
भावें भजावा आनंदकंद। मोक्षाचें पद पावावया ॥ १३

( ३ ) चवथ्या दशकाचा तिसरा समास

( ४ ) ऋग्वेदी व यजुर्वेदी यांच्या वर्णनाचा एक एक श्लोक

**१५४७ ]** बाड-पृ. सं. १०२ × २ = २०४ [१५०

( १ ) श्रीसमर्थ, रंगनाथ, बाळकराम, रोकडाराम, बापुराम ( रोकडारामांचे शिष्य, त्याचे आपल्या गुरुपरंपरेवरील सहा श्लोक ), केशव, तानसेन, एकनाथ, अनंत, तुका, त्रिंबकसुत, नामा, जनी, विठा, कवीश्वर, बहिणी, ज्ञानदेव, यांची पदपदावरें, ( २ ) अंतर्भाव-अपूर्ण, ( ३ ) एकनाथ कृत दिपटा, ( ४ ) गीतगोविंद, ( ५ ) कांहीं औषधें

**१५४८ ]** बाड-पृ. सं. १६ × २ = ३२ [११८
शक १७२० चा उल्लेख आहे

( १ ) श्रीधर ब्रह्मानंद कृत जांबुळाख्यान, ( २ ) शामजीसुत कृत दशावतार-श्लोक १०

गुंतला पितृशब्द जाणुनि टाकिली सुखसंपदा ।
सेविले वन कंद भक्षुनि भोगिल्या बहु आपदा ।
मर्दुनी दशमूख रावण राम ये दारयूतिरा ।
जानकीप्रिय राम सुंदर उद्धरी नर वानरा ॥ ७

( ३ ) प्रह्लादचरित्राचा कांहीं भाग, ( ४ ) फलज्योतिषाचा कांहीं भाग, ( ५ ) हिंदुस्थानी कविराख्यान- कडवीं ३५, ( ६ ) विश्वनाथ नारायणांचें एक पद

भक्षुनि किती पाहतोसि दातारा ।
शिणलों बहु करितां येरझारा ।
आतां या देहें निजपदिं थारा ।
विश्वनाथ नारायण म्हणे विटलों संसारा ॥ ३

**१५४९ ]** बाड-पृ. सं. २९ × २ = ५८ [१२५

( १ ) श्रीसमर्थ, मच्छनाथ, श्रीधर ब्रह्मानंद, दास आनंद, निर्मळ, अमृतेश्वर, बाळकराम, ज्ञानदेव, नारायण, गोपाळ, गोपाळाचा सुत, शिवराम

पूर्णानंद, आनंदतनय, अनंतनदन, उद्धवचिद्धन, दीन श्याम, शंकर, इत्यादिकांची पदपदार्तें, ( २ ) हिंदुस्थानी कवित्त, ( ३ ) हिंदुस्थानी गोरखम-छंद्र संवाद, ( ४ ) सुभाषितें.

**१५५० ]** वाड–पृष्ठें ४५–११० पहिलीं ४४ गेलीं [१५०

( १ ) मुद्गलभट्ट कृत रामस्तुतिपर संस्कृत आर्या व त्याव शिवरामाची प्राकृत टीका—आर्या ३० ते १०५

( २ ) मन्यरूप अति सुदर दीक्षा । हे नऊ श्लोक व शेवटीं दहावा श्लोक :

रामदास होउनि वि असणें । यापरी वरवें मन पोषणें
श्वरि व दास जगीं निज राम । मिरवणें म्हणतो दिन श्याम ॥१०

( ३ ) भर्तृहरीचीं शतकें, ( ४ ) जयदेवकाविप्रबंधः ( ५ ) रगनाथाचें एक च पद

**१५५१ ]** वाड–पृ. स. १४ × २ = २८ किरकोळ [१५०

( १ ) मोडींत शिवचरित्रपर, ( २ ) कृष्णचरित्रपर, ( ३ ) दीनात्मज कृत पद, ( ४ ) सदा मगन गजराव आम्ही टुजरात मन्हाडे शिपाई

**१५५२ ]** वाड–पृ. स. २४३ × २ = ४८६ दोन्ही बाजूचीं वरींच गेलेलीं [१६

( १ ) वामन कृत सीतास्वयंवर–श्लो. ४५ ते ११२, गोपीगीत–श्लो. ४८, वामनचरित्र–श्लो. ४१, अजामेळ आख्यान–श्लो. ५६, रामजन्म–श्लो. २० अपूर्ण

( २ ) एकनाथ कृत गजेंद्र आख्यान–ओवी ४०

( ३ ) विष्णुदास नामा कृत संवावळी आख्यान म्हणजे व कमळाकर ब्राह्मणाची कथा–ओ. ७३

( ४ ) मुक्तेश्वर कृत वनपर्वांतील अकरावा अध्याय वगैरे बराचसा भाग

( ५ ) विठ्ठलदास किंवा विठ्ठल कृत रुक्मिणीस्वयंवर–सर्ग १, २, ३, ४

( ६ ) श्रीशंकराचार्य कृत कृष्णाष्टकस्तोत्रम्

( ७ ) विमलानंद कृत शिवरात्री आख्यान–ओवीसंख्या ६५, याच्या शेवटीं १६९५ आषाढ व. ३० असा लेखनकाल आहे.

( ८ ) अनंत कवि कृत अहिमहिरावण आख्यान– श्लोक ९९, याच्या शेवटीं लेखनकाल व लेखकाचें नांव हीं आहेत : १६९२ विकृति नाम चैत्र शु. १ सौम्यवासरे, हस्ताक्षर गोरि त्रिंवक चित्रक

( ९ ) विष्णुदास नामा कृत उपमन्यु आख्यान–ओवी २८

**१५५३ ]** वाड–पृ. सं. १९ × २ = ३८ [१५०

( १ ) एकनाथ कृत कृष्णजन्म–ओव्या ७

( २ ) बाळकराम कृत रेणुकामाहात्म्य–श्लोकबद्ध, मधूनमधून पदें

( ३ ) गुरुदास अनुचर कृत सुदामचरित्र–प्रथम पाचवा–ओ. १२०

**१५५४ ]** वाड–पृ. सं. १५ × २ = ३० [१७४
दोन्ही बाजूचीं काहीं गेलेलीं

( १ ) ज्ञानेश्वर विरचित स्वात्मानुभव–ओवी २१ ते २११. शेवटीं लेखनकाल–१६८४ आश्विन.

( २ ) ज्ञानेश्वर विरचित पंचीकरण–प्रथम समास, ओवीसंख्या ७१, द्वितीय समास ओ. १४, तृतीय १९, चतुर्थ ११, पंचम १३, षष्ठ ४ अपूर्ण

( ३ ) कांहीं संस्कृतप्राकृत सुभाषितें

( रा ) धिक्तान् धिक्तान् धिगेतान् कथयति सततं कीर्तनस्थो मृदंगः ॥

( म ) तेजातिमिल किरणें घडलें रवीला ।
तेजें चि छिद्र करिती डर मोतियाला ।

रत्नानिमित्य मथिला हरिनें पयाब्धी ।
ज्याचा विशेष गुण त्यास अधीक बाधी ॥ १
कस्तूरिकेस्तव मृगा जिवघात जाला ।
गंधानिमित्य तरुचंदन खंड केला ।
दिव्यौषधी चतुर वैद्य समूळ छेदी ।
ज्याचा विशेष गुण त्यास अधीक बाधी ॥ २
गाई वनांत चरतां चतुरीं अनेकीं ।
अन्याय तोळ नसतां वपू हि येकी ।
कापूनि पुच्छ चवरे करितात आधीं ।
ज्याचा विशेष गुण त्यास अधीक बाधी ॥ ३
धाकी बळीस सुतळीं हरि दान घेतां ।
सूत्रासि बंधन घडे वचनोक्ति येतां ।
यालागिं जो प्रविण फार तया उपाधी ।
ज्याचा विशेष गुण त्यास अधीक बाधी ॥ ४

**१५५५ ]** बाड-पृ. सं. ३७ × २ = ७४ [११५
दोन्ही बाजूचीं काही गेलेलीं

( १ ) अनंत कृत लवकुशपुराण-प्रसंग पहिला, श्लोक २४ ते ७५, प्रसंग दुसरा, श्लोक ९८. शेवटीं " हीं पाथीं गिरमाजी गोसावी रामदासी हाली वस्ती कारंजवीची " याची.

( २ ) श्रीसमर्थ, बाळकृष्ण यांचीं किरकोळ पदपदांतरें, कांहीं सुभाषितें.

**१५५६ ]** बाड-पृ. सं. १३ × २ = २६ [११५

( १ ) हरिसुत कृत पंढरीमाहात्म्य-ओवीसंख्या १०६, प्रकरण अप्रकाशित असावें, अपूर्ण आहे.

( २ ) मरुतीची आरती, कांहीं सुभाषितें, इमारतीकारणें कांहीं सूचना मोडी लिपींत, किरकोळ.

१८५८ माघ शु. ९

**१५५७** ] किरकोळ बाड–पृ. सं. २० × २ = ४० [१२५

( १ ) नामदेव, तुकाराम, जसवंतसुत, कबिर, मध्वमुनेश्वर, कृष्णदास, कृष्णानंद यांचीं पदपदावरें.

( २ ) कांहीं संस्कृतप्राकृत सुभाषितें

**१५५८** ] किरकोळ बाड
पृ. सं. ३५ × २ = ७० [१२५

( १ ) श्रीसमर्थ, रोकडाराम, माधवसुत, माणुकदास, तुका, एकनाथ, श्रीधर, ज्ञानदेव, यांचीं पदपदावरें.

( २ ) एकनाथ कृत गजेंद्रमोक्ष–ओ. सं. ४०

**१५५९** ] बाड–पृ. सं. १७ × २ = ३४ [१२५

कृष्णदयार्णव, रंगनाथ, केशव, जानराज, तुका, नामा, बहेणी, एकनाथ, ज्ञानेश्वर, अमृतराय, रोकडेराम ( रामदास गुरु परम परात्पर पावन हें नाम । अवतार हनुमंतें धरिला भक्ता सुखधाम ॥ ध्रु० ॥ ), अंबरनाथ यांचीं पद-पदावरें, त्यांत तुकारामाचा भरणा विशेष.

**१५६०** ] बाड–पृ. सं. बरोबर
५० × २ = १०० [४००

( १ ) लिपीवरून या बाडाचा काळ चारशें वर्षांमागचा ठरवावा लागतो. शिवाय त्यांत संवत १५८७ पासूनचें भविष्य म्हणून दिलेलें आहे, त्यावरून हि या बाडाचा काळ चारशें वर्षांमागचा असला पाहिजे, असें म्हणावें लागतें. या बाडांत कृष्णयाज्ञवल्कीकृत कथाकल्पतरूचा कांहीं भाग आहे. कृष्णयाज्ञवल्कीचा काळ 'संतकविकाव्यसूचींत' शक १५३० चा सुमार सुचविला आहे, तो बरोबर नसावा, असें या बाडावरून म्हणावें लागेल. तथापि जाणत्यांनीं विचार करून निर्णय द्यावा. बाड महत्त्वाचें आहे.

( २ ) आरंभीं पृष्ठावर अंक न घातलेलीं पांच पृष्ठें आहेत. त्यांत अजपाविवरण आहे.

( ३ ) नंतर १ ते ४४ अंक घातलेलीं पृष्ठें होतीं, त्यांपैकीं १३ ते ३६ व ३९ ते ४१ हीं पृष्ठें गहाळ आहेत. यांत कृष्णयाज्ञवल्की कृत कथाकल्पतरुचतुर्थस्तबके मदळसारयान होतें व आहे.

( ४ ) नंतर ४४ व्या पृष्ठाच्या च मागें १ चा अंक घालून पुढें २१ पृष्ठांकापर्यंतचीं पृष्ठें आहेत. त्यांत संवत १५८७ ते १६३० च्या संवत्सरातील ज्योतिषाधारें भविष्यकथन आहे. तज्ज्ञांनीं व इतिहासभक्तांनीं अभ्यासावें. तें साठ हि संवत्सराचें होतें, पण शेवटचीं काहीं पृष्ठें गहाळ आहेत. तशीं च आरंभींचीं हि काहीं पृष्ठें नाहींत.

१५६१ ] उसवलेलें बाड पृष्ठें १४ ते ४० [१००

सुलोचनाअग्निप्रवेश अशा ओवीबद्ध प्रकरणाला १४ व्या पत्रापासून च आरंभ केला आहे व ४० व्या पत्राच्या शेवटीं ३५१ वी ओवी आली आहे. पुढचीं पत्रें नाहींत, त्यामुळें प्रकरणाचा शेवट नाहीं. तथापि पुढें थोडा च भाग उरला असावा. ३१ वें पत्र मागाहून कोणी तरी लिहून घातलें आहे.

कथानकाला एकदम च आरंभ केल्यामुळें व शेवटचा भाग नसल्यामुळें या काव्याचा कर्ता कोण हें मला उमगलें नाहीं. काव्यसंग्रहात तीन चार सुलोचनाख्यानें प्रकाशित आहेत, तीं पाहिलीं पाहिजेत. वाचकांना उमगावें म्हणून शेवटची ओवी येथें उतरून ठेवतों :

> ते वेळीं उरग्याच्या । सवे सरिसा वेल्हाळा ।
> गेल्या सागरा जवळा । सुलोचना म्हणे तयासी ॥ ३५१

१५६२ ] अगदीं फिरकोळ बाड पृ. सं. २९ × २ = ५८ [१०१

श्रीसमर्थ, माधव, आनंदतनय, चिन्मयनंदन, श्रीधर महानंद, तोकाराम, यांचीं पदपदावर

१५६३ ] बाड-पृ. सं. ३७ × २ = ७४ पहिलीं व शेवटचीं काहीं गेलेलीं [१३५

( १ ) श्रीसमर्थ कृत सुंदरकांड, ( २ ) जयदेव कृत अष्टपदीपैकीं काहीं भाग, ( ३ ) तोकाराम प.चीं काहीं पदें.

# १५६४ ]

बाड-पृ. सं. ५४ × २ = १०८ [ १२५

( १ ) श्रीसमर्थ, रोकडाराम, पाटकराम, कबीर, देवदासांकित, तुकाराम यांचीं पदपदांतरें

( २ ) रामदास म्हणे मग तेव्हां ॥ १ ते ९

( ३ ) ध्रुवाख्यान ( सूर्यवंशीं उत्तानपाद राया । )

( ४ ) काशीवियोग सहसा मज साहवेना ॥ १ ते ८

( ५ ) नको पाठवूं राम माझा वनासी ॥ १ ते ११

# १५६५ ]

बाड-पृ. सं. ६३ × २ = १२६ [ १२५
शेवटचीं कांहीं गेलेलीं

( १ ) मध्वमुनेश्वर कृत श्रीरामाची मानसपूजा–१६ कडव्यांचें एक पद. ( २ ) श्री श्लोक मनाचे, ( ३ ) किरकोळ :

( टा ) नदी डगमीं रियरावे । तरी सिंधुपण कां न पवे ।
तैसें जीवाचें महा कां नव्हे । या स्थिति राहतां ॥ १

म्हणोनि परतावें अभ्यंतरीं । अभ्यास करावा ऐसियापरी ।
मग कल्पना अंतरीं । समरसोनि जाये ॥ २

सांडुनिया स्थूळ गती । ऐसी राहे अंतरस्थिति ।
तववरी अभ्यास निगुती । करावा चि लागे ॥ ३ वगैरे

( म ) प्रसन्न होई गा मार्तंडा । मज देई बादशाईंडा ॥ ०

# १५६६ ]

बाड-पृ. सं. १२ × २ = २४ [ १२५

( १ ) कृष्णदयार्णव, एकनाथ व तुका यांचें एकादुसरें पद, ( २ ) कांहीं सुभाषितें, ( ३ ) शेषकवि कृत गोपालकाला–श्लोक १९

# १५६७ ]

किरकोळ बाड-पृ. सं. ११ × २=२२ [ १२५

श्रीसमर्थ, कोकिळ, माधवदास, शिवराम पूर्णानंद यांचीं पदपदांतरें

१५६८ ] किरकोळ बाड-पृ. सं. ८ × २ = १६ [११५

(१) श्रीसमर्थ, तुलसीदास, नरहरि मालो, यांचीं पदपदांतरें, (२) मर्यादयाक्षरी मंत्रावर पद

१५६९ ] किरकोळ बाड-पृ. सं. ८ × २ = १६ [१२
मोरोपंत, काशी कवि वगैरे

१५७० ] बाड-पृ. सं. ७५ × ४ = ३०० [२००

(१) भानुदास, माधव किंवा माधवदास, गोणाई, नामयाची जनी, एकनाथ यांचीं पदपदांतरें, (२) कृष्णचरित्र-श्लो. २९, (३) संस्कृत स्तोत्रें-सद्गुरुकवच, तारकब्रह्मराम-श्लो.८०, योगतारावळी-श्लो.२४, भैरवाष्टक, भवानीभुजंग, त्रिपुरागायत्री, बगलामुखी, तिरस्करणी, बुध्दगणपति, मूलमंत्र, बालाश्रीअक्षरी, ज्ञानसंन्यास-श्लो. ४३, गंगाष्टक, वेदांतपर श्लोक, वगैरे

१५७१ ] बाड-पृ. सं. ४२ × ४ = १६८ [१२५

(१) अमृतराय, जगज्जीवन, शिवराम, मिंचक, गोसाईनंदन, ज्ञानदेव यांचीं पदपदांतरें (२) तसे च श्लाघ्यवाणी रामदास्य ॥, (३) श्रवणाचा समास ७ × ९, (४) ज्ञानेश्वरींतील उतारे, (५) नामस्मरणाचा समास ४ × ३, (६) घोड्यांच्या लक्षणाचे ४ श्लोक, (७) सुभाषितें

१५७२ ] बाड- पृ. सं. २० × २ = ४० [१००

(१) कोनेरी नारायण, तानाजी, रोकडराम, गोसावीनंदन यांचीं पदपदांतरें, (२) सन १२३५-३६ व सवत १११४-१५ तील कांहीं जमाखर्च.

१५७३ ] बाड-पृ. सं. २० × २ = ४०
आ. व शे. कांहीं गेलेलीं [१५०
ज्योतिषविषयक कांहीं माहिती

**१५७४ ]** १९" × ५३/४" आकाराचे चार सुटे बंद [ १५०

गद्यांत प्रल्हादाची संपूर्ण कथा. अक्षर सुंदर आणि सुवाच्य आहे.

**१५७५ ]** बाड-पृ. सं. १२७ × २ = २५४ [ १५०

( १ ) श्रीधर कृत पांडवप्रताप-प्रसंग २५ वा-नळोपाख्यान, ओवीसंख्या ३०८, ( २ ) नागेंद्र याज्ञवल्की कृत वनपर्वांतील कांहीं प्रकरणें-श्लोक ३३ + २४ = ५७, ( ३ ) महिपति कृत भक्तिविजय-अध्याय ३७ वा, ओवीसंख्या १६१, ( ४ ) पांडवप्रताप-अरण्यपर्व-प्रसंग ३१ वा, ओ. सं. २५४, ( ५ ) पांडवप्रताप-शांतिपर्व-प्रसंग ५७ वा, ओ. सं. ११८, ( ६ ) भक्तिविजय-अध्याय २ रा, ओ. सं. २५५, ( ७ ) रंक कृत आपल्या सद्गुरूस पंचश्लोकात्मक पत्र, ( ८ ) गोसावीनंदन, मोरेश्वर, मोरे धुंडिराय यांचीं दोन चार पदें, ( ९ ) कांहीं सुभाषितें

**१५७६ ]** बाड-पृ. सं. ८ × २ = १६ काहीं पृष्ठें नष्ट [ १२५

( १ ) वामन कृत सीतास्वयंवर-श्लोक १३ ते ११५, ( २ ) उद्धवचिद्धन कृत बहिरंभट उर्फ बहिरा पिसा याचें चरित्र-कडवीं १९, ( ३ ) कोकिळ गंगाधर, मध्वमुनेश्वर

**१५७७ ]** पंचांगाच्या आकाराचें एक पत्र [ १५०

गोरक्षनाथाचे मुहूर्त

**१५७८ ]** पोथी-पत्रें ९९ [ २००

कृष्णयाज्ञवल्की कृत कथाकल्पतरु-स्तबक सातवा. " पुस्तक कोनेर गोविंद पीपळे याहाचे होये ॥ "

**१५७९ ]** पोथी-पत्रें १८ [ १५०

शिवदास गोमा कृत काशीखंड–अध्याय शेवटचा ८० वा, संपूर्ण–ओवीसंख्या ३३४

१५९० ] पोथी–पत्रें १३३ [१५४

रघुवंश अर्थानुसार–सर्ग १ ते ४. चार हि सर्गांचीं हस्ताक्षरें निराळीं, पत्रसंख्या ८२ + २२ + ५२ व ७१ = २० + ९ मिळून १३३. दुसऱ्या सर्गाच्या शेवटीं " इति श्रीमन्महोपाध्यायलोलचलमल्लिनाथसूरिविरचितायां रघुवंशव्याख्यायां संजीविनीसमाख्यायां द्वितीयः सर्गः ॥ २ ॥ " तिसऱ्या सर्गाच्या शेवटीं असाच मजकूर आहे, फक्त ' लोलचल ' ऐवजीं ' कोलचल ' आहे व लेखनकाल वगैरे दिला आहे तो असा " शके १७०४ माघ शुध १ ॥ कौंडिन्योपनामकेन राघवेण लिखिता ॥ " कोलाचल पाहिजे होतें, असें वाटतें.

१५९१ ] पोथी–पत्रें ३ [१५५
समासचक्र

१५९२ ] पोथी–पत्रें
११ + ११ + १ +१ = २४ [१००

कृष्णदासमुद्गल कृत सुलोचनाख्यान–प्रसंग दुसरा, पत्रें १२, वोवी १२१, पैकीं शेवटचें १२ वें पत्र नाहीं; प्रसंग तिसरा, पत्रें १२, वोवी १२४, पैकीं शेवटचें १२ वें पान नाहीं; दोन निराळीं च पानें.

१५९३ ] पोथी–पत्रें २२२ [२००

वामन कृत गीतेची समश्लोकी टीका–फक्त पहिला अध्याय व पांचव्याचीं शेवटचीं दोन पानें नाहींत, बाकी पूर्ण

१५९४ ] उववलेडें चार पृष्ठांचें बाद [१००

रामचंद्रनामावळी–११० नांवें. माळगांव मठपति हरिहर यांची जी १२१ नांवांची श्रीरामनामावळी धर्मेनें प्रसिद्ध केलेली आहे, तिच्याहून

ही निराळी आहे. विश्वास म्हणून रोकडेरामांचे कोणी शिष्य नसल्यास प्रस्तुतची नामावली रोकडेराम कृत असावी, असें दिसतें. प्रकाशना योग्य.

१५८५ ] गळांठा [ १००-३००

( १ ) भक्तिविजय-अध्याय ४९ वा-तुकोबाचरित्र, ( २ ) हरि-विजयाचा काहीं भाग, ( ३ ) शिवलीलामृत-अध्याय ११ वा, ( ४ ) रुक्मिणीस्वयंवराचा बराच भाग, ( ५ ) मंत्र, रमल, पंचीकरण, हिशोब, हस्तामलक, शिवसहस्रनामावली, हरिपाठ, लेखणी, सुदामचरित्र, १६८० तील एक मौंजीपत्रिका, अष्टपदी, अमरकोश, रघुवंश, याचे कांहीं कांहीं भाग, ( ६ ) कांहीं पत्रें, ( ७ ) श्रीसमर्थ, माधव अनंत, गिरिधर, केशवचैतन्य, उद्धवचिद्धन, निपटनिरंजन, तुकाराम, नामदेव, बोधला, ज्ञानदेव, बालकराम, रोकडाराम, माधव रोकडा, दत्तसुत, जनी, शिवराम पूर्णानंद, शिवदिन केसरी, मध्वमुनेश्वर, मानपुरी, सुरदास, निरंजन, अमृतराय, भास्करसुत, देवनाथ, भानुदास, जगमित्रनागा, अनंतपंडितसुत साबाजी म्हणजे साबाजी अनंत, जयरामसुत, आनंदात्मज, गोसावीनंदन, देवीदासांकित, इत्यादि ज्ञाताज्ञात संतकवींची पूर्णापूर्ण पदपदांतरें, ( ८ ) किरकोळ

१५८६ ] वही-बंद ५३ पहिले दोन बंद नष्ट [ ७२

( १ ) ४२ पृष्ठापर्यंत ही वही मोडींत लिहिलेली आहे. पहिलीं दोन पृष्ठें गेलेलीं आहेत. ही बखर दिसते. तींत बहामणी राज्याचा मूळ पुरुष हसन गंगु याची मूळ हकिकत आहे.

( २ ) हिचा शेवट : " राजश्री साबाजी अनंत हे विनती मिती आश्विन शु॥ १२ रोज शुक्रवार सन १२७३ हस्ताक्षर बळिराम सखाराम वस्ती मौजे पांढर नंदापूर हा मुळापता ( ? ) सूर्यभान पा मौजे मार याहाचा असे वाचावयाकरितां लिहून घेतला असे "

( ३ ) ' मुळापता ' हा शब्द लागला नाहीं. पुढच्याच वहींत तो शब्द पुन्हां दोनदां आला आहे, त्यावरून मूळ पत्ता, मूळ हकिकत, असा अर्थ केला आहे. महिना, मिती, वार व फसली सन, यावरून या बखरीचा लेखनशक १७८५ ठरतो.

# १५८७ ]

वही–बंद ३३ [ ९६

( १ ) या वहीत शालीवाहन शकाचा आरंभ कसा झाला याची मोडीत लिहिलेली हकिकत आहे. तिचा आरंभ—" श्री मुळापता सालीवान सेक........साहेबी हुकुम फर्मावेला जे सालीमान सेक कैसा पयेदा जाला त्याची हकिकत जाहीर करावयासी रजा फरमाविली...... " तिचा शेवट—" इति श्री शालीवाहान शक मुळास्ता ( ? ) समाप्त सन १२५० फसली कार्तिक वदे ५......गोविंदाची वही होये... "

( २ ) फसली सन १२४५ तील कांहीं जमाखर्च व कांहीं पत्रांचे उतारे.

# १५८८ ]

बाड–पृ. सं. ४४ × २ = ८८
शेवटचीं व कांहीं मधलींच गेलेलीं [२००

मतिविवेक नामा उर्फ विष्णुदास नामा कृत उत्तरकांड

( १ ) मुखपत्रावर ' लहुकुशकथा प्रा ६ ' म्हटलें आहे, यावरून या कथेचे सहा च प्रसंग होते, असें दिसतें. प्रसंग १ ला, ओवीसंख्या ५८, मतिविवेक नामा, प्रसंग २ रा, ५३ व्या ओवीनंतर पृष्ठें गहाळ; प्रसंग ३ रा, ओव्या ३४ ते ३६, मतिविवेक नामा; प्रसंग ४ था, ओवीसंख्या ६८, मतिविवेक नामा, प्रसंग ५ वा, ओवीसंख्या ९४, विष्णुदास नामा; प्रसंग ६ वा , १०८ व्या ओवीनंतर पृष्ठें गहाळ

( २ ) प्रकरण नवीन दिसतें. मतिविवेक नामा ते च विष्णुदास नामा होत, पण मतिविवेक नामा हें नाव ऐकण्यात नव्हतें.

# १५८९ ]

बाड–पृ. सं. ३० × २ = ६०
आ. प. शे. चीं काहीं नष्ट [१५०

( १ ) श्रीसमर्थ, जनी, मुक्ता, दीना, कोकिळ, मागु, मीराके प्रभु गिरिधर, आत्माराम साळी, गो. नं., नामा, रामा जनार्दन ( आरती शनराजा, ) परशुराम ब्राह्मण ( आरती वेंकोबाची ) इत्यादिकांचीं पदपदांतरें, ( २ ) पोपाबेळाचरित्र–ओ. १४ अपूर्ण, ( ३ ) कांहीं सुभाषितें, ( ४ ) बारा मास–श्लोक ५८ अपूर्ण

# १५९० ]

गठ्ठा
चौदा तुकडे–रामविजय वगैरे [ १००

१८५९ चैत्र शु. १

येणें प्रमाणें विदर्भ प्रांतांत मजकडून आजपर्यंत घडलेलें अल्पसें संशोधन आहे. आज आतां

## किंचित् सिंहावलोकन

करावें, असें वाटतें. गेल्या अठ्ठावीस वर्षांत झालेलें श्रीरामदासी संशोधन सांगण्यास आपण १८५२ च्या ज्येष्ठांत म्हणजे १९३० च्या जून महिन्यांत आरंभ केला व गेल्या सहा वर्षांत १८२४ ते १८३५ अखेरपर्यंतचो म्हणजे इ. स. १९०२ ते १९१३ या पहिल्या बारा वर्षांतील संशोधनाची हकिकत सांगून झाली. पुढच्या सोळा वर्षांत, किंबहुना या क्षणापर्यंतच्या काळांत, विशेषतः कागदपत्रांचें संशोधन घडलें. त्या कागदपत्रांचें स्वरूप दर्शविणारा संशोधनाचा तिसरा खंड स्वतंत्र काढावा असें मनांत आहे. तथापि त्या काळांतील जरूरी-पुरती नुसती रोजनिशी इतक्या सनात येथें नमूद केलेली असावी, असें वाटतें, अशायाठीं कीं, तो तिसरा खंड माझ्या हातून न च लिहिला गेला, तर निदान कोठें आणि केव्हां कागदपत्रांचें संशोधन झालेलें आहे आणि कोठें व्हावयाचें उरलेलें आहे हें तरी संशोधकाच्या कानावर असावें. संशोधनास आरंभ केल्यापासून आजपर्यंत व्यक्तिशः पुष्कळांनीं आपल्या घरांतील किंवा बाहेरून मिळविलेलीं पोथ्यापुस्तकें आणि बाडें माझ्या हवालीं केलीं आहेत. तसें च या सबंध काळात जे हस्तलिखित ग्रन्थ मी कायमचे मिळवू शकलों नाहीं, त्यांच्या नकला करून ठेवल्या आहेत. तेव्हां बारा वर्षांच्या नंतरची रोजनिशी दिल्यावर, इतरांकडून मिळालेल्या पोथ्यापुस्तकांची, बाडांची व नकललेल्या ग्रन्थांची नोंद करून हा द्वितीय खंड पुरा करावा, असा विचार आहे.

## बारा वर्षां नंतरची रोजनिशी

१८-४-१९१४ मसूर, उंब्रज, पाटण

२०-४-१९१४ हेळवाक, कोंढावळें, हेळवाकची घळ. ही घळ अरण्यांत असून अत्यंत प्रेक्षणीय आहे. १५६६ पासून १५९६ पर्यंतचें श्रीसमर्थांचें चरित्र ह्या घळ शागते.

२२-४-१९१४ पुन्हां पाटण. देशपांडे यांचेकडील कागद पाहिले, त्यांच्या नकला करून घेतल्या. पाटणास संशोधनास अजून पुष्कळ जागा आहे.

२३-४-१९१४ चाफळ

२५-४-१९१४ उंब्रज. याळा केशव माधव पाटील यांचेकडील पांच ताम्रपट पाहिले, उतरून घेतले व परत केले.

१४-५-१९१४ लिंबगांव, कुडाळ आणि सरताळें. लिंबगांव आणि सायगांव येथील आपटे घराण्यात विपुल कागदपत्रें आहेत, असें समजलें. कुडाळ येथील देशपांडे यांच्याकडे ऐतिहासिक नोंदवही होती, ती उतरून घेतली. वाकेनिशी टिपण म्हणून श्रीसमर्थचरित्रविषयक प्रसिद्ध असलेलें टिपण करणारा पुरुष या च घराण्यांतला. सरताळ्यास हि वाकनीस होते. या खेपेस नाहीं, तरी पुढें एकदां त्यांच्या कडील कागदपत्रें पहावयास मिळालीं.

१२-५-१५ मसूर, शहापुर, उंब्रज. शहापुरास पांच सहा ताम्रपत्रें मिळालीं. तीं उतरून घेऊन परत केलीं.

१३-५-१५ चाफळ : दर खेपेस कांहीं तरी मिळे च, निदान दर्शन घडे.

१५-५-१५ सज्जनगड

१७-५-१५ मार्गांत च एकाएकीं लोणंद येथें उतरून शिरवळास गेलों. तेथील गेनु मोराजी ताभे व त्यांचा मुलगा कोंडिबा यांच्याकडून २७ कागदपत्रें मिळालीं. त्यांच्या नकला करून घेऊन तीं परत केलीं. नारायण बुवा आणि बाजी बुवा यांच्या समाधींचें दर्शन घडलें.

१८-५-१५ भोरास थोडा वेळ थांबून हिरडोशीस गेलों व रात्रीच्या मुक्कामाला मांझिरी गाठली.

१९-५-१५ वाटाड्या बरोबर घेऊन पहाटेस च प्रशांत वेळीं निघून डोंगराच्या काठाकाठानें जाव सज्जनगडा एवढा डोंगर उतरून कैक वर्षे निदिध्यास घेतलेल्या त्या पवित्र शिवतरखोऱ्यांत उतरलों. श्रीसमर्थांच्या चरणधूलीनें पुनीत झालेल्या घळीचें प्रथम दर्शन घडलें. या घळीला च श्रीसमर्थ सुंदर मठ म्हणत. तिचें त्रोटक वर्णन पृथ्वीवरील स्वर्ग म्हणून श्रीरामदासी मासिकाच्या पहिल्या च वर्षीच्या पहिल्या अंकात श्रीसांप्रदायिक विविध विषयांक २ यात आलें आहे. दैळवाकच्या घळीपेक्षा ही घळ मोठी आहे. घळीपासून एका हाकेवर त्या च डोंगरात वरच्या बाजूस चंद्रराव मोऱ्याचा वाडा होता. आता

त्याचा परटा शिल्लक आहे. पाणी अमृततुल्य आहे. येथून रायगड पाच कोसांच्या आत आहे. या पर्ळीत शके १५७६ ते १५८६ जाऊन येऊन व नंतर हि अनेक वेळा श्रीसमर्थ होते. १५७७ त शिवछत्रपतींनीं रायगड घेतला व १५७८ त चंद्रराव मोऱ्याचा काटा उपटून टाकला. श्रीसमर्थ या पर्ळीत व छत्रपति श्रीरवाडीत असता व मध्ये काळनदीला महापूर आला असता श्रीसमर्थांनीं श्रीशिवछत्रपतींना ' चमत्काररूपे दर्शन ' दिल्याची कथा श्रीसमर्थप्रतापात आहे व तिला कागदपत्राचा आधार आहे. वाद घालणारांनीं वाद घालीत पुशाल आयुष्य कठावें.

१९१६-१७ *अन्य व्याप*

२५-४-१८ चंभ्रज व चाफळ. या खेपेस चाफळास विपुल कागदपत्रें मिळालीं. येथें च

२६-४-१८ *हनुमजयंतीच्या दिवशीं श्रीसमर्थसंप्रदायजीर्णोद्धारादिकार्याचा* **संकल्प झाला.**

२८-४-१८ सज्जनगड

२४-१२-१८ मसूर, शहापुर, चंभ्रज. मसुरास आफळे व बुधकर यांच्या कडील काहीं कागदपत्रें मिळालीं.

२६-१२-१९ श्री क्षेत्र जाब. काहीं कागद पाहिले.

२८-१२-१९ सोनरोहें व शकरपुरवाडी-पूर्णेश्वरदेवस्थानासबधानें मह-त्वाच्या नोंदी पाहण्यात आल्या.

७-५-२० मसूर-आफळे व बुधकर यांच्या कडील आणखी विपुल कागदपत्रें मिळालीं.

९-५-२० कन्हाड-लक्ष्मणराव महादेव ऊर्फ नानासाहेव देशपांडे यांनीं आपल्या कडील सर्व कागदपत्रें दाखविलीं व इतर ठिकाणची माहिती दिली.

११-५-२० कोठें-विपुल कागदपत्रें पाहण्यात आलीं

१२-५-२० धरेगाव. *काहीं कागद मिळाले. भक्तमजरीमालाकार राजाराम प्रासादी या गावचे. राजारामप्रासादी हें एक नांव नसून त्यात दोन नावें येतात : राजाराम व त्याचा पुत्र प्रसाद. तेव्हा भक्तमजरीमाला ह्या*

ग्रन्थ या उभयतांनीं मिळून लिहिलेला असावा, असें वाटतें. तो मूळ ग्रन्थ त्यांच्या वंशजापाशीं आहे.

१३-५-२० चाफळ. देशपांडे यांच्या घराण्यांतील कागदपत्रें पाहण्यांत आलीं.

१५-५-२० उंब्रज

१६-५-२० शिरगांव. कागदपत्रें व बाडें पाहिलीं.

१६-५-२० खंडोबाची पाली. काळभोर व देशपांडे यांचे कडील महत्त्वाचे कागद पाहिले, कांहीं मिळाले, कांहीं उतरून घेतले. काळभोर व देशपांडे यांच्यांतील वादाचा श्रीशिवछत्रपतींनीं केलेला निवाडा श्री रामदासी मासिकांत प्रसिद्ध झालेला च आहे.

१८-५-२० तारळें. देशपांड्यांच्या कडील कांहीं कागदांच्या नकला करून घेतल्या.

१९-५-२० कळंब्याची घळ. अति सुंदर.

२०-५-२० निनाम पाडळी, डोळेगांवचा मारुती व सज्जनगड. निनाम पाडळीस मठ आहे. रघुनाथदिनकरकर्ते यांच्या पासूनची परंपरा येथें चालते. मठात स्वा. दि. ची अपूर्ण प्रत व १७०९ तील संतविजयाची प्रत पाहिली.

२९-३-२१ जांब, शंकरपुरवाडी

२१-३-२१ बारामती. कल्याणाचे शिष्य रामाजी दादा याचा येथें मठ आहे. मठांतील संग्रह पाहिला, त्यांत मुद्गलांच्या हातचा १६२२ तील दासबोध होता. त्याची दोन वेळची हकिकत मासिकांत येऊन गेली च आहे.

७-५-२१ पाल

९-५-२१ कोळें

१०-५-२१ कऱ्हाड-नाणेगावच्या वाघर देशमुखाकडील कागदांच्या नकला घेता आल्या.

११-५-२१ मसूर

१२-५-२१ उंब्रज, चाफळ, कऱ्हाड

२५-१२-२१ भाळगांव. श्रीसमर्थशिष्य त्र्यंबकराजाचा मठ.

२७-१२-२१ औरंगाबाद. निपटनिरंजनाचें स्थान पाहिलें.

२५-१२-२२ गवराई, शहागड

२६-१२-२२ घोंडराई. अमृता नदीच्या काठीं. श्रीसमर्थशिष्य मुद्गलराम यांनीं नदीच्या पात्रांत जेथें एका सराट्यांत मुद्गल रोविलें, तेथें हल्लीं मारुतीचें देवालय आहे. तेथील लोक मात्र या देवालयाची निराळी च उपपत्ति सांगतात. कांहीं कागदपत्रें मिळालीं. संशोधनास अजून पुष्कळ वाव आहे.

२७ १२-२२ आंवळ. पंचरत्नी भगवद्गीतेची सचित्र पोथी दीडशें रुपयास विकत मिळाली. पोथी अपूर्व, प्रेक्षणीय आहे. विचित्र माणसें, विचित्र काळ, विचित्र अनुभव !

१९२३-१९२६ निराळा च व्याप

१६-४-२७ तळेगांवदाभाडा. वाङ्मयचर्चा

१७ ४-२७ महाड. भोंवतालची माहिती करून घेतली.

१८-४-२७ नातें, वरंदोली, कोंझर. नात्यास दिव्य पादुकांचें दर्शन घडलें. तिन्ही ठिकाणीं कांहीं मिळालें. पाचाड येथें रात्र काढली.

१९-४-२७ **रायगडाचा माथा !!!** वर कागदपत्रें नव्हतीं, कारण वरती मनुष्यवस्ती च नाहीं, पण तेथील इमारतींच्या अवशिष्ट भागानीं—उद्ध्वस्त सिंहासनानें, नगारखान्यानें, वाड्याच्या पडक्या भिंतींनीं, भुयारांनीं, स्त्रियांच्या सहा महालांनीं, मागच्या जिन्यानें, मनोऱ्यांनीं, घरट्यांनीं, बाजारपेठेंतील दुतर्फा एकसारख्या दुकानांनीं, जगदीश्वराच्या प्रासादानें, श्रीशिवछत्रपतींच्या समाधीनें—फार काय, पण तेथील दगडांनीं, मातीनें, गंगासागर तळावानें, दिवसाच्या सूर्यानें, रात्रींच्या क्षणैक अंधारानें आणि नंतर उगवलेल्या चंद्रानें, तारागणांच्या चिरंजीव ध्रुवानें, वाऱ्यानें आणि आकाशानें १५९६ पासून १७४० पर्यंतचा आणि नंतरचा हि साद्यन्त इतिहास सारखा चोवीस तास मुकाट्यानें अश्रु ढाळीत सांगितला !! तो आपणास ऐकू येतो, पण सांगतां येत नाहीं. तो आपण हि ऐकावा, असें ज्यांना वाटेल त्यांनीं रायगडास जावें !

गेला भोंका गडांचा ह्यगजपतिचा आणि त्या भूपतींचा।
शूरांचा सज्जनांचा ऋषिजनमुनिचा आणि त्या देवतांचा।
भक्तांचा पंडितांचा चतुर सुमतिचा सावध्यां भाविकांचा।
नाना विद्याकवींचा कुशल जगतिचा बोलक्यां नेमकांचा॥

२०-४-२७ वाडी, छत्री निजामपूर, सांदोशी, पाचाड, वाळसुरें-ठिक-ठिकाणी कागद आहेत, पाहिले पण मिळाले नाहींत.

२२, २३, २४-४-२७ महाड, बीरवाडी, वरंधा-कांहीं मिळालें.

२५-४-२७ नळघड्याचें पठार, पारमाची, शिवतर खोरें

२६-४-२७ खडकेश्वर, चद्रराव।चा घरटा, श्रीसमर्थांची घळ, वाकी खुर्द

२७-४-२७ वाकी बुद्रुक, ( १९१४ ते १९१८ त झालेल्या जर्मनीविरुद्धच्या लढाईवर या लहानशा गांवांतून ८१ लोक गेले होते, पैकीं १८ कामास आले, असें जयस्तंभावरील लेखावरून दिसतें ), वरंधा. वरंध्याच्या देशमुखांकडील कागद पहावयास मिळाले.

२८-४-२७ महाड. एक बखर मिळाली.

२९-४-२७ पोलादपुर. काहीं कागद मिळाले.

१-५-२७ देवळें-चित्त प्रसन्न करणारा मनोरम देखावा. साकर, खडकवाडी ( येथून तानाजी मालुसरे याचें उमरेट गांव दिसतें, तेथें त्यांचा घरटा आहे ), देवळें

२-५-२७ बोरावळें-येथें हि चंद्रराव मोरे याचा एक घरटा आहे. चंद्रराव म्हणजे एक मोठें च प्रस्थ होतें. जशी निजामशाही, आदिलशाही, तशी चंदरराई. जावळी, बोरावळे आणि शिवतर या तिन्ही ठिकाणीं चंद्रराव मोरे याचे वाडे होते. हा पंधरा वीस कोसांचा सारा डोंगराळ टापु त्याच्या ताब्यात होता. कोंकणपट्टींतील आपल्या मुलुखाला निर्भयता आणण्यासाठीं शिवाजीराजाना चंद्ररावाला अनुकूल तरी करून घ्यावयास पाहिजे होतें, किंवा त्याचा कांटा उपटून टाकून हा मुलूख आपल्या ताब्यात घेणें अवश्य होतें. त्या मुलुखांत चंद्ररावाच्या घरट्यापासून एका हाकेवर शिवतरच्या घळींत श्रीसमर्थ जाऊन राहिले होते. कशासाठीं ! रानवडी, पोलादपुर. कांहीं ना कांहीं मिळतें च.

३-५-२७ महाबळेश्वर, वाई, सातारा

४, ५, ६, ७-५-२७ सज्जनगड

८-५-२७ उडतरें, सरताळें

९-५-२७ कुडाळ-देशमुख, देशपांडे यांचे कडील कागद पाहिले, कांहीं मिळाले.

१०-५-२७ जयरामस्वामींचें वडगांव-जयरामस्वामीकृत १७७६ तील रुक्मिणीहरण ग्रन्थाची प्रत, १५९१ तील अपरोक्षानुभव, १५७० तील सीतास्वयंवर व भागवताचा अभंगात्मक दशम स्कंध, असे चार ग्रन्थ पाहण्यात आले. पुसेसावळी.

११-५-२७ पुन्हां उडतरें, सरताळें व म्हसवें

१२-५-२७ अमृतवाडी-येथें काळे याच्या घराण्यांत इ. स. १८४१ तील एक प्रचंड वतननिवाडा आहे. सातारा-मल्हारपेठेंतील घर नं. १२०

१३-५-२७ मसूर

१४-५-२७ उंब्रज, चाफळ

१०-४-२८ भोर, नसरापुर, वनेश्वर ( रम्य स्थान. पहिले बाजीराव साहेब यांनीं बांधलें अशी आख्यायिका. देवापुढें घंटा आहे, तीवर एक फुली असून १६८३ सनाचा अंक आहे. समवतें कीं, वसईच्या लुटींत चिमाजीआप्पांनीं ही घंटा आणली असावी. )

११-४-२८ तांभाडें. येथें विठ्ठलराव सिलीमकर यांच्याकडे मराठ्यांच्या इतिहासाचीं साधनें-खंड १७ वा लेखांक १० वा याचा मूळ १५७९ तील श्रीशिवछत्रपतींचा महजर पहावयास मिळाला. शेवटीं ' मोर्तब सुद ' अक्षरें नव्हतीं ) जांभळी, वेल्याची पेठ

१२-४-२८ तोरणा किल्ला ( कोंकण दरवाज्याच्या बुरुजावर उभे राहून पाहिल्यास चौफेर प्रचंड डोंगर च दिसतात, सिंहगड, राजगड, प्रतापगड, रायगड हे किल्ले दिसतात ). कांहीं आणलें.

१३-४-२८ आंडिवली, मांगदरी, वोरवळे

१५-४-२८ भोर-एका ठिकाणीं कागद पहात असता, शंकराजी नारायण याचे अस्सल शिक्के सनदापत्रावर जेथें उमटवावयाचे, बरोबर त्या च जागीं उमटविलेले कोरे कागद आढळले !

१७-४-२८ आंबवडे-शंकराजी नारायण यांची समाधी, कान्होजी जेधे यांची समाधी, नागनाथाचें रम्य स्थान. जेधे देशमुख यांचे कडील कागद मिळाले. नाझरें-तेथें खोपडे राहतात. त्यांच्या कडे जुने कागद आहेत, अशी नक्की माहिती मिळाली, पण कागद पहावयास मिळाले नाहींत.

१८-४-२८ कारी-जेधेदेशमुख यांचेकडील कागदपत्रें मिळालीं. हिरडोशी येथें रात्रींचा मुक्काम. पन्नास साठ वर्षें या ठिकाणीं दुकान घालून असलेले विष्णु महादेव अळाटे कळवितात कीं, केंक, माळुसरे वगैरेंच्या कागदपत्राचा शोध या भागात साळवें, सायेंळवाडी, रायरी, धारव, दावकेघर, निवघण, धानवली, गुढें, माजिरी, शिरवली, कुडलीखुर्द व बुद्रुक, दुर्गाडी, आवेपुरी, शिरगाव, कारंगण, शिळिंब, कुड, राजेवडी, कोंढी, वेणुपुरी, देवघर, महरपुर्द, उंबरगणी, धामुणशी या पचवीस ठिकाणीं केला पाहिजे !

१९-४-२८ वरंधा, महाड

२०-४-२८ नातें, कोंझर येथें रात्रींचा मुक्काम. कांहीं कागद व समासद कृत श्रीशिवछत्रपतींची बखर मिळाली.

२१-४-२८ पाचाड-समाधी माता जिजाबाईसाहेब यांची च असावी, पण येथील लोक शंका प्रदर्शित करतात. ते निराळी च कथा सांगतात. थेट रायगडावर.

नाम घेत चढतां पद टाकी । धीरखें क्रमित मार्गे विलोकी ।
गांठिलें शिखर रायगडाचें । वंदिले चरण छत्रपतींचे ॥ १

२२-४-२८ वाडी, निजामपुर, वारंगी

२३-४-२८ वाळण, आईचें कोंड ( मोठाले मासे ), दरंधा-
ता. १९ ते २३ गडाला घनायाची प्रदक्षिणा च झाली.

२५-४-२८ तळीये, कीवें, पिंपळवाडी, कांगोरी किल्ला-थोडें मिळालें.

२६-४-२८ नडवडे-तेथें एकदा जामळीच्या चवुतऱ्यावर श्रीसमर्थ संतोषरूप वसले असता कल्याणस्वामी त्यास भेटावयास गेले होते, ती जागा ठरविली. स्वर्गतुल्य आहे. पाटीशीं पारमाची आणि शिवतरखोरें, आणि पुढें रायगड. रात्र काढली.

२७-४-२८ महाड
२८-४-२८ पोलादपुर, परत महाड
२९-४-२८ पुणें- पाच दिवस
५ ते ९-५-२८ भाटघर, महाबळेश्वर, प्रतापगड, जावळी, चद्ररावांचा घरटा- पाहून काय वाटलें तेवढें च, मिळालें काहीं नाहीं.
१०-५-२८ भाटघर
११-५-२८ वनेश्वर, पुणें

१७-५-२९ सातारा, संग्रज
१८-५-२९ घरेगांव, वाहागांव-भक्तमजरीमालेच्या शोधार्थ
१९-५-२९ सरताळे-कागद मिळाले
२०, २१, २२-५-२९ महाबळेश्वर-१६०६ तील दासबोधाची प्रत परत केली
२३, २४, २५-५-२९ सज्जनगड
२७, २८-५-२९ बेळगांव-साहित्यसमेलनात राजवाडेसशोधनमंदिर
४, ५, ६-६-२९ श्री क्षेत्र जांब-श्रीसमर्थमंदिराच्या पायाचा तळ गाठला, तेथील पूजाई दगड

यानंतर जे दौरे काढण्यात आले त्यात मुख्य हेतु आरंभीं श्रीसमर्थ-मंदिर-जांब व नतर श्रीसमर्थवाग्देवतामंदिर-धुळें या सार्वजनिक संस्थाना मदत मिळविण्याचा होता, सशोधनाचा हेतु सर्व काळ मनात अखंड अनुस्यूत असला तरी तो त्या दौऱ्यात गौण होता. त्या दौऱ्याची हकिकत अन्यत्र देण्यात आलेली आहे. त्यात घडलेल्या संशोधनाचें वृत्त तिसऱ्या खडात येईल.

## व्यक्तिशः इतरांकडून मिळालेला संग्रह

### ( १ ) कै. गोविंद काशीनाथ चांदोरकर

**१५९१** ] पोथी-पत्रें १४८० [ १५८

जयरामस्वामी कृत जयबोध

*या प्रचड ग्रन्थाचे अध्याय २० असून ओवीसख्या १५०७४ आहे. ग्रन्थ शके १७०१ त जयरामानीं स्वत, पुण्यास लिहिलेला आहे. तो सर्वस्वी*

श्रीमत् दासबोध ग्रन्थाधारें लिहिलेला आहे. तेव्हां त्याचें महत्त्व किती आहे, हें निराळें सांगणें नको.

१५९२ ] बाड–पृ. सं. ५० × २ = १०० [१२५

(१) तुकाराम, नामदेव, जनी, माळो, ,भानुदास, चांगा, रखुमादेवीवर

(२) बहुधा अनंतशिष्य कृत गजगौरीवोवसा–श्लो. ४६

(३) लीलाविश्वंभरप्रसादें जटासुरवध–ओ. १८

(४) बहुधा श्रीपति कृत प्रल्हादचरित्र–श्लो. २१

१५९३ ] ठिसूळ कागदाचा भुगा भोसल्यांची वंशावळ [१२५

१५९४ ] पोथी–पत्रें १५१ [२००

नित्यानंदसुत कृत वेदस्तुति–ओंवीसंख्या २६००

१५९५ ] पोथी–पत्रें १३१ [१५४

नित्यानंदस्तुति कृत वेदस्तुति–ओ. सं. २६०५

१५९६ ] पोथी–पत्रें ८५ [२००

नित्यानदसुत कृत वेदस्तुति–ओ. २६०५

१५९७ ] महाबळाचा नकाशा [२००

१५९८ ] पोथी–पत्रें ९२ + ९१ + ११२ = २९५ [१८७

त्र्यंबककविराज कृत बालबोध

कै. चांदोरकर यांनीं संपादिलेला हा श्रीएकनाथकालीन ग्रन्थ सभेच्या महाराष्ट्रधर्मग्रन्थमालेंत ग्रन्थ दुसरा म्हणून प्रकाशित आहे.

**१५९९ ]** पोथी–पत्रें ७२ + ७१ + १८ [१७१

त्र्यंबककविराज कृत बालबोध

**१६०० ]** पोथी–पत्रें २३६ [३५२

तुलसीदास कृत रामायण

**१६०१ ]** पोथी–विस्खलित पत्रें सुमारें ४०० [३००

तुलसीदास कृत रामायण

**१६०२ ]** पोथी–पत्रें १९१ [१५०

तुलसीदास कृत रामायण

**१६०३ ]** पोथी–पत्रें २१ पैकी १ लें व ३ रें नाहीं [११७

ज्ञानदेव विरचित महावाक्यनिरूपण

**१६०४ ]** पोथी–पत्रें ७१ [२००

वामन कृत गीता समश्लोकी

**१६०५ ]** पोथी–पत्रें सुमारें २०० [१२५

तुकाराम विरचित गीता अभंगात्मक

**१६०६ ]** पोथी–पत्रें १८ ते २४ अपूर्ण [१५०

त्रिविक्रम पाळु विरचित भक्तियोग

१६०७ ] पोथी–पत्रें १३ [२००

गणेशभट्ट अग्निहोत्रा लिखितं भूगोलवर्णनम्

१६०८ ] पोथी–पत्रें ६७
शेवटचीं फक्त २।३ पानें नाहींत [२००

एकनाथ कृत भिक्षुगीत–म्हणजे भागवतापैकीं तेविसावा अध्याय

१६०९ ] आठ निरनिराळ्या पोथ्या–पत्रें [१००-२००
१६, २०, ३२, १४, १०, ४०, ४१, ४८

ज्ञानदेव कृत उत्तरगीता–पूर्णापूर्ण आठ प्रती

१६१० ] पोथी–पत्रें ११
गुरुगीता–संस्कृत [२००

१६११ ] दोन पोथ्या
पत्रें २८ व ४५ [१००–१५०

रत्नाकर कृत उपदेशरत्नाकर–दोन प्रती,

१६१२ ] मोडी बलरवजा
रामविजय ग्रन्थ [१००

१६१३ ] मोडी बलरवजा
पत्रें १७२ [१००

गद्यांत भागवत

१६१४ ] बाढ–पृ. सं. ५७ × २ = ११४
यांहून जास्त नष्ट [१५०

(१) श्रीसमर्थ, तुकाराम, गहिनी, जनी जनार्दन, एकनाथ, निळा, कृष्णदास, जनी, अनंततनय, उद्धव, केशव, राघव किंवा राघवदास, नामा, जिमांड्या के आश्रित जनभट, शाहुसेन फकीर यांचीं पदपदांतरें

(२) बाबुसुत कृत गोमा ब्राह्मणीचें चरित्र– ओ. २९, (३) सादीचे अभंग, (४) कांहीं दोहरे, सुभाषितें

१६१५ ] बाड-पृ. सं. ८६ × २ = १७२ [१५०
आ. व शे. कांहीं गेलेलीं

( १ ) तुलसीदास, जसवंत, सुरदास, रामदास, अग्रदास, सखीदास, जगन्नाथ, नंददास, मानदास यांचीं हिंदुस्थानी पदपदांतरें; ( २ ) मोरोपंत कृत मंत्ररामायण; ( ३ ) ज्ञानदेव कृत उत्तरगीता

१६१६ ] बाड-पृ. सं. १४ × २ = २८ [१५०
एका मोठ्या बाडाचीं अवशिष्ट पृष्ठें

( १ ) मध्वनाथ कृत सखूचें चरित्र- अभंग १२ ते ६०
( २ ) तुकारामांचे कांहीं अभंग

१६१७ ] जमाखर्चाच्या आकाराचें उभवलेलें [२५०
बाड-पृष्ठें ८ ते ७६ मधलें एकाददुसरें गेलेलें

कृष्णदासमुद्गल कृत रामायण

१६१८ ] पोथी-पत्रें ९१ [१६६

मुक्तेश्वर कृत विराटपर्व-संपूर्ण, आठ हि अध्याय, सुंदर अक्षर, शके १६९० तील प्रत.

१६१९ ] बाड-पृ. सं. २०० × २ = ४०० [१००
आ. व शे. कांहीं नष्ट

एकनाथी भागवत

१६२० ] बाड-पृ. सं. ६४ × २ = १२८ [१५०
कांहीं नष्ट

( १ ) एकनाथ कृत कालिया आख्यान, ( २ ) चंद्रावली-श्लो. ५७, ( ३ ) पुंडलीकाचे श्लोक ५०, ( ४ ) देवदास कृत व्यंकटेशस्तोत्र, ( ५ ) नामा पाठक कृत चंद्रहासाची कथा

१६२१ ] बाड-पृ. सं. ६३ × २ = १२६ [१६६

( १ ) मुद्गलस्वामी कृत संस्कृत रामार्या–१०८, ( २ ) रामार्याची प्राकृत टीका, ( ३ ) रामार्याची टीका वामन कृत, ( ४ ) रामार्याची टीका नागोजीपंत कृत, ( ५ ) श्रीशंकराचार्य कृत दत्तात्रेयस्तोत्रम् ( ६ ) महाभारताच्या शांतिपर्वातील गोसावित्रीस्तोत्रम्, ( ७ ) श्रीधर कृत पारधीकथा, ( ८ ) प्रल्हादचरित्र–अपूर्ण, ( ९ ) हरिपाठाचे अभंग, ( १० ) किरकोळ

**१६२२ ]** बाड–पृ. सं. ५६ × २ = ११२ वरीं च नष्ट [१५०

( १ ) भूमिगोळ–शके १६६२ तील एका लेखकाच्या कल्पनेप्रमाणे भूगोल व इतिहास, ( २ ) चितोराम कृत ध्रुवचरित्र, ( ३ ) श्री श्लोक मनाचे.

**१६२३ ]** ११″ × ७″ आकाराचें महत्वाचें बाड–पृ. सं. १३८ × २ = २७६ [१५०

हें सबंध बाड रत्नाकर यांच्या कवितेचें आहे.

**१६२४ ]** १०″ × ६″ आकाराचें उभें बाड–पृ. सं. सुमारें ४०० [१५०

हें हि प्रचंड बाड मुख्यतः रत्नाकर यांच्या च कवितेचें आहे. त्यांत ज्ञानेश्वर कृत शुकाष्टक आहे व भानुदास यांचे कांहीं अभंग आहेत.

**१६२५ ]** बाड–पृ. सं. ६० × २ = १२० कांहीं नष्ट [१५०

( १ ) मनाच्या श्लोकांपैकीं कांहीं श्लोक देऊन त्यांना रामस्तोत्र नांव दिलेलें आहे; ( २ ) पावनी छंद

**१६२६ ]** बाड–पृ. सं. सुमारें २५० [१५०

या हि बाडांत मुख्यतः रत्नाकर यांची कविता आहे. एकनाथ कृत श्रीकृष्णदानप्रत व क्वचित् इतर.

१६२७ ] बाड-पृ. सं. १२३ × २ = २४६ [ १५०

हें हि बाड रत्नाकर यांच्या कवितेचें आहे. त्यांत उपदेशरत्नाकर, ज्ञानरत्नाकर, भागवत इत्यादि प्रकरणें आहेत.

१६२८ ] बाड-पृ. सं. ७२ × २ = १४४ [ २००

( १ ) श्रीसमर्थ, गोसावीनंदन, कबिर, सुरदास, त्रिंबक, एकनाथ, मुरारसुत, जनजसवंत, नामदेव, कृष्णानंद, श्यामा विठ्ठलदास यांचीं पदपदांतरें, ( २ ) श्रीसमर्थ कृत *युद्धकांड*-पहिलीं सात सर्गे.

१६२९ ] बाड-पृ. सं. ३३ × २ = ६६ [ १००

( १ ) मुक्तेश्वर कृत *नळोपाख्यान*-ओवी १५, ( २ ) वामन कृत *गजेंद्रमोक्ष*-श्लो. १०, ( ३ ) *भामाविलास*-श्लो. ४८, ( ४ ) *चतुःश्लोकी भागवत*-श्लो. ४९, ( ५ ) *मुकुंदविलास*-श्लो. ६५, ( ६ ) *यज्ञपत्न्याख्यान*-अपूर्ण, ( ७ ) मीराबाई व श्रीसमर्थ

१६३० ] बाड-पृ. सं. ६० × २ = १२० [ ७५

( १ ) पहिलीं २२ पृष्ठें मोडींत गणिताचे कांहीं प्रश्न, ( २ ) *बाळकराम कृत गजगौरी व्रत*, ( ३ ) *सीतास्वयंवर*-अपूर्ण

१६३१ ] विस्खलित बाड-पृ. सं. ५४ × २ = १०८ [ १५०

( १ ) अमृत, तुळशीदास, परमानंद, केशव, रामलिंग, शिवदिन केसरी, उध्दवचिद्घन, दीनदास, रत्नाकर, अनंत कवि, रामानंद, मुद्गल पंडित वगैरे यांचीं पदपदांतरें, ( २ ) *गोमतीसंगमचरित्र*

१६३२ ] किरकोळ बाड पृ. सं. २१ × २ = ४२ [ १५०

( १ ) कांहीं मंत्र, तंत्र, आयुष्यमान, ( २ ) एकनाथ कृत जोहार व दशावतार, ( ३ ) कचेश्वर कृत द्विजदेवाची आरती, ( ४ ) तुका, आनंदात्मज, उद्धवचिद्घन, मध्वमुनेश्वर यांचीं पदपदांतरें

१६३३ ] बाड-पृ. सं. सुमारें २५० [ १५०

( १ ) श्रीसमर्थ, तुकाराम, नागनाथ, अमृतराय, शिवदिन केसरी, रंगनाथ निजानंद, सच्चिदानंदसेवक, आनंदात्मज, चोखामेळा, एकनाथ, उ. चि., शिवराम पूर्णानंद, वामन, केसरी, मध्वमुनेश्वर, माधवदास, कबिर, देवनाथ, बापरखुमादेवीवर, सुरदास, विठा, नारायण केसरी, सज्जनरंजन, नामा, जनी, केशव, जीवनसुत, राघवदास, अनंत, अनंतसुत, बाळकेशव, जन पंडित, कृष्णदास, मीराबाई, श्याम, मोरोपंत, इत्यादिकांचीं पदपदांतरें ( २ ) वामन कृत लोपामुद्रा आख्यान व ( ३ ) भरतभाव, ( ४ ) सुभाषितें, ( ५ ) अष्टपदी

१६३४ ] बाड-पृ. सं. ५१ × २ = १०२ [ १५०

( १ ) ज्ञानदेव कृत गीता, ( २ ) किरकोळ

१६३५ ] बाड-पृ. सं. ६७ × २ = १३४ [ २००
ज्ञानदेव कृत उत्तरगीता

१६३६ ] बाड-पृ. सं. ३५ × २ = ७० [ १५०
कांहीं मधलीं नष्ट

( १ ) कृष्णदासमुद्गल कृत रामायण-कांहीं अध्याय, ( २ ) कृष्णयाज्ञवल्कीं कृत एकादशीव्रत, ( ३ ) माधवनंदन कृत भामाविलास, ( ४ ) वामन कृत गोपीगीत

१६३७ ] बाड-पृ. सं. २६ × २ = ५२ [ १५०
कांहीं नष्ट

बडवाळ सिद्ध नागेश याचा शिष्य जंगली फकीर सय्यद हुसेन कृत कांहीं पौराणिक कथा

१६३८ ] बाड-पृष्ठें ३ ते ११ [१०३

(१) विठ्ठल किंवा विठ्ठलदास कृत जानकीस्वयंवर, (२) अनंतसुत मुद्गल कृत रुक्मिणीस्वयंवर, (३) कृष्णदास कृत पदपदावरें, (४) कल्याण कृत अष्टपदी उद्धारी रामा पतीतपावना।, (५) नारायण कृत व्यंकटेशाष्टक, (६) स्तोत्रदशक-मुकुंदा गोविंदा परम सुखकंदा यदुपति। पदांबुजीं ठेवी भ्रम हरुनि माझी निजमति ॥, (७) गोसावीसुत कृत शंभुपंचक, (८) कृष्णदास कृत येकनाथ-श्लोक ४, (९) कांहीं मंत्र

१६३९ ] बाड-पृ. सं. १५० × २ = ३०० [१५४

(१) श्रीसमर्थ, तुकाराम, आदिनारायण, ज्ञानदेव, अमृतराय, मध्वमुनेश्वर, केशव, रंगनाथ, विष्णुदास नामा, जनी, नामा, कोकिळ, चिंतामणी, कबिर, विठ्ठल, ज्योतिबाबा, गोपाळ, उधो शाम, तुलसीदास, शाहा हुसेन् फकीर, उ. चि., कृष्णदयार्णव, वगैरेंचीं पदपदावरें, (२) नमस्कार त्या सूर्य नारायणासी ॥ श्लो. १२, (३) मिताक्षरी बोलण्याची रीत, (४) येणाबाई कृत कौल, (५) अमृतराय कृत दामाजीपंत, (६) औषधें, मंत्र, वगैरे, (७) शके पंचराषे येकाहातरी। विरोधी नाम संवत्सरीं। फाल्गुन वद्य द्वितीया चंद्रवारीं। तुका वैकुंठाभीतरीं प्रवेशला ॥

१६४० ] बाड-पृ. सं. ६ ते ३६ [१५०

(१) श्रीसमर्थ, केशवराज, तुका, अमृतराय, एकनाथ, आदिनारायण, विठ्ठल, राघवात्मज, आनंदसुत, त्र्यंबकसुत, सज्जनरंजन, शंकरसुत, कोकिळ, जीवराजसुत, रंगनाथ, मध्वमुनेश्वर इत्यादिकांचीं पदपदावरें, (२) नामदेवचरित्र-हिंदुस्थानी भाषेत, कडवीं २६

१६४१ ] बाड-पृ. सं. ३८ × २ = ७६ [१५०

(१) एकनाथ, तुकाराम, ज्ञानदेव, जनी (२) विठो विश्वनाथ कृत गणपतिस्तोत्र

## १६४२ ]

बाड–पृ. सं. ६४ × २ = १२८ [ १५०

(१) शिवदिन, रत्नाकर, नामानंद, बाळकृष्ण, मध्वनाथ (२) उपदेशरत्नाकर

## १६४३ ]

बाड–पृ. सं. ५१ × २ = १०२ [ १५०

(१) पवनविजय, (२) मानसी आचार्य विरचित उपदेश, (३) रामरक्षा (आपण म्हणतो ती नाहीं, निराळी), (४) चक्रे, शकुन, वगैरे

## १६४४ ]

बाड–पृ. सं. ६२ × २ = १२४ [ १५४

(१) मध्वनाथ, तुकाराम, मुक्ताई, शंकर, दीन, कविरशिष्य भोळानाथ, अनंततनय, नारायण केसरी, यांचीं पदपदांतरें, (२) कृष्णदास मुद्गल कृत रामायणांतील रावणवधाचा अध्याय, (३) प्रल्हादचरित्र–ओवीसंख्या ८३, (४) चोळराव आख्यान, (५) पद्माक्षराजाचें आख्यान.

## १६४५ ]

बाड–पृ. सं. ३४ × २ = ६८ [ १००

(१) तुकाराम, दास दिगंबर, नामदेव, जनी, अनंतसुत, उदयचिद्घन, एकनाथ यांचीं पदपदांतरें, (२) नमस्कार माझा तया येकनाथा ॥

## १६४६ ]

बाड–पृ. सं. ३८ × २ = ७६ [ ११२

हें सबंध बाड मंत्र, यंत्र, तंत्र यांचें आहे. त्यांत किरकोळ औषधें आहेत व पंचमुखीहनुमत्कवच आहे.

## १६४७ ]

पंचांगांचें दफ्तर [ १६१ ते १७१

या दप्तरांत एकंदर ४२ + १ = ४३ पंचांगें आहेत. तीं शके १६१८, १६२१ ते २३, १६२९ ते ३१, १६३५ ते ३८, १६४०, १६४५, १६४८–४९, १६५१, १६६०, १६६१, १६६५ ते ६८, १६७० ते ७५,

